# सुधारणेचा मनु.

लेखक :- नरहरी

सदाशिव पेठ पुणे.

१९३६

# अनुक्रमणिका.



# प्रस्तावना.



महाराष्ट्रांत गेल्या तीस चाळीस वर्षांपासून सामाजिक सुधारणेची जी लाट उसळली आहे तिच्या कटु परिणामांतील एका बाजूचें चित्र रेखाटण्याचा प्रस्तुत कादंबरीमध्यें प्रयत्न केला आहे. सुधारणेचीं तत्त्वें अति उत्कृष्ट असतील परंतु त्यांचीं रोजच्या व्यवहारांत दिसणारीं फळें जर घातुक असलीं तर त्या तत्त्वांवर तिलोदक सोडणेंच इष्ट असें आमचें मत आहे. महाराष्ट्राची समाजरचना पूर्वींपासून अशी मजेदार आहे कीं, तिच्यांत व्यक्तींना हवी इतकी पण नीति उल्लंघूं नं देणारी स्वतंत्रता आहे. परंतु अमर्याद स्वतंत्रतेला मात्र मज्जाव आहे. महाराष्ट्रामध्यें हिंदुस्थानच्या इतर सर्व प्रांतांपेक्षां विशिष्टत्व आहे अशी आमची समजूत आहे. या समजुतीच्या समर्थनार्थ अनेक सबळ प्रमाणें देतां येतील, परंतु त्या मुद्द्याशीं सांप्रत आपणांस कर्तव्य नाहीं. तो विषय निराळा आहे. महाराष्ट्रांत सुधारणेचा प्रवेश झाल्यापासून विधवाविवाह, बालविवाहनिषेध, रूढ धर्माचा अनादर वगैरे सर्व तत्त्वांचा व्यक्तिशः परिणाम काय घडतो आहे, त्याचें स्वरूप किती भयंकर आहे याचा विचार आह्मी या कादंबरीच्या रूपानें जगापुढें आणीत आहों. *सुधारणेविषयींचीं जीं आमचीं मतें या पुस्तकांत प्रकट झालीं आहेत त्यांना स्नेही मंडळीशीं झालेल्या वादविवादानें ठामपणा आला असून त्यांच्याच प्रोत्साहनानें या कादंबरीचें समग्र लेखन आमच्या हातून पार पडलें.

येथें एक अशी शंका उपस्थित होईल कीं,जर आह्मांला सामाजिक सुधारणेच्या विषयावर लिहावयाचें होतें तर त्याला एखादा स्वतंत्र ग्रंथ लिहिला असता तर काय हरकत होती ? प्रश्न बरोबर आहे, परंतु हल्लीं महाराष्ट्रीयांमध्यें कसल्या प्रकारची वाङ्मयाभिरुचि आहे तिचा विचार केला ह्मणजे आह्मीं जर ग्रंथरूपानें आमचे विचार समाजापुढें मांडले असते, तर त्याच्याकडे कोणींच लक्ष दिलें नसतें. सध्यां सरस, सुरस, गौरव वगैरे उपपदांनीं भूषित पुस्तकांच्या मालांवर अथवा मनोरंजनादि मासिकांवर जशी वाच-

कांची उडी पडते तशी ती इतर वाङ्मयावर पडत नाहीं ही गोष्ट निराळी सांगण्याला नको. या कथात्मक वाङ्मयाची अनिवार आवड उत्पन्न हो-ण्याला एक कारण जें आह्मांस दिसतें तें प्रणय, प्रेम अथवा अनुराग या गोंडस नांवाखालीं दिल्या जाणाऱ्या आचुकमाचुकांच्या गोष्टी हें होय. महा-राष्ट्राच्या चित्ताला सांप्रत प्रणयाच्या रोगानें इतकें पोखरून टाकलें आहे कीं, कथात्मक हलक्या वाङ्मयाखेरीज महाराष्ट्रीयांचा बुद्धीला तत्त्वज्ञान, इतिहास व अशासारख्या इतर गहन विषयांचा भार संभाळण्याची ताकदच उरली नाहीं. भाषेंतील ग्रंथ हें एक राष्ट्राच्या समृद्धीचें लक्षण मानिलें जातें, परंतु आमच्या बाह्य दारिद्र्याला मदत करण्याला बुद्धीचा कंगालपणा आजपर्यंत कधीं सरसावला नव्हता. पूर्वीं जेव्हां आह्मी मुसलमान सत्ते-खालीं नांदत होतों तेव्हां सुद्धां आह्मी बुद्धीनें आजच्यासारखे भिकारी बनलों नव्हतों. त्या वेळीं महाराष्ट्राची बुद्धि अध्यात्मांत रमली होती. श्रीमद्भगव-द्गीता, योगवासिष्ठ वगैरे संस्कृतांतील तात्त्विक ग्रंथांना मराठींत भाषांतर अथवा टीकारूपानें आणून महाराष्ट्राचे निःस्वार्थ ग्रंथकार महाराष्ट्राच्या चि-त्ताला स्वराज्यसंपादनाच्या काळीं लागणाऱ्या धैर्य, साहस, निःस्पृहता, शांति वगैरे अनेक गुणांचें वळण लावीत होते. हिंदुस्थानांतच काय पण सगळ्या जगांत अध्यात्मासारख्या अवघड विषयावरील ग्रंथसंपत्ति एक संस्कृत भाषा वगळली असतां महाराष्ट्रभाषेइतकी कोणत्याहि भाषेमध्यें सांपडणार नाहीं. आज आमचीं मनें निराळ्याच विषयांत तल्लीन झालीं आहेत. वेदान्ताचा विराग सुटला आणि अनुरागाच्या पिशाचानें आह्मी झपाटले गेलों. महाराष्ट्राची बुद्धि प्रणयानें रंगविलेल्या कथापुस्तकांच्या रूपानें ऱ्हासास लागल्याचें आज स्पष्ट दृग्गोचर होत आहे.

ग्रंथकाराचें कार्य अत्यंत उदात्त, पवित्र व अवघड असतें. राष्ट्राचे विचार बनविण्याचें श्रेय ग्रंथकाराच्या पदरांत पडायचें असतें. परंतु आपली जबाब-दारी न ओळखून लेखनाचा व्यवहार करणारे लेखक राष्ट्राच्या बुद्धीला भ्रष्ट करणारे अतएव पातकी होत.

आमच्या मतें कादंबऱ्या हें भाषेंतील हलक्या दर्जाचें वाङ्मय आहे. मग आह्मीं तरी ही कादंबरी कां लिहिली? या प्रश्नाचें उत्तर वर एकदां पर्यायानें दिलें आहे. दुसरें कारण असें आहे कीं, सध्यां जी अभिरुचि लोकांत प्रचलित आहे तिच्याच साह्यानें आपलें ह्मणणें लोकांच्या गळीं उतरवावें. थोडे दिवसांपूर्वी एका प्रसिद्ध महाराष्ट्रीय इतिहाससंशोधकानें शिवराज्याभिषेकोत्सवप्रसंगीं श्री शिवाजीमहाराजांच्या कालापूर्वीच्या तीनशें वर्षांचा आढावा सांगतांना खालीलप्रमाणें उद्गार काढल्याचें आह्मांस स्मरत आहे—"श्रीशिवाजीमहाराजांपूर्वीं तीनशें वर्षे महाराष्ट्रांत व्रतानुष्ठानादि इष्टदेवतासंतर्पणाचा मार्ग अतिशय बोकाळला होता. या भक्तिपंथाविरुद्ध एकदम जाऊन श्रीसमर्थादि कर्त्या पुरुषांना आपलें इष्ट साधतां आलें नसतें ह्मणून त्यांनीं रूढ पंथाची लालूच दाखवून चुचकारीत चुचकारीत लोकांना स्वकार्याकडे वेधून घेतलें." आमचे विचार सांगण्याकरितां आह्मीं तीच दिशा स्वीकारली आहे. लोकांना सांप्रत कादंबऱ्या वाचण्याची चटक आहे तिचा फायदा घेऊन आह्मी ही सामाजिक कादंबरी महाराष्ट्रास अर्पण करीत आहों. केवळ करमणूक करून दमलेलें मन रिझवावें एवढाच आमचा उद्देश नाहीं. सामाजिक प्रश्नांचा विचार करण्यास वाचकांना प्रवृत्त करावें अशा हेतूनें आह्मीं कादंबरींतल्या पात्रांची व प्रसंगांची मांडणी केली आहे. सामाजिक सुधारणेचा मोहकपणा परिणामीं कसा होऊं शकतो याचें दिग्दर्शन करतांना आह्मी फक्त एक दोनच अनिष्ट अंगांचा ठळक उठाव केला आहे. आमच्या कादंबरीची योग्यता समाजांत काय ठरेल ती ठरो. कोणत्याहि श्रेष्ठतादर्शक शब्दांनीं आह्मी आमच्या कृतीचें मंडन करीत नाहीं. प्रस्तुत प्रयत्नाच्या गुणदोषाचा निवाडा करण्यास समर्थ असे महाराष्ट्रांत कांहीं मार्मिक व रसिक विद्वान् आहेत.

लेखक.

---

## जग हें त्रिविध आहे.

लेखक—रा. रा. सीताराम केशव दामले. बी.ए., एल एल. बी.

जगामध्यें मुख्यतः आटळून येणाऱ्या त्रिविध गुणांचें वर्णन या कादंबरीमध्यें उत्कृष्ट तऱ्हेनें पहाण्यास सांपडतें. सदानंदराव सुखात्मे यांची सहजानंदनिमग्नता, श्रीपतराव कांचने यांची संपत्तिलोलुपता आणि बृहस्पतराव कुशाग्रे यांची रोमान्सप्रियता यांचें चित्र अत्यंत चटकदार रीतीनें रेखाटलें आहे. आजकालच्या मराठी कादंबऱ्यांमध्यें या कादंबरीनें आबालवृद्धांस चटक लावून सोडली आहे व मार्मिक विचारसरणीचे योगानें ही सर्वांस पसंत झाली आहे. किंमत दीड रुपया.

## वत्सला आणि अभिमन्यु.

लेखक—नरहरि.

वत्सलास्वयंवर हें पौराणिक कथानक पुष्कळांना ठाऊक असेल. या अद्‌भुत कथेला नवीन वळण देऊन जास्त माधुरी आणली आहे. श्रीकृष्ण परमात्म्यानें अभिमन्यु व वत्सला या योग्य जोडप्याचा संयोग कसा घडवून आणला याचें चटकदार व रसपूर्ण वर्णन या कादंबरींत वाचकांस पहावयास सांपडेल. किंमत आठ आणे.

## प्रेमपरीक्षा.

भलत्या शिक्षणानें व प्रेमविषयक कादंबऱ्यांच्या वाचनानें स्त्रीपुरुषांच्या डोक्यांत वेडेचार कसे शिरतात आणि त्यामुळें त्यांच्या संसाराचें कसें मातेरें होतें हें या कादंबरीच्या वाचनानें चांगलें कळून येणार आहे. किंमत बारा आणे

## कमलिनी.

संसार सुखप्रद होण्यास पतिपत्नींनीं परस्परांशीं एकनिष्ठ रहाणें कसें जरूर आहे, तारुण्यावस्थेमध्यें फाजील मनोविकारांच्या अधीन होऊन उच्छृंखल वर्तन केलें असतां कशीं भयंकर पातकें घडतात, इत्यादि गोष्टी ही कादंबरी वाचल्यानें वाचकांना चांगल्या समजतील. किंमत एक रुपया.

सूचना—सर्व पुस्तकांस टपालखर्च वेगळा.

सेक्रेटरी, अष्टेकर आणि मंडळी. ७७६ सदाशिव पेठ, पुणें.

॥ श्री ॥

# सुधारणेचा मनु.



## प्रस्ताव.

आज त्या गोष्टीला सुमारें पंधरा वर्षे झालीं. त्यावेळीं विश्वभक्षक काळाचा एक प्रतिनिधि महाराष्ट्राच्या समुद्रकिनाऱ्यावर उतरून नुकताच बोरघाटाच्या अलीकडच्या इतिहासप्रसिद्ध मैदानी मुलुखावर आपल्या स्वामीचें कार्य करूं लागला होता. स्वराज्यनाशाच्या आपत्तीनंतर इतर त्रिविध ताप थोड्याबहुत रूपान्तरानें आमच्या मानगुटीस कायमचे बसले. परंतु मराठ्यांच्या भरभराटीच्या काळांत अगर त्यापूर्वी माहीत असलेल्या दुष्काळ, महामारी, इत्यादि कालदूतांपेक्षांहि भयंकर असे वरील अपरिचित पाहुणे येथें आल्यापासून मनुष्यसंहाराच्या कामाची मोठी चलती आहे. पूर्वी येथल्या मानवी बाजाराचे कायमचे गिऱ्हाइक झालेल्या यमाच्या गुमास्त्यांनीं आपआपल्या परीनें मनूच्या भारतवर्षाच्या संततीचे पिंड इतके निकस करून टाकले कीं, या पश्चादागतांची पोळी पिकण्यास आयतीच सोय झाली. बिनीवरच्या फौजांनीं शत्रूच्या सेनेला पक्कें कैचींत धरून शह दिलेला असल्यावर मागच्या सेनेला विजयाची माळ जशी आयतीच घालायला सांपडते त्याप्रमाणें पूर्ववीरांनीं निःसार करून टाकलेल्या भारतीयांच्या देहावर बिनधास्त सत्ता गाजविण्यास प्लेगोबांना चांगलें अवसान सांपडलें. समुद्राला घुसळून त्यांतून रत्नें काढण्याच्या देवदानवांच्या दंगलींत वासुकीच्या मुखांतून बाहेर पडलेलें विष हजारों वर्षांनंतर फिरून भूतलावर अवतरलें व काळानें या जुन्या विषाच्या श्रीगणेशाचा प्रयोग प्रथम गणेशाच्या वाहनावर करून तें रामबाणाप्रमाणें अचुक गुणकारी आहे असें आढळ-

तांच त्याचा प्रसार माणसावर करण्यास आरंभ केला. या संहारक घोर विषाच्या अव्वल कारकीर्दींत त्याच्या प्रतिकारासाठीं राज्यकर्त्यांनीं योजलेल्या उपायाला अपायाचें स्वरूप आल्यानें महाराष्ट्रीयांनीं अधिक घाबरून गेल्यास नवल नाहीं. हजारों लोकांनीं गजबजून गेलेलें, पण गत झालेल्या ब्राह्मणशाहीचें उत्कर्षास चढलेलें केंद्र या दुहेरी जाचानें उघडें पडलें. जिच्यावर पूर्वजांची भिस्त, जी प्रत्यक्ष वर्तमान काळ, त्या तरुण व नुकत्याच उमललेल्या पिढीवर काळाची धाड पडल्यामुळें सर्वत्र दैना उडून गेलेली! प्राणाहून प्रिय मानलेल्या बायकापोरांना अकालींच मुकल्यामुळें दुःखानें वडील मंडळींचीं मनें करपलेलीं! अशा स्थितींत शहर निर्जन झाल्यास नवल काय? कोणाच्या घरांत रोगी आहे असा वास येतांच त्यास मुलाबाळांच्या व आईबापांच्या प्रेमांतून लोकांच्या बऱ्याकरतां निर्दयपणानें खेचून नेणारे लोक दत्त ह्मणून ठेवलेलेच. या तापामध्यें आयांना कोंवळ्या अर्भकांची, पतींना स्त्रियांची व त्यांना पतींची ताटातूट होऊन अगोदरच जाऊं पहाणारे प्राण लवकर देहमुक्त होण्याची मोठी सोय झाली होती. अशा एका प्रसंगीं, एका मोठ्या घरांत, एक इसम रोगाच्या वेदनांना त्रासून जीव जाण्याची वाट पहात तळमळत पडला होता. सगळ्या घरांत शुकशुकाट असून शुश्रूषेला त्याजवळ कोणी नव्हतें. सबंध गांव ओसाड. रस्त्यांत रहदारी जवळजवळ बंदच. अशा स्थितींत त्याच्या निःशक्त कंठांतून बाहेर पडणारा आर्त स्वर ऐकून मदतीसाठीं धावून जाणारा सांपडणें कठिण. त्यांतून जो तो आपल्यापुरतें पहाणारा असल्यानें एखाद्यास त्याची किंकाळी ऐकूं गेली असल्यास आपल्या शिराच्या सलामतीसाठीं रोग्याचा संसर्ग होईल तितका टाळणेंच त्याला प्रशस्त वाटणार. कोणतेंहि कारण असो पण कालाच्या तावडींत गेलेल्याला उपायांची अखेरपर्यंत शिकस्त करण्याची प्रवृत्ति सुहृदांत नव्हती एवढें त्या रोग्याच्या एकटेपणावरून कळण्यासारखें होतें. बिचाऱ्याचे हाल हलके करण्यास जीवाशीं जीव बांधून घेतलेली प्रत्यक्ष पत्नी देखील तेथें नव्हती. तो तळमळे, अस्फुट स्वरांत कोणास तरी हाक मारी, निस्त्राण

झालेल्या डोळ्यांनीं आसपास पाही व फिरून जवळ कोणी नाहीं असें समजल्यावर स्वस्थ पडे. "आई आई, देवा," इत्यादि शब्द त्याच्या तोंडून मधूनमधून पडत. त्याच्या परिस्थितीकडे नजर टाकतांच शेजारीं पडलेल्या चारदोन निरनिराळ्या रंगांचें कमी अधिक पाणी असलेल्या बाटल्यांवरून, रोगाची त्यावर झडप पडतांच घरांतल्या माणसांनीं कांहीं उपचार केल्याचें अनुमान होण्यास हरकत नव्हती. पण प्रेमाच्या उत्कट प्रेरणेनें त्या गुणकारी निर्जीव औषधामध्यें चेतनाशक्ति उत्पन्न करणारीं मायेचीं माणसें तेथें नव्हतीं. ममत्व टाका ह्मणून वेदान्त सांगतो त्याची दीक्षा सर्वांनीं एकदम घेतली होती कीं काय नकळे. पानें गळलेल्या झाडांचा जसा पांखरें त्याग करतात तद्वत् सुखानें पालट खातांच आपलेपणाची बढाई मारणारीं शिताभोंवतींचीं भुतें पार नाहींशीं झालीं. कठिण समयाच्या भट्टींत कस लावण्याची वेळ आली ह्मणजे प्रेमाचें घनत्व लोपून तें वितळून जातें असा सार्वत्रिक अनुभव आहे व त्याशीं विरुद्ध असें आचरण त्या रोग्याच्या स्थितीवरून कोणत्याहि आप्तेष्टानें केलेलें नव्हतें. एवढ्या थोरल्या भरलेल्या घरांत आज एकटें रोगाच्या माऱ्यानें जर्जर होऊन पडण्याचा प्रसंग आला तेव्हां त्याला काय वाटत असेल? आपला पूर्वकाल स्मरून तो ह्मणत असेल—

"शिक्षण संपादून मी कर्ता झालों तेव्हां माझ्या नवीन आचारविचारांशीं समानधर्म असलेली सहचारिणी मीं वरली. शिक्षणानें संस्कृत झालेली ती माझ्यावर अकृत्रिम प्रेम दाखवी, मला तिच्या वर्तनाचें कौतुक वाटून मी स्वर्गाला तुच्छ मानीत असें, मूळची संपत्ति व बड्या तनख्याचा सरकारी अधिकार या दोन गोष्टी अनुकूल असतांना आमच्या मनोराज्याप्रमाणें नवीं नवीं सुखें निर्माण करण्याला कठिण पडत नसे. मी कचेरींत गेलों ह्मणजे तेवढ्या विरहाचा असह्य त्रास होतो ह्मणून ती मला नेहमीं सांगे. इंग्रजी शिक्षणामुळें राज्यकर्त्यांच्या अगदींच नव्या अशा रीतीभाती पाहून तिची वागणूक प्रसंगीं मर्यादेच्या बाहेर जाई. नव्या दमाच्या जोडप्याचा कलह कांहीं वाईट नाहीं. असे प्रेमळ तंटे उडाल्यांत मौज. एकूण घरांत कांहीं

कामधंदा नसल्यामुळें सगळ्या रिकामपणांत वाचनानें मनाला शिक्षण देण्याला तिला अवसर होता. सहचरी या शब्दाला मीं बाणेदारपणानें जुन्या मताच्या टवाळखोरांची भीड न धरतां सार्थ केलें होतें. पुरुष मंडळींत यथेच्छ मोकळेपणा दिल्याचा एक परिणाम अलीकडे दृष्टीस पडत होता व त्यामुळें ती जराशी बहकली असावी असा अंदाज होतो. ती मला अशा स्थितींत टाकून गेली हा त्याचाच तर परिणाम नसेलना? ती ह्मणे-"तुह्मी मला नापसंत वाटल्यास दुसरा वर—एका नवऱ्याच्या देखत दुसऱ्याशीं लग्न— हिंदूंच्या कानाला हीं कल्पना अशुभ, अमंगळ वाटेल. मला देखील राग येई. पण विचारस्वातंत्र्याचें हें नवें युग आहे. एकंदर प्रेमाच्या बडेजावीवरून ती गमतीनें बडबडत असेल ह्मणून मी स्वस्थ होतों. ते दिवस आज नाहींत! मी मेलों असें मानून तिनें दुसऱ्याशीं पुन्हां विवाह— माझी माल-मत्ता— माझा तान्हुला— ही त्या दुसऱ्याची? होय. ती संध्याकाळ मला आठवते.— नसेल मरणानें विरहातुर होऊन ती जीवच देईल. आणि असें झालें तर माझें बाळ— ईश्वरा तूंच त्राता आहेस! हा सगळा मायेचा बाजार आहे. ती मला व मी तिला मुकलों. प्रेमाची भाषा ऐकण्याला मधुर पण प्रत्यक्षांत त्याचा मागमूस सांपडेल तर शपथ—" इतका वेळ विचार अंत-रंगांतच होते. पण आतां मनावर ताबा न राहून ते तोंडावाटे बाहेर पडूं लागले. "मित्रा— माझ्या अनाथ भार्येला सनाथ— मला तें सहन होत नाहीं. बघ, जगलों तर तुझा प्राण घेतों. हें स्वातंत्र्य आमच्या समाजाला नको— काय ही दुर्दशा— कारण शिकलेले लोक. माझा बाळ पाप्याच्या घावानें मरणोन्मुख पडला आहे— कोण आहेरे— सूड— शिपाई— खून खून." त्याचें भान गेलें व शेवटीं बरळतां बरळतां तो बेशुद्ध झाला.

* * * * *

वरच्या गोष्टीला पंधरा वीस दिवस झाले. सायान्हींची वेळ, प्लेगच्या धामधुमींत घरादारांना तिळांजळी देऊन रानावनाच्या शुद्ध हवेंत दडी देऊन बसलेले लोक मोह न आवरून दिवसास शहरांत कामधंद्यास येत. परंतु

मध्यान्हींस सूर्याच्या प्रखर प्रकाशांत सुद्धां आपल्याच रहात्या घरांतून सराव-लेल्या मंडळींना भय वाटे, तर तिन्हीसांजा झाल्यावर गांवांत मनुष्य रहाणें अशक्यच. शहराचे रहदारीचे रस्त्यांत एकहि माणूस नव्हता; तेव्हां अगदीं संथपणानें एक इसम बिनदिक्कत वरच्या घरांत शिरला. अंगावर कपडे अगदीं मलिन असून क्षय झाल्याप्रमाणें त्याचें शरीर रोडावलें होतें. प्रत्येक पावलीं त्यास श्रम होऊन तो धापा टाकावयास लागे. परंतु अंतःकरणांत कांहीं तरी करण्याविषयीं बळावलेले विचार त्यास बाहेरच्या प्रतिकूळतेकडे मुळींच लक्ष देऊं देत नव्हते.

वर सांगितलेला रोगी ज्या घरांत होता त्या घराचा दरवाजा उघडाच होता. प्लेगच्या संहारक सत्तेची चोरट्यांना त्या काळीं मोठी मदत झाली होती. सगळीं घरें सताड उघडीं होतीं खरीं, पण तीं दिलीपाच्या राज्या-प्रमाणें चोरांच्या अभावामुळें उघडीं नव्हतीं. रक्षकांनींच जर बंदोबस्ताच्या पेहरावांत राजरोस संपन्न घरावर धाड घातली तर त्या संभावितपणाला ‘चोरी’ अशी हलकट संज्ञा देण्यास कोणी धजत नाहीं. असो. हा मंद इसम निर्भयपणें त्या घरांत शिरला. रात्रीची वेळ व घरांत कोणीच नाहीं. यामुळें तेथला सबंध देखावा भयाण होता, पण एखाद्या माहीतगाराप्रमाणें निर्धास्त होऊन तो ओटी, माजघर व नंतर लगतच्या जिन्यानें माडीवर चढला. जवळच एक लहानशी खोली होती. तेथें त्यानें काडीनें एक मेण-बत्ती पेटविली व त्या लहानशा उजेडांत तो दालनें ओलांडीत एका खोलीशीं आला. तेथें समोरच तिजोरी होती. तेथें तो सचिंत उभा राहिला. थोडासा विचार करून त्यानें झटपट तिजोरी जवळच्या किल्लयानें उघडली. आंतून भराभर दोन तीन कसलींशीं कागदी पुडकीं काढून पुन्हां जशीच्या तशी लावालाव केल्यावर तो पूर्वीसारखाच शान्तपणानें परत फिरला. माडीवरून खालीं उतरतांना त्यानें जवळ एक भक्कम कुलूप घेतलें. रस्त्यावरचा दर-वाजा बंद करून तो त्या घराकडे पहात स्तब्ध उभा राहिला.

ज्या घरांत त्यानें चोरीसारखा गुन्हा केला त्या घराकडे कोणत्या

भावनेनें तो काळाचें भान विसरून पहात होता त्यास अगर ईश्व-रासच ठाऊक! अपराध्याचें मन नेहमीं त्यास खात असतें; त्याचें पापकर्म त्यास सतत डांचून मनाला शान्ति मिळूं देत नाहीं. कोणी पाहील कीं काय या भीतीनें तो माणसाची टाळाटाळ करीत असतो. परंतु याचा सगळाच प्रकार विचित्र. त्याच्या मनाचा खेद त्या घरावरची दृष्टि खळूं देईना. मधूनमधून तो पुटपुटे व कांहीं हातवारे करी. घराच्या एखाद्या भागाकडे बोट करून तो तिकडेच पहात बसे. त्याच्या या वृत्तींत केव्हां भंग झाला असता तो असो, पण इतक्यांत त्या रस्त्यानें प्रेतवाहकांच्या भेसूर आरोळ्या क्षणोक्षणीं जवळ ऐकूं येऊं लागल्या. तो तिकडे पाहूं लागला तों दहापांच मंडळी बरोबर असलेलें एक प्रेत येत असलेलें त्याला दिसलें. लहान लहान दिव-ट्यांच्या अंधुक प्रकाशानें व कर्णकटु आरोळ्यांनीं काळोखानें अगो-दर वाटणाऱ्या भीतीमध्यें अधिक भर पडत होती. प्रेताच्या मागोमाग एक तरुण स्त्री गतपतीबद्दल हंबरडा फोडीत जात होती. तो घोळका दूर निघून गेला, व त्यांच्या आरोळ्यांचा ध्वनि कमी कमी होत अखेर या इसमाच्या कानाच्या टप्प्याबाहेर गेला. परंतु त्या अनाथ झालेल्या स्त्रीच्या विरहप्रेरित किंकाळ्यांची हलकीशी लकेर ऐकूं आली व हा थोडक्या स्पष्ट स्वरांत तो स्वतःशीं बोलला—

"बये! हीन जातींत व गरीबींत तुझा जन्म झाला ह्मणून नवऱ्याच्या मागून पोराच्या विवंचनेसाठीं तूं वाटेल तितकी रड. श्रीमंत असतीस तर तो मेल्याची एवढी तुला पर्वा वाटली नसती. स्वार्थांत अंतर पडलें ह्मणून होणारें दुःख रडण्याच्या रूपानें बाहेर पडलें तरी त्याच्या मूळाशीं नीच आप-लपोटेपणा आहे. जगामध्यें निरपेक्ष प्रेम कोणांत नांदत असेल तें एकट्या विश्वकर्त्याला ठाऊक! चुकलों; तूं हीन यातींतली आहेस, एखाद्या दुसऱ्या सख्याला चिकटून पुन्हां संसार थाटायला तुझ्या समाजांत परवानगी आहे. जा. पहिली घडी विस्कटली एवढ्यासाठीं दुसरी सांधे तोंपर्यंत रड."

या स्वगत भाषणाच्या ओघांत तो चालूं लागला होता याची त्यास

शुद्धि नव्हती. जरा वाट चालून गेल्याबरोबर तो थबकला. मागें पाहून "संपलें, येथल्याची आज अखेर झाली. आपला हिस्सा सरला." असें बड-बडून तो झपाट्यानें निघाला. जातांना दुःखाचे उसासे व अश्रुधारा मात्र सारख्या चालू होत्या.

---

## प्रकरण पहिलें.

# नणंदाभावजया.

"बाई! आतां यापुढें तुला आपले वेडेचार पुरवून आमच्या घरांत कांहीं रहातां येणार नाहीं." पार्वतीबाई आपल्या सुनेला ह्मणाल्या. "नवऱ्याच्या अमदानींत आह्मां ह्मातान्या जुन्या माणसाचें कांहीं चाललें नाहीं. नवऱ्यानें तुझे कोड पुरवले, पण ते चाळे त्याच्या मागें आह्मी कांहीं चालूं देणार नाहीं. तुला वाटत असेल तूं शहाणी. हो! पण चंडाळणी, तुझ्याच थेरांनीं माझा बाळ यशवंत—" पार्वतीबाईंना गहिंवर आला. त्यांना बोलवेना. परंतु आलेला हुंदका आवरून त्यांनीं पुढें बोलण्यास सुरुवात केली. "रंडकी झाल्यावर तरी असले खेळ करूं नको. कामधंदा टाकून दिवसाचे दिवस आपली पुस्तकांत काय गढून बसते. या बायकांच्या भ्रष्टाकारानें नवीन नवीन रोग उद्भवतात, पण हें समजेल तेव्हांना! आह्मांला नव्हतें बाई हें कांहीं ठाऊक! पण चमत्कार हा कीं, शहाणेसुर्ते नवरे देखील त्यांच्या बायकांच्या छंदानें नाचतात. आजपर्यंत झालें तें पुष्कळ झालें. तुझ्या शिकण्यानें आमच्या अब्रूचे नकोत आतां लोकांत धिंडवडे निघायला. कांहीं भीड, मर्यादा, लाज —जनाची नसली तरी मेली मनाची— कांहीं कांहीं कसें या अलीकडच्या पोरींना नाहीं! आह्मी कुठें पोथ्या पुराणें वाचीत होतों; पण आमचे नाहीं कां संसार झाले? छे ग बाई! यांचे चारच वेगळे. रामा. शिव शिव" चऱ्हाटाच्या शेवटचीं देवांचीं नांवें उच्चारतांना

सासूबाईंनीं एक लांबलचक उसासा टाकला.

सून बिचारी काय करणार ? तिच्या मनांतून पुष्कळ बोलावें असें वाटत होतें पण सासूच्या कजागपणाचा तिला यापूर्वीं अनेकदां अनुभव आल्यामुळें तिच्या तोंडीं लागून जास्त शोभा करून घेण्यास तिला धैर्य होत नसे. पतीच्या पश्चात् आपला छळ होणार हें तिला ठाऊक नव्हतें असें नाहीं. पण घरच्या मंडळीशीं फटकून स्वतंत्र बुद्धीनें योग्य दिसेल तेंच करण्याचा त्याचा बाणा असल्यामुळें इतर घरच्यांना त्या नवराबायकोच्या वागणुकींत फारसा हात घालतां येत नसे. दैवाची सुखविमुखता प्रसिद्धच आहे. मागें वर्णिलेल्या रोगाची करडी नजर संसार नुकताच भराला आलेल्या या आनंदी जोडप्यावर फिरतांच सौभाग्याची अखेर झाली. बिचाऱ्या उमेला जीव नकोसा झाला असेल; पण पतीनें मरण्यापूर्वीं भार्येच्या पोटीं पुनर्जन्म एक दोन वेळ घेऊन तिचें जायापद सार्थ केल्यामुळें त्या पतीच्या बालप्रतिमूर्तींवर भावी काळाची भिस्त ठेवून तिनें दिवस काढ-ण्याचें योजिलें होतें. कोणाच्या पातकानें हा प्रपंचाचा विध्वंस झाला असेल तो असो, पण त्या आपत्तीचें खापर उमेवर फुटलें व या "पांढऱ्या पायाच्या डाकिणीनें माझा बाळ मारला" अशा अर्थाच्या शिव्या तिच्या काना-वर दिवसांतून कितीदां तरी उघड उघड पडत, परंतु हेहि दिवस जातील या आशेवर तिनें सासरच्या मंडळीशीं प्रत्युत्तर देण्याचें बहुधा टाळावें. एके दिवशीं सकाळीं तिच्या तान्हुल्याच्या भातावरून सासूला तोंड सोडण्यास अवसर सांपडला. दीड वर्षाचें अर्भक तें. त्यास संसाराच्या गोष्टीची काय ओळख असणार ! पण विकारानें पछाडलेल्यांना लहान पोर व थोर याचा भेदा-भेद कळण्याइतकें चित्तस्वास्थ्य असतें कोठें ? उमेची एक नणंद घरांत आलेली होती. आईसाहेबांच्या तालमेंत जन्मापासून तयार झालेल्या या स्त्रीनें भावांच्या राजवटींत नांदत असतां भावजयीशीं कुरापती काढून नि-ष्कारण तोंड सोडण्याचा मक्ताच घेतल्यासारखा होता. नवीन सुनांच्या आईबापांना आपल्या मुलींच्या सुखावर येणारें हें आगापिछा नसलेल्या

नणंदांचें मोठें अरिष्टच वाटत असतें. खाण्याची वेळ टळून गेल्यावर भुकेनें व्याकुळ झालेल्या मुलानें रडणें अस्वाभाविक नाहीं; व त्यास तें अनुसरल्याबरोबर आत्याबाईच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला.

"काय बाई पोर हें! मेला जन्मास आल्यापासून छळतो आहे जसा. आल्याबरोबर बापाला मारून टाकलान्. कपाळकरंटा कारटा. जरा उशीर झाला ह्मणून रडायला काय झालें? जशी अगदीं खाखा सुटली आहे. असल्या पोराच्या नरडीला नख—" शेवटची कल्पना उमेला असह्य झाली व तिनें आपलें नेहमींचें सहनाचें व्रत आतां टाकलें. एकीकडे शोक व दुसरीकडे तीव्र राग यांच्या कैचींत तिचा जीव सांपडला. "कोणाचीं पोरें मारायला निघालांत वन्सं?" उमेचा कंठ सद्गदित झाला. "त्या एवढ्याशा पोराला उशीर झाला तर रडूं नये हें समजण्याची अक्कल आहे का? ऐटीच्या भरांत लोक आपली स्थिति विसरतात. वांझेला पोरांची किंमत नसणें वावगें नाहीं." कांहीं उपरोधिक कांहीं रागानें अशा स्वरांत ती वरच्याप्रमाणें बोलून गेली. नऊ महिने पोटांत संभाळून जन्मल्यावर जीवापाड जपून वाढविलेला आपल्याच हाडामांसाचा गोळा गमवावा असें आईला स्वप्नांत तरी वाटेल का? मग नरडीला नख लावून निरपराध कोंवळ्या बाळाचे प्राणावर उठलेल्या वन्संचा मान भावजयीनें सहनशीलतेच्या सीमेनंतर न ठेवल्यास कोणीहि समंजस तीस दोष देणार नाहीं. उमेचे शब्द वन्संना झणाणले व त्यांनीं स्वतःचा दोष झांकण्यासाठीं लोकांना ऐकूं जाईल अशा सुरावर रडें आरंभलें. "अग मथुरे, झालें तरी काय? अशी भरल्या घरांत रडतेस कां? हें ग काय बाई!" सासू तुळशीला प्रदक्षिणा घालतां घालतां आंत आली. "आई! देवा! पुऱ्या झाल्यारे या यातना. बायकांचा जन्मच मेला खोटा. सटवाईनें कुंकूं घालवलन पण तोरा कांहीं कमी झाला नाहीं. आतां नाहीं ग सहन होत हे शब्द." अशा तऱ्हेची कनवाळू मातेची जिज्ञासा उत्पन्न करणारी पुढच्या भाषणाची प्रस्तावना रडक्या बोलण्यानें करून आई विशेष चवकशी करूं लागतांच ह्म-

णाली "आई ! या उमेला तरी या घरांतून घालीव नाहीं तर मला तरी नाहींशी कर. मला कांहीं यापुढें इथें नांदवणार नाहीं. चांगलें मुलाला दूधभात खायला घालीन ह्मटलें तर इडळ ह्मणते तुह्मी नको ह्मणून. आह्मी विष घालूं हीच ना तिची शंका? धन्य आहे या बायकांच्या कुशंकेची." वन्सचा हुंदका बळावला.

"असें झाल्यापासून जों जों ह्मणतें मी कीं, उमेच्या मनाला कांहीं दुखवूं नये बोलून तों तों ही फारच शेफारत चालली. पुष्कळ झालें. चल निघ रांडे घरांतून. नवऱ्याच्या घरचा लागली ऐटा इथें मिरवायला. थांब तसें नकोच तें. भीडे भीडे न् ह्मणतातना तशांतली अवस्था. माहेरीं कोणी कुत्रें देखील विचारीना अन् इथें आमचीं हाडें खायला आली आहे. तरी ह्मणत होतें लग्नाच्या वेळेसच कीं, नको आपल्या यशवंताला ही मुलगी. पण इथें थोडेंच ऐकणें झालें. बाई, बऱ्या बोलानें आपली जा तुला पाहिजे तिकडे. चार दिवस पोर आली माझी मथुरा तर तिची गांजणूक मांडली आहे. थांब, आज उद्यां इतक्यांत गणू येईल. त्याच्या कानावर घालतें सगळें अन् लावतें एकदा त्याचा कायमचा निकाल. हिच्या नवऱ्यानें हीं थेरें शिकविलीं आणि आपण गेला मरून. आणखी हा त्रास भोंवतो आहे आह्मांला. चल, निघ घरांतून."

आईसाहेब जों जों तावांत आल्या तों तों मथुरावन्सच्या दुःखी जीवाला आराम पडेलसा वाटला. आईनें हातांतलीं उपकरणीं धडाधड खालीं टाकलीं तेव्हां तर तिची खात्रीच झाली कीं, आपल्या रडण्याच्या कांगावाची मात्रा छान लागू पडून काम रंगांत आलें. आईचें भाषण सरतांच "कोठें झालें तरी राबलें पाहिजेच ना? कांहीं झालें तरी पोटापाण्याची सोय लावलीच पाहिजे. मग तिकडे तुमचा जीव जात असला तरी चिंता नाहीं." असें ह्मणून लगबगा स्वयंपाकघरांत जाण्यास निघाली. पार्वतीबाईची धुसपुस चालूच होती. एकदां खरें खोटें निमित्त सांपडलें ह्मणजे सुनांची खरड साऱ्या दिवसभर फुरसतीफुरसतीनें चालू असायची अशी

त्यांची संवय होती. गुण्यागोविंदानें एक दिवस जाऊं द्यावयाचा नाहीं. त्यांत दुर्भंग झालेली अनाथ सून हातीं आल्यावर जन्माचे सार्थकाचा आनंद त्यांना होत असेल.

झालें एक आणि त्याला वन्संनीं वस्तुस्थिति आंगावर शेकेल ह्मणून दिलें निराळेंच स्वरूप; हें पहातांच उमा अगदीं थक्क झाली. अजून चुलीवर तांबुलीमध्यें भाताचें आधण देखील पडलें नसतां, भात झाला व तो आपण मुलाला वन्संच्या हातून खाऊं देत नाहीं, हें ऐकतांच तिला कांहीं सुचेना. परंतु करणार काय? होईल तें मूग गिळून पहाण्यापलीकडे तिच्या हातीं कांहींच नव्हतें. दुःखाचा अंतरंगांतला भार हलका करण्यासाठीं घरांतल्या माणसांच्या नजरेआड धाकट्या वत्साला पोटाशीं धरून ती वेळ सांपडेल तेव्हां यथेच्छ अश्रु गाळी. दिवसांतून पन्नास वेळ तरी "तूं निलाजरीच आहेस, आमच्या घरांतून चालती हो" इत्यादि कठोर बोल ऐकूं येत असत. पतिमरणाच्या दुःखातिरेकानें तिचें मन होरपळत असतां त्यावर दुरुक्तीच्या झणझणीत डागण्या बसल्यावर शान्त रहाणें शक्य तरी आहे का? झाल्या प्रकाराबद्दल सासूजवळ स्पष्ट असें एक अक्षर न उच्चारतां ती कामाला लागली. गतभर्तृकेला आवश्यक मानल्या गेलेल्या कित्येक दुष्ट रूढी तिनें अद्यापि न स्वीकारल्यामुळें सोंवळ्याओवळ्याबद्दल रोजच्यारोज तरवारीच्या पाजलेल्या पात्याहून अधिक तीक्ष्ण असलेल्या जिभेचे घाव तिला सोसावे लागत. त्या दिवशींच्या दंगलींत बाळकृष्णाचा भात राहिला तो राहिलाच. सासूनेंहि त्याची मुळीं चवकशी केली नाहीं. सकाळ उलटली. जेवणेंखाणें उरकल्यावर घरगुती कामाची निरवानिरव करून दुपारीं बाहेरच्या ओटीवर मंडळी डाळ निवडीत बसली असतां मायलेकींचीं उमेच्या पुढच्या व्यवस्थेबद्दल खलबतें सुरू झालीं.

"आई! तूं एकदां चांगला चोप दे ग— पहिल्या सुनेला तूं चांगली झोडीत होतीस, पण आतांशा तुझें पाहिलें तर विचित्रच. ही एवढी डोईजड झाली ही तुझ्या नरमाईनें. अगदींच धाक कसा तो उरला नाहीं. एक द

दाखीव आपलें पहिलें स्वरूप ह्मणजे कळेल बयाबाईला इंगा." वन्संनीं युक्ति सुचवली व आईच्या चेहऱ्याकडे आपल्या मसलतीला प्रतिकूळ अगर अनुकूळ मत पडतें कीं काय ह्मणून मोठ्या आतुरतेनें त्या पहात बसल्या.

जरासा विचार करून पार्वतीबाई ह्मणाल्या— "मथुरे, तूं ह्मणतेस तें सगळें खरें; पण आतां पहिले का दिवस आहेत? समज मी तिच्यावर हात उगारला अन् तिनें जर तोच धरून उलट आपल्याच तोंडांत मारली तर हे दिवस अब्रूनें रहाण्याचे का आहेत? त्यांतून ही शिकलेली. सासू छळते ह्मणून हिनें तीं वर्तमान का बिर्तमान पत्रें ह्मणतात त्यांत आपला डंका वाजवला तर काय करायचें? बोल. अमकी तमकी बाई सुनांना जाच करते अशीं बोटें दाखवून जो तो आपली नाचक्की करील, त्याची वाट काय?"

"मग आपलें सगळ्यांत चांगलें ह्मटलें ह्मणजे तिला घराबाहेर हांकलून द्यावी."

"बरें घालवल्यावर तिनें गणूच्या पहिल्या बायकोसारखें कांहीं केलें तर?"

"तिच्या मागें पोरांचा ओढा नव्हता ह्मणून. ही काय पोराच्या जीवावर उठते कीं काय?"

"होय, बरी आठवण झाली. तीच एकटी होती तर हरकत नव्हती पण तिच्या पोरांची सोय काय?"

"मरेनात का मेलीं? तीं जर आपल्या मतानें वागत नाहींत तर त्यांच्यासाठीं आपल्याला तरी मेला इतका काच कां?"

"पण तीं यशवंताचीं आहेत ह्मणून जीव तुटतो ग!" पार्वतीबाईच्या डोळ्यांतून टिपें गळूं लागलीं."

"पोरें घे ठेऊन आपल्याजवळ नि दे तिला हांकलून."

"तसें नकोच कांहीं. गणू आला ह्मणजे त्यालाच सांगूं. तो काय करील तें खरें."

"तो काय तुझ्या बाहेर आहे थोडाच."

"होय बाई! तेवढें तरी सुख आहे. सुना रांडा कशा कां असे-

नात, पण मुलगे तरी कह्याबाहेर नाहींत. नाहींतर शिकून सवरून मोठ्या पगाराची जागा मिळाल्यावर आपल्या आईबापांच्या आज्ञेबाहेर पाऊल टाकल्यावांचून कुठलीं ग राह्यला हीं अलीकडचीं पोरें. जराशीं दोन अक्षरें नाहीं लागलीं इंग्रजी शिकायला तोंच लागतात उलट वडील मंडळींना शहाणपणाच्या गोष्टी सांगायला. मग त्यांच्याशीं मर्यादेनें वागायचें राहिलें दूरच. तेवढ्या बाबतींत तरी मला देवानें सुख ठेवलें आहे. यशवंतानें मात्र आरंभलें होतें जरासें. या बाईनें त्याला अगदीं आपलासा करून घेतला होता. बाकी तो मोठा भिडस्त हो. नवराबायकोच्या संबंधाखेरीज इतर बाबतींत तो देखील मोठा समंजस असे; पण तेवढ्या वागणुकींत कोणीं ढवळाढवळ केली तर मात्र झालीच बाबाची मर्जी खप्पा. कसें कां असेना. जगला तरी कुठे फार दिवस. पहातां पहातां एक वर्ष होऊन गेलें." मातेचें हृदय इतर प्रसंगीं व इतर माणसांशीं कसेंहि असलें तरी प्रत्यक्ष अपत्याच्या संबंधांत मात्र त्याच्याइतका कोंवळेपणा दुसऱ्यांत आढळणार नाहीं. मुलाची आठवण होतांच तिचा गळा दाटला व अपत्यहानीची मानसिक व्यथा अश्रुरूपानें बाहेर लोटूं लागली. पार्वतीबाई डोळे पुसूं लागल्या.

दुःखी माणसाचें मन चांगलें वाईट न पारखण्याइतकें दुबळें झालेलें असतें तेव्हां परक्यांना त्या आगीवर अघळपघळ तत्त्वज्ञानाचा फुकटचा फुंकर घालून भलेपणा मिळवण्यास चांगली संधि सांपडते. मथुरेला हा आयता प्रसंग येतांच "आई, रडून काय होणार ? सगळें नाशिवंत आहे. परवां पुराणिकबोवा धर्मराजाला अभिमन्युवधानंतर व्यासांनीं बोध केल्याचें सांगत होते तें तूं ऐकलेंस ना ? सगळें जग काय आज आहे तर उद्यां नाहीं. बुडबुड्यासारखें. माझ्या संसाराची पहा कशी माती झाली ती." असा गहन वेदान्त सांगून आपल्या दुर्दैवाच्या आठवणीची भर घातली. मुलगा आणि जांवई या दोघांच्या स्मरणानें अर्थात् आईचा शोक दुणावला.

बराच वेळ स्वस्थपणें डाळ तांदूळ निवडण्यांत गेला. परंतु हें मौन फार

वेळ राहिलें नाहीं. मथुरेच्या मनांत आणखी कांहीं तरी पुष्कळ विचारावयाचें होतें. तिनें दोनतीनदां उमेच्या पुढच्या व्यवस्थेची दिरंगाई करतां कामा नये असा पक्का घाट घातला व तसा रुकार पण आईकडून मिळवला. उमा इतका वेळपर्यंत मागील दारीं पडवींत आपल्याशीं विचार करीत सचिंत बसली होती. घरांत मंडळी थोडी असल्यानें फारसें काम नसे. तथापि तिनें तें करूं ह्मटल्यास वन्संनीं तें कधींहि निचितीनें पार पडूं द्यावयाचें नाहीं. ह्मणून मुद्दाम कामासाठीं पुढें पुढें करण्याच्या भानगडींत ती पडत नसे. दिवसभर करायचें तरी काय ? उष्टींखरकटीं व धुण्याचा बोजा दोहों सांज तिच्या अंगावर होता व तेवढा उरकल्यावर तिच्या वाटेस सहसा कोणी जात नसत. आपल्या मागें सासू, थोरला व धाकटा दीर आणि वन्सं आपली टवाळी करतात हें ती जाणून असे तथापि होतांहोईल तों आपल्या हातून भलतीच चूक होऊन त्यांच्या जिव्हास्त्राच्या संधानाला अवसर न मिळूं देण्यासाठीं ती फार जपे. जवळ बाळकृष्ण खेळतो आहे व त्याच्याकडे मधून मधून पहात किंचित् अश्रु गाळीत ती बसली होती. समोरच्या जिनसांत कांहीं बुकें, वस्त्रें व कागद होते. कागदांची उलथापालथ करतांना तिच्या नजरेस पतीचा फोटो पडला. सगळ्या जन्माचें श्रेय गहाळ झालें तें असें होतें ह्मणून त्या सजीवाची अचेतन प्रतिमा पहाण्याचा दुर्धर प्रसंग तिच्यावर काळाच्या क्रूरतेनें ओढवला. यशवंतरावाच्या फोटोवर थोडींशीं टिपें गळलीं. परलोकच्या चिरप्रवासाला निघून गेलेल्या पतीच्या कागदी पडछायेवर आपलीं आंसवें पडल्यानें ती दोषेल ह्मणून कीं काय तिनें तीं चटकन् पुसलीं व फिरून त्यावर टक लावून ती पहात बसली. त्या एकाग्रवृत्तींत तिच्या वाईटावर टपलेल्या वन्संनीं चोरून आपली स्थिति पाहिली हें तिला कळलें नाहीं. वन्सं लागलीच त्याच पावलीं माघाऱ्या गेल्या व बाहेर आईशीं कुजबुजूं लागल्या.

"आई ! जसे कांहीं दुनियेंत कुणा बायकांना नवरे असतात का ? हिलाच तेवढा नवरा होता व हिलाच काय ती खरी प्रीति होती ! पाहिलेंस

का मागील दारीं काय करताहेत आपल्या सूनबाई तें? नवऱ्याच्या चित्राकडे पहात अगदीं समाधि लागली आहे हो ! !"

मुलाच्या मृत्यूच्या दुःखद विचारानें पार्वतीबाई मघांपासून खिन्नच होत्या. त्यांनीं निःश्वास टाकून "हीं सोंगें बरें सगळीं सोंगें. नवऱ्याचें प्रेम अशा तऱ्हेनें चव्हाट्यावर आणलें ह्मणजेच का तें प्रेम आणि आह्मी एवढीं पोरें-बाळें नातवंडें पणतवंडें पाहिलीं तीं प्रतिविंचूनच वाटतें. बाई ! बाई ! शर्थ आहे त्या शिकलेल्या उमेपुढें. आतां नवऱ्याच्या चित्राकडे पहात बसण्याची का ही वेळ? पण थिंडकेला समजेल तेव्हां ना ?"

कानगोष्टीची भाषा ओघानें जोरांत आली व शेवटचीं एक दोन वाक्यें उमेला ऐकूं गेलीं. मनांत पुष्कळ जळफळली पण नाइलाज. पुढें मायलेकींचा संवाद चालच होता. "काम करायचें टाकलेंन् करते आहे विचार. नवऱ्याच्या मृत्यूवर कवनें कर ह्मणावें. नवऱ्याबद्दल जर इतकें प्रेम आहे तर मग हिच्या डोंबलावरच्या केंसांमुळें तिकडे नवरा नरकांत कुजत पडला असेल त्यासाठीं तोंड काढ. आई ! पण रोजरोज ग हा ताप कशाला हवा ? एकदां एक घाव न् दोन तुकडे कर कशी. अशानें अन्न अंगीं लागत नाहीं आणि उगीच जीवाला संताप मात्र." वन्स गंभीर वाणीनें वदल्या.

दिवस सगळा गेला. उमा मुलाला निजवून झाडलोट करण्याकरितां उठली. आणि सासूबाई व मथुरा पुराण ऐकण्याला देवळांत जाण्यासाठीं बाहेर पडल्या. घरांत एकटी उमाच. शाळेंतून थोरला मुलगा घरीं आला होता, तेवढीच काय ती तिला सोबत. दिवाबत्ती झाल्यावर तो नित्याप्रमाणें स्तोत्रादिक सायंपाठ ह्मणूं लागला. इतक्यांत बाळकृष्ण उठला. प्रथमस्वभावाप्रमाणें रडें व त्यावर आईची प्रेमळ समजूत झाल्यावर त्यानें तिच्या शिकवणीबरहुकूम रात्रीचा अंधार दूर करणाऱ्या दीपज्योतींना भावपूर्वक कोमल कर जोडून "दिव्या दिव्या दिपत्कार कानीं कुंडल मोतीहार दिव्याला पाहून नमस्कार" या मंत्राचा उच्चार केला. त्याचे बोबडे बोल ऐकून तिच्या वात्सल्याला भरतें आलें व तें न आवरल्यामुळें बाळाला हृदयाशीं घट्ट धरून

तिनें त्याचें चुंबन घेतलें. आईच्या मुखाकडे कौतुकानें पहात असतां त्याच्या गालावर चटकन् ऊन ऊन अश्रुबिंदु पडला व "आई ललतेश काग" असें बोलून त्यानें आईच्या गळ्यांत आपला कोवळा हात टाकला. आईचा गंहिवर दुणावला. "आई अस लडूं नको गले. मला किती भय वात्त" असा त्यानें उद्गार काढला. आईला तें पटून तिनें डोळे पुसले पण विषा-दाची छाया तिच्या फिकट मुखावर होतीच. "आई तूं हांस गले; खलंच अशी गप्प नको बशूं." असा बाळाचा आग्रह पाहून तीस मुद्दाम हंसूं आणावें लागलें.

सासूबाई व वन्संच्या स्वाऱ्या देवदर्शन, पुराणश्रवण करून आल्या तेव्हां उमेच्या वरील प्रकारांत बदल झाला. "आई मला भूक लागलीयं." "होतय हां जेवायचें बाळ." याप्रमाणें त्या मायलेंकरांचा संवाद असतां वन्संनीं मधेंच "सदान् खदा मेल्याला खाखा सुटलेली. इतका वेळ घरांत एकटी आई होती तिनें दिलीच असेल कीं तूप साखर. आह्मी कोणीच नव्हतों घरांत तेव्हां आपला हात नि जगन्नाथ. वास्तपुस्त करायला कोण? ह्याच मालकिण-बाई." असा चोमडेपणा केलाच. नंतर अंगावरच्या चौघड्या स्वस्थानीं ठेवल्यावर हस्तपादप्रक्षालनानंतर सासूबाई स्वयंपाकाकडे गुंतल्या व वन्सं कांहीं जपजापाकरितां माळ ओढीत नाक धरून माजघराशेजारच्या एका खोलींत बसल्या.

रात्र झाली. लहान मुलाबाळांचीं जेवणें खाणें उरकल्यावर त्या दोघी-जणी फराळाला बसल्या. उमेला मुलांबरोबरच जेवावयास बसवीत असत. तेव्हां तो प्रसंग देखील बोलल्यावांचून वन्संनीं वाया जाऊं दिला नाहीं.

"आमच्यासारख्या बायकांनीं खरें ह्मटलें तर रात्रीं अन्नग्रहण देखील करूं नये. पण कामाच्या माणसाला तसें रहावत नाहीं ह्मणून शास्त्रांनीं थोड्याशा फराळाची सवलत ठेवली आहे. पण हिच्या जीवाला कांहीं आहे का? अगदीं चापून जेवते आहे. बाई एवढ्या मोठ्या तीन मुलांच्या आईला हा अधर्म शोभतो का? उमावहिनी, लोक आह्मांला बाहेर तोंड

काढूं देत नाहींत तुझ्या गुणांनीं. चार बायकांत उजळ माथ्यांनीं बसूं ह्मटलं तर कांहीं सोय राहिली नाहीं. पण आह्मी तरी रक्त आटवून काय उपयोग? ज्याचें त्याला कळेना. मेलें आपणच कोडगें. आपल्यालाच लाज नाहीं. उमा वहिनी! अगदींच कसें तुला कळत नाहीं?" अशी बडबड बराच वेळ चालली होती.

पती गेल्यानंतर सासरीं पाऊल ठेवल्यापासून हीं मर्मभेदक दुर्भाषणें तिच्या रोजच्या परिपाठापैकींच होऊन बसलीं होतीं; पण आज त्यांचा अतिरेक झाला होता. तिला बाहेर काढण्याच्या भावी कार्याची ही पूर्वतयारी होती. त्यामुळें तर सगळा दिवसभर वन्संच्या टकळीला ऊत आला होता.

जेवणखाण आटपलें. मुलेंबाळें आपआपल्या जागीं निजलीं. उमाहि अंथरुणावर आपल्या बाळाला पोटाशीं घेऊन पडली. या मायलेकींची दुक्कल तेथें जवळच आपसांत न ऐकूं येण्यासारख्या आवाजांत हितगुज बोलत होती. बराच वेळ उमा निजली कीं काय असा कानोसा घेऊन ती निजली अशी पक्की कल्पना झाल्यावर त्यांचें बोलणें जरा चढ्या सुरांत सुरू झालें. भावी काळाविषयीं चिंतातुर असलेली उमा झोपीं कशी जाईल? मायलेकींनीं रामनाम घेऊन बिछान्यावर अंग टाकतांना वन्संच्या तोंडून खालील मुक्ताफळें गळलीं.

"बाळजोशाला चांगला मथवून मी आतां गणूभाऊचे चांगले कान भरतें. ते एवढें काम खचित करतील. या अवकळेनें घरांतून काळें केल्याखेरीज कांहीं संसारांत सुख नांदेलसें वाटत नाहीं. या अवदसेनें आमच्या घराचें वाटोळें करण्यासाठीं अवतार घेतला आहे कीं काय कोण जाणे!"

"उगाच बडबडूं नको. ती ऐकेल अन् आपले बेत फसतील."

"मग तिचें एवढें भय कशाला हवें? आह्मी चक्क घरांतून जा ह्मणून सांगण्यापूर्वीं आपल्या वर्तनांत सालसपणा आणला तर ठीकच. तसें करायचें नसलें तर मग घरदार सोडून देशोधडीस भीक मागावी लागेल."

"तसाच प्रसंग आला तर ती पुनर्विवाह करील."

"ह्मणजे आणखी आमच्या अब्रूचे हाल. पण असो. तिचें कर्म तिच्याबरोबर. आमचें घर सोडावें लागल्यावर मग कांहीं कां करीना! का सगळ्यां जन्मभर काळजीच करीत बसायचें? हा तरी जुलूमच झाला ह्मणायचा. हिचा कारटा विद्याधर तो देखील अस्साच. मला वाटतें फुकटच्या अन्नावर माणसें माजतात कीं काय कोण जाणे!"

---

## प्रकरण दुसरें.

## आगींत तेल.

तो दिवस तिनें कसा बसा काढला पण रात्रीं निजतांना हा संवाद कानीं पडला तेव्हां मात्र उमेला काय करावें हें सुचेना. असल्या निरर्थक जाचानें पुष्कळ स्त्रिया जीवाला कंटाळतात व स्वहत्या करून घेतात. संधि साधून तिलाहि तें करतां आलें नसतें असें नाहीं. परंतु तिच्या घरचें शिक्षण आणि गेल्या पंधरा वर्षांतला पतीचा सहवास यामुळें घरचा छळ चुकविण्याकरितां जीवाचा घात करून घेणें हें तिला भित्रेपणाचें लक्षण वाटे. त्यांतून ती सडी असती तर तिनें तोहि पत्करला असता पण दोन मुलांना जगाच्या पाठीवर अगदीं दीन टाकून स्वतःची गांजणूक टाळणें तिला अशक्यच होतें. पतिनिधनानंतर वर्षदीडवर्षांच्या मुदतींत ती माहेरीं गेली होती पण तेथें खऱ्या जिव्हाळ्याचें कोणी नाहीं ह्मणून माहेरच्यांचे टोमणे सहन करण्यापेक्षां सासरींच कष्ट करून दोन घांस सुखासमाधानानें खावे हा तिचा हेतु होता. सासरीं तरी सासू आणि नणंद कशा प्रकारची होती याची तिला पक्की ओळख होती. लग्न झाल्याबरोबर सासरीं गेली तेव्हां ती वयानें चौदा वर्षांची होती. तिचा पति बराच शिकलेला असल्यामुळें लग्न झाल्यावर वर्ष दोन वर्षांत त्यास बाहेरगांवीं हुद्याची सरकारी नोकरी मिळाली व तोंपर्यंत बायकोहि संसार करण्यासारखी झा-

त्यामुळें तीस घेऊन तो स्वतंत्र राहिला. त्याचे थोरले बंधु गणूभाऊ यांची व इतर घरच्या मंडळींची इतराजी त्यास वरील कृत्याबद्दल सहन करावी लागली. परंतु आई जन्मदात्री असली ह्मणून सर्वस्वीं तिच्या अधीन राहून आपल्या सुखाचें मातेरें करून घेण्याची यशवंतरावाची कधींच इच्छा नव्हती. त्यांच्या थोरल्या बंधूंना आईच्या तंत्रानें वागल्यामुळें लौकिकांत नाचक्की होण्यासारख्या दोनतीन गोष्टींचा अनुभव असतांहि, आपली आई ह्मणजे परब्रह्म व ती करील तें सर्व निर्दोष अशी वेडी समजूत करून न घेतां, आपणास सत् वाटेल तें करावयाचें व त्यांत घरगुती अडचणी किती आल्या तरी त्यांस जुमानावयाचें नाहीं असा मार्ग त्यांनीं पत्करला; व तो त्यांच्या एकंदर परिस्थितीच्या निदर्शनावरून गैर नव्हता असेंच कोणीहि ह्मणेल. परंतु मनुष्य करतो एक आणि ईश्वरी संकेत असतो निराळाच. मनुष्याच्या आशा, त्याचा हुरूप, त्याचे प्रयत्न यांमध्यें तो कितीहि झटपटत असला तरी नियतीच्या चक्रामध्यें त्यास आपलेपणा सोडून इच्छेविरुद्ध कामें करावीं लागतात. बागेंतल्या फुलवेली आपलीं सुंदर, कोमल व सुगंधी फुलें पुढें आणून वाऱ्याच्या मंद शीतल लहरींमध्यें सानंद डोलत असतात. त्यांचें तें मनोहर स्वरूप पहाणाऱ्याच्या तोंडांतून धन्यवाद वदवीत असतें; पण गरीब बिचारी लता! ज्या तरुवरावर तिचा आधार असतो व ज्याच्या स्निग्ध छायेखालीं ती आपलें सात्त्विक ऐश्वर्य फुलांच्या रूपानें पुढें आणीत असते, तो एकाएकीं समूळ उन्मळून पाडण्यासारख्या झंझावाताची सृष्टीवर कोठें तरी तयारी होत आहे हें तिच्या गांवींहि नसतें. पण तिला कळलें नाहीं एवढ्याच सबबीवर, मैलचे मैल प्रांत उध्वस्त करीत चाललेली वावटळ तिला सोडील, तिच्यावर दया करील, हें संभवत नाहीं. जें वारें आपल्या मंद क्रमानें इतका वेळ सर्वांना सुखस्पर्श होतें तेंच क्षणोक्षणीं बदलून त्याचा वेग मोठा होत चालला व अखेरीस त्याच्या सोसाट्यामध्यें तो वृक्ष सांपडला कीं, त्याच्या पाळांमूळांसह तो उलथून पडतो व लतेचा आधार तुटून ती दीनवाणीनें धुळींत लोळूं लागते. हें नशीब ह्मणजे आपल्या

धर्मतत्त्वाप्रमाणें गत जन्मींच्या कर्माकर्मांचें फळ असल्यामुळें तें आपला प्रभाव गाजविल्याशिवाय कधींच रहात नाहीं. उमेची तरी अशीच दशा झाली. ''ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें । चित्तीं असों द्यावें समाधान'' या तुकोबा कवीच्या महत्तत्त्वास अनुसरून ती काळ कंठीत होती. संसार रंगाला येत चाललेला होता तेव्हां कधीं आपण अनाथ होऊं असें तिला स्वप्न तरी पडलें असेल का? ती शिकलेली होती पण पति ह्मणजे स्त्रियांचें सारसर्वस्व हें प्राचीन आर्य स्त्रियांचें शुद्ध व उज्वल तत्त्व ती विसरली नव्हती. लग्नांत हजारों माणसांसमक्ष सगळ्या सुधारणेचें आद्यतत्त्व जो अग्नि त्यासमोर ज्याला आपला ह्मणून जगांतील कोमलता, सौंदर्य आणि सुगंध या सात्त्विक गुणांचे प्रतिनिधि जीं फुलें त्यांची माळ घातली त्यास दुजेपणानें वागवून व्यक्तिस्वातंत्र्याच्या गोड परंतु विषारी नांवाखालीं तिनें कधींच दुखविलें नाहीं. या आनंदी दंपत्याचा एकोपा पाहून सर्वांना हर्ष वाटे पण तिच्या सासूला हें कधीं पहावलें नाहीं. नवऱ्यानें बायकोचा तिटकारा केला व प्रसंगीं मारहाण केली ह्मणजेच त्याचें खरें पतित्व नाहींतर तो बाईलबुद्ध्या अशी विचित्र कल्पना पार्वतीबाईच्या हाडींमांसीं जन्मभर खिळलेली असल्यानें सासूपणाचें पद येतांच नव्या मुलीवर आपली सत्ता यथास्थित चालवून घेण्यास तिला फावलें. प्रथमपासून भिक्षुकी घराणें तेव्हां मनाचा विकास होऊन त्यामध्यें औदार्य मुरण्यास अवसरच सांपडला नाहीं. सुवासिनी ह्मणून घरोघर जावयास सांपडे तेव्हां सगळीकडच्या चवकशा करून कुटाळकी करण्यांत जन्म गेलेला. मुलें हुषार निघून त्यांस भराभर नोकऱ्या मिळण्याचा सुमार दिसतांच त्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. लहानपणापासून यजमान घरांत फारसें कांहीं लक्ष देत नसल्यानें मुलांना आपल्या कबज्यांत ठेवण्यास त्यांस फुरसत मिळाली व तें काम त्यांनीं उत्तम रीतीनें पार पाडलें. ज्येष्ठ चिरंजीव गणोबा हे स्वभावानें सालस ह्मणून आईच्या वाईट कारस्थानांत होतां होईतों न पडण्याची त्यांची प्रवृत्ति असे. दुसरे यशवंतराव हे तर लहानपणापासूनच स्वच्छंदी व वाचनमननाची चटक लागल्यामुळें

आईच्या उलाढाल्यांकडे त्यांचें बहुधा दुर्लक्षच. तिसरे वामनराव ते मात्र आईचे पक्के चेले. नेहमीं आईच्या अर्ध्या वचनांत. मग ते आईला प्यार असतील यांत आश्चर्य काय? परंतु यशवंतरावाबद्दल मातु:श्रींची जवळ जवळ अप्रीतिच. आई आपल्या बायकांना निष्कारण छळते ही गोष्ट त्यांना खरी वाटल्यामुळें आईपासून वेगळे होण्यासारखा उत्तम उपाय त्यांनीं योजला. वेगळा झाल्यावर तर पार्वतीबाईनीं सगळ्या लोकांत त्याची व त्याच्या बायकोची निंदा करून आकाशपाताळ एक केलें. नावडता ह्मणून मुलगा मरावा असें चिंतणाऱ्या माता जगांत नाहींत असें नाहीं पण सुदैवानें पार्वतीबाई त्या माळकेंतल्या नव्हत्या. तथापि आपल्याशीं चिरंजीव तिरसट-पणानें वागतात याचें कारण त्याची बायको, हा दुष्ट विचार त्यांच्या मनांत पक्का बिंबल्यामुळें त्याच्या पश्चात् तिच्यावर सगळी आग पाखडण्यास आय-ता योग जुळून आला. माहेर नीट असतें तर मग उमेला सासूच्या ताव-डींत रहावेंच लागलें नसतें, पण सगळें मनासारखें सरळ असल्यावर जगांत दुर्दैव ह्मणून कांहीं उरणारच नाहीं; व ही उणीव ईश्वरानें ठेवली असती तर मानवी सृष्टींत वैचित्र्य असें कांहींच न राहून त्याचें रहस्य गेलें असतें. एखाद्यावर नवीन संकट आलें ह्मणजे जवळच्यांना प्रेमाचा पान्हा फुटत असतो. पुत्राच्या मरणाची ताजी आठवण असेतोंपर्यंत उमेबद्दल पहिल्यांदा सासूनें दोन चार वेळ बोलतांना चांगली कळकळ दाखविली. "दैव का स्वाधीनचें आहे? 'आलिया भोगासी असावें सादर' यापरता दुसरा उपाय माणसाचे हातांत काय आहे? उमे!" नवरा गेल्या दिवसापासून उमा अगदीं वाळत चालली होती. तोंडावरची टवटवी जाऊन फिकटपणा आला होता. काळजीनें झुरणीस लागल्याचें पाहून पार्वतीबाई तेव्हां मोठ्या कळव-ळ्यानें ह्मणाल्या— "अशी खंत घेऊं नकोस. अंगावर पोर तोडणार. असें करून तूं आपलें अन् पोरांचें नुकसान मात्र करून घेशील. क्षय बीय झाला नाहीं ह्मणजे मिळवलेंस. आह्मी खातों त्यांतच तूंहि दोन घांस सुखानें खात जा. असा सारा दिवस रडून घालवूं नकोस हो." पार्वतीबाईचे वरील

बोल खरे असोत अगर खोटे असोत पण मथुरेला ते फारसे रुचले नाहींत. गत बंधूंचें व त्यांचें फारसें सूत नव्हतें व लहानपणीं तिनें लांड्या कारभाराबद्दल त्यांच्या हातून बरेच वेळां मार खाल्ला होता. याशिवाय नवरा गेल्यावर माहेरच्या कारभारांत आईच्या प्रमुख मदतनिसाचें काम मिळाल्यावर तर त्यांचें व तिचें कायमचेंच बिनसलें. याखेरीज तिच्या वर्तनाचा यशवंतरावाला संशय येऊन एकदोनदां त्यानें चांगली कानउघाडणी केली होती. मग तर तिचा व त्यांचा उभा दावा. बंधूंशीं इतकें सख्य! मग भावजयीशीं कितपत असेल तें निराळें सांगावयास नकोच. भाऊ गेला त्यावेळीं ती सर्वांप्रमाणें रडली इतकेंच. पण आई भावजयीशीं प्रेमानें बोलते हें पहातांच वन्संनीं डोळे मिचकावीत ह्मटलें– "पण आई! नवऱ्याच्या रोजगारावर चैन भोगलेली स्वच्छंदी बाई ती. तिला आपल्या येथें रहाणें आवडेल कीं नाहीं कोण जाणे! मला तरी बाई शंकाच येते." लेकीचें ह्मणणें आईस पटलें.

"होय बाई! बरें सुचविलेंस. तसे श्रीमंती थाटमाट आतां नाहीं हो चालायचे आमच्या इथें. अस्संच करीन तें तस्संच झालें पाहिजे असली रिकामी ऐट माझ्या नाहीं कामास येणार. जशी आमची रीत तसेंच वागलें पाहिजे." पार्वतीबाई नेहमींच्या जातीवर गेल्या व मर्मभेदक बोलल्या खऱ्या पण फिरून त्यांचा ओघ बदलला. "बाकी माणसावर प्रसंग आला ह्मणजे तें आपोआप निवळतें. नवऱ्याच्या घरीं चालत होतें तोंवर घेतलेन् गाजवून. आतां कोणाच्या जीवावर मिरवायचें? पहिल्यांदा इथली रीतभात वाटेल थोडीशी जड, पण पुढें पडेल सगळें अंगवळणीं व येईल ताळ्यावर."

"आज नाहीं उद्यां लागेल उमा गिळायला. नवरा गेलान् सगळें जग बुडालें ह्मणून आपण का मरायचें? जीव असें तोंपर्यंत खाल्लें प्यायलें हें पाहिजेच." वन्सं मोठेपणाचा आव आणून बडबडल्या. "मला देखील अगदीं अस्सें वाटे पण आतां कांहीं आहे का?"

जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं. यशवंतरावाच्या मरणाचें स्मरण नुकतें नुकतें असे तोंपर्यंत वाटणारा उमेबद्दलचा कळवळा जसजसा

काळ लोटूं लागला तसतसा ओसरूं लागला व शेवटीं त्या आपल्या मूळ स्वभावावर आल्या. मथुराताईची त्यांना चांगली मदत होऊं लागली. वर्ष सहा महिने लोटल्यावर कोठें तरी तीर्थाच्या ठिकाणीं संन्याश्याप्रमाणें वैधव्याची दीक्षा घेण्याची पार्वतीबाईंनीं हळूच गोष्ट काढली. उमा शक्य तितका प्रयत्न करून त्यांच्या देखत उघड असें कांहींच बोलत नसे. परंतु मनाला झोंबणाऱ्या विषयाला मात्र ती प्रसंगीं स्पष्ट उत्तर देई.

*  *  *

"माणसें अकालीं मरतात तीं स्वतःच्या पूर्वार्जित पातकानें. त्याबद्दल बायकापोरें मुळींच जबाबदार नाहींत. चोरांच्या संगतीनें भल्याच्या मानेवर इहलोकीं मनुष्यांचा न्याय वेळीं सुरी फिरवील, परंतु ईश्वराच्या घरीं असा पक्षपाती कायदा नाहीं. जो तो स्वकर्मांचा ताबेदार आहे. ज्याच्याशीं अहोरात्र निकट संबंध त्या पतीचें त्याच्या मागें सच्छील राहून सदैव हितचिंतन करीत असावें हा उत्तम मार्ग. आमच्यांतल्या पुष्कळ चाली रानटी आहेत. तेव्हां उमे ! माझ्या पश्चात्–" बोलतांना यशवंतरावाच्या डोळ्यांत आसवें उभीं राहिलीं. परंतु हा संवाद सहजच चालला होता.

"इश्श ! काय बाई बोलणें हें ! असलें भलतेंच नका गडे बोलत जाऊं." पश्चात् शब्दानें उमेच्या अंगावर शहारे आले.

"तसें कांहीं न व्हावें याबद्दल ईश्वराचे आशीर्वाद अखंड मागायचेच पण" यशवन्तराव अगदीं गंभीर परंतु प्रेमळ स्वरांत ह्मणाले— "आपलं समज; तर माझ्या पश्चात् मनाला घाबरूं न देतां मुलांकडे पाहून तूं रहा. लोकांच्या सांगण्याला, त्यांच्या निंदेला बळी पडशील. तसें न करण्याबद्दल माझी– पतीची तुला आज्ञा आहे. ती तूं कशाहि अडचणी आल्या तरी कोणत्याहि सबबीवर मोडूं नयेस. हें बघ मन सुसंस्कृत ठेवून वाग, नाहीं तर तुझ्या नणंदेचेंच उदाहरण पहा. तिनें वैधव्याचे सगळे आचार यथायोग्य पाळले आहेत पण वागणूक पातिव्रत्याच्या विरुद्ध—" जें बोलूं नये तें बोललों ह्मणून यशवंतराव चपापले. नणंदेच्या गुणांबद्दल उमेला जिज्ञासा

वाटल्यास तें अस्वाभाविक नव्हतें; पण ती गोष्ट आपणापासून अर्धवट लपविली आहे तेव्हां तीबद्दल मुद्दाम नवऱ्यास प्रश्न न विचारणें योग्य असें तिला वाटून तिनें आपली उत्कंठा तशीच दाबली. सगळ्या गोष्टी मन मोकळें करून सांगण्याची पतीची नेहमींची पद्धति असतां ज्या अर्थी ही गोष्ट अर्धीच तोडली त्या अर्थी त्यास अधिक न सतावणें तिला श्रेयस्कर वाटलें. यशवंतरावांनीं पुढें विषयान्तर करून तें तसेंच कसेंबसें सांवरून घेतलें. "एकूण सांगावयाचें एवढेंच कीं, मन शुद्ध नसल्यास नुसते आचार स्त्रियांच्या वाईट वागणुकीला आळा घालूं शकत नाहींत. उलट माझी तर पुष्कळ विचारान्तीं अशी खात्री झाली आहे कीं, धर्माच्या पांघरुणाखालीं त्यांना कुकर्में निर्धास्त करायला सांपडतात. शेंकडों उदाहरणें दाखवून देतां येतील."

* * *

नवीन राज्य झाल्यापासून सामाजिक स्थित्यंतराच्या विविध विषयावर त्या जोडप्यामध्यें प्रसंगोपात रिकामपणीं चर्चा चालत असे व त्यापैकींच एकाचा मासला वर दाखविला आहे. आपल्या मागून कसे वागावयाचें हा उपदेश कृतींत उतरण्याची वेळ दुर्दैवानें आली. यशवंतराव सन्निपातज्वरानें अस्वस्थ झाले व परगांवाहून स्त्रीपुत्रांसह ते पुण्यास घरीं आले. पतिशुश्रूषा करावी असें मनांत असून सुद्धां रात्रंदिवस उशापायथ्याशीं असलेल्या सासूबाई व थोरले भावोजी यांच्या देखत तसें करणें तिला अशक्य झालें. रोग बळावत जाऊन त्यांतून उठण्याची जवळ जवळ निराशाच झाली. त्या वेळीं यशवंतरावांनीं आपणास बायकोजवळ कांहीं सांगावयाचें ह्मणून बाकी सर्वांनीं निघून जाऊन तीस आंत पाठवून देण्याची विनंति केली. पार्वतीबाई मुकाट्यानें बाहेर पडल्या. गणूभाऊ जवळ नव्हतेच. खोलीकडे पाठ फिरतांच "काय बाई तरी चमत्कार! आह्मी इतकी जीव लावून खस्त खाल्ली तरी कांहीं येशाच्या मनाला येत नाहीं. आज आठ दहा दिवस आमच्यामुळें त्यांना धिंगाणा घालतां आला नाहीं. जिथें तिथें मेली




यशवंतरावांनीं बाळाच्या अंगावरून आपला निःशक्त हात फिरवून विद्याधर कुठें आहे, असा प्रश्न केला !

[ पान २५.

वडील माणसांची अडचण. बायकोच्या हाताला कांहीं अमृत लावलेलें नसतें. बायकांच्या नादानें पोरें आईबापांची माया अगदीं अगदीं विसरतात. येशा बरा असता तर मीं त्याला साफ सांगितलें असतें कीं, माझ्या घरांत नाहीं चालायची असली अमर्यादा ह्मणून. पण जाऊं द्या. आपण आपली गाय खाऊन असावी. उमा, अग उमा, यजमान तुझी वाट पहाताहेत हो तिकडे." याप्रमाणें तोंड सुरू झालें.

ही पडत्या फळाची आज्ञा मिळतांच उमा तडक धाकट्या मुलाला (बाळकृष्णाला) घेऊन पतीकडे गेली. अगदीं आसन्न स्थितींत ते पडलेले. त्यांची व तिची नजरानजर होतांच ती सद्गदित झाली. परंतु सहज प्रेमाच्या भावनेनें होणाऱ्या वेदनांनीं आजाऱ्याला जास्त त्रास होईल ह्मणून तिनें आपले अश्रु पुसले व जवळ जाऊन ती उभी राहिली. पतीनें तीस बसण्याची सूचना दिली व तसें पत्नीनें केल्यावर बाळाच्या अंगावरून आपला निःशक्त हात फिरवून "विद्याधर कुठें आहे?" असा प्रश्न केला. "डाक्टराकडे गेला आहे वाटतं" असें मृदु स्वरांत तिच्याकडून उत्तर मिळालें. "बाळा! तुह्मां सर्वांना या दुनियेंत अनाथ टाकून मला जावें लागेलसें वाटतें आहे. यांतून जगणें मला तरी अशक्यच दिसतें. तरी पण तुह्मां सर्वांच्या नशीबानें मला उतार पडल्यास चांगलेंच. बाळा— लाडक्यांनों, माझ्या मागून तुह्मांला कोणी नीट वागविणार नाहीं. जग मोठें स्वार्थी आहे. तथापि त्या सर्वांतून ईश्वर तुह्मांला पार पाडील. नीट वागून तुह्मी दोघेजण आईला संभाळून कीर्ति मिळवा. उमे! आजपर्यंत माझ्या सहवासांत तुला माझीं मतें कळलीं आहेत. तूं सुशील आहेस पण आपल्या धर्मांत जी वेड्यावांकड्या आचारांची भर पडली आहे ते तूं अमलांत आणूं नकोस. मन पवित्र ठेव. परमेश्वरावर भाव ठेवून त्याच्या करुणेची भिक्षा माग. जगांत कोणावर भिस्त ठेवून आपल्या हालअपेष्टांची दाद मागत बसूं नकोस. जास्त बोलण्याची माझ्यांत ताकत नाहीं."

एवढ्याशा बोलण्यानें त्यांना किती तरी श्रम झाले व त्यामुळें त्यांचा श्वास

जोरानें चालू झाला. दोघां पतिपत्नीच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्य

या करुण प्रसंगांत दार वाजलें व पहातात तों विद्याधर अगदीं साव काश आंत शिरला. मातापिता दृष्टीस पडतांच तो माघारीं जाणार तों यशवंतरावानें खूण करून त्यास जवळ बोलाविलें. तो पित्यासन्निध आदर पूर्वक बसला.

"विद्याधर, बरा वेळेवर आलास. तुझें वय आज बारातेरा वर्षांचें आहे व्यवहार तुला साधारण समजूं लागला आहे. तुला मोकळेपणानें चार गोष्टी सांगण्याला कांहीं हरकत नाहीं. विद्याभ्यास पुरा होऊन तुह्मी मिळविणारा नांवलौकिक पहाण्यास मी शिल्लक रहात नाहीं. पण एवढें ध्यानांत ठेव. ही तुझी आई यापुढें माझ्या जागीं आहे. तुह्मांला दुसऱ्याच्या तोंडाकडे पहा- वयास लागूं नये अशी व्यवस्था असली तरी तुह्मांला त्रास भोगावा लाग- णारच. तुझ्या आईबद्दल सगळ्यांच्या मनांत तेढ आहे. तिचें बरें कोणाला पहावत नव्हतें; त्या सगळ्यांचे डोळे आतां निवतील. हिचा अपराध नस- तांना जर कोणीं हिचा छळ करील तर तो सहन करूं नको. परंतु दुसऱ्याची अमर्यादाहि करूं नको. ईश्वर तुमचा पाठिराखा आहे. उपाशीं मरा पण बाणा सोडूं नका." यशवंतराव येथेंच थांबले.

सगळ्या नामांकित डाक्टरवैद्यांचे उपाय हरले. मुलगा व पति वांचावा ह्मणून पार्वतीबाईनें व उमेनें बोललेले नवस निष्फळ ठरले व यशवंतराव या जगाला सोडून पुढें दोनतीन दिवसांनीं चालते झाले. त्या गडबडींत धाकट्या भावानें थोरल्या भावाजवळ विश्वासानें आपल्या कुटुंबाची पुढें काय व्यवस्था करावयाची तें सांगून ठेवलें होतें. तें गणूभाऊंनीं कोणास कळूं दिलें नाहीं. उमा माहेरीं जाऊन परत सासरीं येऊन राहिली.

ही हकीकत आह्मीं पूर्वींची थोडीशी माहिती व्हावी ह्मणून सांगितली आहे. व सांगायचें कारण एवढेंच कीं, मरतांना व त्या पूर्वीं पतीनें अनेक प्रसंगीं गतभर्तृकांनीं पाळावयाचे आमच्या समाजांतील नियम तोडण्याविषयीं आज्ञापिल्यामुळें पार्वतीबाईच्या संन्यासदीक्षेसंबंधी प्रश्नाला उमेनें स्पष्ट नकार

सांगितला. दोघां मायलेकींनीं पुष्कळ अकांडतांडव केलें पण व्यर्थ ! गणूभाऊंची तसें करण्याबद्दल उमेजवळ उघड बोलण्याची छाती होईना कारण त्यांचें त्यांसच ठाऊक. पुढें ही गोष्ट हळू हळू मागें पडली.

पिता असतांना विद्याधर फार हेकेखोर असे. परंतु आतां तो अगदीं गरीब झाला. आपल्या अभ्यासांत चोख राहून कोणाच्या अध्यांत मध्यांत न पडतां तो आपल्यासंबंधीं अपशब्द काढण्यास कोणास अवसरच मिळूं देत नसे. गणूभाऊंचें एक वडिलार्जित घर त्यांच्या रहात्या घराशिवाय होतें तिकडे तो राही. फावल्यास आईची मात्र विचारपूस तो नेहमीं करी. एकदां दोनदां मथुरा व बाळंभट जोशी यांमधला आपल्या आईच्या वाईटावरचा संवाद त्यानें ऐकला होता. पण तो लक्षांत ठेवण्यापलीकडे त्यानें कांहीं केलें नाहीं. आत्याबाईचा व भाच्याचा कधीं कधीं खटकाहि उडे.

जवळजवळ दोन वर्षांनंतर सासूनें व नन्संनीं तिला हांकलून लावण्याची मसलत केली. तेव्हां आईनें विद्याधराला एके दिवशीं एकटा गांठून सगळें त्याच्या कानावर घातलें. विद्याधराला त्यामुळें भय असें मुळींच न वाटून तो ह्मणाला—

"आई ! वेगळें व्हावें लागेल ह्मणून आपल्यास वाईट वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. खुशाल मोलमजूरी करून पोट भरण्याचें सामर्थ्य आह्मांत नसण्याइतके आह्मी नामर्द नाहीं. चल, त्यांनीं निघा ह्मणण्यापूर्वींच आपली तयारी पाहिजे. वारा वाहील तशी पाठ देणें रास्त आहे."

हे धीराचे शब्द ऐकून तिला बरें वाटलें. "बाळा, तुझ्यावर मी पोटाची काळजी पडूं देणार नाहीं. कष्ट करीन व तुझा विद्याभ्यास पुरा होईतोंपर्यंत सर्वांचें पोट भरीन."

मथुराबाई आडून सगळें ऐकून गर्जूं लागल्या— "आई, पाहिलेंस का इकडे ? या मायलेकरांचे वेगळें होण्याचे बेत ऐक. आतां बाहेर पडण्याचें वाटतंय सूख पण तसें झालें नाहीं तोंपर्यंतच. फुकटचें अन्न कुठलें गोड लागायला ? अशाच कुकल्पना आठवायच्या. वेगळें झाल्यावर कोणी कुत्रें सुद्धां

विचारायचें नाहीं. बाहेर निघणार कुणाच्या जीवावर कोणास ठाऊक! उपासमार झाली ह्मणजे कळेल वेगळेपणाचें सुख. मग येतील आमच्याच दारीं लोटांगण घालीत अन् नाक घांशीत."

स्वयंपाकघरांतून आईसाहेबांचे वरच्याचे प्रतिध्वनि निघूं लागले. "तिला ह्मणावें आत्तां चालती हो तुला जिकडे जायचेंय तिकडे. एवढी नको ऐट. अहाहाग ! माहेरीं कोणी पुसेना मग आली धिंडका इथें. तें विसरली वाटतें !"

सासूबाई स्वयंपाकघरांतून निघाल्या. "गणूभाऊ असता तर कालच काय ती याची वाट लावली असती. पण हें कुठपर्यंत सोसायचें ? मीच तिला आत्तांच्या आत्तां घराबाहेर काढतें. काय मेले वनवास. सुखाचें अन्न देखील अंगीं लागूं देईनात." पार्वतीबाईचा राग अनावर झाला. "मोठी दोन मुलांची आई तीन मुलांची आई ह्मणून गप्प बसतें तों हिचें आपलें वाढतच चाललें. सटवाईनें जसा माझा छळ मांडलाहेन् ! थांब— गणूची आतां वाट पहात नाहीं. सासू वाईट ह्मणून ह्मणतील लोक ना ? ह्मणूं देत. आत्तां कुठें नाहीं ह्मणत ? बोलणाराचें तोंड दिसतें पण यांचे गुण दिसतात का ?"

फणफणत स्वारी थेट विद्याधर व उमा होती तेथें गेली व तिचा हात हिसकून "चल, निघ, आत्तां निघ बाहेर" असें ओरडली. उमेनें हात सोडवून घेतला. दुसऱ्यांदा सासूनें हात उचलला पण विद्याधरानें तो मध्येंच धरला. "सोड मेल्या माझा हात. मथुरे— अग मथुरे." विद्याधरानें तिकडे लक्षच दिलें नाहीं. "आजी, माझ्या आईच्या अंगावर तुला हात टाकण्याचें कांहीं कारण नाहीं. उगाच खटपट करूं नको. मी तुझा हात सोडणार नाहीं." आत्याबाई मध्यें पडल्या संतापाच्या भरांत. "घरांत कलागती लावण्याचें काम तूं करतेस. दूर उभी रहा. माझ्या अंगाला हात लावूं नको." अशी संभावना व धाक मिळतांच त्या तेथेंच उभ्या राहिल्या. "आजी ! नुसतें तोंडानें सांगून पहायचें होतेंस अगर गणूकाकाकडून सांगावयाचें होतेंस. मारण्याचें अन् दंगा करण्याचें कारण ?" आजीबाईचा कांगाव चाललाच.

त्या दोघांची झटापट उमेनें सोडविली व आरडाओरड चालली होती तों बाळंभट आले. पार्वतीबाई व मथुरा यांना त्राता भेटल्यासारखा आनंद झाला. "अरे आहे काय दंगा?" उमेकडे पहात प्रतिष्ठितपणानें ते ह्मणाले.

"फुकटच्या अन्नावर माजलेला हा रेडा, मला आज मारायला निघाला कीं हो! तुह्मी अगदीं वेळेवर आलां; नाहीं तर काय केलें असतें कारट्यानें कोणास ठाऊक?"

"झालाच आहे तो तसा फाजील अलीकडे. तुला राग फार आली असेल तर भिंतीशीं टकरा दे पण हा काय पुंडावा?" रागाच्या आविर्भावानें धाक बसविण्याच्या स्वरांत बाळंभट वदले. नंतर त्यांनीं मथुरेचा हात धरला "बरें चला बाहेर. काय एकंदर हकीकत आहे ती तर सांगा."

"नाहीं भटजी! याला अगोदर चांगली जरब दाखवा. भारी भारी उर्मट झाला आहे." आत्याबाईनें भटजीस फर्माविलें.

"भटजी! तुह्मी कसेहि असा पण चुकीवांचून मी तुह्मांला त्याला मारूं देणार नाहीं. आणि चूक सांगितली तर मी त्याला शासन करीन. उगीच नोकर-चाकर किंवा भटाभिक्षुकांसारख्या आश्रितांनीं पायरी सोडून वर्तन केलेलें मला खपणार नाहीं."

भटजींना इर्षा चढली व "बाईसाहेब, हा दिमाख माझ्यापुढें नको बरं का? पहाच तर माझा या घरांत कसा अधिकार आहे तो." असें ह्मणत ते विद्याधराचे अंगावर चालून गेले.

"घरोघरच्या अन्नावर पोसलेल्या कुत्र्या!" विद्याधरानें एक रट्टा भटजीच्या छातींत लगावला. त्याबरोबर देहभान हरपून बोवा मट्टादिशीं खालीं बसले. मथुरा व पार्वतीबाई आरडाओरड करीत त्याजवळ गेल्या व त्यांची विचारपूस सुरू झाली. उमेनें घाबरून "विद्याधरा! काय केलेंस हें?" विचारलें. "भिऊं नको. या भटानें त्या घरीं मला दिवसरात्र अगदीं भंडावून सोडलें होतेंन्. हा कोण आमचा काका का मामा? घरच्या मंडळीपेक्षां जिथें तिथें याचाच बडेजाव फार. आई, हा मोठा वाईट माणूस आहे.

कण्हत कुथत एकदांचे भटजी उठले. "ब्राह्मणाला मारलेंस, चांगलें केलेंस रे चांडाळा! आई आई. मथुराबाई अन् काकू, तुमची शिकवणूक फार छान्. बेलगामी झालीं आहेत पोरें. देवा- रामा- शंकरा—!!" दोघां मायलेकींनीं त्यास हातीं धरून बाहेर ओटीवर नेलें.

*　*　*　*

संध्याकाळीं गणूभाऊ घरीं येतांच पुढचा बेत सुरू झाला व त्या चौकडीनें दोन तीन दिवसांत आपली वेगळें होण्याची सोय करा ह्मणून फर्मान विद्याधर व उमा यांस सुनविलें.

आईची अमर्यादा झालेली कोणत्याहि सबबी ऐकून सहन करणारे गणूभाऊ नव्हते. त्यांचा आईवर विश्वास निरतिशय होता व तिचें ह्मणणें खरें मानून त्यांनीं यापूर्वीं आपल्या दोघी बायकांचे आई सुचवील तसे हाल केले होते व त्यामुळें झालेल्या दुर्लौकिकाची त्यांनीं फारशी फिकीर बाळगली नाहीं. बायकांच्या सहवासानें पुरुष बिघडतात व त्यांच्या तंत्रानें वागून आईबाप अगर इतर वडील मंडळी यांचा आदर ठेवीत नाहींत या गोष्टीला ते अपवाद होते. अशा स्थितींत विद्याधरानें आईचा हात धरला, बहिणीस दटावलें व घरच्या दिवाणगिरीचें काम करणाऱ्या भटजींना मारलें ही गोष्ट सहन कशी व्हावी? दोन दिवस आपण सरकारी कामामुळें घरीं नव्हतों तर उमेनें त्या दोघींना अगदीं सळो का पळो केलें हें ऐकून त्यांना फार राग आला. भटजींनीं त्या मायलेकींच्या कहाणींत आपल्या माराची चुरचुरीत भर घालून असा बार भरला कीं, त्याच्या धडाक्यानें उमा व विद्याधर यांना तत्काल सोडचिठ्ठी मिळाली. "दोन तीन दिवसांत त्यांनीं काय ती आपली सोय करावी. यापुढें त्यांना आमचें घर वर्ज्य." असा गणूभाऊंचा हुकूम सुटला.

"मी तर ह्मणतें कीं, त्यांना आत्तांच्या आत्तां घरांतून लाथ मारून हांकलून द्यावें— या सापांना कितीहि ममतेनें वागविलें नि दूध पाजलें तरी तें आपला विष ओकण्याचा गुण टाकणार आहेत का? गणूभाऊ आपला गरीब

ह्मणून दोन तीन दिवस तरी घरांत रहाण्याची सवलत देतो आहे. माझ्या-सारखी तर एक पळभर ठरूं देणार नाहीं घरांत.'' आईसाहेब ह्मणाल्या.

''खरेंच आई! आपला गणू फार गरीब हाडाचा. हे चाळे त्यानें ह्मणूनच आजपर्यंत चालूं दिले. दुसरा कोणी एखादा असता तर— फार कशाला तिचा नवरा असता तरी देखील त्यानें अशा वागणुकीबद्दल प्रत्यक्ष बायकोला मोजून पैजारा मारल्या असत्या.'' तिरस्कारानें मथुराताई वदल्या.

''पण पार्वतीकाकू, तिला बाहेर काढल्यानंतर—'' भटजींचें भाषण मध्येंच तुटलें.

''नंतर काय? अब्रू जाईल एवढेंच ना?'' पार्वतीबाई उसळल्या. ''अहो गणूभाऊच्या दोघी बायकांनीं कुठें ठेवली आहे शिल्लक ती हिच्यामुळें जाणार? लोकांना भ्यायचें भ्यायचें तरी मेलें कुठपर्यंत?''

''आणखी असें बघा गुरुजी,'' गणूभाऊ शान्त स्वरांत बोलूं लागले. ''लोक कशाला नांवें ठेवीत नाहींत? त्यांना आंतल्या का गोष्टी ठाऊक असतात? करतील टवाळी थोडीशी पण तिला भिऊन आपले हाल किती दिवस करून घ्यायचे? मी आजपर्यंत गय खाल्ली ती तुह्मांला ठाऊक आहेच. रोजच्या रोज आईनें तोंड वाजवावें अन् उमावहिनीनें तिकडे कानाडोळा करावा हें बरें दिसतें का? तिच्यावर वाईट प्रसंग आला हें मी जाणतों. आईला देखील तें समजतें आहे. निष्कारण कुणी कुणाला छळील का? नाहीं, तुह्मीच याचा विचार करा. आह्मी एक घरचीं माणसें द्वाड आहों असें का घटकाभर धरून चालाना? पण तुह्मी तिऱ्हाईत आहां. तुह्मी आज दोन अडीच वर्षें आमच्या घरीं आहां, तुह्मांला सगळ्या बारीक सारीक गोष्टी ठाऊक आहेत. तुह्मीच सांगा. आई जें कांहीं सांगत असेल वहिनीला तें कांहीं वाईटासाठीं नव्हेना? मग तिकडे दुर्लक्ष करून तिचा पाणउतारा करण्यांत उमेनें काय मिळविलें? मी ह्मणतों एक वेळ तोंडातोंडीं वाद चालला होता तोंपर्यंत हरकत नाहीं. पण अगदीं मारामारीवर येण्याचें काय कारण? बरें, कारटा आपल्या देखत सासूवर हात टाकतो हा

प्रकार वहिनीची तशी फूस नसती, तिनें तसें त्यास शिकविलें नसतें, तर तिला सहन झाला नसता. सासू काय दोन हिताच्या गोष्टीच सांगत असेल ना? काय गुरुजी, मथुताई तरी कांहीं परक्याची नाहीं तिला टाकून बोलायला आणि तुमच्यावर त्यानें गहजबच उडविलान्. इतक्या थराला गोष्ट गेल्यावर अगदीं शान्त धर्मराज असला ह्मणून गप्प बसेल का?"

गणूभाऊंचा मतलब ध्यानांत घेऊन भटजी इतका वेळ मान तुकावीत होते व तिऱ्हाईत या नात्यानें आपल्याजवळ झाल्या प्रकाराचा ते न्याय मागतात याबद्दल त्यांस आनंद झाला. "गणूभाऊ, तुह्मी करतां हेंच योग्य आहे! आंतल्या भानगडी ठाऊक असल्यावर कोणीहि असाच निकाल देईल. माझ्या मतें तुमच्या इतके गरीब तुह्मीच, दुसरा मजसारखा असता तर त्या उमेचें अन् तिच्या बेमुर्वत पोराचें कंबरडेंच मोडून टाकता. छे छे, तुह्मी ह्मणजे आजपर्यंत सहनशीलतेची कमालच केलीत." भटजीच्या बोलण्यानें गणूभाऊस बरें वाटलें. त्यांनीं विद्याधराला हाक मारली. विद्याधर घरांतच होता. तो पुढें आला. "बाबारे! तुझा शहाणपणा आतां फार वाढला आहे. तुझा आजचा गुन्हा मर्यादेबाहेर आहे. तुह्मी दोघेंहि मायलेंकरें विद्वान् आहां. तुमच्यापुढें आमचा निभाव लागणें कठिण दिसतें. तेव्हां आपलें बिऱ्हाड वेगळें करा आणि मग पाहिजे तर नागवे नाचा, काय वाटेल तो धिंगाणा घाला समजलांत. आजपर्यंत झालें तेवढें पुरें झालें." विद्याधराचें तोंड उतरलें होतें. भावी प्रसंगामध्यें आपणास स्वतःच्या कष्टानें पोट भरलें पाहिजे याची जाणीव त्यास उत्पन्न झाली होती. आई व धाकटें भावंड इतक्यांचें पोषण अंगावर पडणार या कल्पनेनें त्याची तरतरी जाऊन निराशेनें चेहऱ्यावर ग्लानि आली होती. तो गणूभाऊसमोर उभा राहिला व शान्त मनानें सगळें ऐकून घेऊन ह्मणाला—

"काका! माझ्या आईला व मला घरांतून हाकलून लावण्यासारखे आमचे अपराध तरी काय आहेत? आजीनें, आत्याबाईनें, या भटजींनीं, तुह्मांपैकीं कोणीहि एक दोन गुन्हे तर सांगावेत. का आई ह्मणते सून अपराधी

तेंच खरें मानायचें ! आह्मी घरांत नकोसे आहोंत हें उघड आहे. आह्मी जातों. ईश्वर आमचा पाठिराखा आहे. जगांत यच्चयावत् प्राणी कांहीं तुमच्यामुळें जिवंत राहिले असें नाहीं. आजीचा हात धरला, भटजींना मार दिला, हा माझा कदाचित् अपराध असेल, पण माझी आई गुन्हेगार नाहीं हें मी बजावून सांगतों. ईश्वरानें आमच्या पोटापुरती दोन घांसाची सोय कोठेंहि केलेली असेलच."

"अलीकडच्या पोरांना चुरुचुरु बोलायला तेवढें सांगा." मथूताई वेडावून ह्मणाल्या, "ह्मणे आमच्या दोन घांसांची सोय देवानें केलीच असेल ! मरा मेल्यांनों !"

"तुझी आई नाहीं अपराधी तर कोण आह्मी असेंचना तुझें ह्मणणें ? होय आह्मीच लबाड. तसें कां होईना ? तुह्मी साव असा बरें." पार्वतीकाकू गरजल्या.

"काय प्रतिष्ठित आहे हो पोरगा ! काय वेदान्त सांगतो आहे ! एखाद्याला वाटेल जसे कांहीं आह्मीच दुष्ट अन् हे अगदीं गरीब. बघतोय पहा कसा रामोशी. दिसायला गोजिरवाणा पण आंत काळें काळें पाप भरलंय मेल्याच्या." मथूताई ठमक्यांत बोलल्या.

"देवांनीं तुमचे घांस कुठें ठेवले आहेत तेंच शोधण्यासाठीं आपल्याला हें घर इत:पर मुकलें बरें का ? मध्याह्न झाली ह्मणजे कळतें आपोआप सुख. जा, जिकडे वाट फुटेल तिकडे जा." भटजीच्या तोंडून मुक्ताफळें गळलीं.

विद्याधर फार वेळ तेथें न रहातां घरांत चालता झाला. गणूभाऊ व इतर मंडळी यांचीं फिरून खलबतें चालू झालीं व त्यांत भटजींनीं आपलें फारसें अनुकूल मत दिलें नाहीं. "पार्वती काकू ! मी सगळें कांहीं जाणतों. पण अद्यापि जर थोडीशी रदबदली करून उमेला ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला तर कांहीं बिघडणार नाहीं. किती झालें तरी तीं आपलीं माणसें, आपल्या रक्ताचा त्यांशीं संबंध आहे. तेव्हां त्यांना तोडून टाकणें कांहीं इष्ट नाहीं. जा ह्मटलें ह्मणजे आतां जातील. पण अशी घाई न करतां—"

"इतके दिवस दम धरला तरी आमचीच का घाई ?"

"तसें नव्हे. जसा आजपर्यंत धीर धरला तसाच थोडा पुढें धराल तर पहातों मी प्रयत्न करून. नाहीं तर जा ह्मणायचें हें ठरलेलेंच आहे. पहा बोवा."

"तुमचा इतका अपमान केला तरी अजून त्यांच्याशीं लगट करायला तयारच ना? धर्थ आहे बोवा तुमची." मथूताई हंसल्या.

"अहो, हें चालायचेंच. त्यांत काय मोठेसें? पण उद्यां तुह्मीच ह्मणाल कीं, जरा समजी झाली असती तर बरी. होय." सर्वांकडे भटजी टकमका पाहूं लागले. गणूभाऊंना गोष्ट पटली. हें प्रकरण थोडक्यांत मिटलें तर त्यांत कांहीं वावगें नाहीं असें वाटून त्यांनीं "आई, गुरुजी ह्मणतात तसें कां होईना? आज इतके दिवस लोटले तसे दोन आणखी" अशी संमति दर्शविली.

"आई! गणूभाऊंना ही गोष्ट पटली, भटजी खटपट करणार, त्यांना रुकार कां देईनास?" मथूताई, चिरंजीव व वेदमूर्ति या तिघांची भीड पडून नाइलाजानें पार्वतीबाई त्यास कबूल झाल्या.

त्या दिवशीं संध्याकाळीं दोघी मायलेकी बाहेर देवदर्शनार्थ गेल्या. गणूभाऊ दुपारींच कामावर गेलेले. त्यांची येण्याची वाट नव्हती व विद्याधरहि घरांत नसावा असें समजून बाळजोशी घरांत शिरला. घरांत दिवाबत्ती करून उमा सचिंत बसली होती. मागून भटजी आल्याचें तिच्या मुळींच ध्यानांत आलें नाहीं. बाळजोशानें तिच्या शरीरास स्पर्श केला तों ती दचकून एकदम उठली व पहाते तों बाळंभट समोर हंसत उभा. परपुरुष व जवळ घरांत लहान मुलाखेरीज कोणी नाहीं. कोणत्या हेतूनें हा आला असेल याची तिला प्रथम कल्पनाच येईना. ती दूर सरली व संतापानें ह्मणाली, "भटजी! भलत्याच वेळेला घरांत कोणी नसतांना तुह्मी कशाला आलांत?" ती बोलत असतां तिचें अंग भयानें थरथरूं लागलें. हा धटिंगण कांहीं वेडें वांकडें मनांत योजून इथें आला असला तर! हा विचार तिच्या भयाचें कारण. तिनें आसपास पाहिलें पण धीर येण्यासारखें जवळ कोणीच दिसेना. "विद्याधर, अरे विद्याधर! बाळ विद्याधर" असें तिनें गांगरून पुकारलें पण

त्यास मुलाकडून साद मिळाला नाहीं. तिची स्थिति भट स्थिर चित्तानें टक लावून पहात होता. "भटजी ! तुमचें कितीहि जरूरीचें काम असलें तरी तुह्मी येथून आत्ताचे आत्तां आल्या वाटेनें परत जा. मला तुमचें एक अक्षर सुद्धां ऐकायचें नाहीं. चला निघा. मी एकटी बायको तुमच्याशीं बोलण्यास तयार नाहीं व तुह्मी माझें चित्त भानावर आणण्यासाठीं मला शिवलांत हें गैर केलेंत." अर्धवट तिरस्कार, अर्धामुर्धा संताप व बरेंच भय अशा मिश्र मनोविकारांच्या गडबडींत तिनें भटजींना वरीलप्रमाणें इशारत दिली, परंतु भटजीवर त्याचा परिणाम झाला नाहीं.

"उमाताई, तुमच्यावर कोणता प्रसंग आहे, याची पुरी ओळख झाली नाहींसें दिसतें. मी तुमच्या अंगाला शिवलों इतकेंच नव्हे त्याहिपेक्षां आणखी कांहीं केलें तरी तुमच्या हाकाटीकडे लक्ष देऊन माझें वांकडें करण्याइतकी तुमची पत निदान या घरांत तरी नाहीं. या कुटुंबांत मी ह्मणेन ती पूर्वदिशा आहे. माझ्याशीं सलगीनें वागलांत तर तुह्मांस अजून सुद्धां या घरांत थारा मिळेल." भटजींनीं गंभीर स्वरांत उद्गार काढले.

उमेचें मन थाऱ्यावर नव्हतें. ती भटजीचें बोलणें ऐकलें न ऐकलेंसें करून बाहेर जाण्यासाठीं दारापाशीं आली तों बाळंभट दार अडवून उभा. "भटजी ! घरांत कोणी नाहीं. तुह्मी सध्यां जा. आमचें बरें वाईट पाहून घेण्याला देव समर्थ आहे. आमच्यासाठीं घरोघरच्या तुकड्यांवर पोसलेल्या माणसांची भीड नको खर्चीं पडायला. या कुटुंबांतली तुमची इभ्रत तुह्मांसच लखलाभ होवो. व्हा बाजूला. मला बाहेर जाऊं द्या." उमा काकुळतीला आली.

"मला ठाऊकच आहे. अहो, माझा जन्म गेला बायकांमध्यें. पहिल्यांदा अवसान आणतील, भय दाखवतील, पुरुषाचें मन पहाण्याकरितां काय पाहिजे तें करतील. पण अखेरीस यायच्या मूळपदावर. हें पहा उमाबाई, मीं जावें अशीच जर तुमची इच्छा आहे तर मी स्वच्छ विचारतों, तुह्मांला इथें नांदायचें असेल तर अद्याप माझ्या हातीं आहे. माझ्याशीं विरोधानें

वागाल तर फसाल. पहा विचार करून." भटजी निश्चयाच्या व किंचित् दटावणीच्या आवाजांत ह्मणाले. "पार्वतीकाकू, मथूताई, गणूभाऊ यांनीं तुमच्याशीं ममतेनें वागावें असें जर तुह्मांस वाटत असेल तर माझ्याशीं नीट वागा. मथूताई काय माझ्या सांगण्याबाहेर जाणार नाहींत, गणूभाऊ सदा फिरतीवर, गरीब भोळा ब्राह्मण, मी सांगेन त्याला हो ह्मणेल. काकू ह्मातान्या सबब त्यांना जसें मथवावें तशा नाचणार. सगळी किल्ली माझ्या हातीं आहे. बघा. ही शेवटची वेळ आहे."

उमेचा संताप वाढला. "भटजी! तुमच्यासारख्या परक्या माणसाच्या मेहेरबानीकरतां जन्माचे मिंधे रहाण्याला मी कबूल नाहीं. सासूबाई, वन्सं आणखी भाऊजी यांच्या समजुतीनें तुह्मी सज्जन असाल, ते तुह्मांला तळहातावरच्या फोडाप्रमाणें जपत असतील, ह्मणून मला कांहीं तसें करावेंसें वाटत नाहीं. देव अनाथांचा वाली आहे. तो आमचा संभाळ करण्याला समर्थ आहे. तुह्मांला श्रम नकोत. तुह्मी बऱ्या बोलानें चालते व्हा. मी पुन्हां बजावून सांगतें."

"दुर्बळ बायकांच्या दटावणीला जर भीक घालूं लागलों तर माझा आजपर्यंत कोठेंच निभाव लागला नसता समजलांत उमाबाई! माझी सत्ता या घरांत असेतोंपर्यंत तुह्मी खुशाल वाजवा. काय? मी ह्मणेन तसें वागून इथें रहायचें आहे का नाहीं? बोला एक उत्तर. जाऊं द्या, मला फार बोलणें आवडत नाहीं." रागाच्या आविर्भावानें भटजी गुरगुरले व उमेजवळ सरले. "दूर हो मेल्या मांगा. एकटी दुकटी बायको पाहून आला इथें पाणचटपणा करायला. मघापासून पुन्हां पुन्हां निक्षून सांगतें, तुमचें ह्मणणें मला कबूल नाहीं. तुमच्याजवळ मी गाऱ्हाणें गाईन त्या दिवशीं तुह्मी आपला अधिकार गाजवा. भिक्षांदेहविर माजलेला भट, पण ऐट पहा कशी सांगतो आहे." उमेनें दोन पावलें मागें हटून याप्रमाणें ह्मटलें. पण त्या निलाजऱ्या कोडग्या ब्राह्मणाला त्याचें कांहीं न वाटून तो जास्त लगट करण्याच्या रंगांत आला.

"अशा फुणक्याच्या स्त्रियांचे आजपर्यंत मीं पुष्कळ अनुभव घेतले आहेत. उमे, अनाथांचा वाली परमेश्वर मागच्या युगांत असेल पण आज—माझ्या" —किंचित् बारीक आवाजांत— "उमे, आज मी दारोदारच्या तुकड्यांवर पुष्ट झालेला असो, कीं कोणी असो; पण आज तुझ्यासारख्या सच्चेपणाची बढाई मारणाऱ्या अनेक बायका माझ्या कबज्यांत आहेत. खऱ्या मालकापेक्षां आमच्यासारख्या अलबत्या गलबत्यांना त्या जास्त वश असतात. त्यांतलीच तूं एक. उमे, बोल. माझ्या ह्मणण्याला हो ह्मण, सगळी मंडळी तुझा गौरव करतील,—अशानें ऐकत नसशील तर—हा तुझा हात माझ्या कबज्यांत घेऊन" भट अगदीं जवळ गेला. "चंडाळा, दुष्टा, विद्याधर विद्याधर" उमा घाबरून हांका मारूं लागली.

"तें पोर मला काय आडवें येणार उमे! पहा ओरड, अशीच हांका मार." बाळंभट तिला धरणार तों बाहेर अंगणांत जोड्याचीं पावलें वाजलीं. भट चपापला. त्याच्या दांडगाईत व्यत्यय आला. दाराशीं जाऊन पहातो तों कोणी गृहस्थ गणूभाऊंची चवकशी करण्यासाठीं आल्याचें दिसलें. उमेला तेवढाच अवसर सांपडून ती चटकन दुसऱ्या खोलींत निघून गेली. ईश्वरानेंच अनर्थ टाळला. बाहेरच्या इसमानें गणूभाऊ घरीं नाहींत व आज ते कामावरून येणार नाहींत असें ऐकतांच त्यांच्या मातुःश्रीबद्दल विचारलें. "त्या पुराणाला गेल्या आहेत." "किती वेळ झाला?" "कांहीं फार नाहीं." "पण संध्याकाळ उलटली, आतां त्या येण्याच्या बेतांत असतील." भटजीनें उत्तर दिलें, "नियम नाहीं." परस्थानें विचारलें, "आपण कोण?" "मी त्यांचा आहे लांबचा नातलग." "गणूभाऊचा एखादा भाऊ लग्नाचा आहे नाहीं?" "होय. कां?" "त्यांचें लग्न यंदां करताहेत असें ऐकून सहज कांहीं विचारपूस करण्यासाठीं आलों." "असें का? मग तर उद्यां या सकाळीं असे आठ वाजण्याच्या सुमाराला." "मी आतां त्या येईतोंपर्यंत बसतोंच इथें. त्यांना भेटून गेलें ह्मणजे बरें." परस्थानें तेथेंच बाहेरच्या ओट्यावर तळ दिला. भटजींनीं त्यास घालवून देण्यासाठीं बरीच प्रतिष्ठित खटपट

केली पण तो इसम पडला खमंग! तो पार्वतीकाकूंना भेटण्यासाठीं बसला तसाच. भटजींचा नाइलाज झाला. उभेशीं चाललेल्या त्यांच्या प्रसंगाची अगदीं ऐन रंगांत या आगंतुकानें घाण केली ह्मणून मनांत ते पुष्कळ चरफडले. तो त्रयस्थ इसम स्वतःशीं गुणगुणत पाय हलवीत स्वस्थ बसला. भटजी त्याशीं प्रथम मुळींच बोलले नाहींत; पण गैर दिसेल ह्मणून मग संवाद करूं लागले. तेवढ्यांत त्याला सहज माजघराच्या आंतल्या खोलींत कोणी तरी बोलत असावेंसें वाटलें.

---

## प्रकरण तिसरें.

## लग्नाच्या वाटाघाटी.

"आपण कोठले?" भटजींनीं त्या अनोळखी गृहस्थाशीं भाषणास आरंभ केला.

"मी महाडचा रहाणारा आहें."

"आपलें उपनांव?"

"डोंगरे."

"आपण इकडे इतक्या लांब आलांत?"

"मुलीला स्थळ पहाण्यासाठीं आलों."

भटजी जरासा विचार करीत होते. कांहीं आठवलेंसें करून "काहो ते तिकडे— मुंबईशेजारीं— काय हो त्याचें नांव— तिथें ते गणपतराव डोंगरे रहातात. त्यांशीं कांहीं आपला संबंध?"

नवख्या गृहस्थानें पुष्कळ डोकें खाजविलें पण त्यास हे गणपतराव डोंगरे, व तेहि मुंबईशेजारीं निनांवी गांवांत रहाणारे आपल्या नातेवाइकांत सांपडेनात. "अहो, डोंगरे काय दुनियेंत पुष्कळ असतील." यावर भटजी हंसले. "नाहीं ते मोठे धनिक सावकार आहेत. नांवलौकिक मोठा आहे. नसतील कदाचित् आपणांस ठाऊक."

"गणूभाऊ काय उद्योग करतात?" डोंगऱ्यांनीं प्रश्न विचारला.

"त्यांना सरकारी नोकरी आहे. शंभर का कितीसे—" भटजी विवंचनेंत पडले "होय— आहे वाटतें शंभर रुपये पगार अन् सध्यां सहा महिने त्यांना फिरावें लागतें त्याबद्दल कांहीं भत्ता कितीहो परवा ते ह्मणाले— तीस का पस्तीस मिळतो."

"बरें त्याखेरीज—"

"तुह्मी तर अगदीं चवकशीच करताहो !" आश्चर्यानें भटजी ह्मणाले.

"अहो, मुलगी द्यायची त्याबद्दल अगोदर चवकशी नको का करायला ? अहो, हा व्यवहार आहे."

"त्यांत काय आहे ? अहो या सरळ गोष्टी. अहो प्रसंग आला ह्मणजे असें करावेंच लागतें." भटजींनीं एक विकट हास्य केलें. "त्याखेरीज त्यांचें एक सत्तेचें घर आहे. एक कां, चुकलों तीन आहेत. हें रहातें व दुसरीं दोन भाड्यानें दिलीं आहेत. अहो ! मोठें नांवाजलेलें जुनें घराणें आहे. पेशवाईमध्यें यांचे पणजे मोठे मुत्सद्दी होते."

"आतां सध्यां कांहीं पेशवाई नाहीं. पेशवाईत काय होतें हें पहाण्यापेक्षां सांप्रत काय आहे तिकडे लक्ष देणें बरें ! तुह्मांला नाहीं का असें वाटत ?" डोंगऱ्यांनीं प्रश्न केला.

भटजींना तें फारसें रुचलें नाहीं. "तें तर आहेच, पण जिथें मुलगी पडायची तिथली जुनी पिढीजाद माहिती असणें बरें. सहज सांगितलें."

"लग्नाचा मुलगा काय करतो ?"

"येथें न्यू इंग्लिश स्कुलांत सहाव्या यत्तेंत आहे. गुदस्तांच तो पहिल्या परीक्षेला जायचा पण त्याला आज दोन वर्षें शाळेंतल्या मास्तरांनीं मनांत वांकडें धरून सहावींत पासच केलें नाहीं. अहो मुलगा हुशार असला तरी वर चढवणें मास्तरांच्याच हातांत कीं नाहीं ? दुसरें कांहीं नाहीं तर घेतात हाच अधिकार गाजवून. तोंडपुजेपणा करणाऱ्या पोरांवर मास्तरांची मर्जी असते पण आमच्या वामनरावाला कुठें येते ती विद्या ? तो आपला सरळमार्गी—"

"त्याचें वय काय ?" डोंगऱ्यांनीं भटजींची चर्पटपंजरी मध्येंच प्रश्न विचारून थांबविली.

"वय कांहीं फार नाहीं. आहे एकोणीस वीस वर्षांचें."

संवाद येथपर्यंत आला तों पार्वतीकाकू व मथूताई देवपुराण होऊन परत आल्या. त्या आंत गेल्यावर भटजींनीं डोंगऱ्यांस हीच ती मंडळी असें खुणावून आंतहि "तुमच्या वामनाला मुलगी सांगून आली आहे हो" असें सुचविलें.

मथूताईवर स्वयंपाकाचें काम पडून पार्वतीकाकू डोंगऱ्यांशीं बोलण्यासाठीं माजघराच्या दाराजवळ ओटीवर बसलेल्या इसमांना दिसतील न दिसतील अशा थाटांत बसल्या. भटजी मध्यस्थाचें काम करीत होतेच.

"यंदां मुलाचें लग्न करायचें आहे का काकू" ? असा डोंगऱ्यांचा प्रश्न भटजींनीं पार्वतीबाईस ऐकविला.

" होय जुळलें तर येत्या वैशाखांत करून टाकायचें आहे. त्याला मुली सांगून येताहेत पण अजून कांहीं जमत नाहीं. तुमची मुलगी केवढी आहे पण ?" दाराआडून मोठ्या मर्यादेच्या स्वरांत जबाब व प्रश्न आला.

"आहे अकरा बारा वर्षांची."

"मग कांहीं मोठी नाहीं. आहे बेताचीच. परवां त्या— गोखल्यांची नाहीं हो गुरुजी ! गोखल्यांचीच मला वाटतें— होय त्यांचीच चवदा का पंधरा वर्षांची मुलगी ! इश्श काय बाई अरिष्टच तें. ह्या मुली कसल्या जळल्या ! बायकाच त्या." सगळेजण हंसले. पार्वतीबाई पुढें बोलूं लागल्या. "बरें मुलीला आई बाप —"

"दोघेहि आहेत. घर चांगलें संपन्न आहे. मनाजोगा वर मिळाला तर त्यांना मोठ्या हौसेनें लग्न करायचें आहे."

"तें काय विचारतां ! आमचा मुलगा पाहिल्याबरोबर मनांत भरायचाच. त्याबद्दल शंकाच नको. पण हें आह्मीं कशाला सांगायला पाहिजे ? तुह्मी त्याला पाहिलेंत ह्मणजे तुमचें तुह्मांलाच कळेल. दोष काय तो विद्येचा. वि

र्यंत जरा मागसला आहे त्याचें कारण मी तुह्मांला सांगितलेंच." अशी भटजींची शिष्टाई झाली.

"मुलीचें टिपण बिपण कांहीं आणलें आहे का?"

"होय." डोंगऱ्यांनीं एक कागदाचें चिठोरें काढून भटजींच्या स्वाधीन केलें.

शेजारीं समई जळत होती तिच्या मंद प्रकाशांत बाळंभट तीं वाचून "शनी वक्री, चंद्र द्वादश स्थानीं, बुध अस्तंगत, शुक्र मिथुनेचा" इत्यादि ज्योतिष शास्त्रांतील कांहीं परिभाषा सहज ऐकूं येण्याइतक्या मोठ्यानें पुटपुटत व मधून मधून बोटावर कांहीं संख्या मोजीत टिपण पहाण्यांत गुंगल्यासारखे झाले. जरा वेळ गेल्यावर "गुरुजी! आतां राहूं द्या! तें काम मग सावकाशीनें करतां येईल." असें पार्वतीबाईनीं सांगितल्यावर ते पुन्हां डोंगऱ्यांशीं बोलण्यास तयार झाले. पण पुढें होणाऱ्या संवादांत आपलें विशेष लक्ष नाहीं हें पुन्हां पुन्हां पत्रिका पाहून भासविण्यांत त्यांनीं कसूर केली नाहीं.

"हुंडा बिंडा काय घेण्याचा विचार आहे?"

"तें कांहीं अद्याप फारसें ठरलें नाहीं. टिपण जुळलें, मुलगी मनास आली, ह्मणजे मगचा तो प्रश्न आहे." पार्वतीबाईनीं जबाब दिला.

"तरी पण मागच्या मुलांचा किती घेतला, आतां किती घ्यायचा, हें कांहीं तरी ठरलें असेलच कीं नाहीं?"

भटजी मध्येंच ह्मणाले, "महाराज, मी आपल्याला सगळें सांगतों. थोरले चिरंजीव गणूभाऊ यांना पांचशेंखालीं हुंडा घेतलाच नाहीं. त्यांचे धाकटे भाऊ यशवंतराव—ते सध्यां हयात नाहींत—ते फार विचित्र होते; व गाजरेट का कायशी चवथी परीक्षा आहे ती उतरल्यावर, ह्मणजे चांगल्या तेवीस चोविसाव्या वर्षीं स्वारीनें लग्न केलें. हुंडा घ्यायचा नाहीं व मुलगी स्वत: पहायची हे दोन हट्ट त्यांनीं घेतले. काय सांगूं तुह्मांला! आईबापांना इतकें सुद्धां न जुमानतां घरच्या चालीरीतीविरुद्ध त्यांनीं हट्ट पुरवून घेतले बोवा! यांच्या घरची मंडळीच फार करारी. आईनीं न् बापांनीं काय जंग जंग पछाडले पण त्याचा आपला निश्चय कायम. मुलगी चवदा वर्षांची.

करीन तर तिच्याशीं लग्न करीन, नाहीं तर आजन्म अविवाहित राहीन हा बाणा. कधीं कालेजांत असतांना त्या मुलीच्या भावाला— तोहि सध्यां जिवंत नाहीं, कदाचित् आपणास ठाऊक असेल. सदाशिव पेठेंत तो मोठा निळसर वाडा आहे तो, तो त्यांचा. मोठा संपन्न गृहस्थ होता. नारायण श्रीकृष्ण देव हें त्याचें नांव. आमच्या यशवंतरावाची बायको ती त्याची सावत्र बहीण. लग्न करीन ह्मणून वचन दिलें होतें, तें त्यांनीं पाळलें. तेव्हां हुंड्याची कट-कटच मिटली. आतां हें तिसरें लग्न. पहिल्याच्या वहिवाटीप्रमाणें पांचशें-पेक्षां कमी तर घ्यायचा नाहींच हा ठराव. आतां तुह्मीच विचार करा." भटजींनीं विषयांतर करून बराच पाल्हाळ केला.

"बरें आहे. एकूण पांचशें तरी घेणारच."

"कां ? वाटल्यास त्याच्यावर देखील." पार्वतीबाईनीं डौलांत जबाब दिला.

"ठीक आहे. रात्र बरीच झाली आहे. तुमच्याजवळ पत्रिका आहेच. म्हा मुलाच्या टिपणाशीं जुळते का ? होय, बरें आठवलें. मुलगा आह्मांला कसा पहायला सांपडेल ? आज येथें कोठें दिसला नाहीं."

"तो चार सोबत्यांबरोबर सध्यां सुट्टी आहे ह्मणून आपल्या स्नेह्याच्या घरीं गेला आहे बाहेरगांवीं. येईल दोन तीन दिवसांनीं. सहा सात दिवस झाले नाहीं हो गुरुजी ?"

डोंगरे उठले व निरोप घेऊन मुलगा आल्यावर येईन ह्मणून आश्वासन देऊन चालते झाले. बाहेरच्या दारापर्यंत भटजी पोंचवावयास गेले होते. भट-जींना त्या रात्रीं पार्वतीबाईनीं त्यांच्या आढ्यावेढ्यांस न जुमानतां घरीं राहून घेतलेंच. जेवणाची वेळ झाली तेव्हां उमाबाईचा शोध सुरू झाला पण घरांत ती कोठें आढळेना. "काय बाई ! वैतागून पोरीनें जीवबीव दिला कीं काय ? हो असें कांहीं केलेंन तर नसती पिडा अन् गणूभाऊ घरीं नाहीं." पार्वतीबाई जराशा घाबरल्या.

"कांहीं इतकें शोधायला नको हो. असेल कुठें परसांत बिरसांत." मथुरा वन्सं ह्मणाल्या.

"तें सगळें खरें, पण आपल्या घरांत आहे तोंपर्यंत बघायला पाहिजेना ? इथून गेली ह्मणजे मग तिकडे मसणांत का जाईना ! त्याचें कांहीं वाटणार नाहीं."

* * * *

भटजींनीं आणलेला बलात्काराचा अनिष्ट प्रसंग ईश्वराच्या कृपाळूपणानें टळला याबद्दल त्याचे धन्यवाद गात ती भ्रमिष्टासारखी तडक मागें परसांत गेली. जातांना पडवीचें दार तिनें बाहेरून लावून घेतलें. बाहेर करकरीत तिन्हीसांजा झालेल्या पण तिला त्याची शुद्ध नव्हती. आलेल्या नवख्या माणसाला वाटेस लावून तो दुष्ट लांडगा आपला पाठलाग करीत येईल या शंकेनें तिनें दार बंद करण्याची व्यवस्था केली होती. परसांत एक विहीर होती ती मागें टाकून उमा समोरच्या जुनाट औदुंबराच्या खालीं चालती झाली. हा वेळपर्यंत बाळकृष्ण स्वस्थ निजल्यामुळें तिला त्यांतल्यात्यांत सुख होत होतें. ती अंधेरामध्यें चालली असतां "कोण ? आई" असा प्रश्न ऐकूं आला. ती सकृद्दर्शनीं बिचकली पण विद्याधर असावा अशा ठाम समजुतीनें "विद्याधर, तूंच का ?" अशी तिनें हांक मारली.

"आई, तूं मला हांक मारीत होतीस का ग ?"

"होय बाळ; तूं इथें काय करतोस ?"

उमेचा श्वासोच्छ्वास झपाट्यानें चालू होता; व एकंदर लक्षणावरून आईची कांहीं तरी चमत्कारिक स्थिति झाली आहे हें त्या चाणाक्ष मुलानें ताडलें. "आई, तूं असें कां करते आहेस ?" विद्याधराचे ममतेचे बोल ऐकून उमेला हुंदका आला. तिच्यानें कांहींच बोलवेना. विद्याधराला तिनें पोटाशीं ओढून घेतलें. त्याच्या शिरावर ती उष्णाश्रु ढाळूं लागली.

"आई ! तुझ्यावर असा कोणता प्रसंग ओढवला, कीं त्यामुळें तूं असें रडावेंस ? आई, मला सांग— असें काय करतेस आई— आई— आई." विद्याधर कळवळ्यानें जों जों बोलूं लागला तों तों उमेला अधिकच गहिंवर येई. तो तिला नाना प्रश्न करीत होता. पण व्यर्थ. कांहीं केल्या आईचें

रडें आटपेना. विद्याधर बिचारा अल्पवयी मुलगा. जाणती आई जर कांहीं एक न सांगतां असा विचित्रपणा करते तर त्याला तरी काय वाटेल? त्यालाहि सुचेनासें झालें व शेवटीं कंठ दाटून तो सद्गद दृष्टीनें पहात स्वस्थ उभा राहिला.

"बाळा! आपलें पुढें कसें होणार?" रडक्या आवाजांत उमा ह्मणाली.

"आई! एवढ्याकरतांच का तुला वाईट वाटतें? असल्या क्षुल्लक गोष्टीसाठीं जर माणूस आपले बहुमोल अश्रु दवडूं लागला तर इतर महत्प्रसंगीं तो काय करील कोण जाणे? आई, ईश्वरावर भरंवसा ठेऊन चाललें ह्मणजे तो कोणत्याहि संकटांतून माणसास वर काढतो. नवऱ्यांच्या व इतर वृद्ध लोकांच्या डोळ्यांदेखत चाललेला द्रौपदीचा छळ श्रीकृष्णानें निवारला हा केवळ तिच्या श्रद्धेचा परिणाम असें तूं आह्मांला नेहमीं समजावून सांगतेस व आतां लहान पोराप्रमाणें रडतेस याला ह्मणावें तरी काय? अवतारी अगर अचाट सामर्थ्यवान् पुरुषांचा लौकिक देखील त्यांनीं धैर्यानें नव्या नव्या संकटांना टक्कर दिली यांतच आहेना? दुःखें आलीं तशीं जातील. पण आई, तूंच जर धीर सोडलास तर माझ्यासारख्या अजाण मुलांनीं ग काय करायचें? आई, आज कांहीं जास्तकमी घरांत झालें का? बोल, तूं अशी रडतेस कां?" विद्याधराच्या बोलण्यांत खेद, धीर, कळवळा इत्यादि भिन्न भिन्न मनोवृत्तींची भेसळ होती.

"बाळ! बायकांच्या बाबी तुला सांगून काय करायचें आहे? पण आपल्याला आतां इथें रहातां येणार नाहीं असें मात्र मला खरोखर वाटूं लागलें आहे."

"मग त्याला घाबरून काय होणार? मी कष्ट करीन, पोट भरीन."

"पण मोलमजुरी करून विद्याभ्यास जर सुटला तर जगांत हजारों प्राणी जन्मास येतात व जातात त्यांतच तुझी गणना होईल. कर्तबगारीनें नांवारूपास आलेल्या थोर पुरुषांप्रमाणें तुझा गौरव व्हावा असें मला वाटतें. तिकडचा हेतु तसाच होता. पण मनुष्य चिंतितो असतो एक

व होत असतें भलतेंच. आपण माणसें किती पंगू आहोंत!" पतीचें स्मरण होऊन व गळा दाटून येऊन तिचें बोलणें येथेंच खुंटलें.

"आई, लहानपणीं पुष्कळ हालअपेष्टा सोसल्यावरच ना पहिला बाजीराव उदयाला आला? बाळपणीं बापाबरोबर तुरुंगांत रहावें लागलें व इतरहि पुष्कळ कठिण प्रसंग गुदरले तरी त्यानें जगांत आपलें नांव कमावलें. तूंच तर मला नेहमीं सांगत असतेस या इतिहासपुराणांतल्या गोष्टी. आई, मी माझा विद्याभ्यास चालू ठेवीन, कष्ट करीन व तुझ्या हेतूप्रमाणें घडून आल्याचें तूं पहाशील."

"शाबास बाळ! पोटापाण्याच्या प्रश्नानें दडपून न जातां त्यांतच प्रयत्न केला तर सगळें साध्य आहे. तुझी उमेद पाहिली किनई म्हणजे माझें भय पार पळून जातें." आईनें त्याच्या पाठीवरून ममतेनें हात फिरविला.

हा सगळा अंधेरांतला संवाद. दोघें मायलेंकरें परस्पराला अंधुक दिसत होतीं. इतक्यांत चंद्रोदय होऊन तेथें चांगला प्रकाश पडला. तो पाहून उमेच्या मनाला एकाएकीं अतिशय हर्ष झाला. "बाळ, पाहिलास का सृष्टि-चमत्कार? रात्रीचा काळोख बघ चट सारा नाहींसा झाला. या काळोखांत आपल्याला दिसत होतें का कांहीं? सांप्रतच्या आधीव्याधींनीं आपण अशींच वेड्यासारखीं झालीं आहोंत. लोकांची दृष्टि निःशक्त करणाऱ्या या अंधेराप्रमाणेंच आपल्याला भ्रमांत पडणारीं संकटें हीं कांहीं सतत टिकणारीं नाहींत. एक दिवस खचित आनंदाचा, सुखाचा प्रकाश परमेश्वर आपणावर पाडील. चल बाळ घरांत जाऊं."

यावेळीं घरांत उमेचा शोध चालला होता. परसाचें दार बाहेरून लावलेलें पहातांच पार्वतीबाईंना आलेला संशय बळावला. "उमे, उमे," म्हणून त्यांनीं दार खडखडून हांका मारण्यास घाबरून सुरवात केलीच होती. तों हीं दोघें मातापुत्र तेथें येऊन थडकलीं. उमेच्या लक्षांत सगळा प्रकार येऊन तिनें दार उघडलें. तिला मुलासह सुखरूप पहातांच पार्वतीबाईंच्या बेसुमार तोंडाचा पट्टा चालू झाला. पण

इतक्यांत बाळकृष्णाची रडकी हांक ऐकूं आली व हा वेळपर्यंत त्याच्याकडे दुर्लक्ष केल्याबद्दल मनाला चटका बसून उमा भरकन तिकडे चालती झाली.

## प्रकरण चवथें.

# पुढचा विचार.

निमित्त सांपडलें कीं उमेवर भडिमार करायला तिच्या वन्संची व सासूबाईची दुक्कल कधींहि कमी करीत नसे, किंबहुना आपोआप उद्भवणाऱ्या बारीकसारीक निमित्तांपेक्षां प्रत्येक बाबींत खोडसाळपणा करून तंट्याला नवीन कारणें उपस्थित करण्याकडे त्यांची प्रवृत्ति विशेष असे. जबरदस्ताच्या कह्यांत सांपडलेल्या गुलामाप्रमाणें आपल्या सुनांना गांजणें ही पार्वतीबाईची प्रकृतिच बनून गेली होती. मग उमेच्या चुकांवर क्षमेच्या दृष्टीनें त्या पहातील ही कल्पना तर अगदींच अशक्य.

उपजत स्वभावाला परिस्थितीच्या निरनिराळ्या प्रसंगांमुळें भिन्न भिन्न वळण लागत असतें व त्यामध्यें घटावतां घटावतां अखेरीस त्याला असा ताठरपणा येतो कीं, मग स्वभावाची ती तऱ्हा कायमचीच होऊन बसते. प्रकृतिगुणाचा लोप कधीं संभवत नाहीं पण मनुष्याच्या रक्तांत असा कांहीं चमत्कार आहे कीं, त्याचा अंशतः संबंध असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीशीं तें अगदीं निखालस बेइमानी करूं शकत नाहीं. आपला मुलगा ह्मणजे प्रत्यक्ष नवमासपर्यंत आपल्या उदरांत वाढलेला व आपल्याच हाडामांसाचा पिंड, तो कसाहि असला तरी जननीला प्रियच असणार व याच शाश्वत नियमावरून कुपुत्र निपजेल पण कुमाता मात्र साऱ्या दुनियेंत आढळणार नाहीं, असा शंकराचार्यांनीं सिद्धान्त केला आहे. पुत्राच्या रक्ताशीं त्याच्या बायकोचा संबंध अगदीं निकट, यामुळें प्रकृतिधर्मानें ती नकोशी वाटली तरी ती घरांत न दिसल्यमुळें तिनें आत्महत्या केली कीं काय या शंकेनें पार्वतीबाईना धागधुग वाटल्यास नवल नाहीं. त्यांनीं उमेला व तिच्या मुलाला सुरक्षित

पहातांच "कशी निष्ठुर आहे पहा. बोललें ह्मणजे लोक ह्मणतात, सासू दुष्ट, सुनांना गांजते. पण तिकडे बाळकृष्ण आईला हांका मारमारून दमला तरी हिच्या तें गांवींहि नाहीं. पोरें नसलीं तर देवाच्या नांवानें रडायचें. आहेत तर त्यांचा अव्हेर करायचा. मिळून असणारांना सुख नाहीं न् नसणारांना तर नाहींच नाहीं."

मुलाला मुलगी सांगून आल्याच्या विषयांत पार्वतीबाईंना रोजच्या इतका संताप आला नव्हता. त्या जरा खुशींत होत्या व त्यांत उमा सुरक्षित दिसल्यानें जरा अधिकच भर पडली. पण इतका सौम्यपणा मथुरेला आवडला नाहीं.

"चालल्या असतील पोरस्वारीशीं गुजगुज गोष्टी. सास्वानणंदा ह्मणजे हिच्या डोळ्यांत जशीं कुसळासारखीं सलतात. ठीकच आहे, मुलें आणि भाऊ कर्ते झाले ह्मणजे सास्वानणंदांनीं आपलं मरावं. तरच यांचे संसार सुरळीत चालायचे. काय हो बाळंभटजी, भीड खर्च करून भांडणाचीं तोंडें बंद करणार होतात ना ? त्याचें काय झालें ? "

" ह्यं: ह्यं: !! कुत्र्याचें शेंपूट बारान् बारा चोवीस वर्षे नळींत घालून ठेवलें तरी वांकडेंच. आमच्या संस्कृतांत एक ह्मण आहे. कर्मणा गहनो गतीः कर्म कांहीं कुणाला चुकत नाहीं. वाघ्याचा पाग्या झाला तरी त्या बिचाऱ्याचें येळकोट चालूच रहायचें. मीं पुष्कळ सांगून पाहिलें या उमाबाईला, पण पालथ्या घागरीवर पाणी. कानीं कपाळीं केलेली सगळी ओरड व्यर्थ. अहो खडकावर कधीं तरी बीं उगवेल का ? मला आपलें वाटत होतें कीं, तिऱ्हाइत ह्मणून समजूत पडेल पण कांहीं नाहीं. ज्याचें कर्म त्याच्याबरोबर." भटजींनीं किंचित् गंभीरपणा, थोडासा खेद दाखवून ह्मटलें.

"बरें आपला निरुपाय आहे." असा पार्वतीबाईंनीं समारोप केल्यावर मंडळी जेवणाखाण्याच्या व्यवसायांत गर्क झाली व हें प्रकरण येथेंच थांबलें. जेवतांना बाळकृष्णानें भाताबर दूध पाहिजे ह्मणून हट्ट घेतला व तें आईकडून मिळण्याचीं लक्षणें दिसेनात ह्मणून रडण्यास आरंभ केला. मुलाला

दूध देण्याइतकी देखील आपल्या घरीं स्वतःची सत्ता नसावी, व एवढ्याशा लहान बाबीसाठीं पोराला रडण्याचा प्रसंग यावा या विचारानें उमेला भडभडून आलें. पोराला दूध मिळावें अशी इच्छा खरी व घरांत त्याची वाण होती असेंहि नव्हे, पण बिनबोभाट तें मुलाच्या पोटांत जाण्याइतकी तिची पुण्याई नव्हती. रडें आटपण्यासाठीं उमा नानातऱ्हेनें त्याची समजूत घालूं लागली पण त्यामुळें तो जास्त जास्त ओरडूं लागला.

"नाहीं नाहीं ते लाड पोरांचे, एवढा का धाक नसावा आईचा? पण पहिल्यापासूनच रीत कुठें आहे? बाळकृष्णा, आमच्या घरीं बाबा तुझे चोचले पुरविण्यासारखें सामर्थ्य नाहीं. विदुराच्या कण्यांसारखी आमची अवस्था, गोड मानून दोन दिवस काढ. उद्यां स्वतंत्र झालां ह्मणजे तिकडे दूध खातां का शेण खातां कोणी बघायला येत नाहीं. दूध मागायला अगदीं खरोखरी आईची फूस." मथुरा बोलली.

शेजारीं भटजी (कारण त्यांनीं पार्वतीकाकू व त्यांची लेक यांच्या अत्यंत प्रेमाग्रहामुळें त्या रात्रीं तेथेंच पोटाची खळी भरण्याचा बेत केला होता) दूध दशम्यांची झोड उठवीत असतां, बाळकृष्णाला दूध मागायला शिकवायला आई नको होती. पण बहकलेल्यांना इतका ताळतंत्र रहावा कसा? बाळकृष्णाला विदुराच्या कण्यांचा बुद्धिवाद समजला असता तर तो गप्प रहाता. पण तसें त्याचें वय नव्हतें. त्याचें रडें थांबेना तेव्हां आजीबाई "मथू! घाल बाई दूध त्याच्या भातावर, गिळूं दे एकदां त्याला. आई तरी कांहीं दाबते आहे का त्याला? गुरुजीजवळ दूध पाहिल्यावर उठला शूळ मेल्याच्या पोटांत. नरड्यांत दूध उतरल्याशिवाय कांहीं तो आवरायचा नाहीं." संतापानें बडबडल्या व बाळकृष्णाच्या भातावर दूध पडलें.

यावर पुष्कळच ग्रंथ झाला. उष्टयाखरकट्याचें काम उरकल्यावर झाकापाक होऊन निजानिजीची वेळ झाली. तेव्हां उमा आपल्या दोघां मुलांन घेऊन माजघरांत गेली पण भटजी, मथुरा व पार्वतीबाई या त्रिकूटाचें मेथकूट पुष्कळ वेळ चाललें होतें. विषय वामनाच्या लग्नाचा होता. मुलगी

पहाण्याचें व टिपण जुळविण्याचें काम भटजींवर सोंपविण्यांत आलें. त्यांच्याइतका प्रामाणिक, विश्वासाचा व मेहनती माणूस त्यांच्या समजुतीनें घरांत दुसरा कोणी नव्हता.

वामनरावाच्या लग्नाबद्दल इतर मंडळींत जितका उत्साह व आनंद दिसत होता तितकें किंबहुना त्याहूनहि अधिक दुःख उमेला वेगळें बिऱ्हाड करण्याचा दिवस जवळ येत चालला याबद्दल होत होतें. आपल्याकडून दोष न होऊं देण्याबद्दल जों जों अधिक जपावें तों तों सासू व नणंद आपल्या मागें सारखीं हात धुऊन लागतात याबद्दल तिला आश्चर्य वाटत होतें. नसतीं खुसपटें काढण्यांत तर वन्सं अगदीं पटाईत. आज काय पोर मोठ्यानें रडलें ह्मणून, तर उद्यां तो अगदींच गप्प बसला ह्मणून, एकूण कोणत्याहि स्थितींत समाधानाबद्दल गोष्टच नाहीं. नवऱ्याच्या अस्तित्वांतल्या गत गोष्टींबद्दल उखाळ्यापाखाळ्या काढून टाकून बोलायला कोणीच कमी करीत नाहीं. परंतु हें सगळें एक वेळ साहवेल. सासूच्या शिव्या आशीर्वाद समजून आनंद मानतां येईल, थोरल्या दीरानें चालविलेली आपली उपेक्षा लक्षांत न घेतली तरी चालेल, परंतु स्त्रियांच्या पातिव्रत्याच्या लुटारूला घरांत अजाणपणें बाळगून त्याकरवीं चालविलेली आपली विटंबना कोणत्या सच्छील स्त्रीला सहन होईल? एका हलकट परक्या माणसाचें निरर्थक स्तोम माजवून त्याच्या दुर्वर्तनाकडे कानाडोळा करणें ही गोष्ट अगदींच अक्षम्य. आपल्याला कोणी बरें पहात नाहीं याचा फायदा घेण्यासाठीं तो पाजी माणूस टपला आहे, त्याच्या खाजगी वागणुकीकडे कोणाचेंच लक्ष नाहीं, अशा स्थितींत या घरांत भलेपणानें नांदणें शक्य नाहीं. दांडग्या पुरुषाच्या मनोवृत्ति उद्दाम झाल्यावर तो नीतिअनीतीची चाड कितीशी बाळगणार? व "आजपर्यंत आपण बायकांमध्यें वावरतों; बायका पहिल्यांदा अशाच रागावतात, पण अखेरीस त्यांचा दिमाख बंद पडून त्या आपल्या फांसांत पडतात," असे त्या नीचानें उद्गार काढले याचा अर्थ काय घ्यावयाचा? संसारी बायका याच्या जाळ्यांत अडकून कुकर्माला प्रवृत्त

होतात, हें शक्य दिसत नाहीं. आमच्या येथें जशी पुरुषमंडळी कमी आहेत, व आहेत तीहि सदा बाहेर, तसाच प्रकार सगळीकडे असेल का? या कुटुंबांत याला पुष्कळ मुभा आहे. भटजी ह्मणेल त्याच्या आड सहसा कोणी जावयाचें नाहीं असा याचा बडेजाव व तो मला खपत नाहीं यासाठीं मला त्रास. देवाच्या घरचा न्याय असा असला तर या जगांत नीटपणानें दिवस निघतील तरी का? छे! तसें नसेल. बायकांच्या स्वभावाचा दाखला देऊन त्या अधमानें मला पकडण्याचा बेत केला असेल. पण आमच्या वन्सं भटजींशीं इतक्या सलगीनें वागतात, दोघेंजण खुशाल एकमेकांशीं हंसत खिदळत बसतात, व त्या फाजील माणसानें प्रसंगीं अंगस्पर्श केल्यास सुद्धां त्याची फारशी फिकीर करण्यांत येत नाहीं, याला काय ह्मणावें? मला धर्म नाहीं, कर्माकर्मांचा विधिनिषेध नाहीं, यासाठीं माझ्यावर आग पाखडणाऱ्या सासूबाई या प्रकाराकडे डोळेझांक कां करतात? हा भट बाहेरून अगदीं भोळा भावडा दिसेल, पूजेअर्चेंत गुंगलेल्या वन्सं जर कोणाच्या दृष्टीस पडल्या तर त्यांच्या दंभाला तो खास भाविकपणा ह्मणेल. चारचौघींत वन्सं गप्पा मारायला लागल्या ह्मणजे त्यांचा वेदान्त ऐकून तर एखाद्याला असें सुद्धां वाटेल कीं ही ह्मणजे पुरातन काळच्या सीता सावित्री वगैरे लोकोत्तर स्त्रियांपैकीं एखादीचा अवतार तर नाहींना? पण इकडे पहावें तर बाळंभटासारख्या पोटभरू ब्राह्मणाशीं यांची केवढी सलगी? कदाचित् अति सख्यामुळें हें घडत असेल. अंतरंग निर्मळ असल्यावर बाहेर लोकांच्या निंदेला फारशी भीक घालायला नको. असेंच जर खरें असेल तर पतीच्या पश्चात् मीं रूढाचार पाळले नाहींत, यासाठीं लोक आपणांस नांवें ठेवतात अशी तरी ओरड माझ्याविरुद्ध कां व्हावी? एका बाबतींत जनलज्जेला फारकत तर दुसरींत तिला अतोनात महत्त्व, हें गौडबंगाल आहे. सदाचारानें वागून रूढाचारांच्या अवज्ञेबद्दल मी ईश्वराचा कोप शमवीन. माझ्या मनाला पापाचा विटाळ लागूं दिला नाहीं, माझ्यावर असलेल्या बालसंगोपनाचें कार्य कष्टाची खातरजमा न ठेवतां आनंदानें ईश्वरी

आज्ञा ह्मणून पार पाडलें, तर पतीला सद्गति मिळाल्यावांचून रहाणार नाहीं.

यापमाणें नाना विचारांचें काहूर तिच्या मनांत माजलें होतें. हे विचार आतां पार मावळले. "उद्यां, परवां किंवा आणखी चारपांच दिवसांनीं मला हें घर सोडावें लागेल. तेव्हां चरितार्थाची सोय काय? विद्याधर अजून पंधरा सोळा वर्षांचा पोर, त्याला व्यवहाराचें ज्ञान काय असणार? त्याला बरें वाईट कळण्याइतका पोंच अद्याप त्याच्या बालवयामुळें आलेला नाहीं. पोरगा बुद्धिमान् आहे पण त्याच्या चलाखीचें चीज या हतभागी आईच्या हातून होण्याचें चिह्न दिसत नाहीं. तो माझ्यासाठीं चाकरी पत्करीन ह्मणतो पण त्याच्या हातून कोणतें काम होणार? ज्या वयांत त्यानें विद्याभ्यास करून खुशाल उडावें बागडावें त्या वयांत त्याजवर प्रपंचाचा बोजा टाकून संसाराच्या रहाटगाडग्यामध्यें जगांतल्या असंख्य माणसांप्रमाणें फिरावयास लावावें यांत मीं मातेचें कर्तव्य बजावलें असें होईल का? काळानें माझ्या पूर्व कर्माचें प्रायश्चित्त मला जबर दिलें. त्यानें माझें कुंकू पुसून मला जगाच्या पाठीवर दीन सोडून दिलें आहे. पतीनें मुलांची सजीव ठेव माझ्या स्वाधीन केली आहे, नव्हे त्यांच्या जाण्यानें ती सर्वस्वीं माझ्या अंगावर पडली आहे. ती सुरक्षित ठेवून तिची योग्य व्यवस्था जर मीं केली नाहीं तर मी माझ्या कर्तव्याला —पत्नी या नात्यानें माझ्या अंगावर असणाऱ्या ईश्वरदत्त धर्माला— चुकेन. पण ही चूक टाळतां कशी येईल? आमच्या पोटाची सोय करून ते जाते तर— पण आपण अकालीं मरूं, बायकापोरांना अनाथ करण्याचा आपणांवर प्रसंग येईल, असें कोणाच्या स्वप्नीं तरी येईल का? नुकताच वाढीला लागलेला संसाराचा अंकुर दुर्दैवाच्या तापानें करपून गेला तर त्यास फळें आलीं नाहींत ह्मणून रडणें वेडेपणाचें होणार नाहीं का? वेड्या मना, या पोटाची तरतूद न केल्याबद्दल पतीला दोष देणें चांगलें नाहीं. असें केल्यानें मरणोत्तर स्थितीमध्यें त्यांस त्रास होईल. जिवंत असतांना जो आपल्या सर्वस्वाचा स्वामी होता, ज्याची आपण अनन्यभावानें सेवा केली,

तो मरण पावल्यानंतर आमच्या स्वार्थाची त्यानें सोय केली नाहीं एवढ्याबद्दल त्यास अपराधी मानणें हा नीचपणा आहे. खाण्यापिण्याची व्यवस्था यथास्थित असल्यावर मीं मुलांचें संगोपन केल्यास माझी थोरवी ती काय ! मी अभागिनी, माझें पूर्वकर्म दुष्ट, त्यामुळें मी संकटांत सांपडलें. काय वाटेल तें करीन, पण नीतीची मर्यादा न उल्लंघितां मुलांना सज्ञानी व सदाचरणी करून सोडीन, असाच माझा निश्चय पाहिजे. सद्भावाचा कैवारी परमेश्वर समर्थ आहे. विद्याधर यंदां परीक्षेला बसावयाचा आहे, त्यांत सुद्धां वामनभावजी त्याचा हेवा करतात. करोत बिचारे."

वरीलप्रमाणें विवंचना करीत असतां तिला उपाय सुचला व तो तिच्या मनोगत भवति न भवतीमध्यें पसंत ठरून तिनें तसें करण्याचें ठरविलें. "आह्मी वेगळे झालों तेव्हां दागिने तर राहोतच पण एक सुतळीचा तोडा सुद्धां मिळणार नाहीं, असें सासूबाईनीं तिकडे बजावलें. माझा सगळा संसार भांड्याकुंड्यापासून नवा होता. ईश्वराची दया असे तोंपर्यंत कांहीं कमी पडलें नाहीं. अलंकारांवांचून चारचौघींजणींत जायची लाज वाटे. मी तरी काय वेडी ! त्या वेळेला तिकडे दागिने पाहिजेत ह्मणून हट्ट घेऊन बसें, पण कधीं सुद्धां त्याबद्दल न रागावतां सांगण्यांत येई कीं, अलंकारासाठीं वाईट वाटायला नको. त्यांवांचून कांहीं अडत नाहीं. आदा पाहून खर्च करावा. घरच्या मंडळींनें आपल्याला कफल्लक केलें आहे. संसाराचा जम बसून मिळकत वाढली, अगर आहे त्यांतच बचत राहिली, ह्मणजे अलंकारभूषणें करूं. पुढें दिवस चांगले आले व माझ्या इच्छेप्रमाणें दागिने तयार करविण्यांत आले. ते सध्यां पडूनच आहेत. देवाचीच दया ह्मणून ते कोणाच्या ताब्यांत देण्याची बुद्धि झाली नाहीं. प्रथम प्रथम त्याची सासूबाईनीं मोठ्या प्रेमभावानें चवकशी केली. मध्यंतरीं वामनभावजींचें लग्न अगदीं जुळल्यासारखें झालें तेव्हां तर त्यांनीं माझ्यामागें दागिने देऊन टाकण्याविषयीं सारखें टुमणें लावलें होतें. मला कांहीं आतां घालायचे नाहींत तर उगीच पडून रहाण्यापेक्षां समारंभांत चार दिवस घालायला मीं द्यावे, पुढें

परत येतील, असा त्यांच्या बोलण्याचा मथितार्थ होता. पण मला भुरळ पडली नाहीं. त्या वेळीं वन्सन् सासूबाई काय मला वाखाणीत ! माझी कोण बडदास्त ठेवीत ! पण तें सगळें एक्या मतलबासाठीं बरें. तो साधण्याचीं लक्षणें दिसेनात तेव्हां आल्या लागलीच आपल्या पूर्वपदावर. झालें तें बरें झालें. तेवढ्याचा तरी मला आधार आहे. मागें गणूभावजींच्या तिसऱ्या लग्नांत तिकडून एकदोन दागिने लग्नांत घालण्यापुरते दिल्याचें सांगत असत पण ते जे एकदां गेले ते गेले. तेव्हां मला सांगणें होई कीं, "तुझें स्त्रीधन प्राण गेल्यानें सुद्धां कोणाचे हवालीं करूं नको. जग लोभी असतें."

सचिंत मन झोंपेला वश होणें फार कठिण असतें. प्रसन्न मन चटदिशीं निद्रेच्या अंकित होऊन दिवसभर श्रमलेल्या मनुष्याला ताजेतवानें करतें, पण चिंतेचा पगडा बसलेल्या अंत:करणाला झोंप बहुधा विन्मुख असल्याचें आढळतें. मध्यरात्र उलटली तरी उमेला झोंप आली नव्हती. अंथरुणावर या कुशीवरून त्या कुशीवर याप्रमाणें तळमळत असतां एकदोनदां किंचित् डोळा लागला तों तेवढ्यांत बाळकृष्णाची झोंप चाळवल्यानें तो जागा होऊन आईला हांका मारूं लागला. शेवटीं जवळच्या एका लक्ष्मीपुत्राच्या देवडीवरील दोहोंचे ठोके तिच्या कानीं आले. इतका वेळ जागरण झाल्यानंतर झोंप लागली तर पहांटेस उठवणार नाहीं, व मंडळींना बोलायला जागा होईल याचें तिला भय होतेंच. पण कशीबशी झोंप तर आली व वेड्यावांकड्या स्वप्नाखेरीज इतर कोणींहि व्यत्यय आणला नाहीं. तासभर असा स्वस्थतेंत गेला असेल तों तिच्या कानावर पडवीकडचें दार खडखडल्यासारखा आवाज ऐकूं येऊन ती जागी झाली. मांजरबिंजर धडपडलें असेल असा तिनें आपल्या मनाचा समज करून घेतला; व त्यास अनुसरून "शुक् शुक्" असा शब्दहि तिनें दोनतीनदां उच्चारला. तेवढ्यापुरती शांतता झाली. पण पुन्हां तोच प्रकार. फिरून दार वाजलें. मग मात्र ती बिछान्यावर उठून बसली. कांहीं मिनिटें लोटल्यावर तिला

दोन व्यक्ति आपसांत कुजबुजत असाव्या असें भासलें व तिनें आपला श्वास थांबवून चांगला कानोसा घेतल्यावर तिची तसें कांहीं तरी असल्याबद्दल खात्रीच पटली.

---

## प्रकरण पांचवें.
## दुसरीकडे काय चाललें होतें ?

"मनोरमाबाई, तुह्मी मनाचा हिय्या कराच एकदां. स्वत: मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं. आपले हेतु उदात्त असले तरी ते प्रत्यक्षांत आणण्याची हिंमत बांधल्याखेरीज त्यांना मान मिळत नाहीं. जें काम आजपर्यंत पुरुषांना देखील अंगावर घ्यावेंसें वाटलें नाहीं, नुसती बडबड मात्र त्याबद्दल पुष्कळ केली, तेंच तुमच्यासारख्या स्त्रीनें करून दाखविल्यावर बोललां तशा चाललां ह्मणून सगळा जनसमाज तुमचे पाय वंदील समजलां."

एका टोलेजंग वाड्यांतल्या भव्य दिवाणखान्यांत एक पुरुष एका स्त्रीशीं बोलत होता. त्याच्या भाषणांत इतकी आतुरता होती कीं, कोणींहि त्याच्या ह्मणण्यास सहज रुकार द्यावा. त्याचा सगळा पोषाख इंग्रजी धर्तीचा असून वर मात्र पुणेरी पगडी झळकत होती. स्त्रीचा पेहराव जरी महाराष्ट्रीयच होता, तरी त्यामध्यें साधेपणापेक्षां छानछुकी फार होती. वाड्यांत इतर पुष्कळ मंडळी होती व या दोघांचा संवाद चालू असतां ती मोकळेपणानें वावरतांना मधून मधून दृष्टीस पडत. परंतु त्यांपैकीं कोणी यांच्या संभाषणामध्यें पडलें नाहीं.

दिवाणखान्यामध्यें खुर्च्या, टेबलें, कपाटें अगदीं व्यवस्थित ठेवलीं होतीं. दिवाणखान्याच्या मध्यभागीं एक वाटोळें टेबल असून त्याभोंवतीं चारपांच सुंदर किनखापी गाद्यांनीं मढविलेल्या खुर्च्या होत्या व त्यांपैकींच दोघींवर वरील संवादकर्त्यांनीं अधिष्ठान ठेवलें होतें. टेबलावर सुगंधी पुष्पांचा एक मोठा थोरला गुच्छ असून त्याचा परिमल दरवळत होता. भिंती चित्रवि-

चित्र रंगांनीं शोभिवंत केल्या असून त्यांवर रविवर्म्यांच्या पुष्कळ मोठ्या आकाराच्या तसबिरी लटकत होत्या. शिवाय तेली रंगांनीं तयार केलेलीं इतर माणसांचीं पुष्कळशीं ठळक ठळक चित्रें लावलीं होतीं तीं निराळींच. दिवाणखान्याच्या एका कोपऱ्यांत भिंतीशीं लागून एक लिहिण्याचें टेबल होतें; कारण त्यावर लेखनसामग्री अगदीं जय्यत असून त्याच्या दोहीं-बाजूंस अलमाऱ्यांतून पुस्तकें ठेवलीं होतीं. सारांश, दिवाणखान्यामध्यें हल्लींच्या मन्वंतरांत राज्यकर्त्यांच्या परदेशीय चालीरीतीला न साजेसें कांहींच नव्हतें. त्या सुशोभित दिवाणखान्यामध्यें वरील दोन व्यक्ति पर-स्परांशीं बोलत बसल्या होत्या. त्यांतील पुरुषव्यक्ति आरंभीं दिल्याप्रमाणें बोलून गेल्याला बरींच मिनिटें झालीं. पण स्त्रीकडून उत्तर आलें नाहीं. तिचें मन तिला काय सांगतें, त्या तिच्या अंतर्गत चळवळीचीं प्रतिबिंबें चेहऱ्यावर कशीं उमटतात, त्यांतून आपणांस अनुकूल अगर प्रतिकूल असा अर्थ निघतो कीं काय, इकडे तो गृहस्थ उपनेत्रांच्या साह्यानें अगदीं टक लावून पहात होता. मनाची चलबिचल कोणत्याहि विकारानें झालेली असो, तिची स्पष्ट छाया चर्येवर आलीच पाहिजे, पण बराच वेळ तिची मुद्रा निर्विकृत पाहून त्याचें मन चंचल झालें.

"मनोरमाबाई, मी तुह्मांला अगदीं निक्षून सांगतों कीं, तसें केल्यानें तुह्मांला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. लोकांना स्वतंत्र मत नसतें, त्यांना विचार नसतो. त्यांना आपले अनुयायी बनविण्यास आपण पुढें झालें पाहिजे. पहिल्यांदा नाकें मुरडतील, दांत विचकतील, पण अखेरीस आप-ल्याला वंदूं लागतील. लोकमताचें पिशाच्च स्वतंत्र बुद्धीच्या माणसाला पछाडण्यासाठीं झटत असतें, वाटेल ते अडथळे करण्यासाठीं तें एका पायावर तयार असतें, पण निश्चयाची कास धरून नेटानें आपण कार्य केलें पाहिजे. पहा, विचार किती दिवस करीत बसणार ?" त्या गृहस्थाच्या मुखावर उत्कंठा विलसत होती. तो गप्प बसला. मनोरमाबाईहि आपल्या स्तब्धच. त्याला चीड आली. आपण जीव तोडून सांगावें व त्याचा

अनादर व्हावा यामुळें तो नाखुष झाला.

"मनोरमाबाई, अशानेंच तर आमच्या पक्षाचा विजय होत नाहीं व लोकांत आमचें हंसें होतें. आजपर्यंत जी रीत नाहीं ती नवीन पाडायची अशी तोंडीं ओरड करतांना उदाहरण घालून देण्याची शक्ति आपणांत नाहीं हें हे लोक विसरतात. बालविवाह, विधवाविवाहनिषेध याविरुद्ध बडबड करायला प्रत्येकजण तयार. अशा सदिच्छा खऱ्या असल्याचें छळ सोसून दाखवावें लागतें. तो दम जर आपल्यांत नाहीं तर देशोद्धाराचें कंकण बांधून लोकांपुढें मिरवावें तरी कशाला? तुमचे पति नारायणराव कशा विचारांचे गृहस्थ होते? त्यांची इभ्रत तुह्मी आपल्या वर्तनानें घालवीत आहां. एकदां असाच विषय क्लबांत निघाला होता तेव्हां कोणी एकानें प्रश्न केला—"पुनर्विवाह करायला तयार व्हाल का?" त्यांना हें बिलकूल सहन झालें नाहीं. ताबडतोब त्यांनीं रागानें आवेशानें उत्तर दिलें, "मी माझ्या देखत माझ्या बायकोचा पुनर्विवाह लावून देईन. एक नवरा जिवंत असतांना तिच्याशीं लग्न लावायला दुसरा तयार नसेल तर मी आत्महत्या करून घेईन." मनोरमाबाई, हे तुमच्या नवऱ्याचे शब्द बरें! अंगीकृत कार्यासाठीं प्राणत्याग करण्यास देखील त्यांची तयारी होती. काय, नुसत्या माना काय हालवतां? त्या वेळीं कोणी लग्न करायला तयार झाला असता कीं नाहीं व ते जीव देते कीं नाहीं हा प्रश्न वेगळा आहे. पण जीव देतों असें तरी नुसतें ह्मणून दाखविण्याचें अवसान कितीकांत सांपडेल?"

"पाळी आली नाहीं तोंपर्यंत वाटेल तो ह्मणेल. नुसतें ह्मणायचेंच असलें तर मी देखील जीव देतें ह्मणून एकदां सोडून सांगाल तितक्या वेळां ह्मणतें." मनोरमाबाई उदासीन स्वरांत बोलल्या.

"तेथेंच तर घोडें पेंड खातें. सगळें नडतें काय तें तेंच. बोलायला काय सोपें आहे? करतांना मात्र सुख कळतें. तुमच्या पतीचा सहवास तुह्मी उगीच भोगलांत, त्यांना अशी बहाद्दर बायको पाहिजे होती कीं यंव रे यंव."

"प्रोफेसरसाहेब, तुमचें सांगणें सगळें मला स्वतःला समजत आहे पण

ती गोष्ट करावी कीं न करावी या विचारांत मी आहें. माझें धाडस होत नाहीं बोवा एकदम रुकार द्यायला. मग काय असेल तें असो. जों जों ती बाब मनांत घोळते तों तों असें वाटतें कीं, तसें करणें पाप आहे. माझ्या मनामध्यें मला कोणी तरी सुचवितें कीं, मनोरमे पाय घसरेल, पडशील, आणि मग तुझ्या उद्धाराची आशा रहाणार नाहीं, या अंतर्गत सूचनेला अमान्य करण्याचें साहस, प्रोफेसरसाहेब, माझ्यांत नाहीं."

"मग या देशाच्या उन्नतीची आशाच सोडा. जोंपर्यंत या देशांत करारी बाण्याचीं माणसें निपजत नाहींत तोंपर्यंत या देशाच्या उद्धाराची आशा व्यर्थ आहे. आह्मी परक्यांच्या लाथा खाण्यालाच योग्य आहोंत. हजारों मैलांवरचे अल्पसंख्य लोक येथल्या कोट्यवधि लोकांवर राज्य चालवितात याचें बीज आमचा अवसानघातकीपणा आहे. एक धनगर शेंकडों हजारों मेंढरें राखतो, मेंढरांसारख्या गतानुगतिक प्राण्याहून खालावलेले आह्मी परक्यांच्या पुढें माना वांकवितों, ते ह्मणतील तसे वागतों, याचें कारण आमच्या नामर्दपणाखेरीज दुसरें काय असणार ?" त्रासून प्रोफेसरसाहेब बोलत होते. "त्या उदार राज्यकर्त्यांनीं आह्मांला खुलें शिक्षण देण्याचा आमच्यावर जो अनुग्रह केला यावरून त्यांना आमची बरोबर पारख झाली नाहीं असेंच दिसतें. मातीच्या गोळ्यावर पुष्कळ सूर्यकिरण पडले तरी सूर्यकान्त मण्याप्रमाणें उलट तेज फेंकण्याचें त्यास सामर्थ्य असूंच शकत नाहीं. काय आमच्या समाजाची दैना ! त्यांच्या शिक्षणानें आह्मांस ती नुसती दिसत आहे पण ती सुधारण्याचा उपाय अमलांत आणण्याचें काम आमच्यानें होत नाहीं. आफ्रिकेंतल्या रानटी नीग्रोंना आह्मी हंसतों तें उगीच. आमच्यांत काम करण्याची बिलकुल धमक नाहीं."

प्रोफेसरसाहेबांचें पांडित्य येथेंच थांबलें. आपल्या भावपूर्ण व्याख्यानाचा सुपरिणाम झाला असावा असें त्यांस वाटलें व प्रतिपक्षाच्या उत्तराची वाट पहात ते बसले.

"तुमचें ह्मणणें मी अक्षरशः खरें असल्याचें कबूल करतें. सामाजिक

सुधारणा व्हावी हा माझा देखील हेतु आहे पण त्यासाठीं मीच उदाहरण व्हावें असें मला वाटत नाहीं. महाराष्ट्रांत अन्नाला मोताद झालेल्या पुष्कळ गतभर्तृका असतील, त्यांच्यावर उपकार करा. माझी सुस्थिति आहे. मी विधवा राहूनच समाजकार्य करीन.'' मनोरमाबाई थांबल्या.

''अहो, खाण्यापिण्याची तुह्मांला पंचाईत नाहीं, ह्मणूनच तुमच्यावर फार जबाबदारी आहे. संपन्न असतांहि केवळ उदाहरण ह्मणून लग्न करा. त्यांत तुमचा गौरव फार होईल.''

''मला तसें वाटत नाहीं.''

''मग आजपर्यंत आह्मांला तुमच्या कर्तृत्वाचा निवळ भ्रम होता. राव-बहादुर शंकर तर घरींदारीं तुमची वाखाणणी करीत असतात पण हा त्यांचा समज व्यर्थ आहे असें मी आज ह्मणतों. एक नवरा मेल्याब-रोबर सर्वसंगपरित्याग करून त्यासाठीं जन्मभर रडत बसणाऱ्या जुन्या बाय-कांत व तुमच्यांत फरक काय ? एकजण असतांना दुसरा करा असा माझा, किंवा कोणत्याहि सामाजिक प्रश्नाचा आस्थेनें खल करणाराचा, आग्रह नाहीं. प्रश्न फक्त गतपतिकांचा आहे. त्याला तुमचें अनुकूल मत— पण नुसतें शाब्दिक मत— आहे. बरें आहे, मी जातों. दयालोभ ठेवा.'' प्रोफेसर उठले व तीव्र दृष्टीनें मनोरमेकडे पहात ते जाण्याच्या तयारीला लागले. मनोरमेनें त्यांस शान्तपणें निरोप दिला.

प्रोफेसर गेल्यावर मनोरमेच्या अंतरंगांत अतिशय खळबळ माजली होती. आज पुष्कळ दिवसांपासून तिनें पुनर्विवाह करावा असा तिच्या न-वीन ओळखीच्या व नवऱ्याच्या जुन्या मित्रांचा अत्याग्रह होता. शिक्षणाच्या संस्कारानें उद्भवलेले नवीन विचार व तिच्या पूर्वजांनीं अनुसरलेले जुने विचार यांमध्यें लढा पडला होता. ती पुरुषांच्या क्लबांत नेहमीं वावरत असे, सामाजिक प्रश्नांचें मनन करी, वर्तमानपत्रांतून नेहमीं चर्चा करून लोक-मताचा अंदाज करण्यासहि ती कमी करीत नसे. विधवांनीं विवाह करावा अशा मताचा जोर झाला ह्मणजे लागलीच पतीच्या हानीनें मुकलेल्या स्त्रि-

यांचा ग्राम्य सुखासाठीं हा प्रयत्न आहे असें तिच्या मनांत येऊन तो पक्ष तिला गौण वाटे. नवें राज्य, नवें शिक्षण याच्या भपक्यानें दिपून गेलेला महाराष्ट्रीय समाज नव्या दमाच्या शिक्षणसंपन्न लोकांनीं चारी बाजूंनीं हल्ला चढविल्यामुळें जुनी घडी मोडून अगदीं विस्कळित झालेला तिला दिसत होता. परंतु या ताज्या समाजधुरीणांमध्यें नवीन परिस्थिति अमलांत आणण्यास लागणारा उत्साह नव्हता, त्यांच्यांत चिकाटी नव्हती. बड्या तनख्याचीं सरकारी कामें करतांना परक्या वरिष्ठाशीं सहवास घडून त्यांच्यांत आढळणारा व्यवहार आपल्या इकडे जशाचा तसा उतरावा एवढा मात्र त्यांचा हेतु खरा. परंतु अशानें समाजाची उन्नति होऊं शकत नाहीं असा मनोरमेचा दिवसानुदिवस ग्रह होत चालला होता व विधवाविवाहासारख्या कार्यांना हातभार लावण्यास तिचें मन कचरूं लागलें होतें.

"पुन्हां लग्न करूं का नको करूं ? करूं नये असाच मनाचा निश्चय होतो. पतीच्या अस्तित्वांत मीं कांहीं ढंग केले. परंतु त्यावेळीं सुद्धां माझा देह पतीखेरीज इतरांचे अधीन करण्यास मी तयार नव्हतें. एका पतिसुखाला अंतरल्याबरोबर दुसऱ्याच्या तयारीला लागलें तर मी जगाच्या दृष्टीनें पापी ठरेन. पण मनानें तरी माझी मला शुद्धता कोठें वाटते आहे ? एकदां वाटतें लग्न करून टाकावें. लोकांच्या निंदेला भिण्याचें कारण नाहीं. माझी संपत्ति मोठी आहे. तिची अधिकारिणी मी आहें, पण माझी मी मुखत्यार आहें एवढ्याचसाठीं लोकांची पर्वा मी बाळगीत नाहीं. तसें नसतें तर— तसें नसतें तर— हजारों गतधवांप्रमाणें मींहि समाजाच्या जुन्या रीतीला मान देऊन दुसऱ्याचे गुलाम होऊन काबाडकष्ट करीत आयुष्य कंठलें असतें. मग माझी सगळी ऐट, हा माझा सगळा तोरा, या संपत्तीवर. हें द्रव्य कोणाचें ? कोणाच्या संबंधामुळें हें माझ्याकडे आलें ? माझ्या पूर्व पतीच्या द्रव्यावर मौजा मारून मी शरीरसुखांत दंग राहिलें तर पत्नीच्या नात्याचें माझें कर्तव्य पतीच्या पश्चात् कांहींच उरलें नाहीं का ? व असें कर्तव्य असणार तरी काय ? त्याच्या जिवंतपणीं मीं त्याच्याशीं बेबनाव

केला नाहीं. क्षुल्लक कारणासाठीं भांडून कधीं आमच्यांत अशान्ति माजली असेल; पण त्या प्रेमकलहाचा शेवट पुनः गोड प्रेमांतच होत असे. एकदां दोनदां त्यांचीं जिवावरचीं दुखणीं गेलीं तेव्हां शुश्रूषेला नोकरचाकर सदैव असत. मला तिकडे पहावेंच लागत नव्हतें. माझ्या मनाला त्याची दिक्कत वाटली नाहीं. त्या आजारीपणांत मला तिकडून ह्मणणें होई कीं, 'माझ्या जवळ बस.' पण मी जास्त ती काय करणार होतें? उगीच शेजारीं बसून फुकट काळ घालवायला मी तयार झालें नाहीं. शेवटच्या दुखण्याची तिकडे झडप पडण्यापूर्वीं बरेच दिवस मला माहेरीं पोंचतें करण्यांत आलें होतें. तेव्हां त्याबद्दल मी जबाबदार नाहीं. मग काय झालें ठाऊक नाहीं. त्यांची अखेरपर्यंत विल्हेवाट लावल्याचें कोणीच सांगत नाहीं. सरकारी कामगारांनीं वाट लावली असेल. पण तसें दिसत नाहीं. घराला कुलूप कोणीं लावलें? आपल्या जिनसा आपल्याला परत सुरक्षित मिळाल्या. एका सौभाग्याखेरीज आज माझें कांहीं कमी नाहीं. मनोरमे, इथें चुकतेस, पूर्वपतीबद्दल तुझे विचार इतके बेपर्वाईचे कां होतात? तूं आपल्या पतीच्य सुखाला आंचवलीस हें तुझें दुर्दैव तर खरेंच. पण तुला अशीच शिक्षा पाहिजे होती. अग! नवऱ्याच्या दुखण्यांत त्याची सेवा भाडोत्री सेवकावर सोंपविण्याला तुझें मन तयार झालें तें कशाचें द्योतक? प्रेमाचें का बेपर्वाईचें? दुष्टे, पत्नीचें सान्निध्य हाच पतीच्या रोगावर रामबाण उतारा. एकनिष्ठ पत्नीचे हात नुसते ममतेनें अंगावर फिरले तरी पतीच्या अंगांतल्या वेदना कितीतरी कमी होतात. तिचे शब्द ह्मणजे प्रत्यक्ष अमृत. पण याचा प्रत्यय त्याला आला नाहीं. सुखाच्या काळांत दोघेंजण एकान्तांत असतां तूं त्याला प्रेमाचे नाटकी हावभाव पुष्कळ दाखविले असशील. धंद्यावर दिवसाचे पांच सहा तास तुझ्यापासून त्याला दूर रहावें लागे ह्मणून तूं त्याला विरहार्तीचें प्रदर्शन किती हुबेहुब दाखवून फसवीत होतीस? तो मतिमंद तुझ्या थापांनीं भुलत होता."

मनोरमेच्या अंतःकरणांत एकदां नवे विचार प्रबळ होत; फिरून जुन्या

विचारांची लाट उसळून आपण पतीशीं नीट वागलों नाहीं याबद्दल चुटपुट लागे. पुन्हां नवे विचार बळावून ते जुन्यांना पिटाळून लावून मनाचा ताबा घेत. वर दाखविल्याप्रमाणें तिच्या विचारांचा ओघ पत्नीच्या व्रतापासून भ्रष्ट झालों या विषयावर वळतांच तिचे डोळे अश्रुवश झाले व आपण पतित आहों या कल्पनेनें ती बेभान झाली. स्थळवेळ तिच्या ध्यानांत राहिली नाहीं. ती स्वतःशीं दांतओठ खाऊं लागली व पुटपुटली—

"महाराज! आपण हयात असतांना जर मला अनुताप घडता तर आपल्या पायांच्या सेवेनें मी माझ्या पापांचें प्रायश्चित्त घेऊन शुद्ध झालें असतें. आज मला तें साध्य नाहीं. या जन्मीं, मनोरमे, गतकर्माबद्दल तडफडत रहाण्यापलीकडे तुझ्या हातीं कांहीं नाहीं. पण हा पश्चात्ताप तरी खरा आहे का? विचाराच्या भरांत मला एकदां वाटतें कीं, या देहाचा शेवट करून कोणत्याहि योनींत असलेल्या माझ्या पतीच्या पायांना मिठी मारावी. पण फेसासारखें हें सगळें वरवर आहे. त्यांत खरेपणा नाहीं."

विचारानें पालट खाल्ली. "नाहीं. मी चुकतें आहें. नवऱ्याच्या विचारांना प्रत्यक्ष स्वरूप देण्याकरितांच माझी येथें ईश्वरानें नेमणूक केली असेल. सगळीं सुखें माझ्यापुढें हात जोडून उभीं असतां एका पतिसुखाच्या अभावीं तीं सगळीं रद्द वाटतात. शृंगारलेल्या देहांत प्राण नसल्यासारखी माझी स्थिति आहे. पण यामुळें पतीच्या अस्तित्वाची किंमत या सगळ्या सुखापेक्षां श्रेष्ठ ठरली. पण त्याला तर मी मुकलें. तें मी फिरून पैदा करीन. मघाशीं प्रोफेसर घमेंडे काय ह्मणाले? इतकी थोर थोर मंडळी मला देशकार्य करण्यासाठीं विनवीत असतां तें काम मला दिरंगाईवर टाकावेंसें वाटतें हें ठीक नाहीं. पुनर्विवाहानें दोन कामें साधतील. माझें हरपलेलें श्रेष्ठ सुख मला पुनः मिळेल व सगळ्या थोर व शिक्षित समाजाला मी वंद्य होईन. शाबास! असेंच केलें पाहिजे. ज्यानें त्यानें आपला मतलब पहावा अशी आज दुनियेची रीत आहे. हजारों गतभर्तृकांकरितां मला रडण्याचें कारण नाहीं. त्या दुर्दैवाच्या माऱ्यांत खितपत पडल्या तरी मला

त्यांची फिकीर नको. पडोत बिचाऱ्या ! माझें सुख मीं पाहिलें पाहिजे. उद्यां मंडळी भेटली कीं त्यांना सांगतें माझा ठाम विचार झाला ह्मणून. एका पतीवर निष्ठा ठेवणें ह्मणजे निवळ गुलामगिरीचें लक्षण. अगदीं शुद्ध रानटीपणा. आमच्या सुखाकरतां तो, त्याच्या सुखाकरितां आह्मी. माझ्यापासून सुख भोगण्याचें त्यांच्या नशीबीं नव्हतें. या पुरुषांच्या जुलमासाठींच आज जुन्यानव्यांचीं रणें माजलीं आहेत. मी या रणांतली एक प्रमुख व्यक्ति आहें. स्त्रियांची उन्नति स्त्रीजातीनेंच केली पाहिजे. त्या एका प्राण्याकरितां माझें तारुण्य, माझें रूप, वायां घालवायला यापुढें मी तयार नाहीं. स्त्रियांच्या उन्नतीच्या मार्गांतला हा गुलामगिरीचा मोठा कांटा मी उपटून बाजूस फेंकतें. येथल्या वनितासमाजाची मी अध्यक्ष आहें. त्या मानाला मी पात्र असल्याबद्दल माझी मींच खात्री करून दिली पाहिजे." विचारांनीं उलट खातांच ते या थरावर आले. इतक्यांत एक नऊ दहा वर्षांचा सुंदर मुलगा त्या दिवाणखान्यांत धांवत आला. तो तडक मनोरमेच्या अंगास बिलगला. "बाळ मधुकर !" मनोरमा त्याच्या तोंडावरून हात फिरवून त्याचे कुरळे केश मागें सारीत सारीत ह्मणाली. "बाळ! भूक लागली होय ना !" मधुकरानें मान डोलवून आपली संमति दर्शविली. "बेट्या भूक लागली ह्मणजे माझी आठवण होते नारे ? एरवीं सारा दिवसभर दुसरीकडे खेळत असतो गुलाम !" "आई, तसं नाहीं बरं कां ? तूं आपली सदानकदा कामांत. कधीं वाचीत तर कधीं लिहीत बसतेस. संध्याकाळीं बाहेर कुठेशी जातेस. कधीं तुझ्याशीं कोणी गप्पा मारीत असतात. मीं तरी काय करावंग ? मला तर तुझ्यापाशींच असावसं वाटतं." लडिवाळपणानें मधुकर बोलला व आईनें त्याला जवळ घेऊन गोंजारलें.

"बाळ, आज मास्तर शिकवायला आले होते कारे ?"

"होय."

"त्यांनीं आज काय शिकवलं मला सांग पाहूं."

"त्यांनीं मोडी व मराठी बुक वाचून घेतलं अन् मग एक गोष्ट सांगितली."

"कसली कसलीरे?" उतावळेपणाच्या आवाजांत मनोरमेनें विचारलें.

"ते ह्मणाले कीं, एक बाई होती. तिचा नवरा मेला तेव्हां तिनं दुसरं लग्न केलं. त्या दुसऱ्या बोवानें त्या बाईच्या मुलाला छळलं, मारलें. त्या बोवाचा होता एक मुलगा त्याचे मात्र लाड करायचे त्या दोघां बाईनें न् बोवानं. एके दिवशीं त्या बोवानं बाईच्या मुलाला धाडलं रानांत. जरी आई त्या नवऱ्याकरतां आपल्या मुलाचा दुष्टावा करी तरी पण तिची प्रीति त्याबर होती. त्या बोवानं त्याला जर उपाशीं ठेवलं तर तिनें त्याला चोरून खायला घालावें. एके दिवशीं त्या बाईचें न् बोवाचें झालं भांडण. बोवा ह्मणे "या मुलाला तूं घरांतून घालवून दे." बाई ह्मणे, "मी नाहीं घालवणार!" बाई पुढें ह्मणाली, "तूं नाहीं तर मी दुसरा नवरा करीनं. जा तुला जिकडे जायचं असेल तिकडे." तो बोवा मग मात्र अगदीं खजिल झाला. पुढें मग बोवानं धाडलं त्या मुलाला रानांत. तो जाईना ह्मणून त्याला मारलन सुद्धां. मग काय करतो बिचारा, रडत रडत गेला रानांत. तिथें त्याच्या मागोमाग तो बोवा गेला न् त्यानं त्या मुलाची कायशीशी कुरापत काढून त्याचं डोकं ठेंचून त्या मुलाला विहीरींत दिलं टाकून. इकडे त्या बाईला बोवाचा तो मुलगा नकोसा झाला होता. बोवा घरांत नाहीं असं पाहून बाईनं पण मुलाची मान विळीनं कापली अन् त्याचें प्रेत कपड्यांत झांकून तिथेंच परसांत पुरून टाकलंन. पुढें त्या दोघांची गांठ पडली अन् त्या बोवांनीं त्या बाईला खूप खूप मारली. मग ती गेली पळून. अशी जमतीची गोष्ट होती बघ."

हें कथानक पुत्रमुखांतून कानीं पडत असतां मनोरमेच्या चर्येवर निरनिराळे विकार उद्भवत होते. अखेरीस ती रागानें लाल झाली. मुलाला तिच्या रागाचें कारण न कळून भय वाटलें व गांगरून जाऊन तो बिचारा चूप बसला.

दुसरे दिवशीं सकाळीं मास्तरसाहेबांना दारांतूनच भय्यानें मज्जाव केला. कारण विचारतां याउपर तुमची शिकवणी बाईसाहेबांना पसंत नसल्याचें

सांगण्यांत आलें. या एकाएकीं झालेल्या बडतर्फीचें निमित्त त्यांचें त्यांनाच चांगलें उमजलें असेल.

---

## प्रकरण सहावें.

# निश्चय ठरला.

प्रोफेसर घमेंड्यांइतका मनोरमाबाईंचा पाठपुरावा करणारा दुसरा कोणी चिकट गृहस्थ नव्हता. धिमेपणा हा त्यांच्यांतला मोठा गुण असल्याबद्दल यांचा छात्रवर्ग नेहमीं वाखाणीत असे. कालेजांतील गुरूंच्या गुणदोषांची चर्चा निघाली कीं, त्यांत घमेंड्यांचें नांव हटकून निघायचेंच. व त्या विद्यार्थीवर्गांत कोणी नकल्या व विनोदी मिळाला कीं, त्यांच्या आख्यानानें विद्यार्थ्यांस पोट धरून हंसावेंच लागे. यांचा विषय संस्कृत असे तथापि अडीअडचणींच्या वेळीं कोणताहि विषय शिकविण्याची यांची एका पायावर तयारी असे. विद्यार्थ्यांना कांहीं तरी प्रश्न विचारून खिजविण्यांत यांचा हातखंडा असल्याचें विद्यार्थी नेहमीं सांगत असत. काव्य अगर नाटक पढवींत असतां पात्रांचीं भाषणें नाटककाराच्या, 'सविमर्शम्' 'साकूतम्' 'साभिप्रायम्' इत्यादि सूचनेप्रमाणें अंगविक्षेपासह सांगण्याची यांना मोठी हौस. साधारणत: न समजेसा अवघड भाग विद्यार्थ्यांच्या डोळ्यांत खुबीनें धूळ फेकून सोडून देण्याचें कसब यांना अगदीं पुरें साधलेलें. त्यांतून यांचें मर्म जाणणारा दक्ष विद्यार्थी आढळलाच तर त्यास कसें तरी हिणावून खालीं बसावयास लावलें नाहीं असें कधींच व्हावयाचें नाहीं. एका वर्गांतून दुसऱ्या वर्गांत जातांना मध्यें कालेजचे शिपाई भेटल्यास त्यांस "अरे हजीरीबुक नीट वागव, फाटेल," "अरे! आमच्या घरचे नारळ आणलेस का?" असे प्रश्न विचारण्यांत त्यांस मोठेपणा वाटत असावा असें त्यांच्या नेहमींच्या वर्तनावरून विद्यार्थ्यांस वाटे. उदराच्या स्थूलत्वामुळें गतीला मंदपणा आल्यानें एका अंगावर झुकत झुकत स्वारी चालत असे. मुलें चेष्टेखोरच!

त्यांनीं आपसांत त्यांचें नांव 'गजगति' ठेवलें होतें. स्वत:च्या पुस्तकाखेरीज दुसऱ्यावर न विसंबून रहाण्याच्या त्यांच्या बाणेदारपणाला, त्यांच्या पुस्तकांत नोट्स उतरून ठेवलेल्या असतात, व गतीप्रमाणें मति जडच असल्याकारणानें त्यांस दुसऱ्या पुस्तकावरून शिकवितांच येत नाहीं, असा कुतर्क काढून छात्रवर्ग नांवें ठेवी. "लेखनी पुस्तकं रामा...... परहस्ते न दातव्या" या सुभाषितास अनुसरून त्यांनीं आपलें पुस्तक दुसऱ्यास पाहूं न दिल्याबद्दल विद्यार्थी त्यांच्या चेष्टा करीत. गुरूला वंदन करणें आपलें कर्तव्यकर्म आहे व त्यासाठीं "सकाळीं उठोनी देवासी भजावें गुरूसी वंदावें जीवें भावें" असा कोणा आधुनिक संताचा अभंग विद्यार्थी दुसऱ्या तिसऱ्या यत्तेंत असतांनाच हाडींमासीं खिळावा ह्मणून मास्तरांनीं त्यावेळीं घोकवून घेतलेला असतो. प्रोफेसर घमेंडे ह्मणत– "जीवेंभावें राहो पण शिस्तीकरितां, अथवा थोरपणीं सभ्य नागरिक व्हावें या हेतूनें तरी रस्त्यांत गुरु भेटल्यास नमस्कार करावा." नागरिक व्हायचें तर असभ्यपणा घेऊन चालेल कसा? नागरिकांनीं नागरिकाला नमस्कार करणें हा एक परस्परांचा हक्क आहे, असले आपले हक्क तरी आजच्या विद्यार्थ्यांनीं ह्मणजे उद्यांच्या नागरिकांनीं न गमवावे यासाठीं घमेंड्यांचा जीव तुटे; व हें सभ्यपणाचें वळण छात्रास लागण्याकरितां, आपण त्याकडे टक लावून पहात असतांहि तो बेशरमपणानें नमस्कार करीत नाहीं, असें दिसतांच स्वत:च त्यास ते नमस्कार करीत. घमेंड्यांनीं नमस्कार केल्यानंतरहि त्यांस उलट मान न वांकविणारा हरीचा लाल बहुधा भेटत नसे. शिस्तची शिस्त राखून स्वत:च्या गुरुपणाचा मान ते असा राखून घेत. शिक्षणाचें काम अंगावर घेतेवेळीं आपल्या मेंदूच्या टांकसाळींतून यांनीं मोठ्या प्रयासानें विनोदी कोट्या पाडून ठेवल्या होत्या व कोणतें पुस्तक कोणत्या यत्तेंत शिकवितांना कोणत्या शब्दाचें विवरण चालू असतां कोणची विट् (विनोदी चुटका) सांगून मुलांना हंसवावयाचें हें सुद्धां अगदीं ठरीव होतें. शिस्त हा त्यांच्या रक्तांत बिंबलेला महान् गुण होता. विद्यालयांत छात्र-

वर्गांना पढवीत असतां अवघड मुद्द्याचा भाग त्यांना नकळत उड-वावयाचा व सोप्यावर मोठें व्याख्यान द्यावयाचें. या वागणुकीचा अनुभव समाजांत देखील पदोपदीं आढळून येई. घरींदारीं त्यांची वागणूक एक. "मनस्येकं वचस्येकं कर्मण्येकं महात्मनाम्" हें सुभाषित नेहमीं त्यांचे तोंडांत असे व समाजांत सामाजिक विषयावर व्याख्यान देतांना ते त्याचा अर्थ "मनांत एक, बाहेर एक व कामांत एक" असा सांगून हा थोराचा मार्ग सर्वांनीं पत्करावा असा कळकळीचा उपदेश करीत. त्यांच्या खाजगी वर्तणुकीबद्दल लोकांत पुष्कळ गवगवा असे. पण आह्मी घरीं काय करतों, याची चवकशी करण्यापेक्षां लोकांनीं आह्मी बाहेर काय बोलतों इकडे लक्ष दिल्यास बरें या तत्वाचें ते "Dont do what I do, do what I tell." या इंग्रजी भारदस्त वाक्यानें समर्थन करीत असत. या तत्त्वाचा अनुवाद दुसऱ्यांनीं केल्यास मात्र त्यांस तो असह्य होत असे. बिनचूक बोलण्याची त्यांची शैली अजब होती व त्याचा पुष्कळांना प्रत्यय आला होता. कालेजमध्यें वर्गांत त्यांचें अध्यापन चालू असता त्यांची अगदीं एकाग्रवृत्ति होत असावी; कारण विद्यार्थ्यांपैकीं एखाद्याला खोकला शिंक वगैरे आल्यास त्यांस अतोनात चीड येई. ते चवताळून विद्यार्थ्यास शिव्यांचा प्रसाद देऊं लागत व प्रयत्नानेंहि असला भयंकर प्रमाद करणारा विद्यार्थी सांपडेनासा झाला ह्मणजे त्यानें स्वतःच मी अपराधी म्हणून पुढें यावें याकरितां ते नीतिधैर्य (moral courage) या विषयावर व्याख्यान देत सुटत. पण अशा नीतिधीरांना दोन तीन वेळ मिळालेल्या भूदंडाच्या प्रायश्चित्ताची जाणीव सगळ्या शिष्यवृंदाला असल्यामुळें बहुधा सर्वच नीतिभीरु बनत असत. घमेंड्यांचा हा विक्षिप्तपणा विद्यार्थिगणांत सर्वप्रसिद्ध होता. आतां ते वनितासमाजाच्या दिवाणखान्यांत व्याख्यान देण्याला नुकतेच उभे राहिले होते, तों काल जिनें आपला तिटकारा केला ती मनोरमा मोठ्या उल्हासानें व्याख्यानास आलेली त्यांच्या दृष्टीस पडली. दोघांनीं परस्परांस हंसतमुखानें

अभिनंदिल्यावर घमेंड्यांच्या निरूपणास सुरवात झाली. "आर्यस्त्रियांची कामगिरी" हा त्यांचा विषय होता. तो प्राचीन स्त्रियांच्या उदाहरणांनीं रंगवून सोडीत असतां सीतेबद्दल ते ह्मणाले— कोणा एका कवीनें ह्मटलें आहे, "सीते, त्वया जगन्ति पुण्यानि— सीते, तुझ्यामुळेंच भूतलावर पुण्यें जगतात बरें." कांहींजण कां हसले हें त्यांच्या आवेशयुक्त भाषणाच्या ओघांत त्यांना कळलें नाहीं. त्यांना उलट संताप आला व "उगीच खिदळून दंताड वासूं नका, तुह्मांला थट्टा वाटते पण सीतेप्रमाणें आपल्या थोरवीनें जगांत पुण्याई जगवायचें काम कांहीं सोपें नाहीं." त्यांच्या धाकानें हसणारी मंडळी एकाखेरीज सगळी विरमली. पण मळकटसे कपडे घालून दाढीमिशा वाढविलेला व डोळ्यावर भल्यामोठ्या काळ्या भिंगांचा चष्मा घातलेला एकजण मात्र आणखी मोठ्यानें हंसला, त्याबरोबर व्याख्याते चिडले व ह्मणाले "ए, तूं येथून एकदम चालता हो. हा वनितासमाज ह्मणजे बायकांचा समाज आहे येथें सगळ्या बायका जमल्या आहेत, पुरुषांचें कांहीं काम नाहीं."

"महाराज असें भलतेंच बडबडूं नका." तो विनयानें ह्मणाला.

"चल अगोदर तूं बाहेर हो. मी फिरून सांगतों येथें आतां जमलेल्या सगळ्या बायका आहेत. पुरुषांनीं येण्याचें बिलकुल कारण नाहीं."

"महाराज, पुरुषांनीं येऊं नये असा तुमचा नियम कोठें आहे?"

"आह्मांला तूं येथें नकोस."

"आमची खुशी नसेल त्यास आंत घेतलें जाणार नाहीं" अशी कोठें पाटी लागल्याची मला दिसली नाहीं. कुठें असल्यास आपण दाखविण्याची तसदी घेतां का?"

"तूं एकदम चालता हो. इथें बायकांत तूं नकोस. न गेलास तर आह्मी पोलीसला बोलवूं. जातोस का नाहीं? शिपाई—ए शिपाई—सगळे कुठें मसणांत गेले वाटतें. आतां इथें सगळ्या बायकांना माझी विनंति आहे कीं, त्यांनीं "बायकांत पुरुष लांबोडा, भाजून खातो कोंबडा."

असा या माणसाचा निषेध करावा. कांहीं इलाज नाहीं. अशीच खोड मोडली पाहिजे."

"महाराज, एवढी तकलीफ नको आपणाला. मी जातों पण माझें ह्मणणें इतकेंच आहे कीं, पुरुषांत मर्दपणा येईपर्यंत बायकांना मर्द करण्याच्या भानगडींत पडूं नका."

"पुरे पुरे तुझा शहाणपणा. चल निघ, बदमाष, पाजी, बेशरम कुठला!" हे प्रोफेसरसाहेबांचे संतापाचे शब्द ऐकण्यास तो तेथें हजर नव्हता. प्रोफेसरसाहेब थंड झाले व आपल्या विषयाकडे वळले. "सरकारशीं राजकीय हक्कासाठीं झुंजण्याला केवढा एकोपा पाहिजे? नुसती बायकांची सभा पण त्यांत देखील केवढा बखेडा माजविलान् चोरानें. मला अगदीं राग आला. पण हातघाईवर येणें ह्मणजे रानटीपणा ह्मणून मी स्वस्थ बसलों. नाहीं तर केव्हांच मुरगळून टाकलें असतें. बरें झालें, वनितांच्या समाजावरचा अनर्थ टळला." प्रोफेसरसाहेबांनीं सर्वांना कर्तबगार होण्यासाठीं फार कळकळीचा उपदेश केला. सगळ्यांनीं टाळ्या पिटल्या. प्रोफेसरसाहेबांच्या निरूपणाचा अलभ्य(?) लाभ झाल्याबद्दल समाजाच्या सेक्रेटरींनीं टाळ्यांच्या गजरांत आभार मानले. अगदीं बरखास्तीची वेळ आली तेव्हां मनोरमाबाई बोलण्यास उठल्या.

"वनितांनों, भगिनींनों, समाजांत कार्य करण्यास कर्तृत्वाचीं माणसें— चुकलें बायकांच्या समाजांत— बायका पाहिजेत असा प्रोफेसरसाहेबांचा उपदेश आपण सर्वजणींनीं इतकावेळ ऐकलाच आहे. सगळ्या सुधारणेची वाढ खुंटते ती निवळ कर्तृत्वहीन माणसांमुळें. आपल्या समाजाची उन्नति व्हावी हा माझा पूर्ण हेतु आहे. ईश्वराच्या दयेनें मला साधनें पण अनुकूल आहेत. मी फार वेळ घेत नाहीं. मी आज पुष्कळ दिवस विचार करतें आहें कीं, पुनर्विवाह करावा का नाहीं ह्मणून. आतां माझा निश्चय ठरला. लग्न करावें असा माझा ठाम बेत झाला. हें जाहिर करण्यासाठीं मीं उभी राहिलें. या माझ्या हेतूला तुह्मी सगळ्याजणी अनुमति द्याल

अशी मला खात्रीची आशा वाटते आहे. जनापवादाची डर मी बाळगीत नाहीं. मला माझ्या समाजाचा पाठिंबा सर्वानुमतें असल्यावर प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला देखील मी ऐकणार नाहीं. "क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे." या सपुच्छ प्राण्याच्या सतराव्या शतकांतल्या कल्या रामाभिमानी अवताराच्या वाक्याप्रमाणें क्रिया करून दाखवावी असें माझ्या मनानें घेतलें आहे. "फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे." बायांनों, हा माझा निश्चय तुह्मां सर्वांना आवडो. इतकें इच्छून मी भाषण संपवितें."

बायकांनीं टाळ्यांचा केवढा तरी प्रचंड गजर केला! समाजाच्या दिवाणखान्यांतली पोकळी तर अगदीं दुमदुमून गेली. वरचा मजला, तळमजला व मधला मजला ह्मणजे दिवाणखाना या तिन्ही भुवनांत त्या गजराचा ध्वनि पुरून उरला.

---

## प्रकरण सातवें.

## बेत फसला.

उमा अंथरुणावर उठून बसली. पडवीच्या बाजूस दूरवर तिनें नजर टाकून पाहिलें तों अगदीं मंद प्रकाशाच्या आड दोन व्यक्ति उभ्या असून त्यांचा आपल्याच खोलीशीं कांहींतरी संबंध असावा असा तिला पक्का संशय आला. तिचें धाबें दणाणलें. काय करावें याचा तिला उलगडा पडेना. या मनाच्या अस्वास्थ्यांत ती जवळपास काड्यांची पेटी शोधूं लागली तों ती हातीं लागेना. ती स्तब्ध झाली, इतक्यांत तिला किंचित् खिदळणें व कांहीं शब्द ऐकूं आले. तेव्हां वरील व्यक्तींबद्दल बोभाटा करून त्यांचें कृत्य अर्धवट तोडण्याचा तिचा पहिला विचार बंद झाला व हे बोलतात तरी काय या जिज्ञासेनें चांचपडत चांचपडत ती पडवीच्या दाराचे बाजूला जाऊन उभी राहिली.

"भटजी, आजचें साहस पचनीं पडेल का नाहीं याचा मला धाक मधां-

पासून वाटतो आहे. बघा बोवा."

"लाडके—" हा शब्द ज्या व्यक्तीला उद्देशून त्या गृहस्थानें उच्चारला ती उमेच्या दृष्टीस स्पष्ट पडल्यामुळें तिच्या सर्वांगावर शहारे आले व बायकांच्या पद्धतीप्रमाणें एक उसासा टाकून तिनें "शिव शिव" शब्द उच्चारीत कानांवर हात ठेवले. क्षणभर तिला आपण हें पाहतों हें स्वप्न आहे असें वाटलें. कदाचित् चिंतेमुळें होणाऱ्या जागरणानें मेंदू बिघडून मतिभ्रमामुळें हें कांहीं तरी मूळापेक्षां विचित्र दिसत असेल असेंहि ती समजली. कोणी तर माया पसरून आपली नजर बंद तर केली नाहींना अशी शंका तिच्या मनांत येऊन गेली. परंतु पुढचा प्रकार तिच्या डोळ्यांदेखत—त्या व्यक्तींच्या अंधुक दीपप्रकाशांत— स्पष्ट घडत असल्यामुळें तर वरच्या सर्व शंका खोट्या होत्या असें ठरलें. पहात असतां ती मनांत म्हणूं लागली,

"या दोघांचें प्रेम निर्हेतुक असेल ही माझी कल्पना निव्वळ भ्रमाची. सासूबाईंना हें खपतें तरी कसें ? त्या काय बिचाऱ्या म्हाताऱ्या झालेल्या. त्यांतून त्यांची दुर्दैवानें बरीच पाठ पुरविलेली, या कारणानें त्यांचें फारसें या भानगडीकडे लक्ष न जाऊन या उपद्व्यापांना बळकटी येत असेल."

उमेचे विचार चालण्याला प्रस्तुत प्रसंगीं अवकाश नव्हता. ती मूळाप्रमाणें फिरून समोर काय चाललें होतें तें पहाण्यांत गर्क झाली.

"साहसावांचून जगांत केव्हांहि चांगले दिवस दृष्टीस पडत नाहींत—लाडके—" गृहस्थानें त्या स्त्री व्यक्तीच्या खांद्यावर हात टाकला. "आजपर्यंत मी निव्वळ साहसाच्याच पायावर उभा आहें." उमेच्या डोळ्यांला अंधेरी आली. क्षणभर डोळे मिटून ती स्वस्थ उभी राहिली, परंतु तिची ध्यानमग्नता दाराच्या खडखडण्यानें दूर झाली. ती एकदम पाहूं लागली तों तिच्या सामानाच्या खोलीचें दार उघडें असून तो गृहस्थ आंत शिरत होता. तिला दम निघेना. ती ओरडली.

"सासूबाई, घात. घात. चोरी—चोरी. धांवा—" सासूबाई तिच्या ओरड्यानें जाग्या झाल्या. परंतु त्या येण्यापूर्वींच ती आपल्या खोलीकडे

धांवली. इतक्यांत एकाएकीं तिच्या गळ्यावर कोणाच्या तरी हाताची घट्ट मिठी पडून तिची शुद्धी गेली. चेहऱ्यावर नखांचे ओरखडे उठून त्यांतून बारीक रक्तस्राव होऊं लागला केस अस्ताव्यस्त झाले व अशा स्थितींत ती भुईवर पडल्यानंतर लागलीच परसाकडचे दरवाजे खडाखड वाजून एक व्यक्ति तेथून धांवत गेली. पार्वतीबाई दिवा लावून 'उमे, आहेस कुठें ? अशी कां ओरडलीस–उमे उमे–" असें कांहीं तरी बडबडत व मधून मधून "या उमेनें तर अगदीं भंडावून सोडलें. दिवसा रात्रीं कधीं ह्मणून क्षण-भर जिवाला चैन पडूं देईल ? रामाचें नांव" अशा तऱ्हेनें तिच्याबद्दल अप-शब्द उच्चारीत स्वारी माजघरांतच उमेचा शोध करीत होती. इतक्यांत "आई, इकडे पडवींत ये पडवींत" ह्मणून हांक ऐकूं येऊन त्या तिकडेच गेल्या तों उमेच्याजवळ मथुराताई मोठ्या कळवळ्यानें "वहिनी, अग वहिनी, उमावहिनी, आतां काय बाई करावं ? आई, आई, पाणी तरी आण, थोडं शिंपडून पाहूं दे" ह्मणत आहे व उमेला हलवीत आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. सासूबाईंनीं दिवा घेऊन सर्वत्र न्याहाळून पाहिलें व पाणी आणतां आणतां रागानें ह्मणाल्या–"या उमेला अगदीं ह्मणून विश्वास नाहीं. रात्रीचें या खोलींत काय गाठोडें पुरलें होतें कोण जाणें ? काय नवरोजींनीं इष्टेट दिली आहे परमेश्वराला ठाऊक !"

पाणी सिंचून सावध करण्याची खटपट चालू असतां दोघी मायलेकी बारख्या बकत होत्या. मथुराताईंनीं "मी हिची हांक ऐकून बिछान्यावरून धडफडत अशी धांवत आलें तों ही बेशुद्ध पडलेली पाहिली. आई, उमा कांहीं यश देणारी बायको नाहीं दिसत. एकदा धडपणानं निराळी राहिली ह्मणजे मग तिकडे मेली कीं वाघांनीं खाल्ली अगदीं पहायला नको. काळजी तरी माणूस किती करणार ?" हा प्रकार इकडे चालू असतां ओटी-वर निजलेला विद्याधर जागा झाला व धांवत त्या जागीं आला. त्याच्या पाठोपाठच बाळंभट सुद्धां डोळे चोळीत चोळीत आले. त्यांना पाहून मथू-ताई हंसत ह्मणाल्या–"भटजींना कांहीं आहे का पहा. इकडे एवढी गडबड

पण स्वारी आतां जागी झाली. काय झोंप का काय ह्मणावं याला ?''

"आहे खरं तसं. आह्मी गरीब माणसं. श्रम फार होतात. थकल्यामुळें झोंप काय लागते पण छान.'' भटजी जरासे थांबले व मग "पण काय झालं हो उमाबाईंना इतकं अगदीं बेशुद्ध व्हायला ? अलीकडे मुलींना, तरुण बायांना फेपरं का अपस्मार—काय ह्मणतात त्याला—त्याचे झटके फार येतात. त्यांतलंच तर कांहीं नव्हेना हें ? ह्मणजे पार्वतीकाकूंच्या मागें एक नवीच काळजी लागली ह्मणायची !'' भटजींचें भाषण एवढ्यावरच थांबलें.

विद्याधराला आईची स्थिति पाहून खरोखर रडूं कोसळलें. "आई आई— ह्मणत मातेच्या निश्चेष्ट मुखाकडे स्थिर दृष्टि लावून तो सारखा अश्रू गाळीत होता. "आजी, पाणी शिंपडण्याखेरीज दुसरा कांहीं उपाय करगं आईला सावध व्हायला. आई—'' त्याच्या प्रत्येक शब्दांत करुणस्वर इतका भरला होता कीं, इतरांच्या देखील हृदयाला जरासा ओलावा यावा. आजी ह्मणाली, "बाबा, तूंच कर आतां. मला तर कांहीं सुचत नाहीं. देवाच्या मनांत माझ्यावर कोणकोणते प्रसंग आणायचे आहेत ? आतां या उमेला कांहीं कारण होतं का इतक्या रात्रींच येथें यायचं ? बरं आली असेल कशाला तर वाटेकडे नीट लक्ष ठेवावं ना. मला तर बाबा अगदीं अगदीं जीव नकोसा झाला आहे.''

"अंधेरांत येतांजातांना कांहीं जीवजिवाणू डसलं बिसलं नसेलना ? यांची खोली अडगळीची. असायचं एखादं. पण कायहो मथुताई, यांचा चेहरा ओरबडला की काय कुणी ?'' भटजींनीं कल्पना काढली.

ही वेळ कांहीं फार रात्रीची नव्हती हें वाचकांच्या लक्षांत असेलच. आतां जवळ जवळ तीन साडेतीन वाजण्याचा सुमार होता. तेव्हां वृद्ध-स्त्रियांचा हा अगदीं उठायचा समय झालेला. उमेची किंकाळी शेजारीं आस-पास कांहीं अर्धवट जाग्या झालेल्या बायांनीं ऐकली होती. व त्यानंतर हा चाललेला गोंधळ मोठ्यामोठ्यानें मंडळी बोलत होती या कारणानें तर एकदोघीजणी पार्वतीकाकूंच्या घरांत कांहींतरी विलक्षण प्रकार घडला

आहे एवढें ताडून त्यांना हाक मारीत त्यांच्या घराशीं आल्याच. भटजींना दार उघडा ह्मणून पार्वतीबाईनीं सांगितलें तेव्हां "या साळकाया माळकाया जमा करून बाजार नको उगीच भरवायला." असें भटजी ह्मणाले; पण आलेल्या बाया पार्वतीकाकूंच्या जुन्या मैत्रिणी, बरोबरीनें संसार करून नातवंडांची तोंडें पाहिलेल्या व अडीअडचणीला उपयोगी पडणाऱ्या अशा असल्यामुळें भटजींच्या सूचनेचा अव्हेर झाला; व सावित्रीबाई आणि शारदाकाकू घरांत आल्या. रीतीप्रमाणें त्यांनीं चवकशी केली तेव्हां "रात्रींची उठून कशालाशी उमा बाहेर परसांत गेली. मग या खोलींमध्यें—" मथुराताईनीं उमेच्या सामानाची खोली या नवीन स्त्रियांना दाखवून ह्मटलें, "कायसेंसें करीत बसली आहे असं मी किती वेळ तरी पहात होतें. मी कांहीं चांगलीशी जागी नव्हतें पण झोंप चाळवली एवढी गोष्ट खरी. कांहीं वेळानें हिची किंकाळी ऐकूं आली व पहातें तों बाई बेशुद्ध पडलेली! मी आईच्या पुढंच धांवत आल्यें, ही अशी मागनं दिवा घेऊन आली. ही पाहिलींत— सगळीं परसाच्या बाजूचीं दारं उघडीं आहेत तीं. कांहीं कांहीं कळेना कारण कसं तें. बघा. आतां काय ह्मणावं या रोजगाराला?"

मथुराताईंच्या तोंडून उमेच्या बेशुद्धीपर्यंतची हकीकत ऐकून त्या दोघां नवख्या बायांना पण मोठा चमत्कार वाटला व त्या अचंब्यानें परस्पराकडे पाहूं लागल्या. 'जें जें ऐकावं तें नवं नवंच! कांहीं कांहीं ह्मणून समजत नाहीं." शारदाकाकूंनीं प्रस्तुत प्रकरणावर अक्कल खर्च करून शोध काढला. "कांहीं ह्मणा—पण मथुताई, माणूस आपलं सहजासहजीं बेशुद्ध कांहीं पडायचं नाहीं." सावित्रीबाई बोलल्या. "पण काहो ही उमा अशी वाळली कशानं इतकी? हातापायांत रक्तच कसं तें दिसत नाहीं. चेहरा काय काळवंडला आहे; कांहो असं हें." सावित्रीबाईंना नेहमीं उमेबद्दल अनुकंपा वाटत असे हें येथें सांगून ठेवलें पाहिजे. प्रसंगविशेषीं घरांत करमेनासें झाल्यास त्यांच्या घरीं उमा जाऊन बसे. तिच्या विपत्ती-

कडे पाहून त्यांना नेहमीं भडभडून येई व त्या ह्मणत, "पोर कशी नक्षत्रासारखी आहे हो. करण्यासवरण्यांत शिकलेली खरी– किती चांगली आहे ह्मणून सांगूं ? पण दैवानं घात केला. यशवंत आणि उमा अगदीं लक्ष्मीनारायणाचा जोडा. शिकलेलीं काय थोडीं आहेत ? पण चटोरपणा कस्मा कस्सा तो ठाऊक नाहीं. देवा, अशा नव्या नव्या होतकरू पोरींवर असा निठुर होत जाऊं नकोस !"

हें येथें विषयान्तर करण्याचें कारण असें कीं, पार्वतीबाईंचें व सावित्रीबाईंचें या बाबतींत जमत नसे. परंतु पार्वतीबाईंना त्यांबद्दल विशेष आदर असल्यामुळें उमेची वाखाणणी त्या सहन करीत. नाहीं तर केव्हांच खडाजंगी उडून त्या दोघींमधून विस्तव जाईनासा झाला असता. सावित्रीबाईनीं वर उमेच्या शरीरकृशतेबद्दल प्रेमानें जे उद्गार काढले ते पार्वतीबाईनीं मानून घेतले. शिवाय सावित्रीबाईचा संबंध या पुढच्या कथानुसंधानाशीं असल्यानें त्यांबद्दल येथें जास्त सांगितलें ह्मणून वाचकांनीं रागावूं नये.

नुसत्या पाण्यानें सावध होत नाहीं असें पाहून पार्वतीबाईला सावित्रीबाईनें दोन चार मात्रा आणण्यास सांगितल्या. त्यांचा प्रयोग लागू पडून उमा बेशुद्ध पडल्यापासून वीसपंचवीस मिनिटांनंतर सावध होण्याचीं लक्षणें दिसूं लागलीं. सर्वांनाच मोठा आनंद वाटूं लागला. सावित्रीबाईच्या देखत सासूनें उमा सावध होऊन उठून बसतांच प्रेमानें पाठीवरून हात फिरवून विचारलें, "उमे काय झालंग तुला ? बेशुद्ध कशानें झालीस ?"

उमेनें प्रथम आपल्या भोंवतीं मंडळींचा घोळका पाहिला व सासूच्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजीं "ही मंडळी जमली कशाला ?" असा क्षीण स्वरानें प्रश्न विचारला. "तुझ्याकरितां बरं" सावित्रीबाई वदल्या. "माझ्याकरितां ?" उमा आश्चर्यानें इकडे तिकडे पाहूं लागली व दाराच्या चौकटीच्या वरच्या भागाला हाताचा भार टाकून उभे असलेले भटजी पाहून ती चपापल्यासारखी झाली; "होय माझ्याकरतांच" असें

ह्मणून ती रडूं लागली. "उमाबाई, बाळ असं वेड्यासारखं काय करावं?" सावित्रीबाईच्या डोळ्यांतून अश्रु आले. हुंदका आंवरून उमा मध्येंच मथुरा-वन्सं व भटजी यांजकडे सारखी टक लावून पाहूं लागली. चारपांच मिनिटें अशीं गेलीं व सर्वजण तिच्या कृत्याचें आश्चर्य करीत आहेत तोंच "हेच ना बाळंभट, शास्त्रसंपन्न अन् वेदमूर्ति—याच ना आमच्या वन्सं, धर्मभोळ्या व्रतवैकल्याच्या भोक्त्या?" असें त्या प्रत्येकाकडे बोट दाखवून उमा ह्मणाली.

अद्यापि रात्र होती, व दिव्याचा उजेडहि फारसा नव्हता; शिवाय तेथें विशेष तीव्र दृष्टीचीं माणसें फार नव्हतीं; त्यामुळें उमेचे शब्द ऐकून भट-जींच्या व मथुराबाईच्या काळजामध्यें झालेली उलथापालथ व तिचे चेह-ऱ्यावर उमटलेलें स्पष्ट प्रतिबिंब सावित्रीबाईखेरीज फारसें कोणाच्या दृष्टीस पडलें नाहीं. परंतु मनाचा धर्म मनानें पाळलाच.

भटजींचें व मथुराताईचें अशीं गुणविशिष्ट नांवें उच्चारण्यामुळें सावि-त्रीबाई कांहींशा तरकल्या व गप्प बसल्या. पण भटजींनीं क्षणहि वायां न जाऊं देतां सुचविलें, "पार्वतीकाकू, उमाबाईचें डोकें कांहीं तरी विलक्षण कारणानें भडकलें आहे. बुद्धि ताळ्यावर नाहीं. अशा प्रकाराला उन्मादवायु ह्मणतात. वाताचा विकार आहे. त्यांना निजवा. चांगलीं दडपून पांघरुणं घाला. कांहीं वेळ स्वस्थ झोंप लागली ह्मणजे मग त्या चांगल्या सावध होतील. कां असंच कीं नाहीं? मला तरी निदान असंच वाटतं."

गोष्ट सगळ्यांना पटली. सावित्रीबाईनीं उमेला 'ऊठ' ह्मणून खूण केली. ती एकदम ताटकन् उभी राहिली पण झोंकबीक जाण्याचा संभव फार ह्मणून विद्याधरानें तिचा दंड धरला. त्या बरोबर "कोण तूं—अरे इतक्या मंडळींदेखत. मी कांहीं वन्स नाहीं हो. माझ्या वाटेस गेलास तर तुझी हाडंनूहाडं मोकळीं करीन. ध्यानांत ठेव." बडबड करीत विद्याधराच्या हाताला हिसडा देऊन ती दूर सरली. विद्याधराला अत्यंत खेद झाला. "आई अग मी विद्याधर नव्हे का? तोल न राहून पडशील ह्मणून मीं

तुला धरलं आहे. मला नीट पहा. असं काय करतेस?" विद्याधर जवळ गेला. आईनें त्याच्या चेहऱ्यावर टक लावली. "माझा विद्याधर. अरे, इतका वेळ तूं कुठें होतास?" उमेनें त्याला पोटाशीं धरलें व ती स्फुंदूं लागली. अधिक सवड दिल्यास हिचें वेड बळावेल ह्मणून सावित्रीबाईनें तिजवर ओरडून दटावलें तेव्हां "माई, तुह्मी देखील माझ्यावर नाराज झालांत काहो? बरं दुनियेनं टाकलं तरी परमेश्वर अनाथांचा वाली आहे ह्मणतात."

मोठ्या मिनतवारीनें मंडळीनें तिला बिछान्यावर निजविलें. विद्याधर तिच्या शेजारीं बसला. इतकें सगळें होईतोंपर्यंत चांगलें फटफटीत उजाडलें. मंडळी कामकाजांत गुंतली. बाळकृष्णाचीं सर्व कामें आजीबाईनींच पार पाडलीं. विद्याधराला जेवणखाण त्या दिवशीं कांहीं सुचलें नाहीं. दुपारीं १२ वाजल्यावर आई चांगली सावध झाली व तिनें थोडासा भात वगैरे खाल्ल्यावर विद्याधर जेवला.

* * * * *

संध्याकाळीं एकट्या पार्वतीकाकूच पुराणाला गेल्या. भटजी कुठूनसे हिंडून आले व बाहेर ओसरीवरच्या झोपाळ्यावर मंद मंद झोके घेत बसले, तों मथुराताई तेथें आल्या.

"का मथुराताई, आज घरींच रहावं लागलं वाटतं?"

"होय, घरांत आजारी माणूस टाकून कुठं जायचं? नित्तनेमानं कांहीं कांहीं ह्मणून चालत नाहीं. शास्त्रीबोवांनीं योगवासिष्ठ ग्रंथ नुकताच सांगायला सुरवात केली आहे. आज अंतरला पण उपाय नाहीं."

"अहो असं पहा," भटजी कांहींसे हंसत व डोळे मिचकावीत ह्मणाले. "माणसाचे बेत अगदीं सरळ कधींच सिद्धीस जायचे नाहींत. तुमच्या वहिनीबाईनींच पहाना कुणाचीं काय काय कामं मोडलीं तीं?"

विद्याधराला हा सर्व प्रकार सहज दिसला.

---

## प्रकरण आठवें.

## अधिक माहिती.

"ह्मणजे मनोरमाताई, त्या गणपतराव भाव्यांचे घरीं असा गोंधळ आहे!" आश्चर्यानें डोळे विस्तारून मनोरमाबाईकडे पहात डोंगरे ह्मणाले.

मनोरमाबाई स्मितहास्य करून "अहो, एकच काय पण हजारांनीं मोजतां येण्याइतक्या भानगडी या जुन्या लोकांच्या घराण्यांतून आहेत. सास्वांचा जाच हा सर्वत्र. जणूं काय सुना हाताखालीं असणं ह्मणजे त्यांच्या हातांत अगदीं राजसत्ताच आली. अहो हल्लींच्या युगांत राजाच्या वर्चस्वाला देखील मर्यादा घालून प्रजाजनांच्या स्वतंत्र हक्कांत त्याला किंचित् सुद्धां ढवळाढवळ न करूं देण्याची लोकांची प्रवृत्ति होत चालली आहे, समजलांत. पोरगी तुमची आहे, देण्याचा हक्क तुमचा आहे. आह्मी बापड्या काय करणार? पण कोणाचेंहि झालें तरी सुख व्हावें असाच आमचा तिऱ्हाइतांचा मानस असणार." असें वदून गप्प बसल्या.

"मला तरी त्या दिवशीं ती बाई इतकी जहांबाज असेल असें नाहीं वाटलें. पण तें ठीकच आहे. एकदां पाहून का कोठें माणसाची पारख होत असते?"

"ह्मणूनच आमच्यासारख्या जाणत्या तिऱ्हाइतांचा सल्ला घेणें इष्ट. मला जें माहीत होतें तें मीं मोकळ्या मनानें तुह्मांला निवेदलें आहे."

"पण याला नुसत्या लोकवार्तेखेरीज कांहीं आधार आहे का?"

'होय आहे. अहो, माझी सावत्रनणंद त्यांच्या घरीं दिली आहे. आमच्या एथल्या माणसांची व तिच्या नवऱ्याची कालेजमध्यें मैत्री जमली होती. तेव्हां माझ्या नणंदेशीं लग्न लावण्याचा त्यांचा बेत झाला व त्याप्रमाणें तो त्यांनीं नेटानें पार पण पाडला. आमची नणंद लग्नानंतर फारतर एक दोन वेळच आमच्याकडे आली असेल नसेल. पतिनिधनानंतर ती कांहीं दिवस आमचे जवळ होती; पण माझें तिचें पटेना तेव्हां ती फिरून

सासरींच राहूं लागली. तिच्यामुळें आमच्या कानावर तिच्या सासूच्या पुष्कळ गोष्टी येत. अहो फार नको. गणूभाऊ भाव्यांचेंच कितवें लग्न आहे याची तर जरा चौकशी करा. त्यांची पहिली बायको आज असती चांगली माझ्यापेक्षां चारपांच वर्षांनीं वडीलच. ती आमच्या नात्याचीच–पण नको तें–जरा लांबची होती. तेव्हां सासूनं तिला छळून शेवटीं घरांतून हाकलून लावलंन्, चार आठ दिवस ती पुण्यांतच होती, पण पुढं तिचं काय झालं देवाला ठाऊक ? लोक आपआपल्या तर्काप्रमाणें कांहींबाहीं बोलतात. तें जाऊं द्या. ती पुण्यास असतांना लोकांनीं पुष्कळांनीं गणूभाऊला सांगून पाहिलं कीं, आईवर विश्वास ठेऊं नकोस; तुझ्या बायकोला परत घरीं आण, अद्यापि ती पवित्र आहे, असा अविचार करूं नकोस ह्मणून. पण तुह्मी पुरुष ह्मणजे काय ? गणूभाऊ फुशारलेलेच; त्यांनीं सगळ्यांचें सांगणें बसवलें धाब्यावर आणि आपलें एक घेऊन बसले कीं तिची काय किंमत, ती नाहीं तर दुसरी पन्नास लग्नें लावीन. बायकांना भिऊं लागल्यावर पुरुषांना त्यांच्या विनवणीखेरीज उद्योग ह्मणून जगांत कांहीं रहाणारच नाहीं. जाऊं दे खुशाल जाऊं दे.” आणखीहि पुष्कळ भलभलतें बोलले ह्मणतात. बायको बिचारी सासूनें घरांतून काढली ह्मणून माहेरीं गेली. माहेरचीं माणसं अन्नूला भ्यालीं. त्यांनीं तिला घालवून सांगितलें कीं, सासरच्या उंबरठ्यांत धरणें धरून बैस, मर जा काय वाटेल तें होऊं दे तिकडे, तूंच शेफारून कांहीं चाळे करीत असशील ह्मणून सासू घरांतून घालवून देते. उगीच कोण कुणाचें वैर करतो ? सासूची क्षमा माग, जा.” करते काय ? परत पुन्हां सासरीं आली. तेव्हां तर सासूनें नाहीं नाहीं तें बोलून मारून घरांतून हांकलून दिली, ती रडत शेजारच्यांच्या घरीं गेली, पण ते ओळख असली तरी अगदीं परके. तिऱ्हाइतांच्या मुलीला उगीच घरांत आसरा कसा देणार ? हो, त्यांचें ठीकच आहे. त्यांनींहि तिला वाटेला लावली. पुढें कुणा एका गावगुंडानें तिला आपल्या घरीं ठेवली आणि नंतर तिचें काय झालें त्याचा पत्ता नाहीं. यारुताईची ही अशी कथा आहे. तिला

डाग दिलेले, भाजलेलें, मारल्यामुळें अंगावर वेळ उठलेले तर मीं कित्येकदां पाहिलें आहे. पण त्याला झालीं जवळ जवळ वर्षें वीस. त्या वेळीं मी बारा का तेरा वर्षांची होतें. माझें लग्न कांहीं झालेलें नव्हतें. मग बघा किती वर्षें झालीं तीं. त्यानंतर दुसरी केली तिनें तर जीवच दिला, व आतां तिसरी आहे. सध्यां कांहीं बोभाट नाहीं. एवढं तर खरंना कीं पिकल्याशिवाय कांहीं विकत नाहीं. पण या गोष्टीला अनुमान कशाला ? प्रत्यक्ष पुरावा मी मघापासून सांगतेंच आहें कसा तो !''

ज्यांच्या घरीं आपण चार पांच दिवसांपूर्वीं चवकशीला गेलों होतों व ज्यांच्या वर्तनाबद्दल संशय घेण्यासारखें एका भेटींत कांहीं आढळलें नाहीं, त्यांच्याबद्दल हा कसला अनिष्ट प्रकार आपण ऐकतों याचें डोंगऱ्यांना राहून राहून आश्चर्य वाटलें. ते स्वस्थ चित्तानें ऐकत होते. ऐकणें झाल्यावर बराच वेळ दोघेहि गप्प बसले.

नंतर एक जवळ जवळ पन्नाशी उलटलेला पोक्त गृहस्थ तेथें आला. कधीं न येणारा गृहस्थ एकदम एकाएकीं आलेला पाहून दोघांना आश्चर्य वाटलें. त्याला पहातांच मनोरमाबाई खुर्चीवरून उठून दूर उभ्या राहिल्या. व डोंगऱ्यांनीं ''या विष्णुपंतदादा'' असें स्वागत केलें.

डोकीवर ओबडधोबड कसा तरी बांधलेला पांढरा रुमाल, त्यांतून बाहेर आलेले पिंजारलेले पांढरे केस, ठेंगणी मूर्ती, घारे डोळे व वयातीत असूनहि तोंडावर दिसणारी अपूर्व तरतरी पाहून कोणालाही हंसूं आल्यावांचून राहिलें नसतें. त्याप्रमाणें स्वागतपर उद्गार काढतांना डोंगऱ्यांना हंसूं आलें.

''का गणपतराव, अहो तुह्मी कोंकणचीं माणसें इकडे दूर कुणीकडे ? विष्णुपंत अचंब्यानें ह्मणाले.

''मुलीचा बाप झालों ह्मणून.''

''ह्मणजे मुलीला स्थळ पहायला वाटतें !'' डोंगऱ्यांनीं रुकारार्थीं मान हालविली.

''मग कुठपर्यंत आलं आहे एकंदर बस्तान?''

"अहो तुमच्यावांचून हीं कामें व्हायचीं थोडींच ? आहे का एखादा उत्तम वर ? पण आपल्या आहारांतला पाहिजे हो !"

"डोंगरे, सध्यांचा काळ मोठा विचित्र आहे. पोरगा कालेजमध्यें शिकणारा हवा असला तर प्रत्येक यत्तेप्रमाणें हजारा हजाराचा तोडा कमरेला अडकावून आलां आहांत का ? मुलाच्या घरीं रोजच्या खाण्याची पंचाईत असली तरी पत्करेल; पण मुलगी सांगून आली कीं लागलीच आली किंमत. मुलगा काय शिकतो ? ह्मणे आहे बीएंत; पण बाजारांतून दोन पैशाची भाजी आण ह्मटलं तर अडलं घोडं. काय करायचीं आहेत तीं पुस्तकं शिकून ?"

"तुह्मी ह्मणतां तें सगळं खरं; पण आहां का तुह्मी एखादं मध्यम वेताचं स्थळ गांठून द्यायला तयार ?"

"त्यांतहो काय अडचण आहे ? एखाद्या कालेजांत जा. तिथें मुलाचें नांव, गांव, गण, गोत्र उत्पन्न यांसह प्रत्येक लग्न झालेल्याची व न झालेल्याची यादी सांपडेल तुह्मांला. अहो, इंग्रेजी राज्यांत सोईला कांहीं तोटा नाहीं. नव्हे आह्मांला खायला मिळत नाहीं पोटभर एवढीच काय ती गैरसोय आहे. पण त्याची कांहीं धास्ती नको. कारण पुष्कळशा सोयींमध्यें एका गैर-सोयीला—तुमची इंग्रजी ह्मण आहे Majority carries the point— मान मुळींच नाहीं."

"मी कालेजांत गेलों होतों; पण कागदावरच्या नांवागांवावर कुठें लग्नं झालीं आहेत कीं काय ?"

"यादींतून एक मुलगा पसंत करावा अन् काढावा शोध त्याचा, ठर-वावं लग्न. बस."

"बरं आह्मीं एक वर पाहिला आहे."

"कोणचा ?"

"गणपतराव भाव्यांचा धाकटा भाऊ."

विष्णुपंत दादा विचारांत पडले. थोड्या वेळानें त्यांना सर्व कळलें.

"हँ! हँ! एक बायको सासूच्या धाकानं फरारी झाली. बाकी त्यांत तिचा दोष कांहीं नाहीं ह्मणा. दुसरीनं जीव दिला. तेच कीं नाहीं मेषपात्र गणपतराव भावे? मधला मुलगा तो यशवंत तो आमच्या सावित्रीबाईच्या प्रल्हादाचा अन् आमच्या नारायणाचा सहाध्यायी. वारला बिचारा! पार्वतीबाईच्या मुलांत मूल तेवढं होतं; पण अल्पायुषी! त्यांचा तो वामन ना? मुलगी तुमची, देणारे तुह्मी. द्यायला काय हरकत आहे? बाकी पार्वतीबाई भारी जहांबाज बाबा! छे! छे!" येथें विष्णुपंतांनीं मुरका मारून पाठ फिरविली—"छे बोवा, तें प्रकरण कठिण, सासू मोठी जलाल. पण तसं असल्याशिवाय कांहीं अलीकडच्या पोरींना— थेर थेर करायला पाहिजेत यांना — जुनी बाळबोध शिस्त लागायची नाहीं. ही आमचीच सूनबाई पहाना. ताळ सुटला बघा ताळ—" विष्णुपंत डोळे गरगर फिरवूं लागले.

मनोरमाबाईची चर्या तत्काळ कोमजली. ती अधोमुख होऊन उभी राहिली.

डोंगऱ्यांना दादांच्या बोलण्याची गंमत वाटत होती, ह्मणून त्यांनीं कांहींएक न बोलतां स्तब्धपणानें ऐकून घेण्याचें काम चालविलें होतें.

"तुह्मी ह्मणतां तें सगळें खरें पण आमच्यासाठीं स्थळ पहाण्याचें तेवढें काम करायला लागाना?"

"अद्यापि लग्नाच्या मुहूर्ताला दोन महिने अवकाश आहे. पाहूं. इतक्यांतच काय घाई आहे?"

"दादांचें आश्वासन मिळालें ह्मणजे निम्में काम झाल्यासारखें वाटतें." डोंगरे डोळे मिचकावून ह्मणाले. नंतर चंची उघडून त्यांनीं व दादांनीं तंबाकू खाल्ल्यावर डोंगरे बाहेर निघून गेले व दादांची स्वारी मनोरमाबाईकडे वळली. त्यापूर्वींच मनोरमाबाईचा लाजेमुळें जीव अगदीं चंचल झाला होता व अंगाला घाम सुटला होता.

"मधुकर कुठें आहे?"

"शाळेंत—" दादांच्या प्रश्नाला उत्तर मिळालें. पण अगदींच हलक्या

आवाजांत.

"समाजांत पुरुषांना व्याख्यान द्यायला आणि पुनर्विवाहाला मी तयार झालें ह्मणून सांगतांना तुमचा आवाज चांगला खणखणीत असतो अन् आतांच कोणीं नरडें दाबलें आहे?" थोडा वेळ शान्ततेंत गेला.

"सूनबाई, तुमची स्वच्छंदी वागणूक पाहून ती माझ्या मनाला न पटल्यामुळें मी तुह्मांपासून वेगळा झालों हें तुह्मी जाणतांच आहां. परंतु मनांत त्याबद्दल तेढ बाळगून तुह्मी व तुमचे यजमान यांच्या हिताच्या आड मी कधीं गेलों नाहीं, उलट प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगीं मदत करीत आलों हेंहि तुह्मांस ठाऊक आहे. आमच्या घरांत जें कधीं कोणीं केलें नाहीं तें तुह्मी यापुढें करण्यास सिद्ध झालां ह्मणून मला लोक बाहेर शब्द बोलूं देत नाहींत. हें न समजण्याइतक्या तुह्मी अजाण असाल असें मला वाटत नाहीं; ह्मणून खऱ्याखोट्याचा निवाडा करण्याच्या इराद्यानें मीं येथें आज पाऊल टाकलें आहे. बाई, तुह्मांला खरोखरीच का दुसरें लग्न करायचें आहे?"

मनोरमाबाई काय बोलते? स्वस्थ उभी होती. इतक्यांत प्रोफेसर मंदगति ऊर्फ जडमति ऊर्फ तुंदिलोदर (विद्यार्थ्यांच्याच आवडत्या नांवानें आपण त्यांना ओळखूं) आले. ह्मातारा विष्णुपंत क्रुद्ध झालेला व मनोरमाबाई अधोमुख हें पाहून त्यांच्या आश्चर्याला सीमाच राहिली नाहीं. परंतु "बाई, तुह्मांला खरेंच का दुसरें लग्न करायचें आहे?" हा प्रश्न ते दारांतून येत असतां त्यांच्या कानावर पडल्यामुळें त्या देखाव्याचा कार्यकारणभाव त्यांस तेव्हांच ताडतां आला व त्यांनीं त्या प्रकरणाची मीमांसा केली. [कार्यकारणभाव व मीमांसा हे प्रोफेसरांचे मोठ्या आवडीचे शब्द होते. कारण ते कालेजमध्यें तर्कशास्त्राचें अध्यापन करीत असत]. प्रोफेसर दादांच्या चांगल्या माहितीचे होते. [गांवांतला साधारण महत्त्वाचा माणूस दादाशीं अपरिचित असणें जवळ जवळ असंभाव्यच ह्मटलें तरी चालेल; त्यामुळें त्यांनीं ओळखलें]; पण त्यांनीं त्यांस कोणत्याहि तऱ्हेनें आदर न दाखवितां आपलें काम तसेंच चालू ठेवलें.

"मनोरमाबाई, आमच्या धर्मशास्त्रांत तुमच्या इष्टकार्याला कुठेंच परवानगी दिलेली नाहीं. गुरुचरित्रांत विधवाधर्म काय सांगितले आहेत? एकीकडे देश बुडाला बुडाला ह्मणून ओरडायचें व दुसरीकडे अधर्माचरण करायचें! रोगराई कां वाढते याचें कारण ह्मणे बालविवाह. आह्मी तरी तशाच लग्नापासून झालेले नाहीं का? पहा, माझ्या वयाला आज बासष्टावें वर्ष आहे. अद्यापि दिवशीं पंचवीस मैल चालण्याची माझ्या अंगांत धमक आहे. बरें आह्मी एक पूर्वीचे लोक अडाणी होतों. तुह्मी इंग्रजी शिकून शहाणे झालेले आहांत. बालविवाह नको न् पुनर्विवाह करा, संध्याच कशाला, या प्रश्नांनीं तुमची अक्कल किती आहे तें दुधखुळें पोर देखील सांगेल. हजामतीच्या वाटींतलें पाणी प्यायचें हीच कीं नाहीं लेको तुमची सुधारणा! आग लावा तिला."

"वाहवा विष्णुपंत! सुधारणेची चांगली मीमांसा! तुह्मांला कांहींच कळलें नाहीं ह्मणायचें." प्रोफेसरांनीं नव्या युगाचे पुरस्कर्ते या नात्यानें असें ह्मटलें तें ठीकच होतें. विष्णुपंतांनीं प्रोफेसरांचे शब्द ऐकतांच पहिल्या झपाट्यास त्यांची आई उद्धरली व नंतर ते ह्मणाले—

"आह्मांला कांहीं समजलें नाहीं. मेंदू हा पदार्थ काय तो ईश्वराला अलीकडेच सांपडला आहे. आजपर्यंत देव मातीचे गोळे डोक्यांत बसवीत असे. मोठा आला आहे शहाणपणा शिकवायला. तुझ्यासारखीं कितीक पोरें खेळवलीं आहेत मीं. ह्मणे "विष्णुपंत सुधारणेची चांगली मीमांसा केलीत" शाळेंतल्या पोरांना शिकवावेंस तूं —मला ज्ञान शिकविण्याची नाहीं आपली योग्यता. माणसानें आपल्या पायरीनें रहावें. तुमच्यामुळेंच तर हीं नवीं नवीं पोरें लागलीं बिघडायला न् गमजा करायला."

"अहो पण दादा जरा—"

"गप्प बैस—एक अक्षर उच्चारूं नकोस, मला सगळें समजतें आहे."

प्रोफेसरांना चुप बसण्याखेरीज इलाजच नव्हता.

विष्णुपंत पुढें बोलूं लागले—

"आह्मांला नको ही असली सुधारणा. सूनबाई, मला एकदां स्पष्ट सांग. तूं न् नारायण माझ्या तंत्रानें वागानात तेव्हांच मी तुमचें नांव सोडलं होतं. पण रक्त आपला गुण केल्याखेरीच रहात नाहीं. तूं सुधारणा करणार आहेस ह्मणून ऐकल्यापासून मला झोंप नाहीं कीं अन्नपाण्याची रुची कशी ती ठाऊक नाहीं. मला एकदां सांग कीं, "मी असं करणार." वाद मिटला. दुसऱ्याला नवरेपणा देऊन तूं माझ्या नारायणाचें नांव बुडवणारना ? हे पैसे उड्या मारताहेत सूनबाई पैसे ! मला एकदां तसें सांग, अन् मग खुशाल नंगा नाच कर. पण त्याच्या अगोदर मला मधुकराची तरतूद करायला पाहिजे."

"मनोरमाताई, अशा भितां कां ? नव्याजुन्याच्या भांडणांत तुह्मी स्त्रीजातीच्या पुढारी आहांत. धैर्य धरा. स्पष्ट सांगा." मनोरमेनें प्रोफेसरांकडे नुसते पाहिलें देखील नाहीं.

प्रोफेसर ह्मणतात—"अबला– अबला– पुरुषांच्या दटावणीला अंमळ सुद्धां भीक न घालण्याचें त्यांच्यानें होत नाहीं. मनोरमाताई, भित्रेपणा धरून रहाण्याचे हे दिवस नाहींत. अशानें उन्नति कशी होणार ?"

विष्णुपंतांनीं पुन्हां प्रोफेसरांबरोबर सुधारकांना शिव्या हांसडल्या. "उन्नति कशी होणार ? पुरुषांची उन्नति करा अगोदर. बायकांची आपोआप मागून होईल. उन्नति ह्मणजे निवळ ढोंग आहे ढोंग. हें आह्मांला न कळण्याइतकें कांहीं आह्मी जुने असलों तरी मूर्ख नाहीं. आणखी हेंहि पुन्हां सांगतों कीं, बायका कांहीं जातीच्या वाईट नसतात. पुरुषच त्यांना मथवून वाटेल तसें नाचायला लावतात. बोला प्रोफेसरसाहेब बोला. आज पंचवीस तीस वर्षें जो तुह्मी सगळ्या मुलुखभर गोंधळ मांडला आहे त्यांत काय साधलंत ? कांहीं बुडालेली पेशवाई मिळवली नाहींत. येऊन जाऊन ओरड काय ती बायकांना शहाणे करण्याची. शहाणपणा कशांत तर तोंडपाटीलकी करण्यांत. दोन माणसांचा स्वयंपाक करतां येत नाहीं, मुलें संभाळतां येत नाहींत, घर राखतां येत नाहीं. मग बायकांचा शहाणपणा तो उरला कशांत ? फक्त




विष्णुपंत संतापानें म्हणाले, हे पैसे उड्या मारताहेत सूनबाई पैसे !

[ पान ८४.

रस्त्यांनीं निर्लज्जपणानें पायांत बूट इष्टाकिण्या घालून नवऱ्याबरोबर नाटकें पहायला जावें, कामधाम करतां येईना ह्मणून सगळेंच रिकामपण, तेव्हां चार-चौघाजणींनीं जमावें, पदें ह्मणावींत, पत्ते इस्पिटें खेळावींत अन् दिवस घालवावा. फारच करमेनासें झालें तर संध्याकाळचें ठमकत मुरकत फिरायला जावें. पुरुषांनीं सुधारणेंत काय मिळवलें? —चहा, डोकीवरच्या केसांचें ...प्पर, गळ्यांत चिंध्या, आणखी असाच कांहीं तरी क्षुद्रपणा. इंग्रजांचें ...त्यकर्तृत्व असल्या सोंगांत नाहीं. त्यांच्या देशाला उचित वेष ते घेतात एव...चि कायतें. बाकी त्यांची खरी कर्तबगारी निराळ्याच गुणांत आहे. त्यांच्या ...हेरच्या भपक्याला आह्मी भुलतों हा आमचा अजागळपणा. त्यांच्या ...गरखे हुशार, अक्कलवान्, लोक नाहींत साऱ्या दुनियेंत. शाळांतून ...तिहास शिकलांत, शिकवलांत तो एवढ्याचसाठीं वाटतें. प्रोफेसर-...हेब, महाराज, बोला ना कांहीं?"

विष्णुपंताचा संताप विकोपाला गेला होता. त्यांची झरझर बोलण्याची ...वय असल्यामुळें रागाच्या भरांत शब्द व वाक्यें जितकीं स्पष्ट उच्चारलीं ...वींत तितकीं जात नव्हतीं. प्रोफेसरांना त्यांच्या एकंदर आविर्भावावरून ...त्र विष्णुपंतांच्या ह्मणण्याचा बोध चांगलाच होत होता. निवळ ...षाखी ऐटींत आपण रमलों परंतु इंग्रज लोकांचें बहिरंगापेक्षां अंतरंग ...ती मगदुराचें आहे हें विष्णुपंतांप्रमाणें प्रोफेसरांनाहि त्या वेळीं पटलें. ...ण अर्थशास्त्राचे सिद्धान्त परीक्षेसाठीं घोकघोकून पाठ केल्यामुळें देशांत ...द्याची वाढ होणें केव्हांहि जनसमूहाच्या दृष्टीनें हितावह असते हें चटकन् आठवलें व विष्णुपंतांच्या वरील सुसंगत भाषणाला उत्तर देण्यासाठीं निर-निराळ्या ग्रंथकारांचे दाखले पुढें करावे आणि त्यांच्या भाराखालीं प्रति-पक्षाला चीत मारावें अशी त्यांनीं मनांत तयारी केली.

"दादा— " मंदस्वरांत भाषणाला सुरवात झाली. "पोलिटिकल एका...ाचा ह्मणजे अर्थशास्त्राचा आद्य प्रवर्तक जो अडाम स्मिथ तो आपल्या 'राष्ट्राची संपत्ति' या पुस्तकांत ह्मणतो—"

दादा खवळले व उसळून ह्मणाले— "तो अमका असं ह्मणतो अन् तमका तसं ह्मणतो या गप्पा माझ्याजवळ चालायच्या नाहींत. तुह्मांला काय कळलें तें सांगा. पुस्तकी ज्ञानाचा हा सारा परिणाम आहे. तीं पुस्तकें घाला सारीं चुलींत. जा. आपल्या मिळकतीप्रमाणें बचत राखून खर्च करण्याची अकल नाहींन् अर्थशास्त्र—अर्थशास्त्र ह्मणून बसा शंख करीत. नव्या नव्या गरजा व व्याप निष्कारण मागें लावून घेऊन त्या भागवितां भागवितां घेटाकुटीला जीव येतो. मी बघा प्रोफेसर, बारा रुपयांत दोन तीन माणसांचा गुजारा करतों. भाजीभाकरीच खातों पण आह्मी असे काटक अन् दमदार आहों कीं, तुमच्या तुकतुकीत शरीराच्या एकाहि माणसाला आमची बरोबरी करायला येणार नाहीं. एकानमी घरच्या बाबींत करा अगोदर. मग बसा देशाच्या उलाढाली करीत."

प्रोफेसरमजकुरांचें बोलणेंच खुंटलें. त्यांनीं दहापांच पाश्चात्य ग्रंथकारांच्या नांवांवर आणलेला दम जागींच जिरला; व वेड्याप्रमाणें विष्णुपंतांच्या तोंडाकडे पहात त्यांचें भाषण ऐकण्याखेरीज त्यांना कांहींच काम उरलें नाहीं.

बराच वेळ झाला पण आपल्या वटवटीला मनोरमेकडून कांहींच समाधानकारक उत्तर मिळेना ह्मणून विष्णुपंतांच्या संभाषणाचा ओघ ओसरला व त्यांनीं "सूनबाई! ध्यानांत ठेव कोणतेंहि काम करायचें झालें तर आपली, आपल्या कुळाची इभ्रत राखण्यासारखें करावें. "हुरळली मेंढी, लागली लांडग्याच्या मागें" त्यासारखी तुमची बायकांची स्थिति असते. पुरुषांच्या गोड गोड शब्दावडंबराखालीं झांकलेल्या दुष्ट हेतूंची कल्पना त्यांस न होऊन त्यांना आपण कांहीं तरी महत्कृत्य करण्याच्या मार्गांत आहों असें वाटतें. हिंदुस्थानांतले पुरुष देखील दुधखुळे, मूर्ख आहेत. खिस्तीधर्मप्रसाराकरितां इकडे येणारे पाद्री हिंदुधर्माची निंदा इतक्या सफाईनें करतात कीं, त्याचा खरेपणा मनाला चटकन् भासून आह्मी सहज फशीं पडतों. बाई! शिक्षणाचा असा दुरुपयोग करूं नकोस. जातिभेद, जातिमत्सर इत्यादि

हिंदुधर्मांतले प्रचार अनिष्टमूलक आहेत ही कल्पना मूळची आमची नाहीं. बाळ मधूला चांगलें जपून असें शिक्षण दे कीं, तो पुढें महापुरुष होईल. मी आतां जातों. नुसत्या देशोद्धाराच्या सुंदर कल्पनेला हुरळून लोकांच्या नादानें पुनर्विवाहासारख्या निंद्य साहसाला बळी पडूं नकोस. स्त्रियांच्या दुष्टपणामुळें केवढे अनर्थ ओढवतात याबद्दल गीतेंत फार चांगलें सांगितलें आहे, त्याकडे लक्ष ठेवा. शहाण्या व्हा. मी आतां जातों. फिरून कधीं तरी येईन."

विष्णुपंत निघून गेले.

प्रोफेसर तटस्थ वृत्तीनें मनोरमाताईच्या चेहऱ्याकडे पहात होते. त्या जेव्हां नुसत्या नजरेनें देखील दाद घेईनात तेव्हां यांनींच सुरवात केली.

"मनोरमाताई, ब्राह्मण मोठा कडक नाहीं हो. भारीच पण खडतर."

"मला आतां कांहीं सुचत नाहीं. तुह्मी पुन्हां केव्हां तरी या."

"अगदींच थिजलांत वाटतें ह्यातान्याच्या टकळीला भिऊन. माझ्यासारखा कोणी असता तर—" मनोरमा एकदम खेदांत देखील हंसूं लागलेली पाहून प्रोफेसर आपला बोलण्याचा हेतु सोडून "कां, हंसता कां?" ह्मणून उत्कंठेनें चवकशी करूं लागले.

आढेवेढे घेतां घेतां शेवटीं मनोरमा ह्मणाली—"माझ्यासारखा कोणी असता तर" या वाक्याचें मला हसूं आलें. तुमच्यासारखा कोणी कशाला हवा ? प्रत्यक्ष तुह्मीच हजर होतांना मामंजीपुढें ? मग कां नाहीं कांहीं बोललांत ? यंव करूं आणि त्यंव करूं अशा फुकट शिलेदारी तावाला कोण भीक घालणार ? प्रसंगाला जर तोंडून अक्षर निघालें नाहीं, तर माझ्यासारखा असता तर अस्सें केलें असतें अन् तस्सें झालें असतें, या बडबडींत काय अर्थ ? मलाहि तुमच्याप्रमाणें वाटलें होतें पुष्कळ कीं धीरानें त्यांच्यापुढें स्पष्ट मत द्यावें ह्मणून; पण कशी अगदीं पाण्यांत टाकलेल्या ढेकळाप्रमाणें विरघळून गेलें बघा त्यांच्या पुढें. अगदीं तुमच्यापेक्षां जास्त. त्यांचा वचक भारी."

आपलें अवसान आपल्याच गळ्यांत आलें हें पाहून प्रोफेसरमजकूरहि विरमल्यावांचून राहिले नाहींत. "आज तुमचें मन स्थिर नसणार. उघ-

डच आहे. विवेकानें मनाची चलबिचल दावून टाका. मी येईन एखादे वेळीं वेळांत वेळ काढून." असें थोडक्यांत समारोपून स्वारी चालती झाली.

मनोरमा त्या दिवशीं किती तरी वेळ खिन्नपणानें विचार करीत होती.

---

## प्रकरण नववें.
## सावित्रीबाईचें घर.

उमेच्या मनावर पहांटेस पाहिलेल्या व अनुभवलेल्या गोष्टींचा भयंकर आघात होऊन त्याचा किती विलक्षण परिणाम झाला हें वाचकांच्या निदर्शनास आलेंच आहे. तो सारा दिवस घरांतल्या मंडळींपेक्षां विद्याधराला मोठ्या काळजीचा गेला. आईच्या वेडाची लहर कोणच्या थरावर जाते याबद्दल त्याला विशेष विवंचना लागली होती; व असें कां व्हावें हें त्यास मुळींच न कळल्यानें तर त्यास हा सारा चमत्कार फार आश्चर्य वाटण्यास कारण झाला. ज्या स्त्रीच्या पोटीं आपण जन्म घेतला तिच्याबद्दल साहजिक आदरामुळें पूज्यबुद्धि असणें सामान्य गोष्ट आहे व त्याप्रमाणें विद्याधराच्या वडील चुलत्याची आपल्या मातुःश्रीवरहि होती. परंतु मातांच्या योग्यायोग्यतेचा प्रश्न तिऱ्हाईत या नात्यानें सोडवूं लागल्यास त्यांत स्वभाव पडताळून पहाणें इष्ट असतें. घरांत जरी सासूच्या दृष्टीनें उमा अत्यंत अधम ठरली होती तरी जग तिचे गुण गातच होतें, त्यामुळें अशा सुशील मातेच्या आस्थेचा लाभ यापुढें आपणास न मिळाल्यास सत्पुत्राला किती वाईट वाटेल याची कल्पना संध्याकाळीं ती सावध होऊन पूर्णपणें ताळ्यावर आली तेव्हां विद्याधरास झालेल्या आनंदावरून करण्याचें वाचकांवर सोंपवितों.

गतपितृक बाळांचा सगळा भार आईवर असतो व अशीं मुलें बापाच्या हयातींत जरी अत्यंत हूड, द्वाड, असलीं तरी पितृनिधनाच्या दैवी आप-

त्तीच्या तडाख्यानें त्यांचा अल्लडपणा जाऊन तीं ताबडतोब निवळतात व सुशील बननात असा अनुभव पुष्कळदां व्यवहारांत येतो. यावरून बापाचें निधन आणि मुलांचें सदाचरण यांचा कार्यकारणभाव बांधून कोणासहि मुलें सद्वृत्त निघण्यास पित्यांनीं जगूं नये असा निष्कर्ष काढण्याचें कारण नाहीं व असा अनुभव अगदीं बिनचूक येतोच असेंहि आह्मीं ह्मटलेलें नाहीं. असो. विद्याधराची मात्र अशी स्थिति होती. विद्याधराचें बापाच्या वेळचें वर्तन इतकें अल्लडपणाचें असे कीं, कोणी कोणी त्याच्या आडदांडपणावरून हा पुढें चांगला निपजणार नाहीं, ढ होणार, असें बोलत असत. लहानपणीं मुलांच्या कोंवळ्या बुद्धीवर भुतेंखेतें, बागुलबुवा व अशा प्रकारचे दुष्ट संस्कार झाल्यानें त्यांचे परिणाम आमरण कायम रहातात हें जाणून विद्याधराला शिशुपणीं आईनें अथवा यशवंतरावांनीं या प्रचारापासून दूर ठेविलें होतें. त्यास सात आठ वर्षांचा होईपर्यंत "श्रीग" ची ओळखहि नव्हती व बाळपणीं चारचौघांनीं आपल्या मुलाला 'अमक्या-तमक्याचा मुलगा एवढासा खरा पण किती हुषार आहे' ह्मणून उदाहरण द्यावें अशी विद्याधराच्या मातापित्यांनीं हाव न बाळगल्यानें अकालींच त्या-वर घोकंपट्टीचा बोजा पडला नाहीं. अशा वयांत विषय ग्रहण करण्याइतकी —विषयाचें मर्म समजण्या इतकी— बुद्धि प्रगल्भ झाली नसल्यानें घोकण्या-खेरीज मुलांना इलाज नसतो. आणि या उपायानें मतीला जडत्व येतें हें येथें वेगळें सांगावयास नकोच.

विद्याधराला लहानपणीं उजळणी बाराखड्यांत तरतरीत केला नाहीं ह्मणून त्यास अगदींच निरक्षर ठेवला होता असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. त्याला रामायण, महाभारत व इतर पुराणें हे प्राचीन ग्रंथ व मरा-ठ्यांच्या इतिहासासंबंधी अर्वाचीन ग्रंथ यांतून पुष्कळ लहान लहान कथा सांगण्याचा यशवंतरावांचा प्रघात होता. युरोपांतल्या वीरांच्या कथा सांगून लहान मुलांचा परक्यांबद्दल निष्कारण आदर वाढविणें चांगलें नाहीं अशी त्यांची ठाम समजूत असल्यामुळें ते होतां होईतों महाराष्ट्रीय

अगर रजपूत महापुरुषांच्या गोष्टी सांगत असत. शिवाजी, रामदास, बाजीराव, पानपतची लढाई, यांसंबंधाची रसभरित माहिती वारंवार कानावर आल्यानें विद्याधराचें अंत:करण महाराष्ट्रदेश व तदंतर्गत इतर इतिहासप्रसिद्ध स्थळें यांबद्दल निरतिशय आदर वाटून उचंबळून जात असे. याशिवाय नित्य पठनीय असा बोधपर संस्कृत व मराठी कविता-संग्रहहि त्यास बराच मुखोद्गत होता. परंतु पित्याचा सहवास दीर्घकाल घडावा असें विधात्याच्या मनांत नसल्यामुळें तो अकालींच संपून सर्व जबा-बदारी मातेवर आली व आपले सुदिन जाऊन विपत्ति मागें लागल्याचें त्यास कळूं लागल्यामुळें बापाच्या वेळची बेपर्वाई आपोआप मावळली. तो प्रत्येक गोष्टीचा सारासार विचार करूं लागला. कोणाशींहि अतिप्रसंग न होऊं देण्यासाठीं तो शक्य तितका जपत असे. मातेचा जाच त्याला दिसत होता व त्या एकट्या कारणानें मात्र त्याच्या विवेकजन्य शान्तीवर विरजण पडून संतापानें त्याचें रक्त उसळे. त्या दिवशीं तर कोपातिशयानें कार्या-कार्य न ओळखण्याइतकी त्याची विचित्र स्थिति झाली होती. मातेच्या विकाराचें खरें कारण कळण्यापूर्वीच त्यानें आपला तर्क निरनिराळ्या तऱ्हे-नें चालवून घरांतल्या मंडळींच्या छलबुद्धीचा हा अतिरेक मातेच्या व्याधी-च्या रूपानें फळाला आला आहे असें ताडलें होतें. घरांत कर्ते पुरुष काय ते गणूकाका, पण त्यांना पोटामागें नेहमीं बाहेरच रहावें लाग-ल्यानें बाळंभट जोशासारख्या हलकट माणसाचा बडेजाव माजून आप-ल्याला त्रास अधिक होतो हें तो जाणून होता. गणूकाका घरच्या कामांत दुर्लक्ष करणारे व आईबहीणी यांच्या शिकवणीनें आपल्याबद्दल त्यांचें मन दूषित झालेलें, तेव्हां घरांत बेदाद अंधाधुंदी बाळजोशाच्या अनुमतानें होत असल्यास मूग गिळून बसण्याशिवाय अन्य गति नाहीं हें त्यास कळलें होतें. बाळजोशाची हुकमत तो आपल्यावर कधींच चालूं देत नसे. प्रसंगीं त्याचा पाणउतारा करण्यासहि तो कमी करीत नसे. आजी, आत्या-बाई व वामनकाका यांची फूस असल्यामुळें बाळजोशाचें वर्तन कधीं कधीं

अनिवार होई.

शिवाय वामनकाकाची गोष्ट कांहीं निराळीच. बाळंभटानें त्यास कसें भारलें होतें ईश्वर जाणे, पण तो भटाच्या अगदीं अर्ध्या वचनांत असे. गणूभाऊंच्या पश्चात् घरचे मालक वामनराव व दिवाण बाळंभट असा कारभार चाले. या उपट्या ब्राह्मणानें खेडेगावांत जाऊन ब्राह्मण्याच्या जोरावर मिळविलेला भाजीपाला पार्वतीकाकूंना कधींमधीं ह्मणजे महिन्यांतून दोन चार वेळां फुकटांत मिळाल्यानें बाळंभटजीसारखा 'कर्तुत्वाचा' [कर्तृत्वाचा बायकी अपभ्रंश] माणूस त्यांस जगांत कोणी दिसेना. बाळंभटजींची बडदास्त ठेवण्यांत किंचित् सुद्धां कसूर न होऊं देण्याबद्दल पार्वतीबाई व मथूताई यांची मोठी तत्परता. वामनराव तर बोलून चालून सरकार. तेव्हां बाळंभटाच्या सचिवीवांचून त्यांच्या कारभारांत पान हलण्याची मारामार. सारांश बाळभटाची बोलवाला होती. विद्वत्तेबद्दल मात्र त्यांचा फारसा लौकिक कुचेष्टेवांचून कधीं कोणाच्या ऐकिवांत नव्हता. जानव्याचा मंत्र जानवें घालणाऱ्याच्या देखत कधीं उच्चारला नाहीं तरी मागितल्यास मंतरलेलीं जानवीं मात्र भारेचे भारे स्वाधीन करीत. पट्टीच्या बैठकीला भिक्षुक मंडळीमध्यें त्यांना निमंत्रण नसलें तरी इतरांच्या निम्यानें, पावपटीनें दक्षिणा हटकून त्यांनीं मिळवावयचीच. यशवंतराव केव्हां केव्हां घरीं रहावयास आले तर मात्र भटजींचें अस्तित्व जगांत आहे का नाहीं इतकी शंका येण्याजोगे ते अज्ञातवासांत रहात. 'यमाच्या समोर जबानी द्यायची सोपी पण त्या यशवंतरावाचें दर्शन देखील नकोरे बाप्पा' अशी त्यांची कल्पना ते प्रेमांत आले ह्मणजे आपल्या श्रीमंताजवळ काढीत. त्यांना संध्या येत नसल्याबद्दल बोभाटा होता पण भटजींची संध्या लोकांच्या पहाण्यांत कधीं आली नसल्यामुळें त्यांविषयीं अशा तऱ्हेचा गवगवा करण्याला लोकांजवळ काय पुरावा होता तो आह्मांस ठाऊक नाहीं.

ओघाला आलेंच आहे ह्मणून भटजींची कहाणी थोडक्यांत आटपून आपण मुख्य कथानुसंधानाकडे वळूं. भटजींना गांवचीं कुटाळ पोरें 'खुं-

टावरचा कावळा' ह्मणून चिडवून मागें लागत पण एका रंगाखेरीज त्यांच्या मध्यें कावळ्याचें सादृश्य काय होतें देवास ठाऊक ! बाकी त्यांचीं धोत्रें पात्रें मात्र इतकीं स्वच्छ असत कीं त्यांत नांव ठेवण्याला जागाच नसे. धोतर, एक उपरणें व डोकीवर मोडकळीस आलेलें पागोटें, यांखेरीज चवथें वस्त्र त्यांस साऱ्या जन्मांत ठाऊक नव्हतें. सकाळीं चार वाजतां स्नान आटोपून भस्मार्चित झाल्यावर एकदां स्वारी बाहेर पडली ह्मणजे मग रात्रीपर्यंत सारखी भ्रमन्ती चालत असे.

उमा बरी झाल्याला दोन दिवस होऊन गेल्यावर संध्याकाळीं भटजींची स्वारी मायलेकीबरोबर फराळास बसली असतां पार्वतीबाई प्रेमानें ह्मणाल्या—

"गुरुजी, ईश्वरानें मोठेंच अपेश टाळलें हो. हो, नाहींतर अगोदरच सासूच्या नांवानें जगभर टिमकी वाजविली आहेन 'दुष्ट, कजाग' ह्मणून, अन् त्यांत जर कां बयेला कांहीं वेडें वांकडें झालें असतें तर मग कांहीं विचारूं नका. आहे त्या भगवानाला काळजी—" शेवटच्या वाक्योच्चारणाचे वेळीं डोळे वर केले.

"हँ:! हँ:! ऐकेल बिकेल हो कुठें जवळपास असली तर." परवां उमेनें वेडेपणांत जे उद्गार काढले होते तेव्हांपासून त्यांच्या मनावर कसला धाक बसला होता कोण जाणें, पण ते तिच्या समोर देखील उभे रहाण्यास धजत नव्हते.

"आज गेलीय् धिंडका सावित्रीकाकूंच्या इथें बाळाला घेऊन." मथूताई वदल्या.

"अन् विद्याधर—"

"तोही गेलाय् कुठे भीक मागायला—"

"अन् आमचे सरकार—"

"तो गेला आहे कुठें आपल्या स्नेह्याकडे अभ्यासाला. भारीच हो पोर मेहनती पण नशीब कुठें आहे स्वाधीन. त्याला किनई विद्याधरासा-

रखं मास्तराच्या पुढें पुढें करायचं साधत नाहीं. तो आहे अगदीं सरळ-मार्गी. ही काय ती गोम आहे त्याच्यांत."

"खरें बोललांत पार्वतीकाकू." भटजी मिटकी मारून बोलले.

"बुद्धीनें तो फार चलाख नसला तरी अगदींच रडव्यांतला नाहीं. आपला चारचौघांसारखा आहे. बाकी माझ्या यशवंताची समजूतच विलक्षण. प्रत्येक मास्तर अगदीं वाखाणीत असत. गेला बिचारा. सगळींच कुठून हुशार असणार सारखीं ? आपल्या एका हाताचींच बोटें पण त्यांत तरी सारखेपणा कुठें आहे ? वामन आपला आहे माझ्यासारखा साधा, कुणाच्या अध्यांत ना मध्यांत." पार्वतीबाईच्या कौतुकाला भटजींनीं संमति दर्शविली.

मथूताई ह्मणतात—"पण आज भल्याची दुनिया नाहीं आई. कायहो गुरुजी, मी ह्मणतें तें खरं कीं नाहीं—"

"सत्यान्नास्ति परं धर्म." अहो ऋषिकाळापासून जिकडे तिकडे हीच बोंब न् रड बघा." भटजींचा शास्त्राधार मिळतांच मथूताईनीं बोलणें पुढें चालविलें— "हें सगळें राहूंद्या एकीकडे. आमच्या वामनाचं कुठं लग्न जुळतेंयूका ? तसं असलं तर सांगा कांहीं."

"सऽगळं जुळेल." गंभीरपणाच्या आविर्भावांत भटजी बोलले, "तुह्मी अगोदर एक घरांतली तेवढी खट काढून टाका. सगळं जुळेल पुढें."

"त्याचा सगळा विचार मीं केला आहे. सावित्रीबाईच्या घरांत पुष्कळ जागा अलीकडे भाड्यानें देण्यासारखी रिकामी झाली आहे. सावित्रीबाई-चाहि उमेबद्दल जीव तुटतो मग काय हिनें मोहनी घातली आहे देव जाणे ! शिवाय माई आपल्यांतल्या आहेत. पोक्त आहेत त्यांच्याच देखरेखी-खालीं उमेला वेगळं ठेवावं ही तोड मीं काढली आहे. उमेला आज दुपारीं विचारलें. तिनेंहि तें कबूल केलें आहे. सावित्रीबाईंच्याच घरांत ठेवण्याचें कारण दुसरें असें कीं, उमा अजून तरणी पोर आहे. मनुष्याच्या मनाचा कांहीं भरंवसा नाहीं—"

"हो, हो, तें खरें तें खरें–" मथूताईकडे डोळे मिचकावून भटजींनीं दुजोरा दिला. "तरण्या पोरी कुणा तरी जाणत्या माणसाच्या नजरेखालीं असणें कांहीं वाईट नाहीं– स्त्रियांना स्वतंत्रता नसावी असं शास्त्रकारांचें वचन आहे."

"त्यांना वेगळं राहून जर सुख होत असलें तरी आपण कां आड या एखाद्याच्या ? नको उगीच. धर्मकर्म आणलंच आहे ह्मणा तिनें संपुष्टांत. नाहीं ह्मणायला तुळशीची तेवढी पूजा नित्तनेमानें करते. कृष्णाला ह्मणते लबाड देव. ह्मणो बिचारी. देवाला काय ? हेंहि नाहीं तेंहि नाहीं."

"चांगलें गिळायला मिळतें आहे ह्मणून देवाची निंदा करायला जीभ चुरचुरते. वेगळी झाली ह्मणजे कळेल. या शिकण्यानें अशीं माणसें बिघडतात." मथूताईचें मत पडलें.

उमेला वेगळें काढण्याचा ठराव सर्वानुमतें पसार झाला व चार पांच दिवसांत तिची व्यवस्था लावावी इतक्यावर मजल आली; व ही गोष्ट थोडकेच दिवसांत अमलांत येऊन घरची एक सासूबाईना वाटणारी 'खट' निघाली.

वेगळें निघणें हें आजपर्यंतच्या घरगुती धुसफुशींत सोपें वाटत होतें तितकें प्रत्यक्ष करतांना जड जाईल अशी उमेची अखेरपर्यंत समजूत होती व ती खरी ठरली. उमा घरच्या मंडळींबद्दल अथवा त्यांच्या वर्तनाबद्दल जनांत एक चकारहि काढीत नसल्यामुळें ओळखीच्या लोकांमध्यें ती सावित्रीबाईच्या घरांत बिऱ्हाडानें रहावयास लागल्यापासून बरीच चर्चा झाली. खुद्द सावित्रीबाईनीं तिला रहाण्यासाठीं सानंद रुकार दिला तरी तिला प्रथम जरा चमत्कारिकच वाटलें. त्यांनीं उमेला वारंवार याबद्दल विचारलें व अखेरीस माईच्या प्रेमाग्रहास्तव तिनें सौम्य शब्दांनीं सर्व प्रकार त्यांना निवेदन केला. सावित्रीबाईना सास्वासुनांचें पटत नसल्याबद्दल थोडीशी अटकळ होतीच व ती उमेच्या साद्यंत वृत्तान्त ऐकल्यावर खरी ठरल्याबद्दल त्यांना बरें वाटलें. पुढें थोड्याच दिवसांत माईची व उमेची चांगली गट्टी

जमली. दुपारच्या वेळीं दासबोध, रामविजय, पांडवप्रतापादि श्रीधरी ग्रंथ हें व यासारखें ऐतिहासिक मराठी वाङ्मय उमेनें वाचावें व सावित्रीबाईनीं तें समजावून घ्यावें असा प्रघात पडला. सावित्रीबाईची सून उमेच्या बरोबरीची होती. ती व उमा दोघीजणी अगदीं सख्या बहिणीप्रमाणें वागूं लागल्या. विणण्याची कला उमेला पुष्कळच अवगत असल्यामुळें त्याचा फायदा सावित्रीबाईच्या सुनेला होऊं लागला. हिचें नांव यशोदा व ही प्रल्हादपंताची कुटुंबिनी, हें येथें सांगून ठेवणें जरूर आहे.

---

## प्रकरण दहावें.

# सावित्रीबाईचें घर (पुढें चालू).

सावित्रीबाईचें घर फार मोठें होतें. त्यामध्यें त्यांच्या स्वतःच्या बिऱ्हाडाखेरीज आणखी चारपांच बिऱ्हाडें होतीं. पतीच्या अस्तित्वांत यांची मोठी चलती होती. तेव्हां त्यांनीं हें घर मोठ्या कुटुंबाच्या सोयीचें बांधलें होतें. पण प्लेगच्या धाडींत पतीसह त्यांचीं एकामागून एक माणसें दगावून शेवटीं सावित्रीबाई, त्यांचा एकटा मुलगा प्रल्हादपंत व सून एवढींच माणसें काय तीं उरलीं. तीन माणसांना एवढें घर काय करावयाचें होतें ? शिवाय त्या घराबद्दल सावित्रीबाईंना कुटुंबहानीमुळें अगदीं वीट आला होता; पण पुढें एकुलत्या एका लेकाला त्याच गांवीं चाकरी लागल्यामुळें त्यांना मनाच्या प्रवृत्तीविरुद्ध तेथें रहावें लागलें. मुलगा व सून कर्तीं, सुशील असल्यानें त्यांचें मन फिरून संसारांत लागलें. पण मुलाच्या अनपत्यतेचा विरंगुळा त्यांच्या मनाला रात्रंदिवस लागलेला असे व तेवढेंच काय तें त्यांना दुःख होतें. "जरि होतीं नवसें पोरें । तरि कां व्हावीं भ्रतारें" ही तुकोबाची उक्ति त्यांना माहीत असून सुद्धां नातवंडासाठीं नवससायस करण्यास त्या चुकत नसत. सुनेला अपत्यासाठीं व्रतें, उपास करायला लावीत. आपल्या बरोबरीच्या मैत्रिणी चार सहा पोरांच्या आया होऊन

नांदत आहेत व आपणाला एकहि मूल नाहीं याची चुटपुट यशोदेला असल्यामुळें ती सासूबाईंच्या सांगण्याप्रमाणें व्रतें यथाविधि पाळीत असे. प्रल्हादपंताचे विचार काय होते तें कोणासच ठाऊक नाहीं. परंतु ते आईच्या व पत्नीच्या धर्मकृत्याआड कधीं गेले नाहींत.

प्रल्हादपंत हे यशवंतरावाचे सहाध्यायी. ते, यशवंतराव व नारायणराव (मनोरमाबाईचे पति) यांची मोठी जूट असे व वर्गांत पहिल्या नंबरासाठीं या तिघांची झटापट सदैव चालू असे. पहिल्या तीन नंबरांमध्यें यांच्याखेरीज इतरांचा शिरकाव केव्हांच झाला नाहीं. अर्थात् यशवंतरावाबद्दल त्याच्या पश्चात् त्यांच्या मनांत अनादर वसणें शक्यच नव्हतें. त्यांनीं कालेजचें शिक्षण संपतांच पुण्याच्या प्रसिद्ध खाजगी शाळेंत नोकरी धरली व लवकरच ते अध्यापनकुशलतेनें नांवाजले जाऊन त्या शाळेचे कायमचे शिक्षक बनले. यशवंतरावाची पत्नी व मुलें आपल्या घरांत रहावयास येणार हें कळल्यापासून त्यांना एक प्रकारचा आनंद होत होता. विद्याधर हा त्यांच्याच शाळेंत सातवीमध्यें होता. त्याची तरतरी पाहून हा आपल्या बापाचें नांव पुढें अधिक शोभवील असा अंदाज त्यांनीं केला होता. उमा वेगळी होतांच विद्याधराच्या शिक्षणक्रमावर मोठी गदा येणार होती, पण प्रल्हादपंतानें त्यास आपल्या घरींच ठेवून त्याचा खर्च उमेच्या हिशोबांतून तोडला. उमेला मानीपणामुळें तें रुचलें नाहीं. तिनें स्वतःचे दागिने मोडून त्याच्या व्याजांत व स्वतः तयार केलेल्या विणकामाच्या जिनसा विकून मिळणाऱ्या अल्प द्रव्यावर अब्रूनें दिवस चालविण्याचा विचार सावित्रीबाईंच्या कानावर घालून टाकला होता. प्रल्हादपंताला उमेच्या मनाला आवडणार नाहीं हें माहीत होतें, पण सावित्रीबाईनीं या प्रकरणांत उमेची समजूत कशीबशी केल्यामुळें हें प्रकरण एकदाचें मिटलें व विद्याधराच्या शिकण्याची सोय झाली.

इंग्रजी राज्याचा पाया या देशांत मजबूत झाल्यावर नवीन राजसत्तेबरोबर जे कांहीं समाजावर परिणाम घडून आले त्यांत राज्यकर्त्यांप्रमाणें

वागण्याची हौस हा प्रमुख होय. सुधारणा ह्मणतात त्याचें सगळें मूळ या हांवेंत आहे. आपणांवर ताबा गाजविणारांच्या चालीरीतींत त्यांच्या कर्तृत्वाचें बीज आहे अशी समजूत प्रचलित झाल्यामुळें त्या अनुकरण्याची खटपट समाजांतील नवीन पिढींत जोरानें सुरू झाली. त्याविरुद्ध दुसरा पक्ष,—जुनी मंडळी—तयार होताच. अशा रीतीनें माजणाऱ्या लढ्यांत कोणाची सरशी होते इकडे सर्व जनतेचें लक्ष लागून त्याबद्दलची चर्चा सर्वतोमुख होऊन बसली आहे. बंगाल्यांत इंग्रजांचें वर्चस्व आमच्यापेक्षां प्राचीन असल्यामुळें तिकडे आंग्लशिक्षितांमधील कांहीं जणांनीं पुढाकार घेऊन समाजाला नवीन वळण देण्याचा बूट काढला. त्याचा कित्ता कालान्तरानें महाराष्ट्रांतील लोकांनीं गिरविण्यास सुरवात केली. आमच्या कथानकाचे वेळीं इकडे रानडे, तैलंग इत्यादिकांचीं नांवें समाजधुरीण ह्मणून सर्वांच्या मुखीं झालीं होतीं. त्याप्रमाणेंच निबंधमालाकार व त्यांच्या खांद्याला खांदा लावून राष्ट्रकार्याची नवीन दिशा पत्करलेली तरुणबांड, स्वार्थत्यागी व संकटाशीं टक्कर देणारी मंडळीहि महाराष्ट्रीयांना चांगली परिचित झाली होती. जुन्या पिढींतल्या लोकांना नव्या दमाच्या परविद्याभिज्ञांशीं झुंजण्याचें हवें इतकें सामर्थ्य नव्हतें ही गोष्ट अव्वल इंग्रजींतच सिद्ध झाली होती. नव्या पक्षाला दुसरा जोर ह्मणजे अधिकाराचा. सुधारणेच्या बंडाचा झेंडा उभारून त्याला मिळणारे सगळे लोक पाहूं गेल्यास इंग्रजी शिकून मोठ्या चाकरीवर असलेले होते, व द्रव्याच्या ऊबेमुळें त्यांच्यापुढें सामान्य जनता फिक्की पडल्यानें त्यांचा विजयच होत गेला. पण सृष्टींत नेहमीं एका शक्तीविरुद्ध दुसरी शक्ति मागोमाग हजर असते. एका शक्तीला अमर्याद होऊं न देणारी प्रतिशक्ति थोड्या फार कालान्तरानें जन्मास आल्यावांचून कधींच रहात नाहीं व ती त्याप्रमाणें प्रस्तुत घडामोडींत निर्माण झाली. पहिलीपेक्षां हिचा जोम अधिक असल्यामुळें सलामीच्या पहिल्या धडाक्याबरोबर सुधारणेचीं तत्त्वें फोल ठरूं लागलीं व त्यांचा चिवटपणा संपला. झीज सोसून काम करण्याची धमक

पहिल्यांत नव्हती व ही स्पृहणीय गोष्ट दुसऱ्यांत असल्यामुळें पश्चिमेकडू
उष्टयामाष्टया चळवळीपेक्षां पतितावस्थेंत देशकार्य कोणच्या दिशेनें कर
येईल याची बरोबर चिकित्सा करून स्वार्थानपेक्षेच्या बळावर तसें करण्या
साठीं या प्रतिशक्तीच्या उत्पादकांनीं धडकून उडी घेतलीच. "बडेनें कि
सो अच्छा और छोटेनें किया सो बंड" या न्यायानें या मंडळींच्या प्र
त्नाला टारगेपणा मानण्यास आरंभ झाला. परंतु तो दिवसेंदिवस यशस्
झालेला पाहून निंदेची मुखरता कमी पडत जाऊन शेवटीं निखालस ना
पावली व स्तुतीचें तोंड मोकळें झालें. महाराष्ट्रांतील या चळवळीबद्द
अर्थातच घरोघर वादविवाद होऊं लागल्यानें विद्याधराला प्रल्हादपंतांच्य
घरीं असली चर्चा सदैव ऐकण्यास सांपडून त्याच्या मनांत नवीन कल्प
ना उद्भवूं लागल्या होत्या.

प्रार्थनासमाज, प्रौढविवाह, पुनर्विवाह इत्यादि गोष्टी त्याच्या अगदी परिचयांतल्या झालेल्या होत्या. व त्यासंबंधी जास्त विचार करण्याची त्याची इच्छा परिस्थितीमुळें जागच्याजागींच जिरून जाई. शाळांतून देखील रानडे, भांडारकर, तैलंग, मंडलीक, अशा मंडळींचीं नांवें फुरसतीच्या वेळांत निघून वरच्यावरच्या इयत्तांतील मुलांत कित्येक वेळेस मजेदार खडाजंगी उडून त्यांची फिर्याद शिक्षकांपुढें जाऊन तडजोड करण्यापर्यंत पाळी येत असे. शिक्षक तरी काय सांगणार ? पोटाची खळी भरण्याकरितां कांहीं तरी धंदा करायचा त्यांतलाच पंतोजीचा धंदा. त्यांच्यांत व विद्यार्थ्यांमध्यें फरक फक्त स्थानान्तरांत. त्यांनीं बहुधा मुलांना "अभ्यास सोडून हा नसता उपद्व्याप करण्याचें आपल्याला कांहीं कारण नाहीं. या गोष्टीचा विचार करायला अद्याप तुह्मांला पुष्कळ अवकाश आहे. हायकोर्टाच्या जड्जापर्यंतच्या जागा आपल्याशा करणाऱ्या इसमाच्या कृति चांगल्या का वाईट याचा विचार करण्याची आपली पात्रता नाहीं." अशा तऱ्हेचा —थोडक्यांत सांगायचें ह्मणजे "जें होईल तें पहावें व स्वस्थ रहावें" असला— हिजडा इनसाफ देत असत. शाळेंत नेमलेल्या पुस्तकांच्या बाहेर

स्वतंत्र वाचनाची यातायात करतो कोण व शिक्षण ही नियत पुस्तकांची घोकंपट्टी करून घेण्यापेक्षां कांहीं वेगळी चीज आहे याची ओळख शिक्षकांना असते कशाला? पोटानें बिगारीला धरल्यामुळें चारपांच तास तोंड वाजवावें व नंतर असल्यास उपरणें झाडून घरीं परत यावें यापेक्षां गुरुजींचें कांहीं अधिक कार्य आहे याची कल्पना तरी शोधूं गेल्यास किती मास्तरांत सांपडेल? प्रल्हादपंताची गोष्ट तशी नव्हती. त्याची घरची स्थिति "सुखं च मे शयनं च मे" अशी आलस्यवृत्ति निभण्यासारखी होती. पण शिक्षणाचें काम हौसेनें पत्करून, आस्थेनें पार पाडून त्यांनीं व्यवसायबंधूंमध्यें आपली बऱ्यांत गणना करून घेतली होती. सामाजिक प्रश्नांचा तर त्यांनीं विशेष काळजीपूर्वक निरीक्षण व वाचन या दुहेरी तत्त्वावर अभ्यास चालविला असल्यानें कोणत्याहि सामाजिक प्रचलित अगर जुन्या मुद्द्यावर सोपपत्तिक विचार त्यांच्यापाशीं विद्याधरास ऐकण्यास सांपडत.

जुनें तेवढें निर्मूळ करूं इच्छिणारांचा प्रथम हल्ला हिंदुधर्मीय आचारांवर झाला; व त्यांतल्या त्यांत स्वतःला ज्ञानांत पूर्णावस्थ कल्पून सृष्टीच्या पुरुषेतर मानवी अंगाचा उद्धार करण्याचें ब्रीद त्यांनीं उचललें. इंग्रजी राजसत्तेला पन्नाससाठ वर्षें झालीं नाहींत तोंच स्वतः कृतार्थ झालों असें मानणें कोणालाहि शहाणपणाचें वाटणार नाहीं. शिवाय महाराष्ट्रस्त्रीसमाजाला त्याच्या इतर भारतवासी महिलांपेक्षां अधिक व्यवस्थित स्वातंत्र्य असल्यामुळें धर्मबंधनें झुगारून वर्तन निरंकुश करण्याचें इकडे तरी कांहीं प्रयोजन नाहीं. सर्वसंहारक रोगाची धाड इकडे पुरुषजातीवर जास्त आल्यानें अनाथ झाल्याबद्दल अनुकंपा वाटणें गैर नाहीं. स्त्रियांना शिक्षण कोणत्या बाजूनें द्यायचें हा एक अत्यंत महत्वाचा प्रश्न आहे परंतु त्याचा निकाल पूर्वद्रष्ट्यांनीं कांहीं चांगलासा केला नाहीं. कोणत्याहि उदयोन्मुख राष्ट्रामध्यें पुरुषांप्रमाणें स्त्रियांतहि एक प्रकारचें आत्मविश्वासमूलक सामर्थ्य प्रकटत असतें, परंतु त्यास निवळ शिक्षणच कारण नसून ती ईश्वरी स्फूर्ति असते, व त्या स्फूर्तीची आमच्यांत वाण आहे. काष्ठपाषाणाच्या मूर्तींतहि केवळ भाव-

नेच्या हटल्यानें जर कार्यक्षम ईश्वरी तेज अवतरतें तर राष्ट्रीय उन्नतीचें प्रवर्तन करणारी चित्कला आमच्यांत उत्पन्न झाल्यावांचून बाकीची खटपट व्यर्थ आहे. जातिभेद ऊर्फ प्राचीन भाषेंत ज्यास चातुर्वर्ण्य ह्मणतात तो इष्ट आहे पण त्यांत मत्सर नसावा अशा मताचे प्रल्हादपंत होते. पुरुषांच्या साहचर्यानें स्त्रियांचे स्वभाव त्यांसारखे बनतात या वचनाप्रमाणें प्रल्हादपंतांच्या विचारांचें प्रतिबिंब त्यांच्या पत्नींत व मातेंतहि कांहींसें दिसत असे. महाराष्ट्राची वाणी ओजःसंपन्न असून ती वाटेल तें कार्य पार पाडण्यास समर्थ आहे, महाराष्ट्राची भाषा मर्दानी आहे, असें लोकांत सप्रमाण ठरविणाऱ्या आद्यनिबंधलेखकानें शकुनादि लोकभ्रमावर जो ताशेरा उडवला त्याच्या संतत श्रवणानें व वाचनानें प्रल्हादपंतांच्या कुटुंबांतील स्त्रियांची मनें बरीच तयार झालीं होतीं व अलीकडे उमाबाईचा सहवास त्यांना या सामाजिक घालमेलीच्या प्रश्नांत बराच साह्य करीत होता.

राजा कालनिर्माता असतो याचा अनुभव राजसत्तेच्या प्रत्येक संक्रमणांत येत असतो व तसा सध्यांहि येतो आहे. धर्मविधि, आचार, इत्यादि कर्मे स्थलःस्थित्यनुरूप बदललीं पाहिजेत असा प्रल्हादपंतांचा समज होता. ते नेहमीं ह्मणत—"परिस्थिति बदलली तेव्हां विहित धर्मक्रियांत फरक झाला पाहिजे. ब्राह्मणाच्या कर्मांची यादी वाचूं लागल्यास ब्राह्ममुहूर्तीं उठल्यापासून रात्रीं निजेपर्यंत निरनिराळीं अनेक कर्में सांगितलीं आहेत. परंतु यज्ञ, तप, इत्यादि गोष्टी ज्या काळांत सुसाध्य व आवश्यक होत्या त्या काळांत त्या करणेंच इष्ट व हितावह होतें. उदाहरणार्थ, फार प्राचीन काळीं समाज अत्यंत अल्प होता, मनुष्यवस्ति अगदीं विरळ होती तेव्हां प्रातराद्यविधि रानांत जाऊन सशास्त्र पार पाडतां येत असेल. आज लाखों लोकांच्या वास्तव्यानें गजबजलेल्या नगरांत मनुष्याला तें साधणें दुर्घट आहे. त्याकरितां आज अमच्यांत असलेल्या सोयींचाच उपयोग करून घेतला पाहिजे. याचप्रमाणें सर्वांचा विचार केला पाहिजे. ज्या धर्मशास्त्राला पतीच्या अस्तित्वांत स्त्रीला परपुरुषस्पर्श नव्हे नजरानजर देखील निंद्य, दंडनीय वाटते

त्यालाच पतीच्या निधनानंतर त्या स्त्रीला भर्त्याच्या पारलौकिक सुखार्थ केश-भार उतरण्याकरितां समाजांतील निकृष्ट जातीच्या इसमापुढें करण्यांत तिर-स्कार्य कांहींच वाटत नाहीं तेव्हां हें आश्चर्य नव्हे का? अनीतीचा प्रतिकार करण्यासाठीं असल्या उपायांची योजना करण्यापेक्षां शिक्षणानें मनें सुसंस्कृत करून पतिमरणाच्या दैवी आपत्तीचा मारा सहन करून शुद्धाचरणानें स्वतःचें ऐहिक व पारमार्थिक कर्तव्य बजाविण्याइतकें स्त्रियांना तयार केल्यास अधिक चांगलें. जबरीच्या उपायानें अनीति थांबेलच असें निश्चित नाहीं मग जुलूम टाळतां येऊन नैतिक अत्याचाराला अन्य साधनानें पायबंद घालतां आल्यास जास्त चांगलें नव्हे का? स्त्रियांच्या धर्मविधींतली ही गोष्ट झाली.

"पुरुषाच्या आचरणांत जर पाहूं गेलें तर परके आचारविचार त्यांच्या रोजच्या रहाणींत फार शिरले आहेत. धर्म हा देशाच्या हवापाण्यानें बराच परिणाम पावलेला असतो. देशाप्रमाणें वेषहि बदलतो. थंड प्रदेशाचे रहि-वासी शीतनिवारणासाठीं सर्वांग कापडानें मढवीत असल्यास गरम मुलखां-तल्यांनीं त्याचें अनुकरण करणें अनिष्टकारक आहे. मद्य, चहा, इत्यादि उष्णतोत्पादक द्रव्यांचा खाण्यापिण्यांत केलेला उपयोग शीतकटिबंधांतल्या लोकांना मानवतो तथापि उष्ण प्रदेशांत तो घातकच होईल. तेव्हां अनुकरण करतांना अनुकार्य बाबीचा विचार करणें जरूर आहे. परंतु तसा कोणीच करीत नाहींत. सारासारविचाराला रजा देऊन परानुकरणांतला अधाशीपणा परिणामीं प्राण घेतल्याशिवाय कसा राहील?"

या अनुकरणाच्या बाबतींत आमच्याकडे झालेल्या गोंधळाबद्दल बोलतांना प्रल्हादपंत नेहमीं धाकट्या शास्त्रीबोवांच्या या विषयावरील निबंधाकडे बोट दाखवीत व विद्याधराशीं बोलतांना तर "केवळ राष्ट्रीयत्व (न्याशन्यालिटी) राखण्यासाठीं माणसानें आपलेपणा टाकूं नये, 'स्वधर्मे निधनं श्रेयः' हें तत्त्व अहोरात्र चिंतीत असावें" असा उपदेश करीत. सारांश, हिंदुधर्माची पुन-र्घटना आरंभापासून करण्याची मूर्खपणाची हांव सोडून त्याचें सद्यःस्थितीला उचित असें संशोधन मात्र व्हावयास पाहिजे आहे असें ते वादविवादाचे

प्रसंगीं मोठ्या कळकळीनें ज्याला त्याला सांगत असत; व विद्याधरावर त्याचा परिणाम खास होत असे.

प्रल्हादपंतांच्या घरांत अलीकडे एक नवीन इसम एकटाच भाड्यानें जागा घेऊन रहावयास आला होता. अशा सड्या उपऱ्या गृहस्थाला कुटुंबांच्या घरांत राहूं द्यावें कीं नाहीं या प्रश्नाचा बराच विचार होऊन त्यास रहावयास तेथें जागा देण्यांत आली. परंतु घरांतलीं सर्व बिऱ्हाडें त्याबद्दल फारच साशंक असत. कथानकाच्या काळांत प्रजेबद्दल सरकारचें मन फार कलुषित होऊन बेबनाव झाला होता. व त्यामुळें हेरांचा सुळसुळाट फार झाल्याचें लोक बोलत असत. राजपक्षाचे हे डोळे प्रजेमध्यें बहुरूपानें हिंडत असल्यानें लोकांनीं प्रत्यक्ष मुलाबद्दलहि विश्वास न ठेवण्याइतका संशयखोरपणा सर्वत्र वाढला होता. अशा वेळीं अगदींच नवख्या व्यक्तीला घरांत रहाण्यास परवानगी देणें ह्मणजे जरा गैरच, पण त्याच्या वर्तनाबद्दल किंचित् संशय आल्यास आपण चांगला इलाज अमलांत आणूं अशी मनाची खातरजमा करून त्यास त्यांनीं बिऱ्हाडानें राहूं दिलें. त्यावर सर्वांची अर्थातच कडक नजर असे.

दिवसाच्या कांहीं तासांखेरीज बहुधा हा गृहस्थ घरांत वाचीत पडलेला असे, व दोन तीन महिनेपर्यंत तर त्यानें इतर मंडळीशीं कधींहि एका शब्दानें संबंध ठेवला नाहीं. त्याचेकडे येणाराजाणाराची वर्दळ कमीच, नाहीं ह्मटल्यास सुद्धां चालेल. क्वचित् कोणी येत पण ते व तो गप्पा मारताहेत असें आढळतच नसे. त्याच्याबद्दल संशयास्पद असें कोणास कांहीं दिसलें नाहीं. महिन्याच्या महिन्यास भाडें मात्र बिनबोभाट चुकतें करी. त्याच्याकडे एका माणसाला साधारणतः लागणाऱ्या जागेहून अधिक जागा होती व त्या जागेच्या मर्यादेबाहेर तो आवश्यक कारणावांचून पडल्याचें कोणींच पाहिलें नव्हतें. वृत्ति अगदीं विरक्ताप्रमाणें, सामानसुमान कपडेलत्ते अगदीं बेताचे, असा त्याचा थाट असे. कधीं कधीं संध्याकाळीं आपल्या कोठडींत फेऱ्या घालीत तोंडानें वैराग्यपर श्लोक गुणगुणतांना तो पुष्कळदां

दृष्टीस पडे. अंगयष्टि मध्यमच, चेहरा अगदीं उदास व त्यावर वयोमान ह्मणा अथवा सजीव देह जाळणारी नांवाच्या प्रथमाक्षरावर अनुस्वार असलेली चिता ह्मणा, कारण कांहीं असो पण वार्धक्याच्या स्पष्ट छटा, केसांवर पांढुरकेपणाची बरीच झांक दिसत असे. आरंभीं प्रल्हादपंतांच्या चवकशीला उत्तरें देतांना त्यानें आपलें नांव दत्तात्रय, रहाणारा पुण्याचा एवढीच काय ती माहिती सांगितली होती. पूर्वस्थिति सांगण्याचें त्याच्या जीवावर येत असे; कारण त्यास ठाऊक. खेदानें अधोमुख उभा राहून अश्रु गाळतांना गेल्या दोन महिन्यांत एकदोनदां त्याला पाहिल्याचें विद्याधर सांगत असे.

या गृहस्थाच्या एकलकोंडेपणाबद्दल बायकांबायकांत नेहमीं कुजबूज चाले. त्याला आपण एकदां रामेश्वराच्या देवळाकडून अमक्या गृहस्थाबरोबर जातांना पाहिला असें यशोदा एकदां ह्मणाली. पुरुष उद्योगाला जाऊन घरांतला धंदा आटपला ह्मणजे बायकांची शेजारणीपाजारणीकडे जाण्याची बहुधा वहिवाट असते. त्या वेळीं कामचें काम, व गप्पाच्या गप्पा ह्मणून वाती करणें, डाळतांदूळ निवडीत बसणें, इत्यादि प्रकार चालतात, आणि या स्त्रियांच्या बैठका साधारण घरंदाज व पोक्त बाईच्या येथें होतात. तद्वत् सावित्रीबाईकडे दुपारच्या बायका जमत असत. तसल्याच एका प्रसंगीं दहापांच जणी जमून गतानुभव व सुखदुःखाच्या गोष्टी सांगण्याच्या भरांत या वरील गृहस्थाच्या वर्तणुकीचा विषय निघाला व यशोदेनें एका इसमाचें नांव घेऊन त्याबरोबर दत्तोपंताला पाहिल्याचें सांगितलें. गतभर्तृकता हें स्त्रियांना एक प्रकारचें प्रौढत्वदायक लक्षण असल्याचें सूक्ष्मद्रष्ट्याला आढळतें, तसेंच माता झालेली मुलगी अल्पवयी असली तरी दोन गोष्टी अधिकारानें सांगण्याची योग्यता तिच्या अंगीं आली असें समजण्यांत येतें, अथवा हा अधिकार त्या मुली बिनधास्त गाजवितात व त्यांत इतरांना कांहीं वैगुण्य दिसत नाहीं. येथें जमलेल्या स्त्रियांमध्यें हीच स्थिति होती. यशोदेनें सांगण्याबरोबर "आपण रस्त्यानें इकडेतिकडे पहात असतां वाटतें!" असें ह्मणून दोघीचौघींनीं आपसांत पोक्त बायांच्या कानीं न जाण्याइतक्या हलक्या

आवाजांत चेष्टा करून यशोदेला खिजविलें. नंतर मुख्य विषयीभूत इसम कडे जिव्हा वळल्या.

"बायकामुळें नसलेला पुरुष ओका दिसतो नाहींग" एकजणीनें सिद्धा ठोकला.

"तसें आहेच हो. जगांत बायकान् पुरुष जे देवानं उत्पन्न केले ते का एकमेकांविरहित का राहायला केले आहेत. पण दैवानें दिलें न् कर्मानें ने तशांतली आजकालची स्थिति. कलियुगाच्या मानानें असेंच व्हायचें. बा तूं ह्मणतेस तें कांहीं खोटें नाहीं हो." एक विधवा ह्मणाली.

"ती त्या नारायणराव देवाची मनोरमाबाई दुसरें लग्न करणार ह्मणे इतके दिवस पुरुष वाटेल तितकीं लग्नें करीत होते; आतां बायकांनीं करायचा काळ आला आहे. इश्श बाई! एकक ऐकावें तें आपलें अघटितच! राम राम नारायणा! करा ह्मणावें पापें अन् मग कडू फळें आलीं ह्मणून देवाच्या नांवानें कां रडावें?" तिसरीनें प्रतिपादिलें.

"अहो, तो तुमचा दत्तोपंत का फित्तोपंत त्या मनोरमाबाईच्या मुलाला शिकवणी पत्करून राहिला आहे वाटतें? संध्याकाळचा दोन तास जातो तिकडे. ती आमच्या शेजारच्या देवकुळ्यांच्या घरची मोलकरीण मनोरमा-बाईच्या इथें झाडालोटायला असते ती सांगत होती." चवथी वदली.

"आमच्या कोंकणची एक बाई आली आहे इथें. तिनें बुधवारांत कुठेशी खाणावळ घातली आहे. तिच्या खाणावळींत जेवायला जातो हा." पांचवी बोलली.

"पण बाई, माणसाला बोलल्यावांचून राहवतें कसें? बायकांना बोलण्या-चालण्याची हंसण्याची मर्यादा. पुरुषांना तसें कांहीं नसतें. त्यांनीं खुशाल हंसलें, खिदळलें, फाजिलपणा केला तरी चालतो. त्यांना आडकाठी नसते. पण या बोवाचें आपलें निराळेंच." एकजणीचें मत पडलें.

"वाहवाग वाहवा! आपल्या नवऱ्यावरनें सगळ्या पुरुषांना तूं नांवें ठेवूं नकोस कांहीं, तुझे यजमान असतील एक बोलभाट—" दुसऱ्या एकीनें कळ-

लावली व त्याबरोबर पहिली उसळली— "बरें, बरें, जानकीबाई, ठाऊक आहेत तुमचीं माणसें किती निबोलीं आहेत तीं. एवढें कड घेऊन नको कांहीं सांगायला त्यांच्याबद्दल. आमच्या इथें येतात तेव्हां पहायला सांपडतो त्यांचा मुखस्तंबपणा. काय ह्मणे आपल्यावरनं सगळ्या पुरुषांना नांवें ठेवूं नको. मोठी आलीय् शिकवायला."

भांडणाला एवढें निमित्त पुरलें व त्या दोघींमध्यें कलागत जुंपून एक-मेकीच्या उखाळ्यापाखाळ्या काढण्यास सुरवात झाली व त्यांच्या तंट्यानें बराच वेळ सर्वांची करमणूक झाली; शेवटीं त्यांच्यांत अबोला ठरून तो मिटला.

"दोन दोन पोरांच्या आया झालां, तुह्मी आतां लहान पोरीप्रमाणें ग काय हमरीतुमरीवर येतां? वेड्या कुठल्या. निमित्त किती क्षुल्लक अन् त्याचें भांडण तें काय. एवढें देखील समजेना अन् मुलांना पुढें रीत कशी लावणार? अग, अंमळ विचार तर करावा कीं नाहीं?" सावित्रीबाईनीं उपदेश केला व ही बैठक संपली.

प्रस्तुत प्रसंगीं उमा मात्र अगदीं कोणत्याच बाबींत न बोलतां निमूटपणानें सर्व वादविवाद ऐकत होती, हें वाचकांस कळलेंच असेल.

---

## प्रकरण अकरावें.

## आराधनकाल.

---

प्रथमविवाहकालीं वधूवरांच्या मातापितरांवर सर्व जबाबदारी असते. परंतु पुनर्विवाह वधूवरांच्या खुषीचा सौदा असल्यानें त्यांना परस्परांचीं मनें आकर्षून लग्नाचा सांधा बसवावा लागतो. मनोरमाबाई ही श्रीमंत स्वयंमन्य बीजवधू लग्नाला तयार असल्याचें जाहीर झाल्यापासून शेंकडों व्यक्तींच्या मनांत ती गोष्ट येऊन गेली असेल. त्या वधूच्या परिचित

पुरुषवर्गांत तर मोठीच खळबळ उडून गेली होती. कोणासहि मनोरमेकडे भेटावयास जावेसें वाटल्यास त्याच्या मनांत— तो सपत्नीक असल्यास नव्हे— तिच्या पुनर्विवाहाची कांक्षा आल्यावांचून रहावयाची नाहीं. प्राथमिक शरीरसंबंधाच्या वेळीं वधूवरें एकमेकाला अज्ञात असल्यानें सुधारणेला तो एक जुलूम वाटतो. लग्न करूं इच्छिणाऱ्यांना परस्पराच्या आचारविचाराची चांगली ओळख असावी, कारण हा संबंध आमरण कायम रहावयाचा असतो; दोन ईश्वरनिर्मित अन्योन्याश्रयी जीव नदीसागराप्रमाणें एकरूप व्हावयाचे असतात. इंग्लंडांत अथवा इतर युरोपीय समाजांत आमच्या इकडची रानटी वहिवाट नाहीं. मुलामुलींना अगदीं लहानपणाखेरीज इतर वयांत मिळूनमिसळून वागण्याची रीत आमच्या देशांत चालू नसल्यानें कुमारिकेला आपला आमरण प्राणसखा व वराला आपली प्रियसहचरी हुडकून काढण्यास सांपडत नाहीं, या घातकी पद्धतीविरुद्ध सुधारकांची ओरड असते व त्याला पुराणांतील कथा आधार आहेत. दुष्यंतशकुंतला, ययातिशर्मिष्ठा, शंतनुसत्यवती, नळदमयंती, इत्यादि सुरस दंपत्यकथा सुधारकांना प्राचीनकाळीं आर्यावर्तांत कशीं प्रेममय लग्नें होत असत हें सुचवितात व इतर कोणत्याहि बाबींत त्यांना पुराणें उकिरडा वाटत असलीं तरी शृंगाररसानें थबथबलेल्या रुक्मिणीश्रीकृष्णासारख्या प्रेमकथा सर्वअंशीं पटतात आणि स्वयंवराची रीति रूढ करण्याची त्यांची खटपट चालू आहे. "सत्य संकल्पाचा दाता भगवान्" यश देवो बिचाऱ्यांना ! सत्य संकल्प असेल तर ? बाकी सहज इंग्लंडचीं वर्तमानपत्रें चाळलीं तर वधूवरांची परस्पर परीक्षा झाल्यावर विवाह झाले असूनहि त्यांच्यामध्यें दर आठवड्यास जितक्या काडीमोडीच्या अगर घटस्फोटाच्या फिर्यादी कोर्टांत येत असतील त्याच्या शतांशानें इकडे वर्षांतहि होत नसतील. कदाचित् स्वयंवरपद्धति आमच्यांत रुजल्यानें न्यायखात्याचें काम वाढवून दहापांच माणसांची पोट भरण्याची सोय करण्याचीहि परीक्षेंत पसार होण्यासाठीं अर्थशास्त्र घोक-

लेल्या पंडितमंन्यांची इच्छा असेल. "मागणी आणि पुरवठा" [Demand and supply] हा मुद्दा वाचकांच्या ध्यानांत आलाच असेल.

तात्पर्य, आमच्या इकडची अनोळखी वधूवरांची सांगड घालण्याची चाल वाईट ठरविल्यावर सुधारक पुनर्विवाहासारखा प्रकार जुन्या वळणावर करतील हें संभवतच नाहीं व शक्यहि नाहीं. अर्थात् बीजवधूचें आराधन करून तिचें मन आपल्याकडे वेधेलसें करण्याची खटपट बरेच जण करीत होते व त्यांत रावबहादुर शकारांची उमेद विशेष होती. यांनीं मनोरमाबाईला पुनर्विवाहासाठीं तयार करण्यांत जितके परिश्रम केले तितके कोणाचेच नसतील. हे नारायणरावाचे (मनोरमाबाईचे गतपति) स्नेही असून त्यांच्यामध्यें सामाजिक बाबींचा खल पुष्कळदां होत असे व अशा प्रसंगीं मनोरमा जातीनें हजर असल्यामुळें तिच्या मनावर याचा ठसा उमटत असेच. तेव्हां नव्यानें ओळख पाडून मनोरमेशीं लगट करण्याचें त्यांना कारण नव्हतें. या रावबहादुरांचें वय फार नसून डेप्यूटी कलेक्टरसारख्या मोठ्या हुद्द्यावर ते काम करीत होते. सर्व समाजाविरुद्ध पुनर्विवाहासारख्या गोष्टी करण्याचें धाडस अशा श्रीमंतावांचून अथवा अगदीं लफंग्यावांचून इतरास होणें अशक्य. कारण खवळलेल्या समाजानें बहिष्कार घातल्याबद्दल बेपर्वा रहाण्याचें सामर्थ्य सामान्य माणसापेक्षां श्रीमंतांत आणि लफंग्यांत अधिक असतें, व पतिवियोगाच्या चिखलांत सांपडलेली गाय समानगुण असल्याशिवाय तिला सनाथ करून वर काढण्याच्या भानगडींत सहसा कोणी पडायचा नाहीं. मनोरमा व रा. ब. शकार यांचा संबंध तसाच होता व त्यांच्या हितचिंतकांना हा जोडा जमल्यास मौज होईल असें वाटत होतें.

मनोरमेच्या मनाचा या आराधन-(Courtship) कालांत द्विधाभाव कधीं कधीं होत असे. "करावें का न करावें?" हा प्रश्न तिच्यापुढें उभा राहून तिच्या मनाला भय वाटे. शकाराशीं बोलणेंचालणें होऊन द्वितीय शरीरसंबंध अधिक निश्चित होऊं लागल्यावर तर अशी अप्रसन्न वृत्ति पुष्कळदां होई. तिच्या मनांत भावी काळाचीं भेसूर चित्रें उभीं

रहात. कां तें मात्र तिचें तिला देखील कळेना. आपल्याबद्दल जनता काय ह्मणेल याची तिला भीति नव्हती पण तिचें मनच तिचा छळ करीत होतें. मध्यंतरीं एकदां दोनदां ती मनाशीं विचार करीत असतां तिची दृष्टि समोरच्या नारायणरावाच्या तसबिरीवर गेली व एकदम तिचें मन चरकलें. कागदी चित्राचें इतकें कां भय वाटावें? "मनोरमे, स्त्रियांच्या एकनिष्ठ पातिव्रत्याला तूं कलंक लावीत आहेस. या घराण्याला काळोखी आणण्यासारखें तुझें कृत्य आहे. विषयासारख्या तामस सुखाची वाढ करण्यासाठीं धडपडणाऱ्यांच्या नादानें तूं हें पाप तर करीत नाहींस ना? जगांत सुखलुब्धांची चळवळ तूं आपल्या उदाहरणानें बळकट करणार! गतपतीनें तुला कधीं कधीं माझ्यामागें तूं लग्न करून तुझ्या सुखांत अंतर पडूं देऊं नकोस ह्मणून ह्मटलें तर तें तुला न आवडून तूं त्याजवर असला भलताच विषय काढल्याबद्दल रुसत होतीस व आतां बिनघोर तूं लग्नाचा निश्चय करीत आहेस. स्त्रियांची वृत्ति चंचल, त्या स्वातंत्र्याला पात्र नाहींत हीं प्राचीन धर्मशास्त्रकारांचीं वचनें खोटीं नाहींत ना? प्रेम प्रेम ह्मणून मृगजळाचा पाठलाग करून जगावर तळमळत पड. प्राचीन स्त्रियांनीं आपले पति स्वत: वरले या एकांगी तत्वावर तूं तसेंच करूं लागलीस पण भावी पति अल्पायु आहे हें नारदांनीं अगोदर कळविलें तरी एकदां ज्यावर मनानें उडी घेतली तोच माझा पति असें बापाला सांगणाऱ्या सावित्रीच्या बाणेदार वर्तनाचा कधीं विचार केला आहेस का? स्वतंत्र होतांच तूं लग्नाला तयार झालीस. चित्तावर ताबा नाहीं. तुझ्याप्रमाणें गतधवा झालेल्या शेंकडों स्त्रिया आज महाराष्ट्रांत हयात आहेत व त्यांना वाईट वाटत नसेल अशी का तुझी कल्पना आहे? त्या कडकडीत ब्रह्मचर्यानें रहातात हें तुला माहीत आहे. त्यांची वागणूक नैतिक दृष्ट्या श्रेष्ठ आहे असें तुला वाटतेंना? मग पुनर्विवाहासारखा गौणपक्ष स्वीकारण्यास तूं कां तयार झालीस? निवळ विषयाचा लोभ चाळवितो आहे. तुला काय कमी आहे? ईश्वराच्या दयेनें पुत्रसौख्य तुला आहे. मनोरमे, शिक्षण मन सुसंस्कृत होण्याकरितां, आध्यात्मिक उन्नतीच्या पायऱ्या चढून

वर वर ईश्वरी प्रसाद ग्रहण करण्यासाठीं जाण्याकरितां का अधोगतीला जाण्याकरितां ? तें बघ तुझ्या गतपतीचें चित्र !" मनोरमेच्या मनाची जबानी चालू असतां, तिला नकळत तिचे डोळे त्या चित्रावर गेले व एकदम "अगबाई" असा भयोद्गार तिच्या मुखांतून बाहेर पडला. "निषेध— त्या डोळयांत—चित्रांतल्या डोळयांत इतका प्रखरपणा—" मनोरमेनें डोळे मिटले तरी नारायणरावाचें चित्र समोरच. फिरून तिचे विचार चालू झाले. "महाराज, आपण या जगाला मुकलांत असें समजलें तेव्हां आपला सहवास कायमचा तुटला ह्मणून डोळे मिटून मी पुष्कळदां आपली प्रतिमा पुढें आणण्याचा प्रयत्न केला. अहोरात्र आपल्या स्मरणावांचून माझ्या अंत:करणाला दुसरा विषयच नव्हता; चित्तांत सतत वसणारी गोष्ट रात्रीं स्वप्नांत दिसते असें ह्मणतात पण मला तरी ती ह्मण खोटी वाटूं लागली होती. स्वप्नांत सुद्धां ज्यांच्या समागमाची आशा उरली नव्हती ते आपण आतां माझ्यापुढें वारंवार उभे राहून कां दर्शन देतां ? मी करीत असलेली गोष्ट आपणांस नापसंत वाटून का आपण मजपुढें येतां ? महाराज—वाहवा— तो प्रसंग— होय मला आतां चांगला स्मरतो, माझ्याकडे कौतुकानें पहात असलेली ती हास्यमुद्रा—अगदीं तश्शीच— त्या वेळीं ह्मणायचें झालें, "मनोरमे कवि नेहमीं पतिपत्नींचे प्रेम अकृत्रिम असल्याबद्दल वर्णन करतात, व एकमेकांत गुंतलेले दोन जीव एकाचें ऐहिक अस्तित्व नष्ट होतांच कधींहि परस्परवियुक्त राहूं इच्छीत नाहींत. मनोरमे, उदाहरण पहा, शेक्सपीयर रोमिओजुलियेटच्या प्रेमाचें चित्र कसें काढतो पहा. नुसती एकाच्या वियोगाची कल्पना दुसऱ्याला असह्य होते. आत्महत्या हें काम दुर्घट तर खरेंच पण पतिवियुक्त स्त्रिया महाराष्ट्रांत सती जात असत. प्रत्यक्ष आपल्याजीवाला परकेपणानें लेखून खुशाल त्याची आहुति देणाऱ्या पतिव्रता धन्य नव्हेत का ? 'मनोरमे, मी मेलों तर तूं ज्यूलियासारखी वागशील का ?' प्रश्न केला व माझ्याकडे कौतुकानें पहाणें झालें. हाय, ती सप्रेम दृष्टि अगदीं हुबेहुब तशीच मी आतां पहातें आहे. आमचें लग्न

परस्परांची ओळख नसतांना झालेलें पण दोघांत प्रेम कसें होतें ? त्याची सर आजच्या प्रेमाला येईल का ? मुलाम्याचें नाणें सोनें नव्हे. ते दिवस, तें प्रेम आज नाहीं. आज मी दुधाची तहान ताकावर भागविण्याचा प्रयत्न करीत आहें. अशा करण्यानें आमचा उद्धार होणार का अधःपात ? अधःपात— देवा, जगदंबे— संतापानें लाल होऊन आतां माझ्याकडे कां पहायचें ? महाराज, जिवंत असतांना देखील माझे अपराध पोटांत घालून आपण माझ्यावर इतके—छे छे, आतां तर डोळ्यांतून ठिणग्या पडण्याची वेळ आली— तेव्हां माझा कसाहि घोर अपराध असला तरी क्षमा करा—चूक—गरीब अनाथ पत्नी आहें. 'कोणाची ?' असा काय विचित्र प्रश्न विचारायचा तो ? रूप पालटलें. किती हिडिस अमंगळ वेष हा ? चर्या कां अशी ? अगदीं जमीनअस्मानाचें अंतर. त्या वेळचा मोहकपणा आतां नाहींसा झाला. रोड दीनवाणें रूप पाहून— पण हा चेहरा अलीकडे कुठें तरी पाहिल्यासारखा वाटतो— आई आई— परलोकीं देखील आमच्या बायकांच्या आचरणाचा इतका परिणाम व्हावाना ! तेथें स्वर्गातल्या अप्सरा सदैव सेवेला हजर असून— पण त्या वेश्या, विवाहित पत्नीसारखी का काळजी घेतात त्या—"

पावलें वाजलीं व मनोरमा चपापून भानावर येऊन पहाते तों दत्तोपंत मास्तर पुढें उभा. मनोरमा एकदम उठून उभी राहिली. वस्तुतः मनोरमा ही मालकीण अर्थात् तिला चाकरांनीं उत्थापन द्यायचें. तिला निरनिराळ्या हुद्द्याचे पुष्कळ लोक भेटावयास येत असून ती क्वचित् कोणाला स्वागतपर उत्थापनाचा बहुमान देत असे; परंतु प्रस्तुत प्रसंगीं तिचें तिलाच न कळून ती उभी राहिली व दत्तोपंताच्या तोंडाकडे मधून मधून पाहूं लागली. थोड्या वेळानें तिला आपली स्थिति लक्षांत येऊन त्यांना समोरच्या कोचावर बसावयास सांगून आपण बसली व "कां आलां ?" असा प्रश्न केला.

"मीं कधीं तुमच्याजवळ महिन्यापूर्वीं पगार मागितला नाहीं. पण सध्यां अडचण आल्यामुळें तसें करण्याचा प्रसंग आला आहे. विनंति करतों,

मान्य होणें न होणें तुमच्या मर्जीवर आहे.'' दत्तोपंत अगदीं धिम्या स्वरांत ह्मणाला.

''बरें आहे. पण खरेंच मास्तर, तुह्मांला एक प्रश्न विचारायचा ह्मणून माझ्या मनांत बरेच दिवस घोळतो आहे. आज विचारतें. तुमचीं मुलेंमाणसें तुह्मी कधीं आणणार?''

''माझ्या मुलांमाणसांपाशीं तुह्मांला काय करावयाचें आहे?''

''कांहीं विशेषसें नाहीं. पण आमच्या घरांत सोबत हवी असें मला वाटूं लागलें आहे. कोणाला तरी ठेवायचें ते तुह्मीच रहा. दोनतीन दिवसांपूर्वीं मला श्यामराव भेटले होते. त्यांच्या बोलण्यांत तुह्मी कुटुंबी आहांत असें आलें. त्यांनींच नाहीं का तुह्मांला आमच्या इथें मुलाला शिकवायला आणलें? तुमचे तसेच ते माझे स्नेही आहेत. पहा जमलें तर.''

दत्तोपंत दीर्घ उसासे टाकीत होता.

''तुमची गरीबी आहे अन् माणसावर नाना प्रसंग येतात. हा संसार आहे. श्यामरावांनीं मला त्या दिवशीं सांगितलें. ह्मणून मला तरी माहीत, नाहीं तर कशानें असणार?''

दत्तोपंत कांहीं बोलला नाहीं.

''बरें, पण आमचा मधुकर शिकतो बिकतो चांगला ना?''

''मधुकर मोठा हुशार आहे. पण वळण जसें लागेल तसें पुढें होणार.''

दत्तोपंताच्या तुटक भाषणाचा मनोरमेच्या मनावर विलक्षण परिणाम होत होता. मधाशीं ती अंतर्विचारांत मग्न असतां गतकालीन पतिस्मरणानें तिच्या मनापुढें जीं चित्रें उभीं केलीं त्यांतलें अखेरचें दत्तोपंताशीं इतकें सदृश होतें कीं, क्षणभर तिच्या मनाला मोह पडला. दत्तोपंताला आपल्या पतीच्या एका विश्वासूक स्नेह्यानें आपल्या घरीं शिकवणीस लावून दिल्यापासून तिच्या मनावर एक प्रकारचा दरारा बसला होता. मुलाला शिकवण्यापलीकडे तो कोणच्याहि बाबतींत एका अक्षरानें ढवळाढवळ करीत नसे.

"पैशाची अडचण कानावर घालून कांहीं उपयोग झाल्यास पहावें एवढ्याच हेतूनें मी इकडे आलों होतों. जातों." ह्मणून दत्तोपंत उठला व जाऊं लागला.

"अंमळ जरा बसा. मी तुमचे कामाचा निकाल आतांचे आतां लावतें;" मनोरमा बोलून बाहेर पडली, व दत्तोपंत थोडा वेळ एकटाच सबंध दिवाणखान्यांत होता. इतक्यांत त्याचा बालशिष्य धांवत धांवत तिकडून आला व "आई कुठाय्" असा त्यानें प्रश्न केला. गुरुजींनीं बाहेर गेल्याचें सांगितलें.

"मास्तर," दत्तोपंत खुर्चीवर बसले होते. मधुकर त्यांच्या गुडघ्यावर रेलून त्यांच्या मुखाकडे सस्मित पाहून ह्मणाला, "तुह्मी आज आईकडे कसे मधेंच ?"

"बाळ," दत्तोपंताचा चेहरा गोरामोरा झाला. त्याच्या मुद्रेवर एक तऱ्हेचें गांभीर्य सदोदित असून मनोगतांची चळवळ त्यामध्यें फारशी कळत नसे. परंतु ही वृत्ति मावळून त्याच्या डोळ्यांतून एकाएकीं प्रेमाश्रु आले.

"मास्तर, आज असें काय करतां ?" लाडिक स्वरांत मधुकर ह्मणाला. प्रसंगाचें भान न राहून त्यांनीं त्याला पोटाशीं धरलें. पण क्षणार्धांत त्यांना भान येऊन विषय पालटण्याच्या मिषानें समोरच्या नारायणरावाच्या फोटोकडे बोट करून ते ह्मणाले—

"मधुकर, हा कोणाचा रे फोटो ?"

"हे माझे पहिले बाबा."

"ह्मणजे ?"

"तुह्मांला नाहीं का ठाऊक ? माझी आई सध्यां लग्न करण्याच्या खटपटींत आहे. काल मी एका मुलाला शाळेंत विचारलें कीं, बाबा कोण असतो रे ? तर तो ह्मणाला, ज्याच्याशीं आईचें लग्न लागतें तो. या चित्रांतले माझे बाबा ह्मणून मला पुष्कळदां पहिले मास्तर सांगत; पण मी त्यांना या घरांत कधींच पाहिलें नाहीं. ते ह्मणे मेले. आतां आई दुसरें लग्न करणार

ह्मणजे ते बाबाच होणार नाहींत का माझे ? मग हे नवे बाबा इथें रहायला येणार. काहो मास्तर, पण आमचे हे चित्रांतले पहिले बाबा इथें आले तर त्यांची व नवे येणार यांची मारामारी होईल नाहीं ?'' उत्कंठेनें मास्तराकडे पहात मधुकर उभा राहिला.

दहा अकरा वर्षांच्या मुलाचे बोल ऐकून त्याच्या प्रश्नांना दत्तोपंत उत्तर काय देणार ? परंतु निःश्वास व सुस्कारे टाकण्याचें काम मात्र चालू होतें.

मनोरमा रुपये घेऊन आली व दत्तोपंताला पाहिजे तेवढें मिळाल्यावर ते उठून चालते झाले. नंतर मनोरमा मधुकराकडे वळून ह्मणते—

''बाळ, हे मास्तर चांगले आहेत का ?''

''आई, मास्तर तर मला फार आवडतात. ते आले ह्मणजे मला किनई बरं वाटतं. त्यांना मागच्यांच्या सारखं तूं घालवून देऊं नकोस आँ.''

हा मायलेकांचा संवाद चालू असतां रावबहादुर शकार, प्रोफेसर घमेंडे व इतर चार पांच मंडळी खोलींत प्रवेशली. तेव्हां मधुकर जरा वेळ तेथें उभा राहून आपल्या कामाला निघून गेला.

त्या दिवशीं पुष्कळ वेळ त्या मंडळीचीं मनोरमेबरोबर खलबतें चालली होतीं.

---

## प्रकरण बारावें.

# मधलाच एक प्रसंग.

आमच्या कथानकांतले गणूभाऊ नेहमीं फिरतीवर असल्यानें त्यांस महिन्यांतून चार दोन दिवसांखेरीज फारसें पुण्यास रहावयास सांपडत नव्हतें हें वाचकांना ठाऊक झालेलेंच आहे. घरीं वारंवार परत येण्यासारखी अथवा वरिष्ठाच्या परवानगीनें अधिक दिवस रहाण्यासारखी घरची ओढ त्यांच्या मागें कोणतीच नव्हती. त्यांच्या कुटुंबाची हकीकत वाचकांना कर्णोपकर्णी कळलीच आहे. अर्थात् यांना घरीं जाण्याची फारशी काळजी नसे.

एकदां सरकारी कामावर फिरत असतां ते मिरजेस उतरले व गांवांत जाण्यासाठीं लगबगीनें निघाले. तों दुपारची वेळ, उन्हाचा मारा जबर व पोटांत जवळ जवळ चोवीस तासांत अन्नाचा पुरवठा नाहीं हीं कारणें व प्रवासाची इतर दगदग यामुळें ते स्टेशनापासून फार अंतरावर गेले नाहीं तोंच झीट येऊन पडले. त्यांच्यावर हें आकस्मिक अरिष्ट कोसळण्यास आणखीहि एक कारण झालें. तें त्यांना अलीकडे येत असलेला बारीक ताप होय. भर रस्त्यामध्यें पडले खरे, पण त्यावेळीं स्टेशनवरील उतारू सर्व निघून गेले होते व रहदारी वेताचीच होती. हा प्रांत ह्मणजे उष्णतेचें आगर व त्यांत उन्हाळ्याचे दिवस! मग मध्यान्हींच्या सूर्यकिरणांच्या प्रखरतेचा अनुभव घ्यायला मुद्दाम बाहेर कोण पडतो? या एकंदर प्रकारावरून गणूभाऊंना ईश्वरी साह्य नसतें तर कदाचित् त्या दिवशींच इहलोकाला रामराम ठोकण्यापर्यंत पाळी आली असती. मिरजेच्या आजच्या स्थितीवरून हें वर्णन कोणी बरोबर नाहीं असें ह्मणेल, पण गणूभाऊंच्या वेळीं स्टेशनाच्या बाजूला वस्ती आली नव्हती. दक्षिणमहाराष्ट्रांत हा लोहमार्ग झाल्याला फार दिवस झाले नसल्यानें लोकांच्या लक्षांत उतारूंच्या सोयी-गैरसोयींचा विचार नुकताच कोठें येऊं लागला होता. असो.

गणूभाऊंना बेशुद्ध पडून सुमारें पंधरा मिनिटें लोटलीं असतील तों एक सारवट बैलगाडी त्या रस्त्यानें आली. बैलांची जोडी उत्तम व गाडीचा झोक यावरून ही कोणा तरी श्रीमंताची असावी हें अनुमान चुकीचें झालें नसतें.

गणूभाऊंच्या शेजारीं येतांच गाडीवानानें "बाईसाहेब" या नांवानें आंतील व्यक्तीस संबोधून खालीं रस्त्यावर कोणी इसम बेशुद्ध स्थितींत पडल्याचें सुचविलें व त्यासरशीं एका स्त्रीनें बाहेर तोंड काढलें व "असेल कोणी तरी दारूबाज" असें ती पुटपुटली. परंतु एकंदर चिन्हांवरून कोणी तरी प्रवासी आकस्मिक कारणानें या स्थितींत पडला असावा या शंकेनें तिनें गाडीवानास गाडी थांबविण्यास आज्ञापिलें. गाडीवाल्याच्या

मनांत तसें करण्याचें नसावें; कारण त्यानें आणखी दहा वीस पावलें गाडी मालकिणीच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून तशीच चालू ठेवली. स्त्रीनें गाडीचें दार उघडून "अरे थांब, पाहूं तर खरें कोण आहे तें" असें दोन-तीन वेळ तेवढ्यांत सांगून पाहिलें व शेवटीं गाडी थांबल्यावर ती उतरली. जवळ जाऊन तिनें कंबरेचा रुमाल काढला व प्रथम गणूभाऊच्या चेहऱ्यावरची धूळ झाडली. क्षणभर तिला काय वाटलें तें वाटो पण ती चपापली खास. तिनें फिरून न्याहाळून पहाण्यास सुरुवात केली व त्या निश्चेष्ट गृहस्थाचें सामान उलथेंपालथें केल्यावर 'ब्याग' या संज्ञेनें जाणल्या जाणाऱ्या अलीकडच्या सुधारलेल्या प्रवाशी पडशीवर धुळीनें अस्पष्ट झालेलीं कांहीं अक्षरें तिला दिसलीं. तीं हातानें झाडून लक्षपूर्वक पहाते तों तिच्या मघांच्या शंकेचें समाधान झाल्यासारखें वाटलें. "गणेश सदाशिव भावे" या ब्यागेवरील नामावलीकडे व त्या गृहस्थाच्या चेहऱ्याकडे ती वारंवार पाहूं लागली. इकडे स्त्री या कामांत गुंतली असतां गाडीवान बाईसाहेबांना उशीर झाला ह्मणून सुचवून निघण्याची घाई करीत होता. शेवटीं बाई-साहेबांचा निश्चय ठरला. "धोंडू माझा गार पाण्याचा खुजा घेऊन येरे इकडे" असा हुकुम सुटून त्याची बजावणीहि अल्पावकाशांत झाली. स्त्रीच्या स्वाभाविक सुंदर वदनावर उष्णतेमुळें लाली चढून त्यावर घर्मबिंदूंची पंक्ति उठल्यामुळें अधिक मोहकता झळकूं लागली. अशा स्त्रीनें परोपकाराच्या भरीस पडून आपल्या नाजुकपणावर मध्यान्हाच्या प्रखरतेचे आघात करून घेऊं नयेत असेंहि रसिकांना वाटलें असतें; पण परदुःखाबद्दल अंतःकरण द्रवून तें एकदम तन्निवारणार्थ जर कोणाचें चटकन् तळमळूं लागत असेल तर तें पुष्कळ अंशानें स्त्रियांचेंच. महत्पदाच्या आकांक्षेनें दंगेखोरांना चिथावून स्वजनांच्या व वेळ पडल्यास पतीच्या छातींत तरवारीचीं पातीं भोंसकावयास लावण्यासारख्या कठोर पाषाणहृदयी स्त्रिया स्त्रीजातींत उत्पन्न होत नाहींत असें नाहीं. परंतु अशा अपवादानें स्त्रियांच्या सहज दयालुत्वाच्या सिद्धान्तास जास्त बळकटी येते. वरील स्त्री स्त्रीजातीला अपवाद नसल्यानें

खुजांतल्या शीतल जलसिंचनाचा उपचार तावडतोब अमलांत आणून त्या पुरुषाला देहबुद्धीवर आणण्याच्या प्रयत्नास ती लागली यांत नवल नाहीं. पुरुषानें सावध होऊन डोळे उघडले. परंतु शरीराला इतकी विलक्षण ग्लानि आली होती कीं, त्यास आपली परिस्थिति ओळखून सुद्धां काय करावयाचें तें करतां येईना. निःशक्त दृष्टीनें तो एकदां त्या गड्याकडे व एकदां त्या बाईकडे पाही. त्यांना पाहून त्याला काय वाटत होतें त्याची त्यास वाचेला पुरेसें बळ नसल्यामुळें व्यक्तता करतां येईना. त्याला स्त्रीनें उठण्याची खूण केली पण व्यर्थ. अखेरीस त्याचे दोन्ही बाहू धरून अतिशय मंद गतीनें त्यास त्या दोघां तिऱ्हाइतांनीं गाडींत बसविलें व सामानसुमान कांहीं राहिलें नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर गाडी पुनः चालू झाली, ती तासाभराच्या अंतरानें एका लहानशा गांवीं सभोंवतीं बागबगीचा असलेल्या एका टुमदार घराच्या दाराशीं उभी राहिली.

मालकाची गाडी दाराशीं येतांच त्याचें स्वागत करण्यासाठीं सेवकवर्गाची कशी धांदल होते हें ज्यांना ठाऊक आहे त्यांना या प्रसंगीं नोकराचाकरांनीं जलदीनें मालकिणीला वाट करण्यासाठीं गाडीचें दार उघडून बाईसाहेब उतरून घरांत शिरेतोंपर्यंत ते कसे अदबीनें उभे राहिले असतील, आजारी माणसाला काळजीनें उतरून घरांत अमक्या खोलींत बिछान्यावर निजवा हा यजमानणीचा हुकूम त्यांनीं या तिऱ्हाईत गृहस्थाच्या माहितीसाठीं वाटणारी उत्सुकता दाबून कसा बजावला असेल, गाडीवाल्याजवळून वृत्तान्त काढून घेतल्यावर आपसांत त्यांनीं आपआपल्या मेंदूच्या मगदुराप्रमाणें आलेल्या शंका व तर्कवितर्क कसे बोलून दाखविले असतील इत्यादि हकीकत सांगत बसण्याचें कांहींच कारण नाहीं.

* * *

गणूभाऊची सोय लागून जिवावरला प्रसंग टळल्याला जवळ जवळ दहा दिवस लोटले. एवढ्या अवकाशांत त्यांना सरकारी कामावर हजर रहातां न येऊन बराच बोभाटा झाला. त्यांच्या मित्रांनीं गणूभाऊचें काय झालें हें

समजण्यासाठीं पत्रें, व त्यांची दाद लागेना ह्मणून जरुरीच्या तारा त्यांच्या घरीं करून पाहिल्या, पण त्याबद्दल कांहींच कळेना. इकडे पुण्यास त्यांच्या घरीं गणूभाऊंबद्दल अशा मजकुराचीं पत्रें येऊं लागल्यामुळें एकच गोंधळ उडाला; व अशा अर्धवट स्थितींत जों जों अधिक पत्रें व अखेरीस तारा धडकूं लागल्या तेव्हां झालेली धामधूम विलक्षणच. कुटुंबांतल्या प्रत्येक इसमाच्या तोंडचें पाणी पळालें. चिंतण्याच्या कामांत मन वैऱ्यापेक्षां देखील सरस असल्यामुळें त्यानें गणूभाऊविषयीं अनेकांच्या मनांत अनेक प्रकार सुचविले व खात्रीलायक बातमी न लागून झालेल्या अधीर स्थितींत जों जों एक एक दिवस अधिक लोटूं लागला तों तों आप्तेष्टांना गणूभाऊंच्या माहितीची निराशाच वाटूं लागली. अमक्या दिवशीं सकाळच्या गाडीनें गणूभाऊ पुण्याकडे जाण्यास निघाला व नंतर त्याचा पत्ता लागत नाहीं अशाच अर्थाचीं पत्रें बहुधा येत. पोरगा काहीं तरी अपघात होऊन आपल्याला कायमचा खास मुकला असें पार्वतीबाईना वाटून त्यांनीं आकाशपाताळ एक केलें. जो तो आपआपल्या समजुतीप्रमाणें त्यांच्या मनाला समाधान वाटावें ह्मणून कांहींतरी सांगे पण त्याचा फारसा उपयोग न होऊन पार्वतीबाईच्या रडण्याला खळ पडेना. जेजुरीचा खंडोबा, तुळजापुरची अंबाबाई, पंढरपुरचा विठोबा इत्यादि प्रमुख देवतांना दिवसांतून शेंकडों वेळां हाका मारून 'कोणाला टाक करून देवांत बसविण्याचीं, कोणाला साडीचोळीच्या प्रातीचीं, तर कोणाला चांदीच्या मुखवट्याचीं, लक्षवातींचीं, प्रदाक्षिणांचीं' आश्वासनें वारंवार मिळून त्यांची बरीच विनवणी करण्यांत आली; पण या आयत्या वेळच्या लाचलुचपतीनें यांपैकीं कोणत्याच देवाला करुणेचा पाझर फुटण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां ज्योतिषी, देवऋषि यांच्याकडे खेटे घालण्यास सुरवात झाली. करपुतळी पहायला देवगणाचीं माणसें शोधलीं. तथापि कोणासच कांहीं थांग लागला नाहीं.

दहा बारा दिवस लोटल्यावर ''आपण एकाएकीं आजारी पडल्यामुळें इतके दिवस हजर रहातां आलें नाहीं, अगदीं चांगलें बरें व्हायला आणखी

दहा पंधरा दिवस लागतील," अशा हकीकतीचा व सोबत एका शहरच्या डाक्टराचें सर्टिफिकेट असलेला अर्ज वरिष्ठ साहेबाकडे आफिसांत आला असून साहेबानें कृपादृष्टीनें अर्ज मंजूर केला आहे अशा मजकुराचें पत्र गणूभाऊंच्या घरीं आलें. लागलींच त्या ठिकाणीं जाण्याची एका सलगीच्या मित्रानें तयारी केली. पण गणूभाऊची शुश्रूषा करणाऱ्या स्त्रीनें योजलेल्या युक्तीमुळें त्या स्थळीं इष्ट व्यक्तीचा पत्ता त्यास न लागून तो निराशेनें परत गेला. त्यापुढें एक दोन दिवसांनीं गणूभाऊंच्या हातचें एक पत्र घरीं आलें व झालेला सगळा वृत्तान्त त्यांत असून शेवटीं माझ्याबद्दल विशेष चौकशी करण्याच्या भानगडींत पडूं नका, दहा बारा दिवसांनंतर मी हपीसांत रुजू होईन व नंतर सगळ्यांना भेटेन अशा सूचना होत्या; त्यानंतर खऱ्या हकीकतीची लागलेली उत्कंठा तशीच दाबून मंडळी विशेष चवकशीच्या भानगडींत पडली नाहीं. गणूभाऊंच्या पत्रांत गांवाचें गांव नव्हतें व पोष्टाच्या छापांत असलेल्या नांवाचे गांवीं त्यांचा ठाव ठिकाण कळेना; या कारणानें त्यांचा शोध करणारांना अपयश आलें.

माणसाच्या सृष्टींत प्रबळांचे हातून काम करून घ्यायला निर्बळांना मूठ दाबण्याचें जसें साधन उपलब्ध आहे व साधुनीतीला जरी निंद्य वाटलें तरी 'प्रत्येक माणसाला ज्याच्या त्याच्या परीनें किंमत आहे' या तत्त्वावर तें जसें मांडिलें जातें तसाच कांहीं प्रकार देवांच्या जगांतहि आहे व आपली कामना सफळ होण्यासाठीं देवांची आवड पुरवली पाहिजे असा देवघेवीचा व्यवहार त्यांच्यांत आहे. एरवीं शुद्ध व निष्काम भक्तीच्या उपासकांना वर्षानुवर्षे रखडत ठेवणारे देव पार्वतीबाईच्या देणगीला वश झालेच नसते. परंतु मुलगा सांपडावा हा तिचा मनोरथ सगळ्या देवांच्या हातभारानें सिद्धीस गेला व त्या सगळ्या देवदेवतांच्या मातुःश्रीनीं देणग्यांसाठीं कबूल केलेल्या पुष्कळशा खर्चाचा भूर्दंड भरून गणूभाऊंना हरवल्याचें प्रायश्चित्त घ्यावें लागलें.

गणूभाऊ परत आल्यावर त्यांच्यांत सगळ्यांना बराच फरक दिसून येऊं

लागला, व हा फरक विशेषतः त्यांच्या मातेला जाणवूं लागला. या मधल्या प्रसंगांतून सुटून आपल्याला लाभल्यानंतर लेक आपल्याशीं नीट वागत नाहीं, नेहमीं हिरमुसलेला असतो, मोकळ्या मनानें पहिल्यासारखा बोलत नाहीं, अशी तक्रार पार्वतीबाई आपल्या बरोबरीच्या अथवा वृद्ध बायकांजवळ करूं लागल्या व "एकदोनदां तर मी त्याच्या बायकोला कांहीं कारणानें बोललें तर तो माझ्यावर रुसून बोलेनासा झाला" असेंहि त्या सांगत असत. पार्वतीबाई सुनांना छळते ही माहिती उमा वेगळी राहूं लागल्यापासून सर्वतोमुखीं झाली होती. त्यानंतर गणूभाऊ बेपत्ता झाल्याचा घोटाळा माजला होता. तेव्हां "पार्वतीकाकू, तुह्मी आतां घरांतल्या कामांत लक्ष जरा कमीच घालीत जा. सुना बरोबरीच्या कर्त्या झाल्या ह्मणजे त्यांच्या तंत्रानें मास्वांनीं वागवयाचे दिवस आले आहेत. ज्यांत त्यांत आपलेपणा मिरवूं लागलें कीं, तंट्याची पाळी येते. सुनांचें चुकत असलें तर तसें नीट सांगून शिकवण्याचें काम आपलें— वडील माणसांचें— आहे. तुह्मी— माझें ऐकाल तर— आतां सुनालेकांचा संसार आनंदानें पाहून देवाचें नांव घेत काळ घालवावा. तुमचें चुकत असेल असें मी ह्मणत नाहीं. पण सगळा दोष सुनांकडेच असतो असेंहि मी ह्मणायला तयार नाहीं. कोणीतरी एकानें पडतें घ्यावें. सून ऐकत नसेल तर आपण तिच्याशीं भांडत बसणें आतां तुमच्या उतार वयाला शोभतें का ? आणखी एक तुह्मांला सांगतें. माणूस किनई उगीच कधीं वाईट नसतें. सुना तेवढ्या वाईट अशी तुमची कल्पनान् त्याप्रमाणें वागणूक; ह्मणून तुमच्या प्रपंचांत कशी फाटाफाट झाली ती पहा. थोरल्या लेकाची एक बायको पळाली, दुसरीनें जीव दिला व तिसरीला माहेरचीं माणसें सासरींच धाडीत नाहींत. दुसऱ्याची बायको दुसऱ्याच्या घरीं बिऱ्हाडानें राहून स्वकष्टार्जित अन्नावर पोट भरते हें तरी तुह्मांला शोभतें का ? व अशा बखेड्यानें नाचक्की होऊन वामनाला मुलगी द्यायलाच कोणी तयार होत नाहीं." असें एका पोक्त बाईचें ह्मणणें पडलें. त्यावर पार्वतीबाई ह्मणाल्या—

“गणूनें परत आल्यावर हल्लींच्या बायकोच्या माहेरच्यांशीं पत्रव्यवहार करून तिला येथें आणविलीन्. वामन मला सगळें सांगत होता. गणूचीन् त्याच्या सासुरवाडच्यांचीं पत्रें तो पहातो. त्यानें मला सगळें सांगितलेंन् हें सगळें. माझ्या मनांतून तिला माहेरून आणायचीच नव्हती. व ती इथें आल्यापासून गणूचेंन् माझें पटत नाहीं. मागल्या दोघी बायकांच्या वेळेला मी करीन ती पूर्वदिशा होती. आतां हिनें काय मोहिनी घातलीन् कोण जाणे! परवां मी लक्ष्मीला कशावरनसें बोलायला गेलें अन् काय सांगू तुह्मांला बाई! गणूला राग आला. तो जेवीना, घरांत कोणाशीं नीट बोलेना, मथीच्या अंगावर वसकन् ओरडला, वामन्याला चापट दिली; एक का दोन जीं थेरें केलींन् तीं कांहीं सांगण्याची सोय नाहीं. शेवटीं मी त्याला विनवलें, जंग जंग पछाडले, तेव्हां कुठें बोलला कीं, ‘तुह्मांला जर घरांत बायकांशीं भांडायचें असेल तर माझी कांहीं घरांत रहाण्याची इच्छा नाहीं. तिला माहेरीं पोंचवितों. मी घरांत पाऊल टाकीत नाहीं; तुह्मांला खर्चापुरते पैसे धाडीत जाईन, त्यावर काय वाटेल तो घाला गोंधळ.’ आतां हें ह्मणणें विचित्रच नव्हे का? परवां एकदां तोन् लक्ष्मी दोघें बोलत होतीं. मथीनें उभें राहूं नये पण राहिली, आणखी यांनीं तरी कशालाहो दिवसास बोलायला पाहिजे आहे? पण तेवढ्यावरून मथीला असें नाहीं नाहीं ते बोलला. “तूंच माझ्या संसाराची नासाडी केलीस, खाऊन स्वस्थ नाहीं का रहावत, चोरून ऐकण्याच्या भलभत्याच खोडी तुह्मांला लागलेल्या.” कित्ती कित्ती सांगू तुह्मांला, प्रसंग आला ह्मणून मथी त्यांच्या घरीं आली. नाहीं तर कोण कुणाच्या घरीं कशाला जातेंय् ज्याचें तें सगळें ठीक असल्यावर. तुह्मीच पहा, वर्षावर्षांत तरी माणसांच्या गांठी पडतात का? असें त्यानें तिला टाकून बोलावें का?”

“पार्वतीकाकू, तुह्मी सांगतां तें सगळें खरें; पण कोणच्या का कारणानें असेना, त्याचा स्वतःच्या बाबतींत तर नास झाला आहेना! आज कमींत कमी चाळीस वर्षांवर तो असेल, हो असेलच. आमच्या मुलांत व त्या-

त्यांत काय तें वर्ष सहा महिन्यांचें अंतर असेल; आमचा कार्तिकांतला, त्याच्याच पुढल्या श्रावणांतला तुमचा गणू, गोकुळअष्टमीला चार पांचच दिवस झाले असतील. मी तुळशीच्या पुजेंत होतें अन् ती रुक्मिणी मोलकरीण आली सांगत पार्वतीबाईंना मुलगा झाला ह्मणून. होय ना पण ? आमच्या मुलालाच आतां आहेत चाळीसन् दोन तीन अधिकच वर्से. एवढ्या वयांत गणूला का पुत्रसुख का स्त्रीसुख काय लागलें हो ? तुह्मीच मोकळ्या मनानें विचार करून पहा. आतां तो आपल्या बायकोशीं बोलला ह्मणून तुह्मांला तरी कां राग यावा हो ? तुमचा तरी संसार नवऱ्याशीं बोलल्यावांचून झाला वाटतें ? असें ह्मटलें तर ह्मणाल ही बाई असें कां बोलते ह्मणून– पण खरें सांगणें गोड फार कमी लागतें. त्यानें आपल्या बायकोशीं बोलतां कामा नये, अशी तरी तुमची इच्छा कां ? दोघें नवराबायको मिळून मिसळून आपसांत एकोप्यानें वागतात हें पाहून तुह्मांला आनंदच वाटावा खरें ह्मटलें तर. पण तुमचं करणं उलट. मग त्याला तें पटलें नाहीं ह्मणजे आलें भांडणाचें मूळ अन् झाला बेबनाव. तो बायकोशीं गोडीगुलाबीनें वागतो याखेरीज तर आणखी काहीं गैर वागणूक नाहीं ना ? मी ह्मणतें तुमचा गणू गरीब ह्मणूनच तो पहिल्या दोन बायकांची तशी तऱ्हा झाल्यावर आत्तांपर्यंत तुमच्याशीं नीट वागला. दुसरा कोणी असता तर हें असें कधींच चाललें नसतें. पहिली एक तुमची सून द्वाड वाईट चालीची होती असें मानलें तर तिच्याबद्दल विशेष वाटणार नाहीं. पण दुसरीनें जीव द्यायला काय कारण ? तिसरी पण कां वाईट ह्मणतां ? तीन ठिकाणच्या तिघी; सगळ्याच वाईट वळणाच्या असें तरी ह्मणायला कांहीं आधार पाहिजेना ? तें कांहीं नाहीं पार्वतीबाई ! तुह्मीं विचारलेंतच ह्मणून अगदीं उघड सांगतें, तुमच्याकडेच वाईटपणा येतो. इतक्या दिवसांनीं आतां गणूभाऊ तुमचें ऐकेनासा झाला यांत कांहीं वावगें नाहीं.''

पार्वतीबाईचें बोलणेंच खुंटलें. अशी ज्या ज्या बाईजवळ त्या आपली कर्मकथा सांगत ती ती सगळा दोष त्यांच्यावरच लादी. तेव्हां पार्वतीबाई

वैतागल्या व मथूताई आणि भटजीबोवा यांबरोबर कोठें तरी तीर्थयात्रेला निघून जाण्याचा बेत करूं लागल्या.

आपण आजपर्यंत पत्नीच्या बाबतींत आईच्या सांगण्यावरच भिस्त ठेवून फार गैर वागलों असें गणूभाऊंना वाटूं लागायला जें कारण झालें तें ते कधीं कोणाजवळ बोलवून दाखवीत नसत. परंतु मित्रमंडळींत बोलतांना आपली चूक दाखवून आईवर असलेल्या फाजील विश्वासाचें अंधत्व नाहींसें करणारें झणझणीत अंजन डोळ्यांत घालणारें एक माणूस आपल्याला आजारीपणाच्या अज्ञातवासांत मिळाल्याचें मात्र ते कधीं कधीं सांगत असत.

* * *

दुसरी भार्या त्यांच्या समोर येऊन उभी राहिली. गणूभाऊ तिच्याकडे स्तिमित चक्षूंनीं पहात उभे होते. तिनें आपल्या परसांतल्या विहिरींत जीव दिला हें गणूभाऊस स्मरेना. हिचा केशपाश अगदीं मोकळा असून त्या योगानें ती जराशी भयप्रद दिसत होती. ती बोलूं लागली—"महाराज, दुसऱ्याच्या ओंजळींतलें पाणी नेहमीं माणसाला निःसत्व करतें. आपण सासूबाईच्या वचनावर वाजवीहून अधिक विश्वास ठेवून आह्मां गरीब दासींचा विनाकारण छळ केला. महाराज, पतीच्या जिव्हाळ्याकरितां बायका सासरचा जाच सहज करतात. पण पतीच्या प्रेमसुखाची आशा नष्ट झाली ह्मणजे दुहेरी तापानें त्यांना आपला जीव जड वाटूं लागतो. आह्मां स्त्रियांची पतीवर किती प्रीति असते याची कल्पना तुह्मां पुरुषांना कशी असणार? पतिप्रेम ह्मणजे आमचें बळ आणि तेवढ्याचीच वाण असली ह्मणजे आमचें जगणें मरणासारखें व मरण मात्र आह्मां जीवांची खरी विश्रांति अशी स्थिति येते. तिसरीच्या दैवयोगानें तिला आपल्यापासून सुख लागो एवढीच आमची इच्छा आहे. महाराज, बायकांना पतीच्या आपणावर असलेल्या प्रेमांत कोणी भागीदार असल्याची कल्पना सुद्धां सहन होत नाहीं; व याच कारणानें सवतींत भांडणें होतात. पण पत्नीत्वाच्या नात्यानें आमचें पद पटकावलेल्या या तिसरीवर तरी आपण

लोभ ठेवून सुख द्यावें असें मला वाटतें. बायका अधीर. कांहीं थोडेसें कारण देखील त्यांना जीव द्यायला पुरतें, असा लौकिकांत आमचा बोभाटा पुरुष करतात पण आमच्या छळाची कल्पना त्यांना कशी यावी ? जगांत जेवढ्या सासवा तेवढ्या सुनांना छळतात असें नाहीं पण आपली माता ह्मणजे छळक सासूचा एक सर्वांगपूर्ण मासला आहे असें मी स्पष्ट सांगतें. आपल्याला ताटाखालचें मांजर करून त्या जोरावर या— संतापानें शिव्या द्याव्याशा वाटतात हो— आपल्या आईला— आमचा हिनें छळ केला. तुह्मांला किती प्रमाणें दाखवूं ? ही पहा—" गणूभाऊंना आपल्या शरीरावरील मारल्याच्या, डागल्याच्या, खुणा दाखवून असें करण्याला कारणें कांहीं नव्हतीं असें तिनें सांगितलें. "घरांत पाणी भरलेलें मुलाकडून नासवून आह्मी पाणी भरण्यांत कुचराई केली अशा सबबीवर आमचे आईबाप उद्धरून शिव्या द्याव्या. कितीहि काळजीनें लुगड्याच्या चुण्या करून एखादे वेळीं चुकलें तर मारावें, अशा कांहीं तरी क्षुल्लक कारणानें या राक्षसीणीनें— महाराज राग मानूं नका— मला डाग सुद्धां द्यायला कमी केलें नाहीं. पण हा सारा छळ आज नाहीं उद्यां आपण प्रेम कराल, या आशेवर निमूटपणानें सहन केला. पण आमच्यावर आईप्रमाणेंच आपलीहि अवकृपा पाहून ही स्थिति पालटण्याची निराशा झाल्यावर मी—"— तिचा चेहरा उग्र दिसूं लागला. "मी— सगळ्या आप्तेष्टांना— आपल्याला नव्हे सगळ्या जगाला रामराम ठोकून मरणाचा आश्रय पत्करला. अफू खाणें अथवा इतर कांहीं साध्य न वाटून आपल्या आईला शिव्या शाप देत विहीरींत उडी मारली." पाण्याचा आवाज ऐकूं येऊन ती वर उसळत असल्याचें गणूभाऊंना दिसलें. आणि त्या भरांत "अरे धावा, हिनें विहीरींत उडी मारली, अरे एक— वर आली— खालीं— खालीं— वर येत नाहीं— ठार मेली हो— कोणी— ठार— धावा" असें कांपऱ्या आवाजांत ते ओरडले. शेजारींच त्यांची तृतीय पत्नी होती. तिला हा गोंधळ न कळून तीहि ओरडूं लागली. घरांतली सगळी मंडळी घाबरून गणूभा-

ऊंच्या खोलीशीं आली व हें सर्व होण्याचें कारण गणूभाऊंना विचित्र स्वप्न पडलें असें कळल्यावर सगळ्यांचा जीव थाऱ्यावर आला व त्याचें पर्यवसान हसण्यांत झालें.

* * *

या वेळीं अकरा बाराचा सुमार होता. त्यापूर्वीं एक तासभर गणूभाऊंनीं आपल्या पत्नीला "आई तुला त्रास देते का?" असा कळकळीनें प्रश्न विचारला होता. "आपण चाकरीवरून थकून भागून कधीं तरी घरीं येणार म्हणून आपल्या मागें आमची हालहवाल कशी होती हें रडगाणें आपल्याला दोन दिवस सुख लागावें व विसावा मिळावा या आशेनें माझ्या सवती गात नसतील. तशीच मीहि सांगत नव्हतें. आपल्या सुखासाठीं जर आमचा जन्म तर त्यांत व्यत्यय आणण्यासारखी गोष्ट खरी असली तरी शहाण्या बायका कधींहि सांगायच्या नाहींत. आपली कृपादृष्टि असली म्हणजे आमच्या सर्व हालअपेष्टा आपोआप हरतात. मग सासूबाईंनीं कांहीं केलें तरी त्याचें वाईट वाटत नाहीं. माझा सांगण्याचा बेत नव्हता पण आपण आग्रहानें कालपासून तेंच तेंच पांच सहा वेळ विचारलेंत म्हणून सांगतें. माझ्या लग्नानंतर माझे हाल सासूबाईंनीं केले हें वर्तमान माहेरीं कळल्यावर ते मला फिरून सासरीं पाठवीनात. पण सासरच्या कागाळ्या मी कांहीं कोणाजवळ बोललें नाहीं हो. सासू काय जन्माला पुरते? इकडचें चांगलें असलें म्हणजे सगळें जग उलटलें तरी त्याची कांहीं आम्हां बायकांना पर्वा वाटणार नाहीं. मला बोललेलें आपल्याला खपत नाहीं असें पाहून आतांशा वन्सन् सासूबाई आपसांतच काचकूच करतात, धुसफुसतात. पण मीं तिकडे लक्ष देत नाहीं!" वगैरे गणूभाऊंच्या वरील प्रश्नाला उत्तरादाखल पाल्हाळिक भाषण तृतीय लक्ष्मीबाई लाडिकपणानें देत असतां गणूभाऊ झोंपीं गेले होते.

---

## प्रकरण तेरावें.

# लग्नाची दुहेरी घाई.

वामनराव लग्नाला अगदीं आतुर झालेले होते व मातुःश्रीच्या लौकिकानें तसें होण्याचा जम दिसेना तेव्हां त्यांनीं भटजींचे पाय धरले आणि त्यांच्या मार्फतीनें कोठें तरी शरीरसंबंध जुळवून आणण्याच्या तयारीला ते लागले. मुलाची विद्याभ्यासांत तरतरी असली तर कोणी मुलगी द्यायला तयार व्हायचा, पण ती बाजू वामनरावापाशीं लंगडी पडल्यानें आपल्या द्रव्याच्या भपक्यावर भटजींच्या लटपटीनें एखादें कूळ गांठलें पाहिजे असें त्यास वाटून त्यांची मसलत सुरू झाली व त्या दोघांमध्यें कांहीं करार मदार ठरून शेवटीं भटजी त्या मार्गाला लागले. बिनवारशी वृद्धाला द्रव्याच्या आशेनें कन्या अर्पण करण्यास पुष्कळ धनलुब्ध बाप तयार होतात पण वामनराव नव्या दमाचे गृहस्थ, यामुळें तिकडूनहि त्यांस अनुकूलता नव्हती. परंतु मध्यस्थाच्या कर्तबगारीवर विश्वासून एखाद्या वधूच्या गळ्यांत माळ घालण्याची संधि लवकर येण्याची वाट पहात बसण्याखेरीज त्यांना इलाज राहिला नाहीं. भटजींनीं मुलाच्या हुशारीबद्दल, घरच्या सावकारीबद्दल वाटेल तसें फुगवून सांगून अखेरीस एक सावज फांसांत धरलें. मुलगी मोठी झाली व कौमार्याची मर्यादा शरीरधर्माप्रमाणें उल्लंघली नाहीं तों ती कोणाच्या तरी गळ्यांत अडकवावी अशासाठीं उत्सुक झालेले एक दूरस्थ परंतु पुणें शहरांत वर शोधीत फिरणारे गृहस्थ बाळंभटांनीं हेरले व त्यांच्या ओळखीपाळखी पुण्यास फारशा नसल्यानें, पार्वतीकाकूंच्या सासुरवासाची पद्धति फारशी त्यांच्या कानावर जाण्यास अवकाश नव्हता; शिवाय उमेनें तुमची खोटीनाटी नालस्ती करून गांवांत तुमच्याबद्दल अविश्वास उत्पन्न झाला आहे, ह्मणून आतां सासूपणा गाजविण्याची जुनी रीत सोडून सुना व लेकी यांत भेदभाव न ठेवण्याचें कबूल करीत असाल तर एक सोडून छपन्न मुली वामनरावाला मिळतील, पण एवढ्याला जपा नाहीं तर बघा आपलें,'' अशी भटजींनीं

लग्न जुळविण्याच्या अगोदर त्यांना दहशत घालून ठेवली होती. त्याखेरीज गणूभाऊंनीं पत्नीवर उघड प्रेम करून मातेशीं साशंक वागण्याचा क्रम धरल्यापासून पार्वतीकाकूंची नांगी बरीच मोडल्यासारखी झाली होती; तेव्हां वामनरावांचें कार्य पार पाडण्याला सासूच्या कजागपणाची आडकाठी भटजींना नव्हती. "सासूचा अनुभव मुलीला लग्न झाल्याखेरीज येणार नाहीं ना ! तुमच्या मुलीला उत्तम वागवितील अशी हमी मी घेतों" म्हणून भटजी कन्यांच्या पित्यांसमोर छातीला हात लावून सांगत. गणूभाऊंचे वडील भिक्षुकीचा धंदा करीत पण त्याशिवाय ते थोडा बहुत देवघेवीचाहि व्यवहार करित असत, तथापि त्यांत नांवाजण्यासारखें कांहीं नव्हतें. भटजींनीं या सावकारीचें पिल्लू पुढें करून त्याला असें बाळसें आणलें होतें कीं, ऐकणारा तावडतोब मोहून जावा व अशा तऱ्हेच्या अनेक युक्तया योजून त्यांनीं काम फत्ते केलें. वामनरावांच्या लग्नाची घाई पार्वतीबाईंना होतीच व संसारांतील आपला वरचढपणा नष्ट होऊं लागल्यामुळें आपण एकदां वामनाचें लग्न उरकून सुखानें तीर्थयात्रेला जाणार आहों असें त्या अलीकडे सांगूं लागल्या होत्या. मुलगी मिळतांच लग्नाचें निश्चित झालें व सामग्रीची तयारी करण्यास हळूहळू आरंभ होऊन आतेष्टांचीहि जमवाजमव होऊं लागली.

* * *

जुन्या पद्धतीच्या लग्नाला काळाचें शुभाशुभत्व पहावें लागतें, पण याच सुमारास रूढ लोकाचाराला तिळांजळी देऊन लोकोद्धाराचें ब्रीद धारण केलेल्या दोन स्त्रीपुरुषांचें लग्न जमून त्याचाहि गांवांत पुष्कळ बोभाटा झाला होता. रावबहादुर ठाकार अथवा मनोरमाबाई यांपैकीं रस्त्यांतून कोणीहि जाऊं लागलें तरी त्याकडे जाणारांयेणारांचें लक्ष जाऊन "हे अमक्या स्त्रीचे भावी पति व या अमक्याच्या भावी पत्नी" अशी ओळख ते आपसांत देत असत. "जनता नेहमीं दुतोंडी असते. कार्यारंभीं त्यास अपयश येणार अशी खात्री मनाशीं बाळगून लोक प्रयत्न करणारांची टर उडवतात

व तेंच सफळ झालें ह्मणजे त्यांची व करणारांची धन्यता गात सुटण्यालाहि त्यांना शरम वाटत नाहीं. नवीन गोष्ट नेहमीं जननिंदेच्या कोलाहलांत जन्मास येते;" असा तत्त्वार्थ या भावी जोडप्याच्या पाठीराख्यांनीं उ..शीं बाळगल्यानें लोक आपल्याबद्दल काय बोलतात याची त्यांना पर्वा नव्हती. सरकारनें माणसांची किंमत न जाणून रावबहादुरांना मुदतीच्या आंत कामावरून सक्तीनें दूर केलें होतें अशी जनवार्ता होती, पण तिच्याशीं आपणास सांप्रत कर्तव्य नाहीं. प्रेमाला अंधळें ह्मणतात व तेंच खरें. त्याप्रमाणें परस्परांच्या गुणदोषांची चिकित्सा न करतां प्रेमानें मनोरमाबाई व रावबहादुर शकार यांचीं हृदयें एकत्र गुंफलीं व या प्रेमाचा संबंध राजरोस रीतीनें शिक्षित समाजामध्यें टाळ्यांच्या गजरांत लोकांसमोर आणण्याचा समारंभ थोडक्याच दिवसांत होण्याचें निश्चित झाल्याचें लोक बोलूं लागले होते. आमच्यांत तिथींमध्यें दर महिन्यास क्षयवृद्धीचा निवाडा करावा लागतो पण इंग्रजी तारखांत तसा कांहीं घोटाळा नाहीं व रविवार हा सहा दिवस सृष्टिरचनेच्या खटाटोपीनें दमलेल्या ईश्वराचा विश्रांतिदिवस ह्मणून त्या शुभ दिवसाची आगामी तारीख ठरविली होती. हा सुधारलेला विवाहोत्सव होण्यापूर्वींच शाळेंतलीं टवाळ पोरें आपणाला पाहिल्याबरोबर "दोन बापांचा, दोन बापांचा" ह्मणून चिडवून त्रास देत असल्याविषयीं तक्रारी रोजच्या रोज मधुकर अलीकडे आईच्या कानावर घालूं लागला होता व सभ्याचाराविरुद्ध शाळेंतलीं मुलें वागतात ह्मणून शिस्तीचे कडक नियम अंमलांत आणावे अशा अर्थाच्या चिठ्या रावबहादुरांकडून शाळेच्या व्यवस्थापकांकडे पोंचूं लागल्या होत्या. 'मारणाराचा हात धरवतो पण बोलणाराचें तोंड धरवत नाहीं' या ह्मणीस अनुसरून मुलांना नतीजा पोंचविण्याच्या कामांत शिक्षकांचा निरुपाय झाल्यावर मधुकराची गाऱ्हाणीं दिवसेंदिवस वाढतच चाललीं. ह्मणून त्यास कांहीं दिवस शाळेंत न पाठविण्याचें ठरलें.

* * *

वामनराव व रावबहादुर यांचीं लग्नें फार थोड्या अंतरानें झालीं. पहिल्या लग्नांत रीतीप्रमाणें रुसवा फुगवा झालाच. मुलाची एक दूरची नातलगीण वधूच्या घरीं गेली व तिच्या पायावर दूध न घालून तिचें स्वागत करण्यांत चूक झाली ह्मणून तिला राग आला. रोजच्या कालवणाला दूध-दुभत्याची घरांत महागाई चालेल पण लग्नांत हे सगळे श्रीमंती चोचले पुरवून घेतलेच पाहिजेत अशी रीत पडून गेल्यामुळें या प्रमादासाठीं वधूकडच्यांना वरपक्षीयांचीं आर्जवें करतां करतां नाकीं नव आले. वधूवरांच्या एकीकरणांत कांहीं उच्च हेतु असतात व अशा प्रसंगीं कोप अथवा लोभ यासारखे नीच मनोविकार जितके दूर ठेववतील तितके ठेवण्याचा प्रयत्न करून सुखासमाधानानें असलीं कार्यें पार पाडावीं. परंतु रुसव्याफुगव्या-वांचून लग्नमंडपाला शोभाच येत नाहीं अशा तऱ्हेची जुनी रीत पडल्यानें वधूकडच्यांनीं वराकडच्यांना खुष ठेवण्यासाठीं आपल्या वागणुकींत कोठेंहि न्यून न पडूं देण्याची खबरदारी घेतली तरी वरचढ पक्षाला धुसफुस करण्याला जागा रहातेच. वामनरावाच्या लग्नांत पार्वतीबाईला जातीनें कोणत्याच कार्यांत पडतां येण्यासारखें नसल्यामुळें त्यांनीं आपल्या एका जुन्या मैत्रिणीवर आपलें काम सोंपविलें व तिनेंहि पार्वतीबाईची उणीव कोठें भासूं न देतां अंगीकृत कार्य फार चोख बजावलें व वधूपक्षीयांमध्यें लग्नाचा विषय निघाला कीं, विहीणपणा गाजविणाऱ्यांत पहिली ह्मणून या बाईचें नांव निघाल्याशिवाय रहात नसे. वरमाईच्या कामगिरीचा मक्ता घेतलेली वरील स्त्री एक दिवस भोजनाच्या वेळीं रुसून फणफणत घरीं आली. वधूकडच्या मंडळींना हिच्या रागाचें कारण लक्षांत न येऊन ती बुचकळ्यांत पडली. ठमाबाई, चिमाबाई इत्यादि शेजारणीपाजारणींचा जमाव जमतां जमतां दोन प्रहर अगोदरच उलटून गेलेले, तथापि बोला-वण्यावर बोलावणीं घेऊन घरचीं अथवा वेळेपुरतीं मागून आणलेलीं उंची वस्त्रें व भूषणें घालून वाजत गाजत थाटानें हें वरपक्षीय स्त्रीमंडळ भोज़-नासाठीं व्याह्याचे घरीं निघालें. त्यांत पार्वतीबाईची जुनी मैत्रीण अर्थातच

मोठ्या मानाची. जेमतेम उन्हामधून पायाला चटके बसत असतां ही मिरवणूक व्याह्याच्या दारापर्यंत पोंचली व तेथें कांहीं कारणानें या उपऱ्या वरमाईचें बिनसलें. श्रीधररूपी वराच्या मातु:श्रीचें काम करणाऱ्या बाईला कामाच्या धांदलींत पायांवर दूध घालून व ओंवाळून स्वागताचा विधि उरकण्याला वेळ लागला व तेवढ्यांत अपमान झाला असें वाटून बाई चटकन सगळ्या मंडळीमधून "आह्मांला घरीं गिळायला नव्हतें ह्मणून का आह्मी यांच्या दाराशीं आलों? काय बाई तऱ्हा तरी! माझें काय खेटर अडलें होतें इथें यायला. पार्वतीकाकूंनीं विनवलें चार दिवस घ्या सांभाळून ह्मणून, तेव्हां त्यांच्या भिडेखातर आलें इथें. माझ्या घरीं कांहीं कार्यें झालीं नाहींत असें नाहीं पण अशी रीत नाहीं पाहिली कधीं. मी आज दहा मुलांची आई झालें पण असें तिष्ठत दाराशीं उभें रहाण्याचा प्रसंग नाहीं आला माझ्यावर कधीं. इश्शबाई!" अशा अर्थाची बडबड करीत बाई परत निघाली.

लढाईमध्यें सेनापतीनें मागें पाय घेतल्यावर सैन्याची रचना विस्कळीत होते ह्मणतात तशी स्थिति प्रस्तुत प्रसंगीं झाली. कांहीं जणींनीं या बाईचा मार्ग स्वीकारला. ज्यांचा जेवणापलीकडे त्यांत विशेष संबंध नव्हता, त्या आपसांत कुजबुजत तेथेंच उभ्या राहिल्या. कांहीं समजूतदार होत्या त्यांना वाईट वाटलें. सारांश बायकांचा दाराशीं जमलेला घोळका पांगला. तिकडे व्याह्यांच्या बाजूला मोठी गडबड उडाली व या घोटाळ्याला तोंड कशी काढावी ह्मणून त्यांच्यांत वाटाघाट सुरू झाली. "भोजनाची तयारी झाल्यावर आह्मांला वाटेल तितका वेळ खेळवून अन्नाचा स्वाद घालवणाऱ्या या बाईला कामाच्या घाईत स्वागत होण्याला चारदोन मिनिटें उशीर झालेला देखील खपूं नये! लोकांच्या डोळ्यांत कसें भसकन् बोट जातें पण आपले दोष माणसाला दिसत नाहींत." कोणी तिऱ्हाईत ह्मणाले.

बाई घरीं परत आलेली पाहून पार्वतीबाईंना प्रथम अचंबा वाटला; पण मूळापेक्षां बरीच तिखटमिठानें चरचरीत झालेली अपमानाची कहाणी

ऐकली तेव्हां पार्वतीबाईच्या अंगाचा तिळपापड झाला. "बरें आहे पाहून घेऊं ह्मणावें मुलगी आमच्या इथें नांदायची आहे पुढें. आजच्या-नेंच कांहीं संपलें नाहीं. आमच्या बायकांचा अपमान करायला त्या कांहीं वर आल्या नाहींत." अशीं वाक्यें त्या बोलूं लागल्या. तास अर्ध्या तासांत ही आली, ती आली, अशा निम्याशिम्या बायका परत आल्या. चूक झाल्याबद्दल क्षमा व्हावी ह्मणून आपल्याकडच्या चार वजनदार पोक्त बाया घेऊन मुलीची आईहि येऊन धडकली व मग वरमायांनीं वाटेल तसें बोलून तंडण्यास सुरुवात केली. मुलीला जन्म दिला या पापाचें हीं अद्वातद्वा भाषणें साहून प्रायश्चित्त घेतल्यावरहि व नाना प्रकारें वर-मातेला विनवल्यावर देखील जेव्हां काम फत्ते होण्याचें चिन्ह दिसेना तेव्हां वधूमाता निराशेनें घरीं परत फिरली. समाजांत प्रतिष्ठित मानल्या गेले-ल्या एका सुखवस्तु गृहस्थाच्या पत्नीला केवळ कन्यामातृत्वाच्या दोषा-मुळें वरमातेकडून झालेली अप्रतिष्ठा सहन करावी लागली. परंतु एवढ्यानें भागेना तेव्हां स्वतः मुलीचा बाप व त्याचा एक स्नेही असे दोघजण वर-गृहीं गेले व या दोघीं महामायांना वंदून, पदर पसरून माफी मागितली तेव्हां सगळें प्रकरण विसरून विहिणी जेवायला आल्या. झाल्या प्रकाराबद्दल वधूकडील स्त्रिया संतापल्या होत्या. एका वधूपक्षीय तिऱ्हाईत स्त्रीनें आपल्या जाणत्या मुलीला शिकवून "विहीण मिळाली अवदसा" अशा तऱ्हेचा उखाणा विहीण अंचवण्यासाठीं उभी असतांना घातला व फिरून आगींत तेल ओतलें. जेवतांना यथेच्छ ताव मारल्यामुळें हातांना आलेला तुपाचा ओशटपणा घालविण्यासाठीं साखरेखेरीज राखमातीसारखे अन्य पदार्थ विवाहोत्सवांत वर्ज्य होत या समजुतीवर विहिणी अडून बसल्याच होत्या व साखरेनें हात प्रक्षाळण्याची इच्छा सफल होण्यापूर्वींच वरील उखाण्याचा घाव मर्मी बसल्यामुळें विझलेला संताप बळावला; परंतु पोटांत गेलेल्या सुग्रा-सामुळें संतापाचा जोर जितका तीव्र व्हावा तितका न होऊन त्यांतच आर्जवाची भर पडल्यानें थोडक्यांत शमला. अशा तऱ्हेची धुसफुस करून

मुलीकडच्यांना चांगला त्रास पोंचलाच पण त्याखेरीज जेवतांना "आह्मांला वाजंत्रीच्या ऐवजीं फोनोग्राफ अगर बाजाची पेटी पाहिजे" इत्यादि नसते हट्ट पुरवावे लागल्यामुळें हट्टाच्या दृष्टीनेंहि थोडा बहुत चट्टा बसल्यावांचून राहिला नाहीं.

बायका अडाणी असतात, त्यांना दूरवर धोरण नसतें वगैरे स्वाभाविक दोषांच्या पांघरुणाखालीं त्यांनीं दिलेला त्रास लपतां येईल पण शहाणेसुरते पुरुष देखील आपण केवळ वरपक्षाचे या घमेंडींत सभ्यतेला फांटा देण्यास कमी करीत नाहींत. मांडवप्रस्थानाचे दिवशीं जांवईबुवा अल्पस्वल्प द्रव्याशेनें रुसलेच. मुलाच्या मानासाठीं ठरलेली रक्कम पोंचल्यावर सुद्धां जांवईबुवांना एखादी सल्ल्याची जोडी या पर्वणींत घशाखालीं पाडतां यावी ही इच्छा होती. बहीणीचा व भटजींचा दुजोरा मिळून त्यांच्या उसन्या रागाची भट्टी बऱ्याच रंगाला आली. जांवईबुवा कांहीं तरी दिल्याशिवाय आज उठत नाहींत हें कानावर आल्यावर मुलीच्या भावी सुखाकडे नजर देऊन झालेल्या खर्चात आणखी एक तोळा सोन्याच्या किंमतीचा आंकडा टाकून व्याह्यांनीं काम भागविलें. जांवईबुवा सोन्याचें घड्याळ, बायसिकल यासारख्या किंमती वस्तूंच्या मागण्या घालीत होते, पण एक तोळ्याची सल्लेजोडी बोटांत चढतांच त्यांचा राग वितळला. जावईबुवांचे आश्रित वेदशास्त्रसंपन्न ह्मणून वरपक्षांत गाजलेले बाळशास्त्री यांनींहि मानापमानाचा धांगडधिंगा घालून वाहत्या गंगेंत हात धुऊन घेतले. यांच्या आगमनावांचून वरपक्षीय पुरुषांची अन्नग्रहण करण्याची छाती नसे व खुद्द जांवईबुवा त्यांना विशेष मानीत असल्यामुळें भटजींच्या बडदास्तींत किंचित् सुद्धां न चुकण्यासाठीं प्रत्येकाची खटपट असे. तथापि एकदोनदां निष्कारण कोठें तरी बाहेर जाऊन भोजनासाठीं मंडळींना भटजींनीं तिष्ठविलेंच.

सगळ्या लग्नांत मुलीकडची मंडळी गणूभाऊंना मात्र त्यांच्या गरीबपणाबद्दल वाखाणीत. व्याह्यांना उपसर्ग असा त्यांच्याकडून केव्हांच पोंचला नाहीं व त्यांच्या हजेरींत त्यांनीं व्याह्यांना कोणाकडूनहि उपद्रव

लागूं दिला नाहीं. विहिणीच्या अपमानाच्या वेळीं झालेला गोंधळ पहाण्यास जर ते असते तर मुलीच्या आईबापांना ज्या नाकधुऱ्या काढाव्या लागल्या त्या कदाचित् टळल्या असत्या, असे शब्द वधूकडची मंडळी वारंवार काढीत होती पण निर्भर्त्सना व कुचेष्टा सोसण्याचें त्यांच्या नशीबीं होती त्याला इलाज काय ? आजारीपणाच्या अज्ञातवासांत त्यांना जी रजा घ्यावी लागली त्यामुळें त्यांना भावाच्या लग्नाला दोन दिवसांपेक्षां अधिक रहातां आलें नाहीं. पण या अवकाशांत त्यांच्या नातेवाईक स्त्रियांनीं एक-दोनदां कांहीं तरी खुसपट काढून व्याह्यांना त्रास देण्याचा केलेला बेत यांच्या रागामुळें विकोपास न जाऊन जागींच जिरला. असा गणूभाऊंच्या सज्जनपणाचा अनुभव आल्यानें त्यांबद्दल जो तो आदरानें बोलूं लागला.

आमच्या गोष्टीशीं संबंध असलेल्या व्यक्तींमध्यें आणखी एक विवाह-समारंभ झाल्याचें वाचकांस विदित आहेच. परंतु तो केवळ प्रेमसंयोग असल्यानें त्यांत मानापमानासाठीं भांडणतंटे होण्याचें कांहींच कारण नव्हतें. मनोरमा व रा. ब. शकार या दोन्ही व्यक्तींचा आपसांत दाट परिचय असून परस्पराला पतिपत्नीच्या नात्यांत जखडण्याचें केवळ त्यांच्याच मनावर अवलंबून होतें. अपरिचित वधूवरें एकत्र करण्याच्या जुन्या अर्थात् दुष्ट चालीवर समाजोद्धारकांचा नेहमीं हल्ला असतो व तशा मंडळीपैकीं दोन प्रमुख व्यक्तींचा संबंध व्हावयाचा असल्यानें त्या दोघांनाहि एकमेकाचा स्वभाव पक्क्या माहीतीचा झालेला होता यांत नवल नाहीं. आराधन-कालांतील (Courtship) एकान्तांत उद्भवलेले परस्परांच्या हृदयांतले प्रेमांकुर फोफावत जाऊन अखेरीस त्याचें गोड फळ विवाहरूपानें जनांत प्रकट व्हावें हा सुधारकाचा मानस या बिजवरबीजवधूच्या संयोगानें सिद्धीस गेला. 'पावसाळांतल्या बेडकाच्या ओरडण्याप्रमाणें वेदमंत्रांचा अर्थ-शून्य घोष करणाऱ्या ब्राह्मणभिक्षुकांचा' या उत्सवांत संबंध नव्हता. आंग्लविद्येच्या संस्कारानें पावन झालेल्या प्रोफेसर व इतर अंमलदारांची गर्दी होती. एका पुढारी व्यक्तीनें ज्याला पंचरसी हें सार्थ विशेषण दिलें

आहे त्या प्रार्थनासमाजाचें भव्य मंदिर एका संध्याकाळीं शेंकडों शिष्ट लोकांच्या जमावानें फुलून निघालें होतें. संध्याकाळ हा गोरजमुहूर्त खरा, पण या लोकांनीं काळाची शुभाशुभ चिकित्सा करून ही वेळ ठरविली नव्हती. सहा दिवस सृष्टीची नवीन घटना करून ईश्वरानें विश्रांतीसाठीं जो दिवस पसंत केला व या दमणाऱ्या देवाच्या कृतीस अनुसरून तद्धर्मीय लोक ज्या दिवशीं आराम घेतात तो मंगल दिवस वरील लोकांनीं या अभिनव पद्धतीच्या लग्नासाठीं योजला होता व त्या दिवसाची सूर्यास्ताची रम्य वेळ या मंगलकार्याला इष्ट वाटून त्यांनीं ठरविली होती. तासेवाजंत्र्यांच्या कर्णकटु दणदणाटाऐवजीं इंग्रजी ब्यांड त्या दिवशीं प्रार्थनामंदिराबाहेरच्या बागेंत गर्जत होता. गाड्याघोड्यांची गर्दी सारखी प्रार्थनामंदिराकडे लोटत असून हा समारंभ पहाण्यासाठीं गमतीनें जमलेले इतर लोक जो येईल त्याकडे बोट करून "हा अमक्या जिल्ह्याचा डेप्युटी कलेक्टर, हा मामलेदार, हा मुनसफ, हा अमुक प्रोफेसर, हा अमुक प्रिन्सिपाल, हा अमक्या शाळेचा सुपरिटेंडेंट, हा हायकोर्टाचा जज्ज, हा अमुक बॅरिस्टर, हा अमुक हुद्द्याचा" असे आपसांत बोलत होते. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, समारंभाला येणारी मंडळी एकटी नव्हती. बहुधा सगळे सपत्नीक असत. नवराबायकोंनीं एका गाडींत मौजेनें सर्व जनांदेखत बसून थाटानें फिरावें, हें एक सुधारणेचें तत्त्व आहे. नवराच प्रत्यक्ष शेजारीं असल्यावर त्याच्या अस्तित्वाचें वेगळें कुंकवाच्या टिळ्यासारखें चिन्ह कशाला हवें? या विचारानें येणाऱ्या दंपत्यांपैकीं कित्येक स्त्रियांचीं ललाटें मोकळीं होतीं. त्यांची निंदा करण्याचें लोकांना कांहीं कारण नव्हतें, पण दुसऱ्याचें उणें शोधून कुटाळकी करायला सांपडावी अशी जर सगळ्यांची प्रवृत्ति तर त्यांनीं सुधारणेचे पुरस्कर्ते व अनुयायी यांबद्दल अनुदारपणा दाखविल्यास नवल नाहीं. असल्या प्रकाराकडे सुधारक लक्ष देत नसतात; कारण कोणतीहि नवीन गोष्ट आरंभीं लोकांना न रुचून ते तिच्या उत्पादकाचा छळ करण्यास तत्पर असतात असा अनुभव पुरातन कालापासून पहावयास सांपडतो व अशा

इतका कचरत्याग आल्हे उदात्त हेतु सफळ होणार नाहींत ही जगाच्या सार्वकालीन अनुभवाची खूणगांठ मनाशीं बांधून ते लोकांच्या टवा-ळीला कारणें कुमानीत नसतात. विवाहकालीं ह्मटल्या जाणाऱ्या मंत्रांची दुर्बोधता लक्षांत घेऊन या प्रसंगीं प्रेमाचे पोवाडे अगदीं शुद्ध मराठींत तयार करवून कांहीं मुलांच्या करवीं ते खड्या व तालबद्ध सुरांत वधू, वर व इतर जन यांना ऐकविले. पुरोहिताचें अथवा उपाध्यायाचें काम संस्कृतभाषाभिज्ञ व गीर्वाणवाणीचे आचार्य प्रोफेसर घमेंडे चालवीत होते. ज्यांच्या संस्कृत पुस्तकांना एक आधुनिक शास्त्री "एक बोळ दाखविणारें व दुसरें भांदरांत ढकलणारें असें नेहेमीं ह्मणत असतात ते प्रोफेसर घमेंड्यांचे परात्पर गुरु हा प्रसंग साजरा करण्याकरितां हजर होते. कलाविशारद ही इकडील परी-क्षांची ओळीनें सनदा पटकावून आपल्या वरील दोन पुस्तकांच्या जोरावर ज्यांनीं एका पाश्चात्य गीर्वाणभाषाजिज्ञासु राष्ट्रांतील पंडितांकडून एक उपपद मिळविलें; व दुसऱ्या एका विद्वानाला त्याहून श्रेष्ठ दर्जाचें उपपद मिळत असतां त्यांत खो आणला असें ह्मणतात; ज्यांना त्यांच्या पगारी गुरुकर्माबद्दल सरकारांतून बहुमानाच्या शाब्दिक देणग्या पदवीच्या रूपानें मिळाल्या होत्या, जे प्रार्थनासमाजाचे महामुनि, त्यांनीं आपल्या नांवलौकिकास साजेसें भाषण या विवाहोत्सवांत केलें. त्यांचा सगळा भर 'जुनें तेवढें वाईट' या सुधारकी आद्य तत्त्वावर होता. वधूवरांनीं लोकनिंदेची पर्वा न बाळगतां जें मनोधैर्य दाखविलें, तें स्तुत्य आहे असें सांगून त्यांनीं त्या दोघांचें अभिनंदन केलें. पतिपत्नीचा संबंध शुद्ध प्रेमाचा असावा व तो जुन्या विवाहांत वधूवरें अपरिचित व शरीर-संबंध ह्मणजे काय याविषयीं अजाण असण्याइतकीं अल्पवयस्क असल्यानें साधत नाहीं. प्रस्तुत विवाह हा दोघांचाहि दुसऱ्यांदा असल्यानें विशेष मान देण्यास योग्य आहे. रा. शकार व मनोरमाबाई या दोघांचें प्रेम शरदृतूंतील शुक्लपक्षी चंद्राप्रमाणें प्रतिदिनीं एकेक कलेनें वृद्धिंगत होत जाऊन समाजास आल्हादकारक होवो अशी सदिच्छा त्यांनीं प्रकट केली. अशा तऱ्हेचे विवाह समाजांत जों जों अधिक होत जातील तों तों आपल्या राष्ट्राचें

नष्टचर्य अंशाअंशानें कमी होत जाऊन लवकर भाग्योदय होईल अशी आशा त्यांनीं दाखविली व विधवाविवाह, अबलोन्नति इत्यादि सुधारणेच्या मूलतत्त्वांचा सणसणीत उहापोह करून या दंपत्याच्या मनोधैर्याचा कित्ता गिरवावा असा उपदेश करून टाळ्यांच्या गजरांत हें जाडें प्रस्थ आसनस्थित झालें. पुनर्विवाह, संमतिबिल, युनिव्हर्सिटी कमिशन इत्यादि कित्येक बाबींत ज्यांनीं अश्रान्त परिश्रम करून वैभवशाली अपयश कमाविलें त्यांचा सद्बोध जमलेल्या स्त्रीपुरुषांच्या मनावर चांगलाच ठसला!

प्रोफेसर घमेंड्यांनीं वधूवरांच्या हातांत पुष्पहार देऊन तोंडानें 'आह्मी निष्कलंक चित्तानें व शुद्ध सात्त्विक प्रेमानें परस्परांना वरतों' अशा अर्थाचीं मराठीं वाक्यें वदवीत ते एकमेकांच्या गळ्यांत घालण्यास सांगितलें व ते ह्मणाले—"सन्मान्य प्रेक्षकहो, पतिपत्नीरूप मानवी पुष्पांची माला सुतासारख्या निर्जीव व दृश्य पदार्थानें गुंफतां येणार नाहीं. या दोन जीवांना सांधणारें सूत्र फारच कोमल परंतु अदृश्य आहे. तें प्रेमसूत्र या दोन्ही जीवांचा आयुष्यकाल सुखमय करो. सद्भावना ही कार्यक्षम असते असा मानसशास्त्राचा अनुभविक सिद्धान्त आहे. आपल्या मनांत वसणारी एखाद्या विषयीची बरीवाईट इच्छा त्या माणसावर कार्य करीत असते या नियमाला अनुसरून जर आपण या सन्मान्य वधूवरांचा जीवनकाल सुखाचा जाण्याविषयीं इच्छा बाळगली तर त्या इच्छाबलानें अनंत विघ्नें निरसून हीं दोघें आमरण सुखांत राहूं शकतील. जनहो, या मंगल समयीं आपलें मन निर्विकार व प्रेममय असूं द्या. आपण सर्व या दोघांस आशीर्वाद द्या. ह्मणा त्रिवार उच्चारा "स्वस्त्यस्तु मंगलं भवतु."

या शिक्षित व हौसेनें भिक्षुक कर्म करणाऱ्या उपाध्यायांच्या आज्ञेला मान देऊन प्रेक्षकवृंदांनीं तीनदां मोठ्यानें वरील शब्दांचा घोष केला व नंतर चार पांच मिनिटें सारखा टाळ्यांचा गजर प्रार्थनामंदिरांत दुमदुमत होता.

उपाध्याय व त्यांचे गुरु यांचीं भाषणें झाल्यावर आणखी बरेच जण आपआपल्या अवसानाप्रमाणें बोलले व हारतुरे, गजरे, अत्तरें वगैरे सुगंधी

द्रव्यांची वांटणी झाल्यावर मंडळीपैकीं प्रत्येक जण या नूतन वधूवराजवळ येऊन अभिनंदन करून निरोप घेऊं लागला. सानंद मुखानें वेळांत वेळ काढून सहपरिवारें कार्यसिद्धीला हजर राहिल्याबद्दल तें जोडपें आभारवचनें उच्चारण्यांत गर्क झालें होतें. फिरून ब्यांड झडूं लागला व तासाभराच्या आंत सगळा दिवाणखाना रिकामा पडला.

दुसऱ्याच दिवशीं कांहीं सणानिमित्त सुट्टी असल्यामुळें भोजनसमारंभ उरकला, तेव्हां टेबलावर मेजवानी झाली. लग्नाला कोणत्याहि जातीच्या सह्रानुभावी इसमाला येण्याची परवानगी होती तेंच धोरण जेवणाऱ्या वेळीं कायम राखण्यांत आलें होतें. इंग्रजांच्या ज्ञानदानाचा फायदा घेऊन महत्पदाला चढलेले बरेच हलक्या मानल्या जाणाऱ्या जातींतले इसम या बड्या खान्यांत ब्राह्मणाच्या खुर्चीशीं खुर्ची लावून अगदीं मोकळ्या मनानें हजर होते. यद्यापि वर्ज्य पदार्थांना या भोजनांत मज्जाव नव्हता व जुन्या लोकांत तंबाखू खाणारांची जशी सोय करण्यांत येते तशी औषधाच्या नांवाखालीं सुरापान करणारांना त्यांच्या आवडीच्या पेयासाठीं खिन्न न होऊं देण्याची तजवीज होती. अंड्यासारखे अभक्ष्य पदार्थहि उपयोगांत आणल्याची लोकांत वदंता होती व त्या समजावर लोकांनीं कित्येक इसमांवर ग्रामण्य केलें व त्याचा आपल्या बाणेदारपणानें प्रतिकार न करतां ज्या अर्थीं प्रायश्चित्ताची सक्षौर शिक्षा भोगून कांहींनीं बहिष्कारांतून मोकळीक करून घेतली त्या अर्थीं अभक्ष्यभक्षणाच्या लोकवार्तेंत सत्य आहे असा निष्कर्ष सामाजिक चर्चा करणारे ठासून काढूं लागले. आपल्या कृत्यामुळें लोकांची नाराजी झाली तरी तिला भीक न घालणारे हरीचे लालहि पुष्कळ होते पण त्याबद्दल लोक ह्मणत कीं, हा केवळ द्रव्याचा परिणाम आहे. व द्रव्याचा जोर फार दिवस चालणार नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं तर या समारंभाला साजरा करणाऱ्या लोकांपैकीं पुष्कळ जण आपल्या बायकांमुलांना समाजांत त्रास होतो अशीं गाऱ्हाणीं आपल्या मित्र मंडळींत सांगूं लागले होते. त्यांपैकीं एकाची बायको कोठेंशी हळदी कुंकवाला गेली तर तिला तेथें अगदीं उघड मनाई

करण्यांत येऊन नालस्ती झाली. दुसऱ्या एकाच्या घरीं हळदीकुंकवाचा मोठा जंगी थाट केला असतां त्यांच्याकडे एकहि स्त्री न गेल्यानें सगळा बेरंग झाला अशी तक्रार त्यानें स्वजनांत केली. पुरुषाप्रमाणें बायकांचीं मनें निगरगट्ट झालीं नसल्यामुळें त्यांनीं आपल्या धर्मकर्मांना फांटा दिला नव्हता. बोडण, सुवासिनीभोजन वगैरे जे अनेक आचार त्यांना पाळावेसे वाटत ते आपल्या नवऱ्यांच्या सुधारकी सबगोलंकाराच्या उद्योगामुळें सिद्धीस जाईनात तेव्हां त्यांनीं आपल्या पतींची कानउघाडणी करण्यास सुरुवात केली. कोणा एका रावसाहेबांच्या कन्येला स्थळच मिळेना व सुधारणेचीं प्रौढविवाहादि तत्त्वें बोलण्यापलीकडे फारशीं अमलांत आणण्याचें धैर्य नसल्यानें त्यांनीं जिकिरीस येऊन प्रायश्चित्त घेऊन स्वतःचें कुळ पावन केलें व नंतर मुलीला स्थळ मिळालें. बाहेर लोकनिंदा व घरांत बायकांची नाखुषी या दुहेरी काचानें पुष्कळ प्रोफेसररावबहादुररावसाहेबांची रग जिरून ते रंजीस आले व चोरून मारून लोकांना खुष करण्याचे प्रयत्न चालू करून कुटुंबसुखाकरितां त्यांनीं आपल्या ब्रीदाला तिलांजली दिली.

उत्सव साजरा करणारांची ही स्थिति झाली मनोरमाताई व रावबहादुर शकार यांचा प्रेमसंबंध पुढें कसा काय चालला हें पहाण्यापूर्वीं आपण दुसऱ्या एका व्यक्तीच्या संभाषणाकडे वळूं.

---

## प्रकरण चवदावें.

## दत्तोपंत.

---

या लग्नाची चर्चा गांवांत एक महिनाभर तरी सारखी चालली होती. व त्याला प्रल्हादपंतांचें घर कांहीं अपवाद नव्हतें. बायकांमध्यें सुद्धां त्याबद्दल वादविवाद होऊन उमेला बायाबापड्या आपल्या भावजयीचे उद्योग पहा ह्मणून चिडवीत असत. ती त्याला उत्तर काय देणार? ती ह्मणे "ज्यांना मनुष्यस्वभावांत निरंतर वसणाऱ्या नीच भावना आवरत नाहींत

त्यांनीं त्या पुरवण्यासाठीं चोरटीं कुकर्मे करण्यापेक्षां राजरोस पुनर्विवाह करावा हें चांगलेंच. बाकी नीच वासना बहकूं देऊन त्यांच्या अधीन होणें अधमपणाचें आहे असेंच कोणीहि सांगेल. ज्याचें कर्म त्याच्या बरोबर. जो करील तो भरील."

सावित्रीबाई एकदां वदल्या— "अलीकडे मुलींना शिकवावें असें सगळेजण ह्मणतात व पूर्वी पेशवाईंत जसें सांगतात कीं, मुलीला स्थळ पहायचें झालें तर वराचें मोडी अक्षर अन् वळण पहात असत तसें हल्लीं मुली ठरवायच्या झाल्या ह्मणजे त्यांचें शिक्षण किती यत्ता झालें याची लोक चवकशी करतात. शिकून आपल्या जुन्या चालीरीतीला व घराण्याला काळोखी आणण्यासारख्या या असल्या लाजिरवाण्या गोष्टी अगदीं उघड भीड टाकून करायला मात्र बायकांना सुचूं लागलें. यापेक्षां आह्मां जुन्या बायकांना एक अक्षर सुद्धां येत नव्हतें तें काय वाईट ? अक्षरशत्रुत्व बरें, नीचपणा करायला शिकवणारें शहाणपण नको."

यशोदा एका मैत्रिणीशीं याच विषयावर बोलतांना ह्मणाली— "कायग या दोघांचा संसार कसा चालणार ? उद्यां समज दोघांचें कांहीं निमित्तानें बिघडलें तर मग तो ह्मणेल माझी पहिली बायको फार चांगली होती. ती ह्मणेल माझा पहिला नवरा नसे मला कधीं त्रास देत. मग या दोघांमध्यें आपल्या गेलेल्या माणसांचे गुण गाऊन खडाजंगी उडणार नाहीं का ? इश्श ! एका बाईला दोन नवरे कसेंसेंच वाटतें नाहीं कानाला ? कलियुगालाच साजतील अशीं कर्मे."

प्रत्युत्तरार्थ ती मैत्रीण ह्मणाली— "आपल्या ब्राह्मणांत व कुणब्यांत फरक काय तो आतां नांवाचा उरला. त्यांच्यांत नाहीं का पाटाचीं नवराबायको असत. तसेंच ब्राह्मण हे आचारविचारानें श्रेष्ठ हें आपलें उगीच ह्मणायचें. आतां ते दिवस गेले."

शेजारीं एक साधारण जाणती मुलगी होती ती चटकन् बोलली— "पण काय ग वहिनी, या पुनर्विवाह करणाऱ्या बाईला जो मुलगा आहे

तो कोणत्या नांवानें ग हांक मारणार या बोवाला ? बाबा ह्मणायला हा कांहीं त्याचा मुलगा नव्हे."

आणखी एक जराशी वात्रट होती ती ह्मणाली— "कुणव्यांत एखाद्याचा अगदीं पाणउतारा करायचा असला तर तूं "बारा बापाचा सोळा बापाचा" अशा शिव्या देतात त्या माणसाला आपल्या आईवर भलतेंच कुभांड घेतल्याबद्दल राग येऊन तो चिडतो. पण इथें तर तो मधुकर का फिदुकर तो दोन बापाचा नव्हे का ?"

ही व अशा प्रकारच्या चर्चेची जशी बायकांत तशीच पुरुषांतहि वाण नव्हती. एके दिवशीं दत्तोपंत भाडें देण्यासाठीं प्रल्हादपंताकडे आला असतां तो सुट्टीचा दिवस असल्यामुळें प्रल्हादपंतानें दत्तोपंतास तो काम झाल्यावर जाऊं लागला तेव्हां हटकलें व बसण्यास खुर्ची पुढें केली. अलीकडे प्रल्हादपंताची व त्याची जराशी जास्त ओळख पडली असून ते कधीं कधीं बोलत असत. परंतु प्रल्हादपंतानें होऊन हांक मारल्याशिवाय दत्तोबा सहसा चुकून देखील तिकडे जात नसत. त्या दिवशीं दत्तोपंताला बसवून घेतल्यावर त्यांच्यांत इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्या व मनोरमेच्या पुनर्विवाहासंबंधीं बोलणें निघालें. तो विषय ऐकतांच दत्तोपंताच्या चेहऱ्यावर कालिमा येऊन तो एकदम स्तब्ध झाला. आपल्या अंतर्विकारांची झांक चर्येवर न खुलून आपली चलबिचल कोणाच्या दृष्टीस न पडावी ह्मणून तो खटपट करी पण यावेळीं त्याचे प्रयत्न व्यर्थ जाऊन तोंड खरकन् उतरलेंच. प्रल्हादपंताला आश्चर्य वाटल्यावांचून कसें राहील ? मनोरमेच्या विवाहाचा प्रश्न या गृहस्थाच्या मनावर असा भलताच परिणाम होण्यास कां कारण व्हावा हें त्याचें त्यास न कळून तेहि झाल्या प्रकाराबद्दल विचार करीत दत्तोपंताप्रमाणेंच स्तब्ध बसले. दत्तोपंताचा चेहरा नेहमीं उदास दिसे तो फिरून तसा दिसूं लागण्याला जवळ जवळ दोन तीन मिनिटें लागलीं. नंतर खेदानें दत्तोपंत ह्मणाला—

"मी जगांत एक अत्यंत अभागी प्राणी असल्याचें दोनतीनदां मागें

सांगितलेंच. माझ्या मानसिक व्याधीचा शरीरावर इतका विलक्षण आघात झाला आहे कीं, कधीं कधीं निष्कारण माझ्या मनांत कांहीं निराशेचे विचार येऊन चेहऱ्यावर अचंबा वाटण्यासारखी ग्लानि येते. हा विकाराचा दोष आहे व तो आतां माझ्या मुद्रेवर तुह्मांला दिसला असेल. त्यासाठीं विशेष विचार करून डोकें शिणवण्याचें कारण नाहीं. बरें तुह्मी मघाशीं काय ह्मणालांत ! फिरून सांगा. असा भ्रम मला कधीं कधीं होतो."

प्रल्हादपंताला दत्तोपंताच्या विकाराचा हा पहिलाच अनुभव होता तेव्हां अमुक एका विशिष्ट विषयामुळें त्याच्या मनावर कांहीं आघात होतो कीं काय हें ताडून पहाण्यास त्याजवळ साधन नव्हतें. त्यांनीं दत्तोपंताच्या बोलण्यावर विश्वास ठेवला व ते ह्मणाले–"मनोरमाबाईच्या लग्नामुळें गांवांत मोठीच धामधूम उडाली आहे. कित्येकांवर ग्रामण्य झालें आहे, कित्येक प्रायश्चित्तें घेत आहेत, सगळा एकच गोंधळ चालू आहे."

"अहो, आजच्या सुधारकांना आपण नवीन धर्म स्थापूं अशी घमेंड आहे. नवीन धर्म प्रचलित करणारांचा छळ होतो हें तत्त्व उराशीं बाळगून ते लोकमताची पर्वा करीत नाहींत. पण अशा तऱ्हेनें स्वजातीशीं फटकून वागल्यानें नवीन धर्म प्रचारांत येत नाहीं. लोकनायक नेहमीं साधारण लोकांतच वागतात. हिंदुस्थानचे लोक कांहीं आफ्रिका खंडांतले रानटी नीग्रो नव्हेत कीं, चार दोन मिशनऱ्यांच्या प्रयत्नानें सबंध खंडचें खंड ख्रिस्ती बनेल. हिंदुधर्मांत स्वत्व ह्मणून कांहीं आहेच व आज हजारों वर्षें परधर्मीयांचे टोले सोसून फिरून जसाच्या तसा कायम रहाणारा हा हिंदुधर्म अशल्या थोड्याशा रावबहादुरांच्या यत्नानें डगमगेल असें ह्मणणें मूर्खपणाचें होणार नाहीं का ? आमचें धर्मशास्त्र मुळींच अवगत नसतां स्वधर्मप्रसारासाठीं दुसऱ्या धर्माची टवाळी करणाऱ्या ख्रिस्ती लोकांच्या तालावर आमचा नाच चालू आहे. फुरसतीच्या वेळांत धर्मसंस्थापना करूं पहाणारांचा प्रयत्न टिटवीच्या समुद्र पिऊन टाकण्याच्या हिंमतीप्रमाणें अगदीं गचाळ आहे. शंकराचार्यांनीं धर्मसंस्थापना केली पण रोजगार धंदा संभाळून पैसे

गांठीला पाडून, मानमरातबासाठीं राजसत्तेची खुशामत करून त्यांच्या हातून तें कार्य तडीला गेलेलें नाहीं. त्यांनीं सारा जन्म तेवढ्याच हेतूला वाहिला. राजसत्तेचा पाठिंबा असलेल्या बुद्धधर्माला त्यांनीं माघार घ्यावयाला लावली, त्याचा नायनाट केला, तो कशाच्या जोरावर ? रामदासांना कसे कष्ट पडले तिकडे पहा. दुर्मतांच्या संस्कारानें धर्माला जीर्णता आल्यास त्याचें पुनरुज्जीवन करायला असे परिश्रम लागतात. मग अजीबात नवीन धर्म राष्ट्रांत फैलावण्याला किती कष्ट व केवढी योग्यता संपादली पाहिजे बरें ? या सुधारकांची अशीच फजिती व्हायची.''

प्रल्हादपंतांनीं हें साद्यंत ऐकून जरा वेळ मौन धरलें.

दत्तोपंत हा अतिशय मितभाषी असल्याचें प्रल्हादपंतांच्या पुष्कळदां अनुभवास आलें होतें. त्यामुळें यावेळीं तो इतकें थोरलें भाषण कसें बोलला याबद्दल प्रल्हादपंताला नवल वाटलें व तें आटपल्यावर ते ह्मणाले—

''दत्तोपंत, तुह्मी ह्मणतां तें अगदींच खोटें आहे असें मी ह्मणत नाहीं. हिंदुस्थानच्या लोकांना आपलेपणा आहे व त्याचा संस्कार त्यांच्या हाडामासांत आज हजारों वर्षे खिळलेला असल्यानें तो समूळ नाहींसा करण्याचा सुधारकांचा खटाटोप सिद्धीस जाणार नाहीं असेंहि मला वाटतें; पण एखादें झाड साफ उपटतां आलें नाहीं तरी त्याला सारखे धक्के देत गेल्यास कालांतरानें त्याचीं मूळें ढिलीं पडल्याशिवाय खास रहाणार नाहींत. तद्वत् हिंदुधर्मावर या सुधारणेचे आघात बसून बसून त्याच्या आचारविचारांचे बंध शिथिल झाल्यावांचून कसे रहावे ? व हा प्रकार अप्रतिबंध असाच चालल्यास थोडक्या काळांत हिंदुसमाजामध्यें मूळच्या हिंदुत्वाची ओळख सुद्धां नाहींशी होईल.''

''तुह्मी ह्मणतां तें अगदीं बरोबर आहे. एकदां शिवपार्वती हिमालयावर क्रीडा करीत असतां सूर्य मावळून चोहोंकडे काळोख पडूं लागला. हिमालयावरील सगळ्या पदार्थांच्या रूपरेषा त्या अंधारांत लोपून एखादी खोल दरी व पर्वताचीं उंच शिखरें यांमध्यें भेद कळेनासा झाला, ह्मणजे खोली

आणि उंची यांच्यासारख्या परस्परविरुद्ध बाबी देखील सारख्या वाटूं लागल्या. या प्रसंगाचें वर्णन करतांना कालिदासानें शिवाच्या तोंडीं पार्वतीला उद्देशून फारच मार्मिक वाक्य घातलें आहे. तो ह्मणतो-“धिङ्महत्त्वमसतां हृतांतरम्” उच्चनीच, लहानथोर इत्यादि भावनांतलें अंतर हरण करणाऱ्या असज्जनाच्या महत्त्वाला धिक्कार असो ! या भूतसृष्टींत जशी रोज एकदां पूर्वेस व एकदां पश्चिमेस श्रीसूर्यनारायणाची स्वारी उजळीत असते तद्वत् राष्ट्राच्या वैभवांतहि प्रकार चालू असतो. भाग्यसूर्याचें तेज आज पाश्चिम दिशेस निरभ्र पडल्यामुळें त्या देशांची भरभराट आहे, व जें राष्ट्र प्राचीन कालीं विद्याकलांचें आद्यपीठ मानलें जात होतें ज्याच्या विद्याधनाचा अपहार करण्यासाठीं आज पश्चिमदिग्वासी झटत आहेत व ज्याचें ऐश्वर्य ग्रीस, रोम, चीन इत्यादि राष्ट्रांच्या उदयाचें स्वप्नहि पडलें नव्हतें त्या काळीं सगळ्या जगांत निष्कलंक, तेजःपुंज ह्मणून मिरवीत होतें, त्या पूर्वेकडच्या श्रेष्ठ राष्ट्रावर आज दुर्भाग्याचा काळोख पडूं लागला आहे. आमचे डोळे आज अंध झाले आहेत. परक्यांच्या दिवट्या हाताशीं धरून आज आह्मांला हुडकावा लागत आहे. एखाद्या पश्चिमेकडच्या संस्कृतज्ञ अल्पपंडितानें आमच्या प्राचीन विद्यांच्या बडेजावीची मशाल आमच्यापुढें धरली ह्मणजे आह्मांला आमचे पूर्वज जाडे विद्वान् व प्रचंड तत्त्वज्ञ होते हें दिसूं लागतें. आमचे वर्णाश्रमधर्म, जाति आज कांट्यांसारख्या हृदयांत सलून त्या मानसिक काळोखानें तो भेद आह्मांला समजेनासा झाला आहे. सवगोलंकार करणाऱ्या या असज्जनाच्या महत्त्वाला कालिदासाप्रमाणें मीहि धिक्कारतों. अंधेरांत काजव्याची क्षुद्र चमक देखील जशी कौतुकाला कारण होते तशी आज एखाद्या अल्पज्ञ संस्कृत पंडिताच्या फुशारकीपुढें प्राचीन तत्त्वज्ञ महापुरुषांची आठवण बुजून त्यांच्या ओंजळीनें पाणी पिण्याची आमची तयारी झाली आहे. प्रल्हादपंत, दुसऱ्याच्या ओंजळींतलें पाणी निःसत्त्व असतें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. संस्कृत विद्या वस्तुतः आमची असून ती पश्चिमेकडच्या एखाद्या

परपंडिताच्या गुरुमुखानें शिकण्याचा आह्मांवर प्रसंग येतो तेव्हां आमच्या निःसारत्वाची वेगळी ओळख द्यायला नको. स्त्रिया दुष्ट झाल्या कीं वर्ण-संकराला मूळ फुटतें अशी ओरड कृष्णापाशीं करणारा अर्जुन वेड्याच्या इस्पितळांत पोंचविण्याच्या लायकीचा होता असें नको का ह्मणायला? आमच्या पूर्वजांना मूर्ख ह्मणणारे आजचे शिक्षित पुरुष या काळोखानें अंध झाले नाहींत असें कसें ह्मणावें? प्रल्हादपंत, सध्यांच्या स्थितीचा विचार डोक्यांत आला कीं, माझ्या अंगाची लाही होते. ज्या पूर्वजांच्या परिश्रमानें आज आह्मी जगावर जिवंत आहों त्यांना सरसकट वेड्यांच्या माळेंत गोंवून वाटेल तसा धिंगाणा घालायला सांपडावा ही सुधारकांची युक्ति आहे. ज्यानें उठावें त्यानें मी शहाणा अशी बढाई मारीत सुटावें व त्याच्या बोलक्या चळवळीला मोहून लोकांनीं आपल्या पुढारीपणाचीं सूत्रें त्याच्या हवालीं करावीं असे दिवस आज आले आहेत. सगळ्या हिंदुस्थानाचा प्रश्न राहो पण एकट्या महाराष्ट्राचें तरी कल्याण या आजच्या चळवळखोरांनीं काय केलें आहे? उलटपक्षीं सद्यःस्थितीची बरोबर चिकित्सा करून रामबाण उपाय योजणारे वैद्य आज हालअपेष्टा काढीत आहेत, व एका वर्तमानपत्राच्या परवांच्या एका अंकांत या मनोरमेच्या व रावबहादुराच्या लग्नाला प्रशंसनीय ह्मटलें आहे व दुर्बळ, अडाणी, सुधारक अशीं लग्नें होऊं लागलीं ह्मणजे राष्ट्राचा उत्कर्ष होईल ह्मणतात! वारेवा! कार्यकारणभाव फारच खासा—"

बोलतांना दत्तोपंताचें मन इतकें क्षोभलें कीं, चार वाक्यें सुद्धां मागचा पुढचा संबंध राखून त्यास बोलतां येईनात व त्याच्या अशक्त प्रकृतीवर चित्तक्षोभाचा परिणाम होऊन शेवटीं तो भाषणाचा ओघ सोडून अगदीं गप्प बसला. प्रल्हादपंतांला तर त्याचें बोलणें जों जों जोरांत येऊं लागलें तों तों कौतुक वाटूं लागलें परंतु बोलणें एकदम खुंटल्यामुळें त्यांस वाईट वाटलें व फिरून त्यांनीं भाषणास आरंभ केला.

दत्तोपंत धापा टाकीत होता.

"तुह्मी कालिदासाचें ह्मणून ह्मटलेलें वचन फारच मार्मिक आहे बोवा!

खरोखरच आज तसा काळोख निःसंशय पडला आहे."

दत्तोपंत यावर कांहीं न बोलतां उठून चालता झाला.

* * *

त्याच दिवसाची संध्याकाळ. दत्तोपंत मुलाच्या शिकवणीसाठीं मनोरमेच्या घरीं गेला होता. रोजच्याप्रमाणें मधुकर त्याच्या शेजारीं अभ्यास करण्यासाठीं येऊन बसला. परंतु त्याच्या मुद्रेवर रोजच्यासारखी हुशारी नव्हती. दत्तोपंताचा त्या मुलावर इतका लोभ जडला होता कीं, त्याची दीन चर्या पहातांच त्याला दुःखाचा उमाळा आला व तो कळवळ्यानें ह्मणाला—

"बाळ, आज तूं असा खिन्न कां रे ?"

"काय सांगूं मास्तर, आतां मला आईला सोडून दुसरीकडे कुठें बोर्डिंगांत पाठवणार आहेत. प्रोफेसर घमेंडे, रावसाहेब [या नांवानें तो मनोरमेच्या बीजपतीला ओळखीत असे] व आई या तिघांच्या मसलतीनें हें ठरलें आहे. त्यांनीं मला दुपारींच सांगितलें त्यामुळें मला दिवसभर बरेंच वाटत नाहीं."

बापाचा सहवास तर नव्हताच, पण आईच्या प्रेमळ सान्निध्याच्या वियोगाची कल्पना त्यास सहन न होऊन तो भ्रमिष्ठासारखा झाला होता. हें त्याचें करणें कांहीं आस्वाभाविक नव्हतें. "बाळ, तुला दुसरीकडे पाठविण्याचें कारण काय तें कांहीं कळलें का ?"

"मधुकराला घरीं ठेवल्यानें तुझ्या माझ्या प्रीतींत अंतर पडेल असे शब्द आज माझ्या कांनीं सहज ओझरते आले व माझ्या पोटांत धस्स झालें."

दोघे कांहीं वेळ गप्प बसले नंतर मधुकर बोलूं लागला—

"अलीकडे माझ्याशीं रावसाहेब नीट वागत नाहींत. परवां एकदां आई अन् ते दिवाणखान्यांत बोलत बसले होते तेव्हां रावसाहेबांनीं आईच्या खांद्यावर हात टाकला. आईनें तो झिटकारला व ह्मणाली कीं, मी लग्न कांहीं सुखासाठीं केलें नाहीं. लौकिकासाठीं केलें. तेव्हां रावसाहेब जवळ आले. मला तें चमत्कारिक वाटून मी त्यांना ह्मणालों— 'रावसाहेब हें

करणें मला आवडत नाहीं. माझ्यादेखत माझ्या आईशीं असे घाणेरडे तुह्मी कां वागतां ?' त्या वेळेस त्यांनीं मला एक चापट मारली व "चहाटळपणा करायला तुला कोणीं सांगितलें आहे ? फिरून मी व तुझी आई एका ठिकाणीं असतां तिथें येण्याचें तुला कारण नाहीं. आलास तर बघ तंगडी मोडून टाकीन." असें ह्मणून दोनचार शिव्या दिल्या. आईला तें खपलें नाहीं. ती रागावली व ह्मणाली कीं, माझ्या मुलाला असें गैर वागवलेंत तर माझें न् तुमचें जुळायचें नाहीं. समजलांत. एवढेंच काय तें माझ्या समोर झालें. मी तिथून पळालों."

हा संवाद चालू असतां पंतोजींना बोलावणें आलें व हें इतकेंच राहून मनोरमाबाईकडे त्यास जावें लागलें. तेथें दिवाणखान्यांत मनोरमाबाई इतस्ततः विचार करीत फिरत होती. मनोरमेनें खुर्ची पुढें करून त्यांस बसण्यास सांगितलें व भाषणाला आरंभ केला— "पंत, आह्मी मधुकराला दूर कोठें तरी एखाद्या चांगल्या बोर्डिंगांत पाठवायचा बेत केला आहे. त्याला तुमचें काय मत पडतें ?"

"मला हें संमत नाहीं ?"

कां ह्मणून विचारण्याची मनोरमेची इच्छा खरी, पण उत्तर काय येईल याच्या भयानें तिनें तो प्रश्न तेढ्यावरच सोडला.

"बरें, तें राहूं द्या; पण त्याला रवाना केल्यावर—"

"आमचें कांहीं कारण नाहीं हेंच पुढें असणार."

"नाहीं. तुमच्या तर्काच्या अगदीं उलट आहे."

"मग मी तुमच्या घरीं कशाला राहूं ?"

"माझी इच्छा आहे कीं, तुह्मी आमच्या घरींच बिऱ्हाड करावें. एवढी माझी इच्छा पूर्ण करा."

"तुह्मी सोबतीसाठीं एका पुरुषाला पतीच्या नात्यानें आपल्या घरीं आणल्यावर माझ्यासारख्या तिऱ्हाइताची सोबत हवी कशाला ?"

मनोरमा विरमली पण पुन्हां ह्मणाली— "माझ्या घरीं तुह्मीं रहावें

असें मला कां वाटतें तें मलाच समजत नाहीं."

"बाईसाहेब, तुमच्या फंदांत सांपडून प्रसंगीं माझी नाचक्की होण्याचा संभव फार. समजा मी तुमच्या घरीं राहिलों तुमच्या उडत प्रेमानें कधीं माझ्यावर स्वारी केली तर कसें होईल? असें ह्मटल्याबद्दल नाराज होऊं नका. तुमचा पहिला पति गत होण्यापूर्वी त्याच्याजवळ तुह्मी प्रेमाच्या गोष्टी बोलत नव्हतां का? मनुष्याच्या मागें जन्मतः असणाऱ्या कर्तव्यांना ज्या प्रेमानें हरताळ फासली जाते त्या प्रेमाला पुढें करून सांप्रतच्या विवाहसंस्थेंत सुधारक फरक करूं पहातात. तुमची पहिल्यापासून रहाणी नवीन चाली-रीतीला अनुसरून. तेव्हां कधीं कधीं प्रेमाच्या भरांत आपलें आयुष्य आम-रण अभिन्न व सुखपर जावें असें तुह्मी एकमेकापाशीं वदलां असल्यास त्यांत नवल नाहीं. कदाचित् प्रसिद्ध इंग्रज नाटककाराच्या रोमिओ आणि ज्युलिएट या दंपत्याप्रमाणें एकाच्या अभावीं दुसऱ्याचें जीवित नष्ट होण्यापर्यंत प्रेमा-च्या संबंधाची मजल यावी असेंहि तुह्मी परस्परापाशीं सांगत असाल. बाई-साहेब, आज तुमचीं कर्मे पहायला तर प्रथम पति जीवंत नाहींत. त्या वेळची तुमची प्रीति— नवराबायकोमध्यें तशी असणें साहजिक आहे— आज दुस-ऱ्याशीं शरीरसंबंध जडल्यानें फोल ठरलेली पाहून— समजा तो आज या जगांत अवतरून आला असला तर— त्यास काय वाटेल? मी तुमच्या घरीं राहूं लागल्यावर— माणसाची बुद्धि सदैव स्थिर राहील असा भर-वसा ठेवतां येत नाहीं ह्मणून ह्मणतों. उद्यां तुमच्या प्रेमाच्या पिशाच्चानें मला झपाटलें तर या गरीब ब्राह्मणाला विनाकारण त्रास व्हावयाचा. दुःखां-तला जीव सुखांत पडल्यास त्यांत कांहीं वावगें नाहीं, पण तुमच्या प्रेम-पाशांत मी बांधला गेलों तर अशी श्रीमान् स्त्री मिळून माझी चैन झाल्या-बद्दल मला आनंद होण्याऐवजीं त्या सुखामागें लागलेलीं अनेक संकटें टाळण्याचें माझ्यांत अवसान नाहीं ह्मणून माझा छळ मात्र होईल."

"दत्तोपंत, तुह्मी किती उघड बोलतां हो! काय बाई तरी, अगदींच उघड."

"बाईसाहेब, मी बोललों यांतलें एक अक्षरहि एखाद्या पतिनिष्ठ स्त्रीच्या समोर उच्चारवलें नसतें. कारण तिचें सत्त्व परपुरुषाला सलगी करूं देत नाहीं. परंतु तुमचें तसें नाहीं. तुह्मी आपल्या प्रेमाचा सवदा आरंभला आहे. एक नवरा आटोपतांच दुसऱ्याला चिकटणारें तुमचें मन उद्यां दुसऱ्याला विटून तिसऱ्याला बिलगल्याशिवाय राहील असें ह्मणवत नाहीं. स्पष्ट भाषेबद्दल माफ करा, पोटासाठीं नीतीचा खून करून देह बाजारांत विक्रीसाठीं मांडणाऱ्या स्त्रियांत व तुमच्यांत फरक काय ? एका नवऱ्याच्या पश्चात् चरितार्थ कष्टाचा होतो, लोक त्या दुर्भगेचा अनादर करतात एवढ्यासाठीं— स्वार्थासाठीं, नीच अप्पलपोटेपणासाठीं— दुसऱ्याला माळ घालण्यास तयार होणाऱ्या स्त्रीला कोणती उपमा द्यावयाची ? त्यांतून सध्यां मौज अशी झाली आहे कीं, अशा तऱ्हेनें स्वार्थाचा डाव साधणारांना जगांत मान्यता मिळते. नवऱ्याचें गंडांतर ठाऊक झाल्यावर सुद्धां त्यालाच वरणाऱ्या व यमाचा पिच्छा पुरवून त्याशीं हुज्जत घालणाऱ्या सावित्रींत व या स्त्रींत फरक नाहीं का ? वेडी सावित्री, तुला पुत्र होतील ह्मणतांच एखाद्याला गांठून यमाचा वर तिला खरा करतां आला नसता का ? आपमतलबाची भेसळ झालेलें प्रेम शुद्ध व पवित्र कसें मानायचें ? ताईसाहेब, गतपतीच्या जीवनकालांतले दिवस स्मरा, त्या वेळीं भावी संकट न जाणून तुह्मी त्याशीं कशा गोडीनें वागत असाल याची आठवण करा, ह्मणजे मी ह्मणतों तें खरें तुह्मांस वाटूं लागेल."

दत्तोपंताचीं कठोर वाक्यें मनोरमा अगदीं मुकाट्यानें ऐकत होती.

दत्तोपंत जाण्यासाठीं उठला तेव्हां त्याला तिनें जरासें थांबण्यास बोटानें खुणावलें. तो बसला.

ती ह्मणाली—"मास्तर तुमच्या ह्मणण्यांत गैर कांहीं नाहीं. मीं जें कृत्य लोकांत मोठेपणा मिळण्यासाठीं केलें तें वाईट असा आतां मला पश्चात्ताप होतो आहे पण हातांतून बाण सुटल्यावर तो बरोबर गेला का चुकीचा हें पहात बसणें शहाणपणाचें होणार नाहीं. दत्तोपंत, माझ्या चित्तांत रात्रं-

दिवस कृतकर्माच्या अनुतापाचा दाह होत असतो."

प्रोफेसर घमेंड्यांनीं खोलींत पाऊल याच वेळीं टाकलें व मने तोंडचीं शेवटचीं वचनें कानीं पडल्यानें "काय चाललें आहे, काय आहे" असें ते हंसत हंसत विचारूं लागले.

"कांहीं नाहीं, ताईसाहेब ह्मणतात कीं, मीं केलें हें कृत्य अनिष्ट च दत्तोपंत एकदम बोलला.

"कोणतें ?"

"ज्याबद्दल गेल्या तीन वारांत वर्तमानपत्रांमध्यें मनोधैर्याची येत आहे तें— ह्मणजे पुनर्विवाहाचें."

प्रोफेसरांच्या भ्रुकुटीचा संकोच झाला व डोळ्यांत तिरस्कारयुक्त आश्च छटा दिसूं लागल्या. "त्या पश्चात्तापाची कहाणी मनोरमाताई तु जवळ सांगतात !" मनोरमाताईकडे वळून "वहिनीसाहेब, या चाकरा तुह्मी आपलें हृद्गत ओकून टाकतां ! माणसांची खूप परीक्षा आहे ब्र आज यांच्याजवळ तर उद्यां एखाद्या मोलकरणीजवळ कांहीं बोलाल."

दत्तोपंताला राग आला. "तुह्मी अगदीं विश्वासास योग्य अशी ईश्व तुह्मांस सनद दिली आहे वाटतें ? तुमच्या वहिनीसाहेबांना आपलें मनं सांगण्याला विश्वासपात्र असा मीच आहें. तुह्मी कोण ?"

"मी कोण ? वहिनीसाहेब तुला सांगतील."

"वहिनीसाहेब, कोणहो हा ?"

"बा मास्तर" मनोरमा विनोदानें बोलली "खूप विचारलेंत. हे का जामध्यें प्रोफेसर आहेत."

दत्तोपंत ह्मणतो—"कालेजांत विद्यार्थ्यांना कुमार्गाचें शिक्षण देण्या ठेवला आहे वाटतें हा ?"

"असें भलतेंच काय बोलतां !"

"ऐका, मी असें खात्रीनें सांगूं शकतों कीं, मनोरमाताईंना पुनर्विव हाच्या कामीं अत्याग्रह करून त्या फंदांत पाडायला हा जितका कारण झा

तितका कोणी नसेल. पुनर्विवाहाच्या गोंडस नांवाखालीं मनोरमाताईच्या पातिव्रत्याचा अध:पात करायला लावणारा दुष्ट माणूस हा. रावबहादुर शकाराला मी पुरा जाणतों. त्या झोटिंगानें प्रोफेसराच्या मदतीवर आपला नीच हेतु साधला. स्नेह्यांच्या अनाथ पत्नींना सुधारणेच्या गोड दिसणाऱ्या तत्त्वांची फूस लावून व्रतभ्रष्ट करणारे चोर सुधारक या नांवाखालीं आज बडेजावीनें आज मिरविले जात आहेत. ठीक आहे. येभी दिन जायगा. ऐकून घ्या. प्रोफेसरसाहेब, तुह्मी ज्या विषयाचे अध्यापक असाल त्याचा अभ्यास कायम ठेवून त्यांत नवीन शोध करण्याचें व्रत पत्करा. विधवेनें हळदीकुंकवाची नसती उठाठेव करण्यासारखी तुमची सुधारणेची चळवळ आहे. तिऱ्हाइतांच्या बायकांना आपल्या वाग्जालांत पकडून धर्मद्रोहाच्या पिंजऱ्यांत अडकवणारा हा छद्मी हाताखालच्या शिष्यांना आपल्या मताचा उपदेश करायला कमी करीत असेल अशी कल्पना तरी होते का ? गुरुजी, मी तुह्मांला ओळखतों. लक्षांत ठेवा."

"बस बस. तुह्मी आतांच्या आतां चालते व्हा या घरांतून. मनोरमाताई, तुह्मी हलकट माणसाला विश्वासांत घेतलेंत ही मोठी चूक झाली."

"वहिनीसाहेब, तुह्मी या गळेकापूला आपल्या स्नेह्यांत गणलेंत हा तुमचा प्रमाद आहे. वहिनीसाहेबांसारख्या गरीब गाईला—पण जाऊं द्या—"

"ही मोंगलाई नाहीं लक्षांत असूं दे."

"इंग्रजी राज्य आहे."

"जबरदस्ती चालणार नाहीं."

"जाणून आहें."

"मग मद्यांची भाषा कोणाला उद्देशून वापरलीस ?"

"तुला."

"कां ?" असा प्रोफेसरांचा प्रश्न पडला.

"चार पांच दिवसांपूर्वीं रात्रीं अकरा वाजण्याच्या सुमारास रावबहादुर शकारांच्या रहात्या घरीं—"

प्रोफेसरांचा चेहरा अगदीं फिक्का पडला. मनोरमेला या चमत्काराचें कोडें पडलें. पालीपुढें विंचवाची नांगी सैल पडते तसा दत्तोपंताच्या वरील संदिग्ध वाक्याचा परिणाम प्रोफेसरावर घडला. दत्तोपंत उठून जाऊं लागला. तेव्हां त्यास अटकाव कोणींच केला नाहीं. प्रोफेसर निश्चल दृष्टीनें त्याकडे पहात होते. दत्तोपंत क्षणार्धांत दृष्टीआड झाला.

प्रोफेसर व शेजारीं मनोरमा या दोन व्यक्ति बराच वेळपर्यंत आपआपल्या विचारांत चूर होत्या. या त्यांच्या निःशब्दतेचा भंग रावबहादुरांच्या आगमनानें झाला परंतु प्रोफेसरांची प्रकृति फारशी ताळ्यावर नसल्यानें त्यांच्यांत हास्यविनोद त्या दिवशीं विशेष रंगला नाहीं. प्रोफेसरांनीं लवकरच निरोप घेतला व रावबहादुर व मनोरमा दोघेंच एकान्तांत राहिलीं.

---

## प्रकरण पंधरावें.

## मनोरमा व शकार.

विवाहसमयीं शेंकडों प्रेक्षकांनीं ज्या दंपत्यास सुखाच्या वाढीसाठीं आशीर्वाद दिले तें प्रत्यक्ष संसार करूं लागल्यावर लग्नापूर्वीचें मनोराज्य पार लयाला गेलें. सगळ्यांच्या सदिच्छा निष्फळ ठरल्या व लवकरच त्या दोघांत बेबनाव होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. "वैधव्याच्या दुर्धर पंकांत रुतलेल्या गरीब गाईचा उद्धार करण्याच्या परोपकारी तत्त्वावर विधवापुनर्विवाहाची इमारत उभारली खरी, पण मनोरमा वैधव्याचा ताप चुकविण्यासाठीं दुसऱ्याच्या गळ्यांत पडण्याइतकी जर्जर झाली नव्हती. नारायणरावाच्या जिवंतपणीं पुनर्विवाहाची चर्चा पुष्कळदां तिच्या कानावर आली असून कांहीं प्रसंगीं अशा संवादांत तीहि मन घालीत असे; पण दुर्दैवानें त्या वादाची बजावणी करण्याची वेळ आल्यावर ती पुनर्विवाह करण्यास स्वतः धजेना. नवऱ्याच्या मरणदुःखांत पुत्राच्या अस्तित्वाचें सुख लाधल्यानें तिला पतिनिधनाची फारशी हुरहुर नव्हती. परंतु द्वितीय विवा-

हाच्या कल्पना प्रत्यक्षांत आणण्याचे कामीं तिनें स्वेच्छेपेक्षां परेच्छेलाच विशेष मान दिला होता. शकारांची व तिची साधी ओळख वाढतां वाढतां नवराबायकोचा संबंध जडण्याइतकी दाट व्हावी हें चूक होऊन गेल्यानंतर तिला रुचेना; व लग्न झाल्यावर अहोरात्र प्रथम पतीचें स्मरण होऊन तिच्या मनाला विलक्षण ताप होत असे.

द्रव्यवानाला स्वजनांची अपेक्षा वाटत नाहीं व त्याप्रमाणें मनोरमेला आपल्या कृत्यानें आपण हितचिंतक आप्तेष्टांना मुकलों याचें कांहीं वाटलें नाहीं. परंतु जी गोष्ट सुखासाठीं केली ती दुःखाला कारण झाल्यानें आपण धर्मद्रोहाचें पातक केलें असें तिला जाणवूं लागलें; व रावबहादुरांना आपण जाहीर रीतीनें पति ठरविलें असलें तरी त्याचा आपला संबंध मैत्रीहून अधिक नसावा यासाठीं ती खटपट करूं लागली. त्यांत दत्तोपंताच्या प्रसंगोपात्त खडखडीत व निंदाव्यंजक भाषणाची भर पडून आपण खचित पतित बनलों अशी तिची खात्री झाली. या जगांत सुखासाठीं सगळी धडपड असते पण या जीवितानंतर मागें आपला कांहीं संबंध रहात नाहीं असें तिचें पहिलें मत बदललें. प्रोफेसरांच्या प्रेरक पांडित्यानें तिचें मन जेव्हां बहकलें तेव्हां या आयुष्यांत मौजा मारून घेणेंच प्रत्येक माणसाचें कर्तव्य आहे हें साध्य ठरविलें होतें; पण या ध्येयाच्या प्रयत्नानें पाऊल घसरतांच एकदम आपण केलें तें वाईट असें तिच्या मनानें घेतलें व ज्या पद्धतीनें आपण विवाह केला त्याच पद्धतीनें पतीला काडी मोडून देऊन मोकळें व्हावें असे विचार घोळूं लागले. आराधनकाळांत शकार जितक्या लीनतेनें तिच्याशीं वागत असत त्याच्या उलट आतां त्यांच्या वर्तनांत फेर पडला व मनोरमेच्या घरांत त्यांची मालकी सुरू झाली. शकाराचें वर्चस्व मनोरमेला खपेना व ज्याच्या संगानें आपणास या मिळकतीची धनीण व्हायला सांपडलें तिच्यावर तिसऱ्याचा ताबा झालेला पाहून ती मनांत खिन्न झाली व गतपतीचा सजीव प्रतिनिधि अपत्यरूपानें तिच्या समोर सदैव वावरत असल्यानें नारायणरावांचें स्मरण तिला घडूं लागलें.

रावबहादुरांचें व त्यांच्या सापत्न चिरंजीवाचें जमेना. दिवसांतून एव
वेळ तरी त्यांचा खटका उडेच. एकदां प्रोफेसरांनीं विचारलें,—
मधुकर, रावसाहेब तुझे कोण रे?" तेव्हां सर्वांसमक्ष त्यानें उत्तर
कीं, रावसाहेब माझे सावत्र बाप. "सावत्र बाप" हा शब्द ३
समाजाला अगदींच अपरिचित. रावबहादुरांनाहि तो कसासाच वाटल
करणार काय? "आतां पुन्हां कोणीं तुला रावसाहेबांचें नातें वि
तर माझे वडील असें सरळ सांगत जा." अशी प्रोफेसरांनीं त्यार
दिली. मधुकरानें तत्काल निर्भयपणानें प्रश्न विचारला "त्याचें माझे
सावत्रपणाचें नाहीं का? माझ्या मास्तरांनीं सांगितलें मला."

"मग तुझा बाप कोण?"

मधुकरानें चटकन् दिवाणखान्यांत लटकत असलेल्या नारायणरा
फोटोकडे बोट केलें. प्रोफेसरांना राग आला. "वहिनीसाहेब,
फार वात्रट झाला आहे. या वयांत हें गोड वाटतें पण पुढें फार
जाईल. याला चांगली शिस्त लावली पाहिजे. नाहीं तर बिघडेल. स
मास्तर फाजील दिसतो."

"पण आमचे मास्तर काय ह्मणतात ठाऊक आहे का?"

"काय, काय," सर्वांनीं उत्सुकता दर्शविली.

"परवां एकदां रावसाहेब मला रागें भरले तेव्हां 'कोण कुणावर
गाजवतो पहा' असें ते पुटपुटले. 'याचा अर्थ काय' ह्मणून
विचारलें तेव्हां "तो आईला विचार" असें त्यांनीं सांगितलें.

"बरें बरें, ही वटवट बंद कर. चल चहाटळ कुठला." रावसाहे
दरडवणीला पोर भ्यालें व आईकडे पाहून तिचें कांहीं पाठबळ मिळतें
याची त्यानें नजरेनें चवकशी केली पण तिकडून आधार दिसेना तेव्हां
या लोकांच्या डोळ्याआड होण्याचा मार्ग पत्करला.

मास्तर भलभलतें पोराच्या मनांत भरवतो यासाठीं त्याला सोड
देण्याची मसलत सुरू झाली व एकदोन दिवसानंतर मास्तरसाहे

त्यांनीं घरच्या मालक मंडळीबद्दल केलेल्या नालस्तीचा जाब देण्यासाठीं रावसाहेबांसमोर हजर रहाण्याचा हुकूम सुटला. पंतोजींना आपल्या वाक्पटुत्वानें घाबरून सोडावें असा शकारांचा आरंभीं दम होता, पण त्या दोघांच्या संभाषणाच्या पहिल्या झटक्यास तें अवसान लटपटलें व रावबहादुरांचा धीर सुटण्याचा रंग दिसूं लागला. वादाचा निकाल सांगतांना मनोरमेजवळ शकार ह्मणतात—"मास्तर अगोदर माझी मालकी कबूल करीना. तो ह्मणे मनोरमाबाईंना मी जाणतों व मुलाला मी धनी समजतों. यांच्या मालमत्तेवर तुमचा कांहीं हक्क नाहीं. मला मुळीं बोलूंच देईना. इसम फार उर्मट."

यजमानांनीं यावर आपण यंव बोललों, अमका मुद्दा पुढें केला, अमक्या प्रमाणानें आपल्या बाजूचें समर्थन झालें इत्यादि पुष्कळ पाल्हाळ सांगितला. पण दत्तोपंतानें रावबहादुरांची एकदां त्यांच्या समक्ष टर केली असल्यामुळें मनोरमाबाईला यजमानांच्या फुशारकीचा तिरस्कार वाटला. लग्न झाल्यानंतर प्रेमाचा रंग पालटून रावबहादुर अरेरावी करूं लागले होते व त्यांची संगत टाळण्याचा मनोरमेचा प्रयत्न चालू होता. लग्नापूर्वींच्या संकल्पसृष्टींत तिला जीं आशेचीं मनोरम चित्रें दिसत होतीं त्यांचा निरास होऊन तिचें लग्न ही गोष्ट भूतकालीन झाल्यावर रावबहादुर तिला परपुरुषासारखा तिरस्कार्य वाटूं लागला, व कोणत्या तरी युक्तीनें हे यजमान आपल्यापासून दूर व्हावेत अशाकरितां ती खटपट करूं लागली.

याच सुमारास रावबहादुर एकदां क्लबांतून रात्रीं ११॥ चे सुमारास आपल्या घरीं परत येत असतां अंधारांत— नव्हे म्युनिसिपालिटीच्या अंधुक उजेडांत— त्यांना 'खबरदार' ह्मणून एका व्यक्तीनें हटकलें. ती आकृति शेजारीं एका घराखालीं गटाराजवळ उभी असून विलक्षण अंगविक्षेप करीत होती. रावबहादुरांनीं जरा खाकरून हातांतली काठी सावरली व पुढें पाऊल टाकलें तों ती व्यक्ति आपलें ठाणें सोडून एकदम दहा हाताच्या अंतरावर समोर आली. शकार बारगळले व शब्दोच्चाराची शक्ति लुली

पडली. त्यांनीं डोळे मिटले. क्षणार्धांत ती आकृति जवळ आली व कांहीं कानांशीं पुटपुटली. दुसऱ्या दिवशीं म्युनिसिपालटीच्या अधिकाऱ्यांकडे राव-बहादुरांचा निकडीचा अर्ज जाऊन रावबहादुरांच्या घराच्या समोर आणखी एक दिवा लावण्यांत येऊं लागला; पण तो रात्रीं आपलें काम नीट बजा-वीत नसल्याबद्दल हाकाटी कायम राहिलीच. रावसाहेबांची वरील व्यक्तीशीं झालेली भेट त्यांच्या तोंडून जागतेपणीं बाहेर पडली नाहीं, पण झोंपेपुढें इलाज काय ?

मध्यरात्रीं शकारमहाराजांनीं किंकाळी ठोकली व "चूक झाली, आतां पुन्हां असें—" असें कांहीं तरी अर्धवट ते बडबडले. सावध झाल्यावर त्यांनीं बतावणी केली— "मी मोठ्या धैर्यानें माझें मत कृतींत वठवलें यामुळें लोक माझें वाईट चिंतूं लागले आहेत. कांहीं खोडसाळ इसम छायेप्रमाणें पाठलाग करून संधि येतांच धाकदपटशा दाखवून भेवडावण्याचा प्रयत्न कर-तात. तसेंच कांहीं आज घडलें. आज चांगली लठ्ठालठ्ठी झाली. आह्मी नामर्द नाहीं. सत्यसंकल्पाच्या सिद्धीकरितां जगाशीं महापुरुषांना कायेनें वा-चेनें व मनानें असेंच झगडावें लागतें."

या त्यांच्या सांगण्यांत कितपत तथ्य आहे याचा शोध जर कोणी करूं लागला अथवा त्यास जर एखादें कर्णपिशाच अधीन असेल तर त्यास असें कळून येईल, कीं ती व्यक्ति त्या भयाण अंधारांत, निर्जन मार्गामध्यें जेव्हां प्रथम नज-रेस पडली तेव्हां सुधारलेले व पिशाच, मंत्रतंत्र इत्यादि लोकभ्रमांची चेष्टा करणारे रावबहादुर त्या व्यक्तीस भूत समजले व तिला भय दाखवून आपल्या-वरचें संकट टाळण्यासाठीं कपड्याच्या आंत जानवें धुंडाळूं लागले. पण आपल्या उच्च मताला अनुसरून या सुतांना आपण रजा दिल्याचें त्यांस स्मरतांच पिशाचबाधा न होऊं देणारें रामरक्षास्तोत्र ते आठवूं लागले पण त्यानेंहि फसवलेंच. दाखविण्याचे व खाण्याचे दांत जसे हत्तीपाशीं भिन्न भिन्न असतात त्यासारखीच रावबहादुरांची व त्यांच्या जातीच्या इतर गृह-स्थांची स्थिति असते व त्या वेळीं तर ती अगदींच उघड झाली. कोणत्या

देवाचें नांव घेतल्यानें भुतें पळतात तें त्यांस सुचेना व त्यांनीं राम, शिव, गोविंद, अशीं नांवें उच्चारलीं देखील. अखेरीस तें झगटलें आणि त्यांच्या कानांत कांहीं तरी गुणगुणलें व नाहींसें झालें.

शकारांना पिशाचें दिसतात याचा बोभाटा होण्याला आणखी एक कारण झालें. तेव्हां ती गोष्ट लोकांत येऊन "रावबहादुरांच्या बोकांडीस भूत बसलें आहे" हा एक त्यांना वादाला विषय झाला व बायकांनीं आपल्या समजुतीप्रमाणें मेलेल्या बाया जशा आपल्या सवतींना छळतात तसा मनोरमाबाईचा पहिला नवरा रावबहादुरांच्या मानगुटीला बसला आहे अशी त्या भूतावर कल्पना बसविली.

मनोरमेला या बीजपतीबद्दल फारसा आदर वाटत नव्हता. त्यामुळें तिनें एकदां त्यांच्या स्पष्ट कानीं घातलें—"मी लग्न सुखासाठीं केलें नाहीं. माझा यांत हेतु फक्त लौकिकाचा आहे. आपण यापुढें विशेष संबंध ठेवूं नका."

"लाडके, छान फार छान बोललीस."

"मला ही सलगीची भाषा देखील सहन होत नाहीं."

"केवळ प्रेमाच्या पायावर ना ही आपल्या संसाराची इमारत?"

"हें प्रेम धर्माला मान्य नाहीं."

"एखाद्या कर्मठ बाईसारखी तूं सुद्धां धर्माला कवटाळायला लागलीस."

"त्याला माझा निरुपाय आहे."

"मग पुढें काय?"

"आपण अतःपर मी आपली पत्नी नाहीं असें समजून घरांत रहा."

"घरांत पूजेला ठेवलेल्या ब्राह्मणासारखी माझी स्थिति होणार तर!"

"ती कशीहि होवो. मीं हें पाप केलें असें मला वाटतें."

"पण मला हें खपावें कसें?"

"हा इच्छास्वातंत्र्याचा काळ आहे. पत्नीला पतिसमान हक्क असतात."

"हें जुळणार नाहीं."

मनोरमा मुकाट्यानें बसली. इतक्यांत पुढलि शब्द कानीं आले—

"बुडत्यानें वर येण्याची धडपड केली तरी तो खोलांतच जायचा. तुझी भ्रष्टता आतां कोणत्याहि उपायानें भरून येणार नाहीं."

शब्दोच्चारक कोण याचा तलास लावण्यासाठीं अर्थातच रावबहादुर आसन सोडून उठले. तोंच "भूत— अरे मेलों" असा त्यांच्या तोंडचा ध्वनि घरांतल्या नोकराचाकरांस जागें करण्यास कारण झाला. ही गडबड थोडक्यांत मिटली पण तेवढ्यानें वर वर्णन केल्याप्रमाणें लोकांत गवगवा झाला. शकार रात्रींचे ओरडून झोंपमोड करतात ह्मणून नोकर कुरकुरूं लागले होते.

शकार व मधुकर या नवीन बापलेकांमध्यें पहिल्यापासूनच मेळ नव्हता. शकार हा कोणी परका गृहस्थ आहे एवढी जाणीव त्यास चांगली असून तिचा अनुभव शकारास पदोपदीं येऊं लागला. मारण्याची भीति घालून मुलाच्या विक्षिप्त कल्पना घालविण्याचा प्रयत्न सरल्यावर मारून देखील पाहिलें पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मधुकरावर गाजविला जाणारा शकारांचा अंमल मनोरमाबाईच्या असंतोषांत भर पडण्यास कारण होऊन सावत्र बापाच्या हक्काचें भांडण सुरू झालें. आपल्याविरुद्ध पोरटा वागतो एवढेंच नसून त्याला आपल्या पत्नीची फूस आहे हें समजल्यावर रावबहादुरांच्या अंगाची आग होई, त्यांस आपण एकदम अनियंत्रित सत्ता गाजवावी असें वाटे. परंतु समान हक्क, मतस्वातंत्र्य, यांची आठवण देऊन मनोरमा त्यांचा हिरमोड करी. शेवटीं या कारट्याच्या पायीं आपल्या प्रेमांत भंग पडणार असें निदान काढून त्यास मुंबईसारख्या शहरीं विद्याभ्यासासाठीं बोर्डिंगांत अडकवून हा कांटा उपटावा असा विचार रावसाहेबांनीं केला व आपली वर्तणूक पाहून मुलाला लागूं पहाणारें भलतेंच वळण या मार्गानें टळेल असें समजून तिनेंहि त्यास— मोठ्याशा आनंदानें नव्हे— संमति दिली. परंतु या वेळीं आणखी एक प्रश्न उपस्थित झाला.

रूढमताची विटंबना करणारांवर व धर्माला असंमत गोष्टी प्रचारांत आणूं पहाणारांवर लोकांची नाराजी व्हायची हें ठरलेलेंच होतें, त्याप्रमाणें मनोरमेच्या

घरावर बहिष्कार पडला. तिच्या घरीं अन्नपानादि क्रियेला तर नाहींच पण सहज देखील कोणी पाऊल टाकण्यास धजेना. एकट्या दुकट्याच्या कृत्यानें यांच्या सबंध आप्तेष्टांचे हाल होऊं लागले. विष्णुपंतासारख्या मनोरमेशीं कितीतरी दिवसांपासून फटकून रहाणाऱ्या इसमाच्या घरीं कोणी जाईना तेव्हां त्या म्हाताऱ्याला संताप येऊन तो मनोरमेकडे तणतणत गेला. त्याला पाहून मनोरमेला तर कांपरेंच भरलें व रावबहादुरांना बरें वाटलें नाहीं. म्हाताऱ्याचा चेहरा लाल झाला होता. रागाच्या अतिरेकानें त्याला स्पष्टसें बोलतां देखील येईना.

"बये, सगळ्या घराण्याला काळोखी फासलीसना एकदां ? तुमचा सहज खेळ झाला पण त्यामुळें इतर आप्तेष्टांना किती ताप होतो याची कांहीं कल्पना आहे का ? नंगा नाच घालायचा होता तर त्यामुळें तो दुसऱ्याला लाज आणण्याला कारण होईल कीं नाहीं याबद्दल विचार करतीस तर अशा चुकीला तुझें मन वाहिलें नसतें. या परक्या पुरुषाला घरांत घेऊन कोणचा पुरुषार्थ साधलास ? तुझ्या आज्यानें, पणज्यानें, सगळ्या पितरांनीं जी गोष्ट करूं नका ह्मणून ठरविली ती करण्यांत मोठें शतकृत्य झाल्यासारखें तुह्मांला वाटतं ना ? शहाणे इंग्रज आमच्या चालीरीतींना वाखाणतात पण आह्मी बेअक्कल, नादान लोक तें विसरून आपलेपणा घालविण्याच्या तयारींत आहोंत. आपल्या घराण्याचें ज्या कृत्यानें नांव बुडविलेंस, आपली हौस पुरवून घेण्यासाठीं आपल्या नवऱ्याला, स्वतःला, जातीला, ज्या कृत्यानें तूं लांछन आणलेंस त्या कृत्याचा गौरव करण्याकरिता नरकांतले प्राणी तुझी मोठी उत्सुकतेनें वाट पहात असतील. एका नवऱ्याचें नांव बुडवून तूं कोणतें परम पद मिळवलेंस ? यांत धन्यता वाटण्यासारखे काय आहे ?——"

ब्राह्मणधर्माची स्तुति व आपली निंदा ऐकून रावबहादुर आपलें समर्थन करावें ह्मणून सरसावले. "ब्राह्मणांनीं शास्त्रांनीं सांगितलेलें कोणतें आचरण पाळलें आहे ? आह्मी स्वतः ब्राह्मणधर्म मानीत नाहीं." इत्यादि कांहीं चार पांच वाक्यें त्यांनीं जेमतेम भीतभीत उच्चारलीं. मग मात्र तो म्हातारा अधिक

चवताळला व त्यानें रावबहादुरांना शिव्या देऊन "बायकांना फसविण्याला पुरुषांची नेहमीं अघाडी असते. तुमच्या सारख्यांच्या संगतीचा तर हा सगळा परिणाम आहे. माझ्या सुनेचें वांकडें पाऊल पडायाला सर्वस्वीं तूंच कारण. रावबहादुरी मिळाली असली तर आपल्याजवळ ठेव. शहाणपणा शिकविण्याचा मक्ता कोणीहि तुझ्याकडे सोंपवला नाहीं. तूं जर मोठा शहाण्याचा कांदा होतास तर सरकारनें तुला चाकरीवरून कां हकललें ? सरकारांतून ++वर लाथ बसल्यावर सुधारणेचा प्रसार करायला लागलास. मला तुझें सगळें चरित्र ठाऊक आहे. वर काढण्यासाठीं तुला चिखलांत रुतलेली एवढीच गाय सापडली नाहींरे ? सगळ्या देशभर हजारों अशा गाई दुःखांत लोळत आहेत ना ? त्यांपैकीं एखादीचा उद्धार करायचा होतास. पण गाय उद्धरल्याच्या मोठेपणाबरोबर पोटाची सोय लागावी असें कुळ तुला मनोरमेपेक्षां जास्त चांगलें सांपडलें नाहीं हेंच खरें. बडें घर अन् पोकळ वासा" अशी तुझी स्थिति. रावबहादुरीच्या किताबाखेरीज तुझ्या पदरांत काय आहे ? तुझा खानदेशांतला नांवलौकिक आह्मांला ठाऊक नाहीं कीं काय ? सूनबाई, तुला माणसाची पारख चांगली आहे. रावबहादुराशीं शरीरसंबंध करायला तुला मोठेपणा मिळेल असें वाटलें. पण हा सगळे धंद्दे करणारा बेशरम माणूस तुला ओळखला गेला नाहीं हेंच खरें. या मैंदाच्या गोड गोड भुलथापांना भाळून हा लांडगा आहे याचें भान तुला राहिलें नाहीं. या सुधारकांच्या प्रत्येक कामांत मूळाशीं कांहीं तरी स्वार्थ असतो. सरकारांत नाचक्की झालेली व लोकांत फारशी मान्यता नाहीं; बरें, पोटाच्या सोयीसाठीं चौपदरी हातांत घेण्याचा प्रसंग आलेला. हें सगळें जाणून त्यानें आखूडशिंगी, बहुदुधी अशा एखाद्या चिखलांतल्या गाईचा शोध चालविला व त्याला तुझा पत्ता लागला. तुझ्या नवऱ्याची व त्याची ओळख असेल कदाचित्; पण एवढ्यावरून त्यानें गळ घालून तुला लग्नाला सिद्ध केलें व तो डाव साधतांच एकदम बड्या लोकांत त्याची किंमत वाढली. त्या माणसाचा स्वार्थ साधला पण तूं मात्र साफ तोंडघशीं पडलीस. बरें,तुझ्या

पोरट्याची मुंज वगैरे धर्मकृत्यें उरकल्यावर या मार्गांत पडतीस तर आतां त्या कामांत ज्या अडचणी उद्भवल्या आहेत त्या तरी नाहींशा झाल्या असत्या.

लोकांनीं तें घर वाळींत टाकल्यानें मधुकराच्या मुंजींत काय अडचणी आल्या असतील त्यांची निराळी ओळख नको. पण दादांच्या बोलण्यानें मनोरमेचे कांहींसे डोळे उघडले. मधुकराचा उपनयनसंस्कार आतां होणें कठिण असें वाटून आपल्याबरोबर आपल्या पोराचें मातेरें केलें याविषयीं तिला फार खेद झाला, व कोणत्या उपायानें पोराचा घोर दूर होईल इकडे तिचें लक्ष वेधलें.

विष्णुपंताची टकळी आणखी पुष्कळ वेळ चालली होती व तिला प्रतिकार करण्याचें धैर्य त्या दोघांत नव्हतें. विष्णुपंतांनीं बोलण्याच्या ओघांत शकारांच्या व्यसनशीलतेची, जुलमी स्वभावाची, उघड उघड ओळख देण्यास माघार घेतली नाहीं व तसें करतांना सगळे दोष रावबहादुरावर लादून आपल्या सुनेची त्यांनीं मधून मधून कड घेतली. कांहीं विशिष्ट वर्तमानपत्रांत झालेली प्रशंसा त्यांनीं या वेळीं या वादांत ओढली व "वर्तमानपत्रकार ह्मणजे कांहीं ब्रह्मदेवाजवळून जन्म घेतांना सर्वज्ञतेची सनद मिळवून आलेले नाहींत. कळो अथवा न कळो ज्यांत त्यांत तोंड घालून आपलें असें कांहीं सांगण्याची त्यांची पद्धति अनिष्ट आहे, कोणत्याहि प्रश्नाचा परिश्रमपूर्वक सर्वांगानें विचार करून वर्तमानपत्रें आपलें मत देत नसतात, त्यांना आली वेळ मारून न्यावयाची असते, आपलें अज्ञान झांकून दुसऱ्याच्या डोळ्यांत धूळ खुबीनें कशी फेकावी यांतच त्यांची अक्कल असते, असल्या बिनधोरणी वर्तमानपत्रांतील स्तुतीला फार मान देतां उपयोगी नाहीं," वगैरे अनेक विषयांवर त्यांनीं झोड उठवली. शेवटीं आपला संबंध मनोरमेशीं कायमचा तुटला असें जाहीर करून स्वारी बाहेर पडली.

शकारांनीं विष्णुपंतावर बेअब्रूचा खटला करण्याची त्याचें बोलणें बंद पाडण्यासाठीं धमकी दिली. पण ह्मातारा अशानें काय वचकणार ? त्यानें ताबडतोब रावबहादुरांचे प्रच्छन्न दुर्गुण बाहेर ओढून कोणत्या बाबींत तुझी

अब्रू राहिली आहे असा सडेतोड प्रश्न केला; व एवढा वेळ झालेली आपली शोभा आपण आपल्या हातानें वाढविली असें त्यांस वाटविलें.

विष्णुपंताच्या भाषणांत कसलेल्या वक्त्यासारखी मुद्द्यांची सुसंगति नसेल पण ग्राह्याग्राह्यतेची छाननी केल्यास त्यांत ग्राह्यांश अधिक असें कोणाहि ऐकणाराला वाटलें असतें. तात्पर्य एकटा विष्णुपंतच काय पण सगळीकडून रावबहादुरांचा कोंडमारा झाला. बायको धड वागेना, सावत्र पोर तिरस्कार दाखवी, नोकरचाकर टवाळी करीत, त्यांच्या पंथांच्या लोकांचें काम झाल्यानंतर त्यांजविषयींचें प्रेम मंदावलें, लोकांनीं बहिष्कार घातलेला, अशी त्यावर आपत्ति कोसळली. अशा विघ्नांना घरांत भुताटकी सुरू झाल्यापासून तर दुजोरा मिळाला, व आपण सडे होतों ते बरे अशी त्यांची खात्री झाली.

लग्न झाल्यावर महिना पंधरा दिवसांत घडून आलेल्या गोष्टी आह्मी सांगत आहों. कोणतीहि गोष्ट प्रत्यक्षांत येण्याचे अगोदर फार चांगली वाटते असा अनुभव आहे व ती साधेपर्यंत तिच्याबद्दल जो आदर वाटत असतो तो ती प्राप्त झाल्यावर नाहींसा होऊन ती कंटाळवाणी वाटूं लागते. तसाच प्रकार या दंपत्यांत घडला. लग्न झाल्यावर त्यांच्यांत सुखाचा बहुधा अभावच होता. मनोरमेच्या मनानें आपण पातकी असा पालट खाल्लेयानें व त्यास परिस्थितीची अनुकूलता मिळाल्यानें ती शकाराचा तिरस्कार करूं लागली. त्यांना ती नीट वागत नाहीं ह्मणून विषाद उत्पन्न झाला. लग्नापूर्वीं जें प्रेम त्यांच्यांत एखाद्याला आढळलें असतें त्याचा सहस्रांश देखील आतां शिल्लक नव्हता. चूक केली ती निस्तरली पाहिजे अशा उदासीन वृत्तीनें त्यांच्या मनावर पगडा बसविला, व हळू हळू त्यांच्यांत खटके उडूं लागले. ही स्थिति जावी याबद्दल रावबहादुरांची खटपट, व वाढावी ह्मणून मनोरमेचा प्रयत्न, अशी ओढाताण सुरू झाली व त्यांत यशाचीं चिन्हें बाईच्या बाजूस प्रकट होऊं लागलीं.

मधुकराच्या निमित्तानें अलीकडे झगडा वाढला तेव्हां त्याला दूर करण्यासाठीं शिक्षणाच्या गैरसोईचें पिल्लूं रावसाहेबांनीं पुढें आणलें. त्यांत मात्र

दोघांचें एकमत झालें, पण दत्तोपंताची गांठ पडल्यावर त्याला हरताळ फांसला गेला. त्यानें आपलें प्रतिकूल मत दिल्यानें तो बेत तितकाच राहिला व शेवटीं निरुपाय होऊन रावसाहेबांना आपली ब्याद तेथून कांहीं दिवस काढणें प्रशस्त वाटलें. रावसाहेबांनीं गंभीरपणाचा आव आणून दत्तोपंताला पाचारण केलें व ह्मटलें—"पंत, तुह्मी आमच्या भानगडींत पडून आमच्या मार्गांत अडचणी उपस्थित करतां हें तुह्मांला शोभत नाहीं. परवां तुह्मीं प्रोफेसरासारख्या सभ्य गृहस्थाचा उपमर्द केला ही गोष्ट कोणत्याहि माणसाला सहन होण्यासारखी नव्हती. पण तुमच्या विरोधी स्वभावांत आमच्याबद्दल विशेषत: तिच्याबद्दल प्रेम वसत असावें अशी माझी कल्पना आहे व ती खरी ठरवाल अशी मी आशा करतों. माझी प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें मी आतां थोडक्या दिवसांत परगांवीं जाणार आहें तरी माझ्या मागें इथली व्यवस्था पहाण्याचें मी तुमच्यावर सोंपवितों. या माझ्या करण्याला तिची आडकाठी नाहीं. पण ध्यानांत ठेवा, तुमचे मागचे अपराध पोटांत घालून तुह्मांला मोठेपणा देतों या आमच्या उदारपणाचा फाजील फायदा घेऊं नका. माझ्याविषयीं त्या नादान पोराला चिथवतां असें माझ्या कानावर आलें आहे व तें खरें असेल; पण असा मला फिरून अनुभव आला तर मी तुमची खातरजमा ठेवणार नाहीं. इतक्यावर सुद्धां जर ते चाळे चालू ठेवण्याचा तुह्मीं हट्ट धरला तर या तुमच्या मूर्खपणाबद्दल मी फरासखाना दाखविल्यावांचून खचित रहाणार नाहीं.

"सुधारकांच्या मतांची चेष्टा करण्याची तुह्मांस वाईट संवय लागली आहे. संभाळून असा. तुमचें मन व मेंदू कुजलेला असून तुह्मी माणसांत रहाण्याला नालायक आहां असें जर तुह्मांला वाटत नसेल तर यापुढें पूर्वींसारखा बोलण्याचालण्यांत बेतालपणा करूं नका. मी मोठा वाईट आहें हो एकदां कोणाशीं वांकडें आल्यावर."

हें सगळें स्वस्थपणानें ऐकून घेतल्यावर दत्तोपंत ह्मणाला—"जगाची प्रकृति दुरुस्त करण्याचा उपद्व्याप व्यर्थ आहे. प्रत्येकानें आपल्या पायाखालीं

काय जळतें तिकडे लक्ष द्यावें. रावबहादुर, तुमच्यासारख्यांनीं उपदेश करण्याइतका मी खचित वेडा नाहीं; तुह्मां दोघांत बिघाड आणण्याची माझी इच्छा नाहीं. पण ज्या प्रेमाची भुरळ पाडून तुह्मीं ताईसाहेबांना फसविलें तें किती अशाश्वत आहे याची ओळख मी देत असतों. ज्या पंथाबद्दल तुह्मांला इतका अभिमान वाटतो तो कुटिल आहे हें सांगण्यांत मी कोणाला भिणार नाहीं. बहिरंग कितीहि सुबक असलें, त्यांत नांव ठेवण्याला जागा नसली, तरी मन जर उन्नत व शुद्ध नसेल तर सगळ्या शरीराचे व्यापार आपल्या तंत्रानें करावयास लावणारें कोतें मन आत्मघात केल्याशिवाय रहाणार नाहीं. आमचा धर्म बाहेरच्या दिमाखाला मान देत नाहीं. मन स्वच्छ, व्यवस्थित व टापटीपीचें पाहिजे असें आमचे संत सांगतात. रावसाहेब, या देशांत परक्यांच्या अंमलापासून झालेल्या व होणाऱ्या स्थित्यंतराचा विचार न करण्याइतकें माझें मन मठ्ठ नाहीं. एखाद्या पाषाणासारखा वातावरणाच्या फेरबदलाशीं अज्ञ रहाण्याला मी निर्जीव पदार्थ नाहीं. ईश्वराच्या दयेनें माझ्यांतहि बरें वाईट जाणण्याची शक्ति आहे. प्रत्येक सुधारक जर आपल्या चित्ताची साक्ष घेऊं लागेल तर त्यास आपण समाजाची धर्माची घडी विस्कळण्याउपर फारसें कार्य केलें नाहीं अशी जबानी तो देईल. घरबंध तुटून 'इतो नास्ति ततो नास्ति' अशी अर्धवट स्थिति ओढवल्यावर देशाची अधोगति निश्चित असते. सुधारणेच्या कल्पना आमच्या परंपरेच्या असत्या तर त्यांत अनिष्ट नसतें पण त्या कल्पना स्वधर्मप्रसाराच्या भरांत परधर्माची निंदा करणाऱ्या इतरधर्मी लोकांच्या आहेत. आपला धर्म आवडावा ह्मणून ते उद्योग करतात व दुसऱ्याच्या धर्माला विरूप करण्याखेरीज रामबाण उपाय त्यांना सुचत नाहीं. रावसाहेब, अपेयपान, अभक्ष्यभक्षण यासाठीं लोकमताची पायमल्ली, यांत सुधारणा ती कसली ? धर्माची कटकट चुकून स्वच्छंद फिरण्याला मोकळीक मिळावी हें जर सुधारणेचें कार्य असेल तर धर्मकर्माची ओळखहि नसलेल्या उघड्यानागड्या रानटी निग्रोंना अत्यंत उन्नत समजायला कांहींच हरकत नाहीं. मनास येईल

तें करावें असें प्रतिपादणारा धर्म जगांत एक तरी दाखवून द्याल का? रावसाहेब, कांहीं ह्मणा, या विघातक सुधारणेची तळी अधिकाराची जागा भोगणाऱ्या, बडा सरकारी तनखा खाणाऱ्या, इंग्रजी शिकलेल्या, अहंमन्य इसमांनीं उचलून धरल्यामुळें तिला निष्कारण महत्त्व आलें आहे. तिच्यांत राष्ट्राच्या खऱ्या उन्नतीचें बीज तर नाहींच पण धर्मविध्वंसाचीं तत्त्वें मात्र पूर्ण भरलेलीं आहेत असें सांगायला– तुह्मी काय पाहिजे तें केलें तरी– मी मुळींच सोडणार नाहीं.''

दत्तोपंत निर्भीड बोलून बहुधा दुसऱ्याची मात्रा चालूं देत नसे व त्या भाषणाचा परिणाम इतर कोणावर झाला नाहीं तरी मनोरमेच्या मनावर तो पुरा बिंबे यांत संशय नाहीं. आपला अधःपात होत आहे ही भावना दृढमूल होण्याला दत्तोपंताच्या बोलण्यांतला चरचरीतपणा पुष्कळ कारण होता व नारायणरावाच्या एका जिवलग स्नेह्याच्या मार्फतीनें मनोरमेच्या घरांत त्याचें प्रथम पाऊल पडल्यापासून त्याबद्दल तिच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती. दत्तोपंताचा आपल्या शिकवणीवांचून इतर कांहीं व्यवसाय नाहीं अशी सर्वांची समजूत होती व त्यामुळें थोडक्याशा रुपयांवर याचा निर्वाह होतो कसा हें सर्वांना एक कोडें होतें. ज्या गृहस्थानें याचा मनोरमेच्या घरांत शिरकाव करून दिला तो दत्तोपंतासंबंधीं एक अक्षर सुद्धां उच्चारीत नसे. दत्तोपंताची साद्यंत माहिती कोणाला लागली नाहीं तरी तो सज्जन असावा एवढी मनोरमेची खात्री होती व आपल्याला याच्या सहवासापासून फायदा होईल असें तिला वारंवार वाटे. त्याचें बोलणें कडक पण मुद्द्याला धरून असल्यानें त्याचा उपयोग झाल्यावांचून रहाणार नाहीं अशी तिची पक्की समजूत झाली व इतर सर्व मनोवृत्ति दाबून ती दत्तोपंताला आपल्या घरीं राहून घेण्याचा फार आग्रह करी. दत्तोपंत आढेवेढे घेई, पण अखेरीस त्यानें तिचें ह्मणणें नुसतें कबूल केलें.

---

## प्रकरण सोळावें.

# दुर्लक्ष झालेली एक बाजू.

वर्तमानपत्रांतून गाजलेल्या मनोरमाशकारांच्या विवाहोत्सवांत इतका वेळ अवधान गुंतल्यामुळें कथानकांतील एका बाजूकडे आतांपर्यंत कानाडोळा झाला. आपल्या सावत्र भावाची बायको मनोरमा हिनें पुनः लग्न केल्यानें पूर्वापर धर्मपरंपरेला व आर्य स्त्रीजातीच्या —विशेषतः महाराष्ट्रीय स्त्री-जातीच्या —शीलाला कलंक लागण्यासारखें कर्म तिच्या हातून घडल्याबद्दल उमेला फार विषाद वाटला. ज्या पूर्वकर्मांनीं या जन्माच्या आरंभीं आपल्या सगळ्या आयुष्याचा क्रम तयार करून ठेवला व ज्यांपैकीं दुष्कर्मांनीं या आयुष्यांत सौभाग्य हिरावून वैधव्याच्या खडतर दुःस्थितींत आणून सोडलें तसलीं कर्में पुन्हां न होऊं देण्याची खटपट करीत व ईश्वराची करुणा भाकीत उरलेलें कष्टतर जीवित संपवावें असा उमेचा अभिप्राय होता. सौभाग्याच्या सुखासाठीं जर अहोरात्र स्त्रियांची धडपड तर तें काळाच्या निष्ठुरतेनें एकदां नाहींसें झाल्यावर फिरून एका आयुष्यांत कसें लाभणार? फुटलेल्या भांड्याला डांक बसविला तर त्याची मूळची सुबकता त्यांत साधत नाहीं. असे डांक स्त्रीपुरुषांच्या संबंधांत वारंवार बसविल्यानें त्यांत सौंदर्य काय? एका स्त्रीचा एका पुरुषाशीं यावज्जन्म संबंध असावा हेंच उचित असें तिला वाटे व स्त्रियांची एकनिष्ठा कशा प्रकारची असावी याविषयीं बोलतांना ती आपल्या मैत्रिणीस नेहेमीं सांगे. "सीतेचें माहेर व सासर दोन्ही संपन्न होतीं, रामाबरोबर सीतेनें वनांत जावें असा कैकेयीचा हेतु नव्हता, पण त्या बाणेदार राजस्त्रीनें पतीसह कष्ट कां स्वीकारले? दमयंतीला नलानें तूं माझ्याबरोबर हाल न सोसतां माहेरीं जावें असें स्पष्ट सांगितलें असतां ती नलाच्या संकटाची भागीदार कां झाली? सावित्रीला सासरमाहेरचीं न्यूनें पूर्ण होण्याचे वर मिळल्यानंतर स्वतःच्या पुत्रप्राप्तीचा आशीर्वाद पुनर्विवाहानें सफल करतां आला नसता का?

मग त्यांनीं सर्वस्वाचा त्याग करून पतिसहवास पत्करण्यांत काय हेतु असावा ? सरड्याच्या रंगाप्रमाणें त्यांच्या पतिनिष्ठेचे रंग सुखदु:खाच्या भिन्न कालांत पालटते तर त्यांचें नांव आज हजारों वर्षे कसें कायम राहूं शकलें असतें ? त्यांनीं स्त्रियांच्या नैसर्गिक गुणांना झुगारून दिलें नव्हतें. आज इंग्रजी शिकून शहाणे झालेले ज्या चालीरीतींना शुद्ध रानटी मानतात त्या त्यांच्या हाडींमांसीं खिळल्या होत्या. हल्लींच्या पद्धतीप्रमाणें पुरुषांच्या खांद्याशीं खांदा लावून राष्ट्रोन्नतीच्या मोहक नांवाखालीं कांहीं तरी उपद्व्याप करीत असल्याचें त्यांच्या चरित्रांत आढळत नाहीं, तरी वाल्मीकि, व्यास व इतर प्राचीन अर्वाचीन कवि त्या स्त्रियांचे गुणानुवाद गात आहेत. त्यांनीं बायकांच्या सभांत व्याख्यानें देऊन वर्तमानपत्रांसारख्या साधनांच्या द्वारा आपलें नांव पुढें आणलें नव्हतें, अंत:पुराच्या बाहेर त्या कधीं पडल्या नाहींत, तथापि त्यांच्या खाजगी आयुष्याची महती आज कायम आहे व ती तशीच चिरकाल टिकेल. त्या पुराणांतल्या स्त्रियांना सोडलें तरी बायकांच्या पातिव्रत्याचीं गोमटीं फळें मराठ्यांच्या इतिहासांत देखील अनेक चाखावयास सांपडतील. पेशव्यांच्या बायका सगळ्याच अक्षरशत्रु नसल्या तरी आज शाळेंतली एखादी मुलगी भूगोलांतले पर्वत, नद्या, गांवें व जगांत घडलेल्या ऐतिहासिक गोष्टी यांची माहिती काळवेळासुद्धां जशी सांगेल तसें कांहींच त्यांना अवगत नव्हतें हें खास. पण अशा बायकांच्या पोटीं निपजलेलीं संतानें कशीं पराक्रमी, तेजस्वी होतीं ! त्यांतल्या त्यांत चमत्कार असा कीं, जोंपर्यंत पेशव्यांच्या बायकांना नसत्या उठाठेवी करण्याची खोड लागली नव्हती तोंवर त्यांचीं बाळें प्रतापी जन्मलीं. पेशव्यांच्या घराण्यांत एका आनंदीबाईनें नवऱ्याच्या भोळेपणाचा फायदा घेऊन राजकारणाच्या भानगडी जेव्हां उपस्थित केल्या तेव्हां मराठ्यांच्या राज्यश्रीला उतरती कळा लागली. लहान लहान बालकांना जन्म देऊन त्यांचें शिक्षण संगोपन करण्याचें केवढ्या जबाबदारीचें काम ईश्वरानें स्त्रियांवर सोंपवलें आहे ? त्या महत्त्वाच्या कामाकडे दुर्लक्ष करून दुसऱ्या घालमेली जर बायका करूं लागल्या तर

त्या देशाच्या लाभाऐवजीं हानीसच अधिक मदत करतील. पेशव्य अव्वलपासून अखेरपर्यंत प्रत्येक पुरुष पहिल्याच्या सवाईनें उदयास असे व असले वीर आईनें बाळपणींच मर्दानी बाळकडू पाजल्याशि नांवारूपाला येत नसतात. मराठेशाहीच्या भरभराटीमध्यें मर्द बाळें त करून राजकारणाच्या रंगणांत आपली मर्दुमकी गाजविण्यासाठीं सो देण्याचें महत्कर्म स्त्रिया त्या वेळीं करीत असल्याशिवाय मराठी साम्राज्य इत पुढें खास आलें नसतें व असलें मर्दानी शिक्षण आयांना जितक्या सुल तेनें व बिनबोभाट करतां येण्यासारखें आहे तितकें शाळेंतला इतिहा घोकून होणार नाहीं. मराठेशाहीच्या अवनत काळांत जें पटवर्धन घरा आपल्या शौर्यानें पुढें सरसावलें त्याची तरी अशीच स्थिति आहे. नवी प्रजा जगांत आणण्याचें काम परमेश्वरानें स्त्रियांकडेच दिलें आहे व त कार्यक्षम बनविण्याला स्त्रियांमध्यें ज्या प्रकारची जाणीव पाहिजे ती पुस्तव शिक्षणानें पैदा होऊं शकत नाहीं. जिजाबाईसारखी एखादी निरक्षर स्त्र देखील शिवाजीच्या स्वभावाला जें वळण देऊं शकते तें एखाद्या पदवीध विदुषीला साधणार नाहीं. मराठी राज्यांत अहल्याबाईसारख्या राज्य सूत्रें संभाळून विधवाधर्मानें परमार्थसाधन करणाऱ्या बाया जन्मास आल्या. इहलोक, सगळें राज्य, वैभव, इत्यादि गोष्टींना काय पण सबसे प्यारा जीव त्याला सुद्धां होरपळून पतिसहगमन करणारी सती रमाबाई, या व अशां- सारख्या अनेक राजस्त्रियांच्या अगर सामान्य स्त्रियांच्या पुण्याईनें महाराष्ट्र- साम्राज्य लौकिकाला चढलें.''

उमेनें इतिहासाचें परिशीलन व पति असतांना त्याबरोबर चर्चा करून असलीं तत्त्वें तयार केलीं होतीं. मराठ्यांचा वीरगौरव वर्णन करतांना तिचा कंठ सद्गदित होई. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, सदाशिवरावभाऊ, थोरले माधवराव इत्यादि ब्राह्मण, व शिवाजी, तानाजी, बाजी प्रभु देशपांडे, वगैरे ब्राह्मणेतर महापुरुषांना प्रसवणाऱ्या पुण्यमातांची थोरवी ती बोल- ण्याच्या भरांत अनेकदां गाई व तिच्या प्रेमळ व सद्भावप्रेरित संभाषणाचा

सावित्रीबाईसारख्या पोक्त स्त्रियांपासून तों नुकत्या समजूं लागलेल्या कुमारीपर्यंत सर्व आदर करीत असत. कधीं कधीं ती देहभान विसरून अशा गोष्टी सांगूं लागे व एकदोनदां प्रल्हादपंतांनींहि तिचें भाषण आडून ऐकून आपल्या पत्नीस संधि सांपडल्यावर उमेपासून तुला शिकण्याजोगें फार आहे असें सांगून ठेवलें व अशा गुणसंपन्न स्त्रीचा सहवास आपल्या कुटुंबाला लाभल्याबद्दल मनांतल्या मनांत ते अनेक वेळां ईश्वरास सानंद धन्यवाद देत.

पतिनिधनानंतर भोगलेल्या विविध स्थितीचा परिणाम तिच्या मनावर झाल्यावांचून राहिला नाहीं. जगाच्या नश्वरतेचा निराशेच्या दृष्टीनें ती विचार करी. असलेलें जीवन कंटाळवाणें वाटून कित्येक वेळीं तिचा जिव अगदीं रंजीस येई, पण आपल्या चित्तांतील खेद, औदास्य, सहसा बाहेर न पडूं देण्याकडे तिचा प्रयत्न असे. वामनभाऊजींच्या विवाहकालीं लाजेकाजेस्तव पार्वतीबाईंनीं स्वत: जाऊन तिला लग्नांत येण्याविषयीं साग्रह निमंत्रण दिलें परंतु शुभ व मंगल उत्सवांत अभागिनीनें गेल्यास तो विटाळेल, त्यांत विघ्नें येतलि अशी भावना धरून तिनें जाण्याचें टाळलें. त्यासंबंधीं राग येऊन पार्वतीबाई पुष्कळ बडबडल्या अशी वार्ता तिच्या कानीं आली. अर्थात् तिनें त्याकडे दुर्लक्ष केलें. मुलांना तिनें एकदां आजीच्या आग्रहास्तव लग्नांत पाठविलें. अनाथ स्त्रियांचा कार्यांमध्यें अपमान होतो असा तिचा इतर दीन स्त्रियांच्या अनुभवावरून समज झाला होता व अशा विपन्न वनितांच्या मुलांची तर कोणीच दाद घेत नाहींत. ह्मणून तिनें प्रसंगीं मुलांना तिकडे फार मिसळूं दिलें नाहीं. त्यांतून ती सोवळी झालेली नाहीं ! व अशा बायकांच्या हातचें अन्नपानादि ग्रहण न करण्याचा तो वेष घेतलेल्या स्त्रियांचा बाणा. मग पदोपदीं झिडकारून घेण्यापेक्षां घरींच सुखानें राहिल्यास उत्तम असा तिनें विचार केला होता.

तिचा निर्वाह कसा चाले याचें थोडेंसें दिग्दर्शन मागें एकदां झालेंच आहे. दागिने गहाण टाकणें ह्मणजे आपल्या मागें आपल्या मुलांवर कर्जाचा सव्याज बोजा करून ठेवणें असें तिचें मत असल्यानें आपल्या पश्चात्

मुलांना आईकरितां कांहीं त्रास न पडूं देण्याची व्यवस्था तिनें केली. ग
लागेल तसतसे अलंकार रोखीनें विकून त्यावर पोट भरण्याची ती सं
करी. शिवाय शिवण्याविणण्याचीं कामें ती मधून मधून करी. लोकरि
गळपट्टे, लहान मुलांचे पायमोजे, हातमोजे, रुमाल इत्यादि कामांत
निष्णात असल्यानें तिच्या त्या कौशल्याचा उपयोग प्रल्हादपंतांचे स्नेही ना
लग करून घेत. चरितार्थाच्या दृष्टीनें तिला कांहीं उणें नव्हतें, पण शेज
रच्या एखाद्या संपन्न अथवा सुखवस्तु बिऱ्हाडकरूच्या मुलानें सणासुदीः
एखादा मौजेचा जिन्नस खरेदी केला तर तसा आपणाला मिळावा ह्मणू
स्वस्थितीशीं अज्ञ असलेला बाळकृष्ण कधीं मागे व मुलाची हौस पुरविण्या
आपल्यांत सामर्थ्य नाहीं यासाठीं तिला वाईट वाटे. परंतु बाळकृष्णाला
उपदेश करी– "बाळ, हें मातीचें चित्र आणल्यानें पोट का भरणार आहे
आज आणलें अन् उद्यां फुटलें ह्मणजे गेलें फुकट. त्यापेक्षां तूं चांगल
शिकलास, तुला वाचतां यायला लागलें ह्मणजे मी छानदार पुस्तक देईः
बरें. तुला बुक वाचून शहाणें व्हायचें आहे का चित्रें आणखी कांहीं तशा
जिनसा घेऊन खेळाडू व्हायचें आहे? बरें समज, चित्र घेऊन दिलें त
त्यानें अभ्यासांत मात्र लक्ष लागणार नाहीं, खेळायचा नाद लागेल; म
वेडा रहाशील." शहाणें व्हावें अशी लहान मुलांत इच्छा आढळते. "
शहाणा का वेडा?" असा प्रश्न केल्यास "मी शहाणा" असा जबा
देणारीं मुलें पुष्कळ आढळतात. या प्रवृत्तीचा फायदा घेऊन ती बाळकृ
ष्णाचें मन न दुखवतां समजूत घाली. सारांश, पतीच्या मागें मोठ्या शहाण
पणानें तिनें आपल्या मुलांचें संगोपन चालविलें होतें.

प्रल्हादपंतांच्या खास देखरेखीखालीं विद्याधराचा अभ्यास चांगला चालला होता. इंग्रजी भाषेंतलीं निवडक पुस्तकें देऊन ते त्यास विद्याभिरुचि जडवीत होते व त्याकडून वाचवून घेऊन त्यांतल्या महत्त्वाच्या मुद्द्यांवर ते वादविवादहि करीत. प्रल्हादपंत फार विचारी गृहस्थ असल्यानें त्यांच्या भाषणापासून विद्याधराचा पुष्कळ फायदा होत असे. विद्यार्थ्यांना नेमलेल्या

पुस्तकांबाहेर जास्त कांहीं समजूं न देण्याचा हेतु बहुधा सर्व मास्तरांत आढळतो. इंग्लंड, अमेरिका अथवा हिंदुस्थान या देशांचा भूगोल पाठ करवावयाचा, इतिहासाचें मर्म उकलून न सांगतां नुसता घोकून घ्यायचा, भाषाविषय खुलवून विद्यार्थ्यांच्या मनांत भरेल असें न करतां नुसता वाचून अथवा भाषांतरें करून संपवायचा, तात्पर्य वेठीला धरलेल्या चुकाराप्रमाणें नेमलेल्या तासांत आपल्यावर सोपविलेले विषय कसे बसे संपविण्याकडे सगळ्या पंतोजींचें लक्ष असतें. अध्यापनकर्म ह्मणजे पोटाचा धंदा. तो कसा तरी पुरा करून महिन्याच्या महिन्याला पगार वसूल केला व वर्षाअखेर एकदां आपल्या वर्गांतलीं दोनतृतीयांश मुलें एका यत्तेच्या कोंडींतून वरच्या यत्तेंत ढकलण्यापुरती व्यवस्था केली ह्मणजे संपलें गुरुजीचें काम. सरकारी शाळांतून असा प्रकार असतो, ह्मणून ज्या महापुरुषांनीं विद्यादानाची धुरा आपल्या मानेवर स्वार्थत्यागाच्या पायावर घेतली, त्या पुरुषांपैकीं कांहीं अल्प वयांत आटपल्यावर व कांहीं व्यवसायांतरानें तें काम करण्यास असमर्थ झाल्यावर ज्या लोकांच्या हातीं हा गाडा गेला त्यांनीं मूळचे हेतु सोडून सरकारी नमुन्यावर जो चालू ठेवला, अशा एका खाजगी शाळेंत प्रल्हादपंताला नोकरी होती. त्यांच्या मतांशीं त्यांच्या व्यवसायबंधूंचें मत जुळत नसे तरी त्यांच्या विद्वत्तेला ओळखून त्यांना कामावर कायम ठेवण्यांत त्या विद्यालयाच्या चालकांनीं मनाचें धैर्य व उदारपणा दाखविला होता. शिक्षणाच्या बाबींत चालू असलेली पद्धति त्यांना आवडत नसे. ते ह्मणत—"तसा विषय विद्यार्थ्यांच्या मेंदूवर लादण्याऐवजीं त्यांना भावी जीवनक्रमांत उपयोगी पडतील असे विषय निवडावे. परीक्षा पास होणें हें विद्यार्थ्यांचें ध्येय ठरल्यामुळें त्यांच्या हातून खरें अध्ययन न होतां परीक्षेची तयारी होते व एकदां परीक्षा उतरल्यावर नोकरीखेरीज पोटाचें अन्य साधन त्यांना साध्य नसल्यानें हमाली करणें हाच त्यांचा मार्ग ठरतो. त्यामुळें त्यांच्यांत कार्यक्षमता उरत नाहीं. शाळेंतल्या अभ्यासाबरोबर जगांत काय चाललें आहे इकडे लक्ष लागेल, व सभोंवतीं घडत

असलेल्या घडामोडींचा तारतम्यानें विचार करतां येईल असें शिक्षण पाहिजे. पुस्तकी विद्येला व्यावहारिक अनुभवाची जोड नसल्यास ती व्यर्थ. शिक्षकांनाच अगोदर हें कळत नाहीं. अध्यापन हें एक पवित्र राष्ट्रीय कर्तव्य आहे अशी शिक्षकाची भावना पाहिजे.'' वगैरे वगैरे.

शाळांमध्यें शिकविणाऱ्या मास्तरांच्या संबंधाचे जे विचार वर प्रल्हादपंतांच्या ओघानें सांगितले आहेत त्या विचारांचा दोष सर्वस्वीं शिक्षकांवरच येतो असें प्रल्हादपंतांचें मत नव्हतें. आंखून दिलेला कार्यक्रम उरकण्यापेक्षां शिक्षकांच्या हातांत अधिक कांहीं नसल्यामुळें शिक्षकांची अशी प्रवृत्ति साहजिक होते असें ते ह्मणत.

शाळेंत ते आपल्या विषयांत विद्यार्थ्यांचीं मनें रंजवून त्यांस कर्तव्यदक्ष करण्याचा होईल तितका उपदेश करीत, पण शाळेच्या नाजूक इभ्रतीला हा असला प्रयत्न न रुचून त्यांना चालक तसें सुचवीत. घरीं मात्र ते कोणाचे बांधलेले नव्हते. विद्याधरासारखा चाणाक्ष विद्यार्थी हाताखालीं मिळाल्यावर त्याला लोकोत्तर पुरुष करावें अशी त्यांची इच्छा होती व वेळोवेळीं ते आपल्या उद्देशाचे प्रयोग त्यावर करीत असत. देशांत चालू असलेल्या सर्व गोष्टींची साद्यंत माहिती देऊन तसें कांहीं इतर देशांत घडलें असल्यास त्यांचा दृष्टान्त ते देत असत व मग अमुक गोष्टींत कोठें चुकतें, अमुक गोष्ट कितपत फलद्रूप होईल अशी वाटाघाट ते त्याजवळ करीत. तात्पर्य, विद्याधराचें शिक्षण सर्वांगानें सुरेख चाललें होतें.

उमाबाईचा सदाचार, विनय इत्यादि विषयावर प्रसंगोपात्त बोध चालूच असे. परंतु तिच्या सहवासाचा इतर परिचित स्त्रियांवर फार परिणाम घडून तिनें त्यांच्या आचारविचारांत क्रांति घडवून आणली होती. जुन्या आचारांत दोष असल्यास ते दाखवून कोणती सुधारणा केल्यास इष्ट होईल, नवीन मतांत काय ग्राह्य आहे, अशी चर्चा तिच्या तोंडून पुष्कळ प्रसंगीं स्त्रीसमाजाच्या कानीं पडे. इतिहासांतलीं उदाहरणें घेऊन ती स्त्रियांच्या एकनिष्ठ पातिव्रत्याची जशी वारंवार प्रशंसा करी तसे प्रल्हादपंतहि निराळ्या

दिशेनें करीत असत व अलीकडे दत्तोपंतांच्या बोलकेपणाची भर पडल्यामुळें त्या वाड्यांतल्या व इतर आसपासच्या स्त्रियांना परिस्थितीचें बरेंच ज्ञान झालें होतें. स्त्रीजातीला अनुसरून उमा स्त्रियांना मोठेपणा देई. ती ह्मणे— "देवाभक्तांत असणाऱ्या अभिन्न प्रेमाला प्रतिव्रतेच्या प्रीतीची उपमा साधुसंत देतात, ह्मणजे निस्सीम प्रीति पतिनिष्ठ स्त्रियांवांचून अन्यत्र सांपडणेंच अशक्य. पुरुषाचा वरचष्मा ह्मणजे जुलूम अशी वेडी कल्पना बायकांनीं टाकून आपल्याशिवाय त्यांचा मोठेपणा चालूं न देण्याची खटपट करावी. व्यसनी व दुराचरणी पतीवर इतर कोणत्याहि उपदेशाची मात्रा चालली नाहीं तरी बायकांच्या सत्त्वाचा उपाय कधीं काळीं तरी रामबाण लागू पडतोच पडतो. पुराणें पहा, इतिहास पहा." या सगळ्या वादांत तिची भर मराठेशाहीवर फार असे. मराठ्यांच्या महाराष्ट्रांत आपण जन्मलों याचा तिला तर अतिशय अभिमान होताच, पण तो ती दुसऱ्या स्त्रियांत उत्पन्न करण्याचा यत्न करी. प्रल्हादपंत इतिहासांतून तिसरेंच प्रमेय काढीत व जातिभेद मोडण्याच्या सुधारकी मतावर टीका करून खोडून टाकतांना एके प्रसंगीं दत्तोपंतानें तर सर्वांवर ताण केली. त्यांचें भान सुटलें व ते एकदम चवताळून ह्मणाले— "जातिभेद मोडा ह्मणणें खुळेपणाचें आहे. जाती राष्ट्रकार्याच्या आड कधींच येऊं शकत नाहींत. प्रल्हादपंत, तुह्मी इतिहासाचे शाळेंत गुरुच आहांत. तुह्मांला वेगळें सांगायला नको; पण आतां रहावत नाहीं ह्मणून बोलतोंच. ज्या पुरुषांनीं महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याची मुहूर्तमेढ रोवली त्यांपैकीं सगळे एकाच जातीचे होते का? शिवाजी, तानाजी, बाजी, रामदास ही सगळी मंडळी परस्परांत रोटीबेटीव्यवहार करण्यासारखी नव्हती ना? पण एका हिंदु धर्माच्या, महाराष्ट्रभूमीच्या अब्रूकरितां या सगळ्यांनीं जातिभेद विसरून एकमेकाच्या खांद्याशीं खांदा लावून साह्य केलें. आपल्या मातृभूमीच्या छातीवर नाचणाऱ्या शत्रूंच्या प्रतिकाराकरितां हातावर शीर घेऊन त्यांनीं तिचें बंधन तोडलें. ज्या सत्पुरुषानें आपल्या लंगोटीचें महाराष्ट्राच्या राष्ट्रीय ध्वजांत रूपांतर केलें तो

ब्राह्मण होता, स्वामीचा जीव संकटांत सांपडलासा पाहून ज्या पठ्यानें सह्याद्रीच्या एका खिंडींत शत्रूंच्या हजारों सैनिकांना मूठभर पहाडी सैन्याच्या मदतीनें नामोहरम केलें व स्वामीच्या सुखरूपतेची तोफ कानीं पडेपर्यंत जखमांच्या द्वारांतून निसटून जाण्यासाठीं उतावीळ झालेले प्राण योग्याप्रमाणें रोधून स्वाधीन ठेवले तो वीरश्रेष्ठ बाजी जातीचा परभू होता. स्वामिकार्यासाठीं रात्रीं बेरात्रीं कोंडाण्यावर चालून जाणारा पराक्रमी तान्हाजी एक साधा कुणबी होता. परंतु हा ब्राह्मण, हा परभू, हा मराठा असा भेद विसरून मातृभूमीच्या स्वातंत्र्याकरितां सगळे एकवटले, भगव्या झेंड्याखालीं जमून त्यांनीं आपल्या प्यार जिवावर धार धरली, पंचमहाभूतांचे क्षोभ त्यांनीं मोजले नाहींत. सगळ्यांचें साध्य एक असल्यानें डोंगरादऱ्यांतून समशेरी चमकूं लागल्या व हरहर महादेवाच्या गर्जनेबरोबर हजारों तरवारी मातृभूमीच्या रक्षणार्थ सरसावल्या. प्रल्हादपंत, हा सारा चमत्कार कशाचा? धर्मभेदाच्या नांवाखालीं इंग्लंडांत एके काळीं प्रजाजन परस्परांच्या नरडीचा घोट घेण्यांत तत्पर होते, या धर्मभेदाच्या यादवींत इंग्लंडची भूमि रोजच्या रोज बळी पडणाऱ्या इसमांच्या रक्तानें न्हाली होती, पण इंग्लंडवर स्वारी करण्यासाठीं निघालेल्या अजिंक्य आरमाराची बातमी लागतांच इंग्रज लोक धर्मभेद विसरले व थोड्या दिवसांपूर्वीं परस्परांच्या छातींत घुसणाऱ्या समशेरीचीं टोकें त्या आरमाराकडे वळलीं. सगळ्यांचा नायनाट करणारें महत्संकट उद्भवतांच आपसांतलीं भांडणें विसरणारे लोक विजयाचे धनी झाल्यास नवल काय?

मातृदेशाच्या प्रेमांत अशी जादू असते कीं, तिच्या तडाख्यांत सांपडल्यावर अंगांत एक रक्त खेळणारे सगळे लोक आपला मत्सर, वैर, विसरतात. जगाच्या इतिहासांत या जादूनें भारलेल्या लोकांच्या अद्भुत कर्तृत्वाचीं शेंकडों उदाहरणें सांपडतील, मराठ्यांचा इतिहास त्याला अपवाद नाहीं. राष्ट्रोन्नतीसाठीं काय करावें लागतें व आमच्या बहादर पूर्वजांनीं अगदीं शून्यावकाशांतून साम्राज्याची इमारत बांधतांना काय केलें तें तो आम्हांस सां-

गत आहे. पण आमच्यांत काय आहे हें पाहून त्याप्रमाणें आयुष्याला दिशा लावण्याऐवजीं, व खरा राष्ट्रोद्धार ह्मणजे काय व त्याचीं साधनें कोणतीं हें पहाण्याऐवजीं, दुसरे काय शिकवतात इकडे आमचें लक्ष सध्यां आहे. हिंदूंच्या ज्या शेंडीसाठीं महाराष्ट्रांतल्या हजारों वीरांचे प्राण खर्चीं पडले त्या शेंडीला स्वेच्छेनें, दुसऱ्याच्या जबरदस्तीनें नव्हे, कापून टाकून परक्यांसारखीं कपाळावर झुलपें राखण्याची सुधारणा होत आहे. घरांत खायला नसलें तरी चालेल, पण या केसांची डागडुजी करण्यांत रोजच्या मिळकतीचा बराच भाग खर्चीं घालण्यास लोक तयार आहेत. गळ्यांत चिंध्यांचे तुकडे घालून फिरण्यांत लोकांना प्रतिष्ठा वाटूं लागली, चहा तर इहलोकींचें अमृतच बनलें आहे. सारांश, महाराष्ट्रधर्माकरितां, आपल्या राष्ट्रीयत्वाकरितां ज्यांनीं आपलीं शिरें संतापानें वाहिलीं, त्यांचेच वंशज आज पोषाखी सुधारणेंत चूर आहेत. वेदान्तांत ममत्व टाका, अहंभाव नको, असा उपदेश आढळतो त्याचें शब्दशः आचरण लोकांत पहावयास सांपडतें. राष्ट्रीयत्वाचीं चिन्हें टाकून आपलेपणाला मुकणारे, अहंभावाला विसरणारेच सगळे सांपडतील. दोन अडीचशें वर्षांपूर्वीं ममत्वाच्या अहंकाराला पेटून ज्यांनीं वरचढ अहंतेशीं झगडा मांडला ते सर्व खुळे. पारलौकिक कर्तव्यासाठीं मी व माझें या शब्दद्वयाला तिळांजली द्यायला सांगणारे प्राचीन ऋषि आपला उपदेश फळाला आला ह्मणून स्वर्गांत आनंदानें टाळ्या पिटून धन्यता व्यक्त करीत असतील नाहीं बरें !"

प्रल्हादपंत नेहमीं दत्तोपंताला त्याचे खरे विचार ओकावयास लावण्याकरितां सुधारकांची बाजू घेत असे व शान्तपणानें बोलतां बोलतां दत्तोपंत चिडला कीं ते गप्प बसत. मग दत्तोपंताला आंतून फुटणाऱ्या उकळ्या न आंवरून तो सारखा बोलत सुटे, पण त्याच्या भाषणांत अर्थ असल्यानें त्याचें प्रल्हादपंतास कौतुक वाटून ते स्वस्थपणानें ऐकत.

असे संवाद बायकांच्या ऐकण्यांत पुष्कळदां येत व त्यावर स्त्यांच्यांत प्रश्नोत्तरें होऊन उमेच्या साहाय्यानें उलगडा पडून आपण आज नवीन कांहीं

तरी शिकलों असे त्यांस वाटे. प्रापंचिक अनुभवांत उमेचें शहाणपण बेताचें खरें, पण मिळालेला अनुभव, वाचन व मनन करण्याची तऱ्हा या दृष्टीनें ती लहानथोर स्त्रियांत श्रेष्ठ होती; व तिच्या विद्वत्तेचा अनुभव येऊं लागल्यावर तिची टवाळी करण्याकरितां टपलेल्या पुष्कळ बायका ताळ्यावर आल्या.

दत्तोपंताचा पहिला एकलकोंडेपणा दिवसेंदिवस कमी पडत जाऊन ते जसजसे माणसाळूं लागले तसतसा त्यांच्याबद्दल बिऱ्हाडकरूंत आदर वसूं लागला. पण त्यांच्या खाजगी माहितीचा थांग त्यांनीं कधीं कोणास लागूं दिला नाहीं. विद्याधराशीं ते पुढें पुढें ह्मणजे अलीकडेच पुष्कळ मोकळ्या मनानें बोलत पण सहसा आपली हकीकत त्याच्यापासून लपविल्याशिवाय रहात नसत. त्यांच्यांत विक्षिप्तपणाहि बराच असल्यानें त्यांच्या पूर्वेतिहासाचा मुद्दा कोणी छेडल्यास ते एकदम विचारणारांवर ओरडत व त्यांस जवळून घालवून देत. ही खुबी सगळ्यांना माहीत झाली असल्यानें तेवढी बाब खेरीजकरून इतर वाटेल त्या विषयाची चर्चा करण्यास ते सदैव सिद्ध असत.

---

## प्रकरण सतरावें.

## आणखी दुसरा भाग.

'करावें करावें ह्मणून वाटाघाट होत असलेल्या वामनरावाच्या लग्नाची हकीकत दुसरीकडे आलीच आहे. लग्नांत झालेले घोटाळे वाचकांच्या नजरेस पडलेच आहेत पण मुलगी ठरवितांना झालेल्या गोष्टी निराळ्याच आहेत. गणूभाऊचें संसारांत दुर्लक्ष ह्मणून करण्यासवरण्याची सारी भिस्त काय ती बाळंभटावर. तो मुलाच्या बाजूचा ह्मणून मुलगी पहाण्याचें बडेजावीचें काम अंगावर पडल्यावर त्यास स्वर्ग दोन बोटें उरला. मुलीच्या आईबापांचें पाप. अमके दिवशीं दुपारीं मुलगी आमचे घरीं पहाण्यासाठीं

हजर करा असा हुकूम सुटला कीं, त्यांनीं आपलें काम धाम कितीहि जरूरीचें असलें तरी खुशाल बाजूस ठेवून या शिष्टांच्या घरीं जावें. तेथें मुलगी तपासण्याचें काम सरे तोंपर्यंत काळ कंठून परत यावें. मग मुलगी पसंत अथवा नापसंत याचा निकाल कळेल तेव्हां कळेल. मुलगी नाका-डोळ्यानें अव्यंग असल्यास हुंड्याची रक्कम मुलीच्या बापाच्या आहाराबाहेर चढवून नाकारायची असा सार्वत्रिक क्रम आहे. मुलीचें रूप हुंड्याच्या दरा-वर अवलंबून असतें. ज्यांना आपल्या मुलीच्या हितासाठीं दुसऱ्याचे उंबरठे झिजवून जाण्यायेण्याच्या निष्कारण हेलपट्यापायीं वराचे भाव ठरविण्याचा प्रसंग आला असेल त्यांना या वर्णनांत नवीन कांहींच वाटणार नाहीं. मुलाची पहिली परीक्षा उतरलेली असली किंवा उतरावयाची असली, कीं मुलीच्या बापानें पांचशें रुपयाचा तोडा कमरेला बांधूनच त्या मुलाच्या घराची पायरी चढावी, असा हल्लीं लग्नाचा बाजारभावच पडून गेला आहे. मुलाच्या घरांत खाण्यापिण्याची भ्रांत असो, मुलगा मात्र आपल्या कपड्यालत्त्यांत व शिपऱ्यांच्या शुश्रूषेंत महिना दहापांच रुपये उडवीत असतो व घरांतलीं माणसें त्याचें कौतुक करीत असतात! असो, हा नुसत्या मुलाचा दर मग तो बड्या बापाचा बेटा असला, स्थावरजंगम कांहीं इष्टेट असली, तर या प्रत्येक गुणाबरोबर सौदा वाढत जायचा. मुलीचा बाप हा बेअक्कल, मूर्ख असा-यचाच; त्याला कांहीं किंमत नाहीं, त्याला अब्रू नाहीं, त्याला जीव सुद्धां नाहीं, असें समजून त्याशीं बेमुर्वतेनें वागण्याचा मुलाकडच्यांना ईश्वरदत्त हक्क आहे; व स्वतःच्या मुलीच्या लग्नाचे वेळेस दुसऱ्याचे पायपोस खातां खातां जीव टेकीस आला असला तरी मुलाच्या लग्नप्रसंगीं हा हक्क बजाविल्या-वांचून ते स्वास रहात नाहींत. मुलगी समोर आली ह्मणजे तिला वाटेल ते प्रश्न घातल्यास असभ्यतेचा दोष लागत नाहीं अथवा लागत असल्यास तो माफ. लग्नाचा खर्च भागून जमल्यास मुलीच्या अंगावर दोन दागिने चढवितां येऊन शिवाय चार दोन महिन्यांची पोटगी भागण्याइतकी हुंड्याची रक्कम एका लग्नांत मिळवावी असा मुलीच्या

आईबापांचा हेतु असतो. पार्वतीबाईसारख्या जहांबाज स्त्रीनें हा अधिकार कसा गाजवून घेतला असेल याची त्यांच्या आतांपर्यंतच्या स्वभावपरिचयामुळें वेगळी हमी द्यायला नको. आपण विधवाधर्मदीक्षित ह्मणून बाहेर पडण्यास अयोग्य, या सबबीवर वामनाला सांगून येणाऱ्या मुलींना आपल्या घरीं खेटे घालायला लावावें; जन्मापासून ज्यांच्यासमोर मुलगी वाढली त्यांना माहीत नसलेलीं व्यंगें एका पहाणीसरशी बाहेर काढून तीं नाकारावीं; ह्मैस, गाई अथवा इतर पशूप्रमाणें त्या उपवर कुमारीला वागवून तिची नानातऱ्हेनें परीक्षा घेऊन अखेरीस नकार सांगावा; व अमक्यातमक्याची मुलगी वामनाला सांगून आली आहे, ती ठरवावी किंवा नाहीं, याची पार्वतीबाई आपल्या सख्या सोवतीणींशीं मसलत करूं लागल्या ह्मणजे कोणी कांहीं कोणी कांहीं अशीं अनुकूलतेऐवजीं बहुधा प्रतिकूल मतें देऊन हुंड्याच्या लहान-मोठेपणावर मुलीचा स्वीकार करणें न करणें सोपवावें. मुलीकडच्यांची अशी अप्रतिष्ठा करणें कधींहि उचित नाहीं; पण त्यांना लाचारीनें जे हाल सोसावे लागतात ते किती वाईट आहेत, याची कल्पना तज्ज्ञांनींच करावी. दिवस रात्र, भूक तहान, सुख दुःख, गांव परगांव, हें सर्व विसरून अमक्याच्या घरीं मुलाचें लग्न यंदां आहे असा सुगावा लागला कीं त्या घरीं धांव घ्यावी, येथें जुळेल तेथें जुळेल या आशेवर भटकत फिरावें व अखेरीस कालावधि थोडा राहिलेला पाहून कोठें तरी जुळवून पाठीस लागलेली कन्येची चिंता दूर करावी, असें हल्लीं पहावयास सांपडतें. परंतु यांत मौज अशी आहे कीं, अमुक अटी जेथें साधतील तेथेंच लग्न करायचें अशा प्रतिज्ञेनें मुलींना नाकारणाऱ्या कुमारांच्या गळ्यांत त्यांच्या इच्छेशीं अननुरूप अशी कन्यकाच पडते —नव्हे लग्न होईनासें झालें ह्मणजे गळ्यांत अडकवून घ्यावी लागते— व त्यांच्या अटी प्रतिज्ञा जागच्या जागींच जिरतात. स्त्रीपुरुषांचा संबंध जन्मास घालतेवेळीं विधीनेंच ठरवून ठेवल्यामुळें माणसांच्या प्रयत्नाविरुद्ध हा योग घडून येतो. लग्न जुळविण्याच्या या प्रकारांत सुधारक बिनसुधारक हा भेद मुळींच नाहीं.

हुंड्याच्या चालीविरुद्ध कितीहि बोलणारे सुधारक असोत किंवा नसोत, मुलांच्या लग्नांच्या वेळेस हुंडा घेतल्याशिवाय कोणीच रहात नाहीं. कोणी रोख रुपये घेतात, तर कोणी करणीच्या रूपानें घेतात अथवा कोणी जांवईबोवांच्या शिक्षणाची सोय करण्याचा करार करून त्या रूपानें घेतात. एवंच अल्प श्रमानें मिळणाऱ्या लक्ष्मीला लाथाडण्याचें धाडस कोणाच्याहि हातून होत नाहीं. प्रसंगविशेषीं या कामांत बिनसुधारकांवर सुधारकांची ताण असते. असो.

पार्वतीबाईनें मुलीच्या आईबापांना त्रास देण्याचे सगळे प्रकार केले व या त्यांच्या कार्याला बाळंभटानें होईल तितकी मदत केली. लग्न झाल्यानंतर आषाढपाटी, श्रावणपाटी असे कांहीं देवघेवीचे प्रकार असतात. श्रावणपाटीची तयारी करतांना पार्वतीबाईनीं भातुकलीच्या खेळाचीं चिमुकलीं भांडीं मनाजोगीं मिळेनात ह्मणून जी युक्ति योजली ती त्यांच्या स्वभावावर विशेष प्रकाश पडण्यासारखी असल्यामुळें येथें देतों.

पार्वतीबाईची एक चुलत जाऊ यांच्या घराशीं लागून असलेल्या घरांत रहात असे. तिच्याशीं तंटा करून धुडगुस घालण्याचे प्रसंग आल्यास उत्तमच, पण न आल्यास एखादी कुरापत काढून मुद्दाम भांडण्यास पार्वतीबाई सदैव सज्ज असत व या दोन्ही घरांमध्यें एकच दार असल्यामुळें त्याचा फायदा घेऊन संधि साधली ह्मणजे बारीक सारीक जिनसाहि आपली जाऊ लांबविते असें गाऱ्हाणें भागीरथीबाई नेहमीं आजूबाजूच्या ओळखीच्या बायांना सांगत असत व पार्वतीबाई आपल्या मंडळींत तिची निंदा होईल तितकी करण्यास सोडींत नसत. पार्वतीबाईच्या मुलांत वामन आणि मथु हीं अगदीं आईच्या तालमींत तयार झालीं असल्यामुळें पार्वतीबाईला त्यांची मदत चांगली असे व लहानपणीं एकदां कोणतीशी वस्तु पळवून नेतांना भागीरथीबाईच्या नवऱ्याच्या हातीं सापडून आपल्याला चांगला खरपूस मार मिळाल्याचें मथूताई थोड्याशा निराळ्या स्वरूपानें सांगत. पार्वतीबाईनें तर आपला दावा साधण्यासाठीं त्या अकरा वर्षांच्या अजाण पोरीच्या हातांत

ती वस्तु मुद्दाम देऊन चोरी केली असा खोटाच आरोप घातला व माझ्या पोरीला मारविलें अशी बातमी उठविली. पण भागीरथीबाईच्या व पार्वतीबाईच्या यजमानांचें सूत असल्यामुळें त्यांच्यांत या बायकांच्या भांडणानें बेबनाव झाला नाहीं. भागीरथीबाईला सून आली तेव्हां तिला मानभावी प्रेमानें हाताशीं धरून 'सासू मला छळते' अशी हूल तिच्या करवीं उठविण्यासहि पार्वतीबाईनीं कमी केलें नाहीं; पण भागीरथीबाईच्या सुदैवानें त्या सुनेला आपली चूक लवकरच कळून येऊन हें प्रकरण मिटलें. पार्वतीबाईचे यजमान निवर्तल्यावर तर हें वैर अधिक माजलें व भागीरथीबाईच्या नवऱ्याचा त्या फार हेवा करूं लागल्या. माझें 'असें' झालें ह्मणून भागीरथीबाईचेंहि तसेंच व्हावें अशाकरितां भागीरथीबाईचें सौभाग्य तिच्या डोळ्यांत खुपूं लागलें. पार्वतीबाईच्या त्या दुष्ट वासनेचें फल लवकरच येऊन त्यांची बाऊहि त्यांसारखीच झाली. भागीरथीबाईच्या स्वभावांत कुचकेपणा कमी असल्यामुळें त्या आपल्या सुखदुःखाच्या गोष्टी सर्वांपाशीं अगदीं उघडपणानें बोलत, त्या पार्वतीबाईच्या पथ्यावर पडत; भागीरथीबाईच्या घरीं जाऊन तीं नवरा बायको कोठें बोलत असल्यास वामन व मथू चोरून ऐकत, सवड सांपडली कीं सगळें घर धुंडाळून कोठें काय आहे हें सर्व पाहून ठेवीत व मातुःश्रींना त्याची बित्तंबातमी देऊन त्यांच्याकडून शाबासकी मिळवून घेत. हा मागचा वृत्तांत येथें सांगण्याचें कारण असें कीं, श्रावणपाटींत उणीव पडलेल्या वस्तूंची भरपाई मोठ्या खुबीनें भागीरथीबाईच्या घरांत डल्ला मारून केली. भागीरथीबाईजवळ देवपूजेच्या लहान लहान सुंदर पात्रांचा संच होता. श्रावणपाटी तयार होत असतां भागीरथीबाईला कांहीं निकडीच्या कामानिमित्त मुलांबाळांसह शेजारच्या गांवीं घराला ताळेबंदी करून जावें लागलें होतें, व ईश्वराच्या कृपेनें त्या गैरहजेरीची सुसंधि आयतीच दत्त ह्मणून पुढें आल्यावर ती हर प्रयत्नानें सडकून फायद्यावर पाडून घेण्यासाठीं पार्वतीबाईनें कंबर बांधली. अशा कार्यांत मथूताई, वामन व बाळंभट यांची त्यांच्यापुढें अघाडी असे. जावेच्या पूजापात्रांवर पार्वतीबाईंच

डोळा पुष्कळ दिवस होता. त्यांनीं युक्त्या योजून शेवटीं काम फत्ते केलें. भागीरथीबाई परत आल्यावर जेव्हां भांडीं नाहींशीं झालेलीं पाहिलीं तेव्हां त्यांनीं शिव्याशाप उच्चारण्यास आरंभ केला व तेवढें निमित्त पार्वतीबाईंना आपल्या जबऱ्या वाचेच्या मगदुराला अनुसरून भाडिमार करण्यास पुरलें. दोघींनीं एकमेकांचें निःसंतान होण्याविषयीं आशीर्वाद दिले. या भांडणांत बाळंभटानें अर्थात् आपल्या धनीणीची कड घेतली पण दुर्दैवानें हा बायकांचा तंटा पुरुषांच्या तंट्यानें मिटून बाळंभटाच्या बाजूनें वामनराव सरसावले. दैव अनुकूल नसल्यामुळें बाळंभटाची शिवीगाळी असह्य होऊन भागीरथीबाईच्या एका सकस मुलानें बाळंभटाची कणीक चांगली तिंबली. मी आतां फौजदारींत फिर्याद लावतों असें रडक्या सुरांत ओरडत बाळंभट निघाले पण तसा खटला झाला नाहीं. कारण बाळंभटासच ठाऊक.

भांडीं कावळ्यांनीं पळविलीं असतील हें पार्वतीबाईचें ह्मणणें किती सयुक्तिक होतें तें दिसतेंच आहे.

वामनाचें लग्न उरकलें ह्मणजे तीर्थयात्रेस जाण्याचा बेत सुनेच्या लहानपणामुळें तितकाच राहिला. पार्वतीबाईंना नातवंडाचें सुख नव्हतें असें ह्मणतां आलें नाहीं तरी आवडत्या मुलांचीं लेकरें खेळविण्याची त्यांना मोठी हौस होती. हरिभाऊ निरपत्य असल्यामुळें त्यांच्या आशेचा मोर्चा वामनराकडे वळला व वामनाचें एकादें मूल 'नदरेस' पडलें ह्मणजे मी कृतार्थ झालें, मग मला तीर्थयात्रा करायला हरकत नाहीं असें पार्वतीबाई ह्मणूं लागल्या. बायकांची आशा ही मारुतीच्या शेपटीप्रमाणें सदा लांबत असते. नातवंड दृष्टीस पडल्यावर त्याचे उपनयनव्यवहारादि सगळे सोहळे पाहून पणतूच्या जन्मोत्सवांत पणजी ह्मणून माझ्यावर सोन्याचीं फुलें पडावीं अशी दीर्घेच्छा त्यांना असते. आमच्या धर्मांत मनुष्याच्या गर्भवासापासून स्मशानांतल्या अखेरच्या विधीपर्यंत एकंदर सोळा संस्कार आहेत व त्यांपैकीं बराच भाग स्त्रियांवर अवलंबून असल्यामुळें लग्नें, गर्भाधानें यांसारख्या विचारांत त्यांचीं मनें गढून गेलेलीं असतात. व्यवहारांत तर सामान्यतः असें आढ-

ळून येतें कीं, चार बायका एके ठिकाणीं जमल्याबरोबर त्यांच्यामध्यें संभाषणाला विषय असेच असायचे. अमक्याची बायको एवढी वयानें सोळा वर्षांची मोठी झाली तरी तिला रजोदर्शन झालें नाहीं, तिच्या बरोबरच्या किती तरी मुली लेंकुरवाळ्या होऊन अपत्यसुख भोगीत आहेत, तमक्याची बायको साता महिन्याची गरभारशी झाली तरी तिच्या तोंडावर टवटवी कशी ती नाहीं, अगदीं फिकट पिळून काढल्यासारखी क्षयी दिसते, या व अशाच तऱ्हेच्या गोष्टींवर त्यांची चर्चा चालते. पार्वतीबाईच्या घरीं समविचारी स्त्रीमंडळाच्या बैठकी वारंवार होऊन निरनिराळ्या बाबींचा खल चालत असे. अलीकडे त्यांचा तीर्थयात्रेचा बेत रहित झाल्याबद्दल त्या सगळ्यांना सांगत.

गणूभाऊ व मातु:श्री यांचा जो बेबनाव एकदां होऊन त्यांच्या प्रीतीची घडी विस्कटली ती सुधारण्याचें चिन्ह दिसेना. उमेविषयींची अढी पार्वतीबाईप्रमाणें त्यांच्या मनांतूनहि गेली नव्हती; पण जगांत चांगलें हातून झालें नाहीं तरी वाईट न करणारी एक निरर्थक भल्यांची (Good-for-nothing) जात असते त्यांपैकीं ते बनले होते. गणूभाऊ व त्यांच्या पत्नींत वितुष्ट यावें यासाठीं मथूताई बाळंभटामार्फत कांहीं ताईत तोडग्याची प्राप्ति करून घेत असल्याचा गवगवा होता; पण त्या दोघां नवराबायकोंत त्यांच्या हेतुविरुद्ध प्रकार दिवसेंदिवस अधिक वाढत असल्यामुळें त्यांच्या खरेखोटेपणाकडे पहाण्याचें आपणास कारण नाहीं.

पार्वतीबाईचें व कनिष्ठ सुनेचें चांगलें पटे. त्या तिचेवर फार माया करीत.

* * *

एकदां सकाळचे प्रहरीं गणूभाऊचें घरासमोर रस्त्यावर माणसांची गर्दी असल्याचें जाणारायेणारांना आढळलें. दुरून माणसांचा जमाव पाहून जो तो आकर्षितचित्तानें त्या बाजूस जलद पावलें टाकीत जाऊं लागे. गिऱ्हाइकाचें दुकानदाराशीं न पटून त्यांत खटका उडाला, का गारुड्याचा खेळ चालला आहे, का पोलीसानें एखाद्या इसमाला पकडून चालविलें आहे,

का सायकलीवरून कोणी ऐटबाज पडले, का तमाशा चालला आहे, का एखाद्या तोंड चुकवून पळणाऱ्या ऋणकोला धनकोनें गांठून पैशाचा तगादा लावल्यामुळें त्यांच्यांत धक्काबुक्की चालली आहे, का नवराबायकोंत मारामारी चालली आहे, का कोणी चाललेला संभावित गृहस्थ कांहीं आकस्मिक कारणानें दुखापत होऊन पडला आहे, का घोड्याच्या व बैलाच्या गाडीची टक्कर होऊन मोडतोड झाली, लांबून माणसांचा घोळका नजरेस पडतांच मनांत अशा अनंत कल्पना येत व काय आहे तें एकदां दृष्टीखालीं घालून ठेवावें यासाठीं प्रत्येकाचे पाय तिकडची दिशा धरीत. रस्त्यांत वहिवाटीपेक्षां तिळभर विचित्र घडलें कीं लोकांना तें पहाण्याची उत्कंठा लागते व गतानुगतिकत्वाच्या स्वभावानुरूप एक उभा राहिला ह्मणून दुसरा, दोघांशेजारीं तिसरा असा समुदाय जमूं लागतो. कित्येकांना तर आपण या जागीं कां उभे राहिलों याचें कारण देखील माहीत नसतें. ही अतिशयोक्ति नाहीं. थोडकासा विचार आपल्याला ही वस्तुस्थिति असल्याचें कळवून देईल. समाज हा असाच. हरिदासाच्या चुटक्यांत एक गमतीची गोष्ट ऐकायला सांपडते. "कोणी एक गोसावी कांहीं तिथिविशेषानिमित्त नदीस्नानाला गेला होता. आज स्नानार्थी मंडळी फार जमणार व त्या घोंटाळ्यांत आपलीं कांठावर ठेवलेलीं वस्त्रें ओळखणें दुष्कर होईल असें जाणून त्यानें एक युक्ति योजली, नदीच्या वाळवंटांत एक खळी खणून त्यांत त्यानें आपलीं वस्त्रें पुरून धर्मविधि आटोपून परत आल्यावर ती जागा नेमकी सांपडावी ह्मणून त्या खळीवर त्यानें पांच शिवलिंगांची खूण केली होती. कांहीं वेळानें तो येऊन पहातो तों सारें वाळवंट शिवलिंगांनीं भरून गेलेलें त्यानें पाहिलें व त्याची जागा त्यास आढळणें मुष्किलीचें झालें. त्यानें वाळवंटांत शिवलिंगें उभारलीं हें कोणीं पाहिलें होतें. आजच्या तिथीला वाळूचीं पांच लिंगें तयार करण्याचें माहात्म्य असावें असें त्या गृहस्थाला वाटलें व त्यानें संन्याशासारखें केलें. मागून आला त्यानें तोच मार्ग स्वीकारला व हळू हळू सगळें वाळवंट शिवलिंगांनीं

भरून निघालें. समाज किती आंधळा व विवेकशून्य असतो, सारासारज्ञतेची त्यांत किती उणीव असते एवढें लक्षांत येण्याला ही गोष्ट पुरे आहे.'' तात्पर्य, लांब गर्दी जमलेली दिसते ह्मणून आपणहि जाऊन तींत भर घालावी असें वाटून तेथें जाणारे लोक पुष्कळच असतात. कांहीं मौजेचा प्रकार असला तर ठीकच, नाहीं तर वेड्यासारखें त्याच घोळक्यांत थोडा वेळ राहून लोकांच्या जमण्याचें कारण विचारीत फिरावें, जमल्यास बरेंच, न जमल्यास लोक आपसांत बोलत असतील तेवढ्यावर आपल्या तर्कवितर्कांच्या मदतीनें तिसराच सिद्धांत ठोकून आज अमक्या ठिकाणीं असें असें घडलें ह्मणून सांगत सुटावें अशी जनरीति आहे. परंतु आह्मी वर्णींत असलेल्या वेळीं जमणारांना निराश होण्याचें कारण नव्हतें. तेथें एका घराच्या दारांत उभ्या राहिलेल्या, व जिच्या नोकझोकावरून ती कुलीन स्त्री नसावी असें वाटेल अशा एका बाईबरोबर दुसऱ्या एका पोक्त विधवाधर्मस्वीकृत स्त्रीचें भांडण लागल्याचें आढळलें. कित्येक परिचितांनीं ''ही गणूभाऊ भाव्यांची आईना! वाऱ्याशीं सुद्धां तंटा करील. ती परस्थबाई कोण, वेषावरून तर ती सुशील नसेल हें दिसतेंच आहे, तिच्याशीं ही अगदीं तावून हुज्जत घालीत बसली आहे. हलकटाशीं भररस्त्यांत घासाघीस करायला हिला लाज कशी वाटत नाहीं? काय मूर्खपणा हा? त्या बिचाऱ्या गणूभाऊच्या नांवाला बट्टा लागतो हिच्या कृत्यानें! असल्या आया मिळणें ह्मणजे पापच!'' असे उद्गार काढले. भांडणांत झगडणारे पुरुष असले तर तें विकोपाला जातेसें पाहून पहाणारांना मध्यें पडायला संधि असते, पण बायका झुंजू लागल्यास पहाण्याखेरीज इतरांना गत्यंतर नसतें, व तसेंच सध्यांहि चाललें होतें. पार्वतीबाईंना ओळखणारे जसे त्यापैकीं कांहीं होते तसे त्या दुसऱ्या बाईला जाणणारेहि होतेच व एकंदर भाषणसंदर्भावरून ''गणूभाऊ भाव्यांची ही पहिली बायको, सासूच्या छळामुळें हिनें देशान्तर केलन्, पळून गेली, ती ही बाई'' अशी हूल उठली व ती असत्य नव्हती.

पार्वतीबाई ह्मणतात— ''चांडाळणी, बाजारबसवे, सासू छळते ह्मणून

सगळ्या दुनियेंत डंका वाजवून दुकान घातलेंस का ? सासर माहेरच्या बेचाळीस कुळांचा उद्धार केलास बरें ! अग अदवसे, तुला शिंदळकी करायला हवी होती तें लोकांना कुठें दिसतय्, ज्यांनीं उठावें त्यांनीं आपलें ह्मणत सुटावें कीं पार्वतीबाई वाईट. चटक लागलेलें कुत्रें हड ह्मणून का कोणाचें ऐकणार आहे ! पहाहो सगळे जण पहा, सासू वाईट असें पुढें करून हिनें दुसऱ्याचा हात धरलान् अन् आलिय् मोठी माझ्या घरापुढें रहायला दिमाखानें; तुला बाकीचा गांव का ओस पडला होता ? मी आपली देवपूजेसाठीं चांगली शुचिर्भूत होऊन पडलें घराबाहेर तों ही सटवाई आपल्या दारांत उभी राहून मोठ्या तोऱ्यानें कशी ह्मणते कीं, "सासूबाई, मला ओळखलेंत का? " तुला आपलें अमंगळ तोंड दाखवायला दुसरी वेळच नव्हती का ? हो मीं तुला चांगलें ओळखलें बरें बये ! तूं माझ्या थोरल्या मुलाची पहिली बायको. हो, मीं तुला चांगलें ओळखलें. पळून गेलीस तेव्हां तुझ्या माहेराच्यांचीं तोंडें चिमणीएवढालीं झालीं होतीं. त्यांना अन्न का पाणी कांहीं गोड लागत नव्हतें. सटवे, चांगलें केलेंस बरें. चांगलें केलेंस."

"मी आपलें कुलशील सोडून या धंद्याला लागलें याचें सगळें खापर तुझ्या डोक्यावर फोडायला मी कांहीं भिणार नाहीं. माझ्या नवऱ्याचे कान फुंकून त्याचें माझें वाकडें आणण्याचें काम तूं केल्यामुळें तर माझ्या संसाराचें मातेरें होऊन मला असला बेअब्रूचा पेशा पत्कारायला लागला. तूं पुष्कळ आरडली ओरडलीस तरी मी कांहीं भिणार नाहीं."

"तूं कशाला भिशील ? अन् भ्यावेंस तरी कां ? नाहीं भिणार तेंच तुला साजतें. तुझीं कर्में लोकांना काय माहीत !"

"बाई, तें पुरे करा. सून परसाकडेला गेली तर हातपाय धुवायला ठेवलेलें पाणी मुलाकडून ओतून टाकवून सुनेवर पाणी ठेवायला विसरते, आह्मी का तुझे नोकर, अशी तणतणणारी तूं कोणत्या योग्यतेची आहेस तें आह्मांला ठाऊक आहे. इतक्या बारीक सारीक गोष्टींत जी तूं कुरापती काढीत होतीस त्या तुला माझीं कर्में लोकांना सांगत फिरण्याचें कारण ? कांहीं तरी क्षु-

ळक सबबीवरून दिलेले डाग अझून माझ्या देहावर तुझ्या निर्दयपणाची साक्ष देत आहेत. हिचें सोवळें ओवळें अन् धर्माच्या गोष्टी ऐकून एखाद्याला सहज वाटेल कीं ही मोठी साध्वी आहे. पण पोटांतल्या विषाची कल्पना सहवासावांचून कळायची नाहीं बरें. मी वाईट चालीची असेन पण माझ्या सवतीनें तरी कां जीव दिलान्! बाई, तूं आपल्या मार्गानें जा. इथें रस्त्यांत भांडत बसून लोकांना तमाशा कशाला दाखवतेस ?"

"अस्सें अस्सें, आपण कळ लावून फिरून नामानिराळें होण्याची युक्ति आहे हें का मला कळत नाहीं. अग, आह्मी देखील अन्नच खातों, गवत आधडीत नाहीं. आह्मांला देवानें मेंदू दिला आहेच कीं! माझें धर्मकर्म अन् सोवळें ओवळें काढण्याची उठाठेव तुला ग कोणीं सांगितली ?"

घारूबाईनें (हें तिच्या माहेरचें नांव) कुलीनपणाला बट्टा लागण्यासारखा पेशा पत्करला यावर झोड उठवितांना पार्वतीबाईची जिव्हा निरर्गल चालली होती व ते शब्द ऐकण्याइतकें तिच्या सुनेचें मन निलाजरें नसल्यानें तिनें प्रकरण अनिवार भडकलेसें पाहून गम खाण्याचा विचार केला. पार्वतीबाईच्या मर्मी लागण्याजोगे वाचेचे पुष्कळ घाव तिनेंहि घातले, पण सासूबाईच्या तोंडाचा पट्टा तिच्याहूनहि प्रखर होता. हा मुद्देसूद व पद्धतशीर वादविवाद नसल्यामुळें सून बोलूं लागल्यावर तिच्यापेक्षां मोठ्या आवाजांत सासू बोलत सुटे व सुनेची बाजू लोकांच्या कानीं पडण्याला अवसरच मिळेना. सासूची सरशी होऊन आपला पाणउतारा होणार अशीं चिन्हें दिसूं लागतांच तिनें दार लावून घेतलें व ती घरांत चालती झाली. पार्वतीबाईनीं कुलशील टाकलेल्या सुनेची चांगली खरड काढली ह्मणून त्यांची कोणी प्रशंसा करूं लागले तों सुनेनेंहि सासूचा छान परामर्ष घेतला ह्मणून कांहीं तिला वाखाणूं लागले. गणूभाऊ घरीं असून ते तटस्थ कां राहिले याचा कोणास अचंबा वाटला तर बाळंभटजीच्या गैरहजेरीबद्दल कोणास आश्चर्य वाटलें. लोकांना काय तासभर करमणूक झाली, त्यांना भांडणांत स्वार्थ असा कांहींच नव्हता. तरी पार्वतीबाईसारख्या उतार वयाच्या बाईनें,

लाज, भीड, सोडून खुशाल असभ्यता पत्करली या गोष्टीबद्दल पुष्कळांनीं त्यांस नांवें ठेवलीं व सभ्यतेचा त्याग न केल्याबद्दल घारूताईची तारीफ केली. घारूताईनें तोंड लपवल्यावर तरी पार्वतीबाईंनीं आटपतें घ्यावें कीं नाहीं ? पण त्यानंतर दुप्पट अवसान चढलें, त्या तिला आव्हान करूं लागल्या, विजय संपादल्यामुळें त्यांच्या सुरकुत्या पडूं लागलेल्या चेहऱ्यावर साभिमान आनंदाची टवटवी आली. त्या मोठ्यानें गरजल्या पण प्रत्युत्तर मिळालें नाहीं तेव्हां "× × माझी अब्रू मांडीत होती चव्हाट्यावर, पण ह्मणावें मीहि आहें, तूं बारा गांवचें पाणी प्याली असलीस तर मी सुद्धां चार गांवचें प्यालेली आहें. चार पावसाळे मीं जास्त पाहिले आहेत." अशी बडबड करीत त्या इष्ट कार्यासाठीं तणतणत तोऱ्यानें निघाल्या.

एखाद्या सभ्य स्त्रीला ऐकवल्या नसत्या इतक्या नीच व हलकट शिव्या त्या तोंडानें टाकीत चालल्या होत्या. ते बीभत्स शब्द श्रवण केल्यावर त्या स्त्रीबद्दल पुष्कळ समजस लोकांनीं योग्य तो निष्कर्ष काढलाच असेल. तो गालिप्रदानसमारंभ पहाणाऱ्या एखाद्या वेश्येनें देखील लाजेनें खालीं मान घातली असती व असा शेलका गालिसंग्रह पार्वतीबाईपासून शिकून शिमग्यांत पुढें आणावा असाहि विचार पुष्कळ टवाळांच्या डोक्यांत आला असेल. गणूभाऊ घरांत होते पण त्यांना आईचा प्रताप पहावला तर नाहींच पण क्षणोक्षणीं वाढत्या प्रमाणांत हवेचा भेद करीत असलेला तोंडाचा भडिमार त्यांस ऐकवेना ह्मणून ते मागें परसांत विहीरीच्या बाजूला जाऊन बसले. जिभेच्या तोफेंतून धूमधडाक्यानें निघणारा निवडक शिवीचा अचूक गोळा सुनेच्या हृदयाला छिन्नविच्छिन्न करीत होता. मथूताईनें आईच्या धांगडधिंग्यांत पडून समजूत काढण्याचा प्रयत्न केला पण पार्वतीबाईंना भान कोठें होतें ? या कचाट्यांत सांपडून विनाकारण आपले धिंडवडे निघतील असा तर्क करून तिनें तटस्थाचा मार्ग अवलंबिला. बाळंभटांनीं दुय्यम गोलंदाजाचें काम स्वीकारून मदत केली असती, पण दुर्दैवानें ते गैरहजर होते. साह्याला कोणी नाहीं ह्मणून पार्वतीबाईंनीं उणीव पडूं दिली नाहीं.

त्यांनीं हलकट विजय मिळविला.

त्या दिवशीं सारा वेळ पार्वतीबाईंना दुसरा विषयच सुचेना. आज सकाळीं काय झालें ह्मणून विचारण्यासाठीं पुष्कळ बाया आल्या व चरचरीत फोडणी देऊन स्वादिष्ट केलेलें कथानक इत्थंभूत वर्णून त्या स्वत:चा पराक्रम मोठ्या गौरवानें मैत्रिणींजवळ सांगत होत्या. तो ऐकून त्या बायांनीं ह्मणावें— काकू, तुह्मीच ह्मणून निभावलांत. आपल्यासारख्या एखादीची तर गाळण उडून एक अक्षर सुद्धां तोंडाबाहेर पडलें नसतें. शाबास तुमची, तिची चांगली खोड मोडलीत, ती होऊन तुह्मांला ह्मणालीना कीं, मला ओळखतां का ह्मणून, पहाहो बायका तरी कशा असतात त्या ? तूं बाजारबसवी झालीस तर त्यांत ओळख कसली रहायची ? पण ह्मणतात ना आपलें नाक कापून दुसऱ्याला अपशकुन करायचा त्यांतलेंच हें नव्हे का ? मोठा पुरुषार्थ केला का कांहीं शतकृत्य केलेंस ह्मणून तुझी ओळख ठेवायची ! असल्या ××च्या सावलीला सुद्धां उभें रहाणें पाप. काय बाई तरी हो. तुह्मी किनई काकू फार छान केलेंत. लोकांना ह्मणे वाटलें कीं, गरती बायकांना न शोभेशी अमंगळ वाणी तुह्मी बोललांत ह्मणून, पण त्यांना वाटो तसें. मला तर वाटलें कीं, अशांची खुमखुम जिरवायला असेंच हवें.''

बाळंभटांना गोष्ट कळल्यावर ते ह्मणाले— ''काकू, मी जवळ असतों तर खाडदिशी पायांतलीं खेटरें काढून डोक्यापासून पायापर्यंत शंभर मोजलीं असतीं अगोदर, अन् मग विचारलें असतें तुझें काय बोलणें आहे तें बोल ह्मणून. अशीं माणसें नुसत्या शिव्यागाळीनें का ताळ्यावर येणार ? यांना हग्या मार पाहिजे हग्या मार. काय करूं हो फार वाईट वाटतें मी त्या वेळेला नव्हतों ह्मणून. आतां काय उपयोग.''

गणूभाऊंनीं तर त्या दिवसापासून आईशीं भाषण सोडलें.

सावित्रीकाकूंच्या घरीं हें प्रकरण निघाल्यावांचून कसें राहील ? तेथें पार्वतीबाईच्या जहांबाजपणावर सगळ्यांनीं कुत्सित टीका केली. पार्वतीबाईचे हातून अतिरेक झाला असें सगळ्यांचें ह्मणणें पडलें. पार्वतीबाईच्या बरो-

वर त्यांच्या प्रतिपक्षिणीची चवकशी सहजच निघून "घारूताई इतके दिवस कोठें होती ? कोणाजवळ होती ? सध्यां ती येथें कां आली ? भाव्यांच्या घरासमोरच भाड्यानें घर घेऊन रहाण्याचें कारण काय ? तिच्याबरोबर कोणी पुरुष आहे किंवा नाहीं ?" या प्रश्नांची वाटाघाट चालू झाली; व प्रत्येक जणीची मिळून एकंदर अशी माहिती निघाली— "तिच्याबरोबर पुरुष कोणी नाहीं, पार्वतीबाईंना खिजविण्यासाठीं ती त्यांच्या घरासमोर दुकान घालणार असेल. ब्राह्मणवस्तींत हा प्रकार अनिष्ट आहे. ती खालीं कोल्हापुराकडे कोणा जमीनदाराजवळ होती अशी वदंता आहे, त्याचें व तिचें पटलें नसेल ह्मणून ती मुद्दाम येथें आली असावी. अहो, तो का नवरा आहे त्यानें छळलेन् ह्मणून त्याला चिकटून रहायला. घरोघर बायकांना नवऱ्याच्या तंत्रानें वागावें लागतें पण अशा बायांच्या तब्बेतीनें पुरुषांनीं राहिलें तरच त्यांचा निभाव लागेल, नाहीं तर ती ह्मणेल तूं नाहीं तर तुझा काका दुसरा."

उमेचें या वादांत अंग नव्हतें हें सांगावयास नकोच. तिच्यासारखी धोरणी स्त्री सासूविरुद्ध ब्र काढील ही कल्पना सुद्धां चुकीची ठरेल. तिचें मत काय तें समजण्यासाठीं तिला पुष्कळ जणींनीं जंग जंग पछाडले पण व्यर्थ, तिनें आपलें मौन भंगूं दिलें नाहीं. तिनें विद्याधराला सुद्धां ताकीद दिली कीं, "आजीबद्दल कांहीं कोणाजवळ सांगत बसशील. तसें करू नको. कोणीं विचारलें तर त्यास स्पष्ट सांग आपल्याला यांत कांहीं ठाऊक नाहीं."

सास्वासुनांची ओळख व वाद यासंबंधीं आसपासच्या पुरुषांत कांहीं कमी वाटाघाट झाली नाहीं. प्रत्येक आपल्या स्वभावाप्रमाणें या प्रकरणीं निष्कर्ष काढी; कोणी ह्मणे— "येथें ब्राह्मणजातीची वेश्या आली हें चांगलें झालें नाहीं. ब्राह्मणांच्या होत असलेल्या फजितींत यामुळें भर पडणार." बोलणारांचा हा एक मासला झाला. "सास्वांनीं सुनांचा छळ केला ह्मणजे अशा थराला गोष्ट येते." या मुद्दयावर पुष्कळ जण वाद खेळले.

कित्येकांना "अशा तऱ्हेच्या जीवनक्रमांत स्त्रियांना सौख्य लाभत असेल कीं नाहीं ?" अशी शंका सुचून तिचें समाधान करून घेण्यासाठीं ते स्नेह्यांशीं तंडले. एक का दोन, ज्याला जसें सुचेल तसें त्यानें बडबडत सुटावें. असल्या वादांपासून निष्पन्न काय होणार ?

---

## प्रकरण अठरावें.

## घारूताई.

"जे पिकतें तें विकतें" अशी एक व्यावहारिक ह्मण आहे. कारणाशिवाय कार्य घडायचें नाहीं हाच तिचा रूढार्थ आहे पण कार्यकारणभाव ठरवितांना वस्तुस्थितीचा खरा बोध न झाल्यामुळें तो चुकतो. सुदैवानें "घारूताईला भेटण्यासाठीं गणूभाऊ एकदोनदां गेला होता व तो तेथें घटका घटका बसतो" या जनांत पसरलेल्या वार्तेला आधार होता, व ही बातमी खुद्द गणू-भाऊच्या मातेच्याच तोंडून निघाल्यानें तिच्यांत अतिशयोक्ति असेल पण ती अगदींच खोटी असेलसें संभवत नाहीं. गणूभाऊ आपलें ऐकत नाहीं ही अनिष्ट गोष्ट नाहींशी करून त्याला ताळ्यावर आणण्याकरितां त्याचा जेथें उणेपणा दिसेल तेवढा प्रकट करण्याचें काम पार्वतीबाईंनीं आरंभलें होतें; व या प्रीतीच्या रोगावर योजलेलें औषध कुचकामाचें ठरून दिनानुदिन त्या दोघांमध्यें अधिक फाटत चाललें. पार्वतीबाईंनीं याखेरीज एखाद्या देवतेला अधीन करून तिच्या मार्फत गणूभाऊंत सुधारणा घडवून आणावी असा बेत केला. एका सकाळीं गणूभाऊच्या उशाशीं लिंबू व अंगाऱ्याची पुडी सांपडली; तिचा बोभाटा होऊन तें आपल्या आईचें काम असें कळल्यावर गणूभाऊचें व त्याच्या आईचें जंगी भांडण उडालें. गणूभाऊला वश कर-ण्याचे कामांत अपयश येणार हें तर दिसतच होतें. पण वारंवार अडचणी आल्या तरी अंगीकृत कार्य यशाच्या शिक्यावर चढविण्याचा सज्जनांचा मार्ग पार्वतीबाईंनीं स्वीकारला आणि 'गणू पळून गेलेल्या बायकोस भेटतो' या

बातमीचें साधन हातीं आल्यावर तर तें फुटेल या भयानें तो आपल्या मुठींत येईल असा मातुःश्रीचा अंदाज़ होता. पण हें अनुमान निदानीं चुकीचें ठरलें. एकदां पार्वतीबाई मोठ्या गंभीर आवाजांत अधिकारानें ह्मणाल्या, "गणू, तूं त्या अवदसेला भेटायला जातोस, तिची गांठ घेतोस व तासचे तास बसतोस हें कांहा चांगलें लक्षण नव्हे. या करण्यांनीं लोक काहींचें बाही कुजबुजूं लागले आहेत. आपला संभाळून रहा हो. मला आपल्या शेजारच्या आयाबाया विचारतात कीं, गणू कांहीं भलत्याच नादाला तर लागला नाहीं ना? त्या आपल्या बऱ्या भावानें विचारतात. मला सांगायचें तें काम मीं केलें. शत्रूचें सुद्धां वाईट होऊं नये अशी सगळ्यांची इच्छा असते पण मीं सख्खी आई– अगदीं जिव्हाळ्याची– तिला आपला मुलगा बहकावा असें कसें वाटेल? जीव रहात नाहीं ह्मणून आपण आपली बडबड करावी. बाकी ऐकणारांचें लक्ष कुठें असतें तिकडे ह्मणा."

गणूभाऊ स्वस्थच राहिला. त्यानें उत्तरप्रत्युत्तराच्या भानगडी स्तब्धतेनें टाळल्या. गणूभाऊ आपल्या समजावणीनें वळत नाहींसें पाहून पार्वतीबाईनीं नवीन युक्ति शोधून तिचा प्रयोग आरंभला. गणूभाऊच्या बायकोला त्यांनीं हाताशीं घेतलें. नवऱ्याचें प्रेम आपल्याच हक्कानें दुसरी कोणी हिसकावून घेईल ही शंका देखील बायकोला सहन होत नाहीं. या प्रेमी मत्सराची मनोवृत्ति चिथावून गणूभाऊबद्दल लक्ष्मीच्या मनांत काय वाटेल तें त्यांनीं भरवून दिलें. आजपर्यंत सासूबाई व वन्सं आपल्याला दुजेभावानें वागवीत असतां आतां एकाएकीं प्रीति कां करूं लागल्या याचें खरें मर्म लक्ष्मीला कळलें नाहीं. लक्ष्मीला आपलीशी करून घेतल्यावर मग तिच्या नवऱ्याबद्दल शंका वाढतील असे मुद्दे पुढें मांडण्यास सुरुवात झाली. "गणूभाऊ आतांशा कुठें एके ठिकाणीं राहूं लागला आहे. इतके दिवस फिरतीवर होता, तेव्हां त्याला बाहेरख्यालीचा नाद अमलाच पाहिजे, त्यानें आज जवळ जवळ वीस वर्षें अशीं काढलीं, बायको जवळ नाहीं तेव्हां असें होणें कांहीं मोठेसें नवलाचें नाहीं. आतांच पहा, सवड सांपडल्याबरोबर त्या सटवाईच्या न्

त्याच्या झाल्या गांठीभेटी सुरू. लक्ष्मि, बघ बाई तूं आपलें, नवऱ्याचें लक्षण कांहीं धड नाहीं." लक्ष्मी बिचारी यांचे पाचपेंच कळण्याइतकी चाणाक्ष नव्हती. तिच्या मनांत हें विष चांगलें भिनलें व सासूबाईंना अथवा वन्संना पर्यायानें नवऱ्याच्या वर्तनाबद्दल प्रश्न विचारूं लागली. त्यांना तेंच हवें होतें. त्यांनींहि एक एक गोष्ट अशी बनवून सांगावी कीं, त्यांच्या जाळ्यांत लक्ष्मी पूर्णपणें अडकावी. लक्ष्मीला असें पक्कें भारल्यावर तिची दृष्टि नवऱ्याविषयीं संशयी बनली. नवरा जें करील, जें बोलेल, त्या प्रत्येकांतून तिला नवऱ्याच्या अनुचित वर्तनाचे देखावे दिसूं लागत. एकदां गणूभाऊच्या तोंडून विवंचनेच्या भरांत सहज उद्गार निघाले— "मला बरें वाटत नाहीं, मनाला असमाधान वाटतें." लक्ष्मीनें तेवढी संधि साधली व ह्मणते—"तें ठीकच आहे. दुसरीकडे मन वेधलें ह्मणजे घरांत चैन कसें पडणार? संतोष वाटत नाहीं, सुख होत नाहीं, तेंच खरें. माझ्या हातून व्हावी तशी सेवा होत नसली तर सुख देणारणीच्या फासांत मन अडकेल यांत नवल नाहीं. देवा नारायणा, अदृष्टांत काय काय लिहिलें आहेस तुझें तुला ठाऊक."

आज बरेच दिवस आपली पत्नी आपल्याशीं मोकळेपणानें वागत नाहीं, सदा दुर्मुखलेली असते या प्रकाराचें इंगित गणूभाऊला आतां कळलें. त्याच्या मनांत प्रकाश पडला. आपल्या भार्येचें आई व बहिण यांशीं हल्लीं फार मेतकूट जमलें आहे, त्यांच्या वेळीं अवेळीं बऱ्याच गुजगुज गोष्टी चालतात या चमत्काराचें कोडें त्यांना आतां उकललें व हें अगदीं सास्वासूनांत अथवा नणंदाभावजयांत पाघळूं लागलेलें प्रेम आह्मां नवराबायकोंत विरोध उत्पन्न करीत आहे अशी त्याची बालंबाल खात्री झाली. आपला स्वभाव माहीत असून बायकोला दुसऱ्याच्या शिकवणीनें संशय वाटूं लागला याचें त्यांस अत्यंत वाईट वाटलें व त्या खेदाच्या भरांत ते ह्मणाले— "प्रत्येक गोष्ट मी तुझ्याशीं उघड सांगतों, कांहीं लपवून ठेवीत नाहीं; तरी माझ्याबद्दल तूं अविश्वासाचे संदिग्ध उद्गार काढावेस याचें मला फार वाईट वाटतें. अग, माझें मन दुसऱ्या कोणी स्त्रीनें हरण केलें असून त्यामुळें मला घरांत

सुख होत नाहीं असे शब्द प्रत्यक्ष बायकोच्या– तुझ्या– तोंडून निघालेले माझ्या कानीं पडतील अशी माझी कल्पना नव्हती. जग जरी निंदीत असलें तरी मला प्रिय असलेल्या भार्येच्या मुखांतून अशा अप्रतिष्ठेच्या वाक्यांनीं माझा मर्मभेद होईल असें मला स्वप्न देखील पडलें नाहीं, पण हतभाग्याचा पिच्छा दुःखांनीं, संकटांनीं, पुरवावा हेंच योग्य आहे."

ही खेदवाणी परिसून लक्ष्मीच्या हृदयांत कालवाकालव झाली. आपण चूक केली अशी भावना होऊन ती आपल्या भाषणाचा अधिक खुलासा करून त्याबद्दल नवऱ्याकडून खरा प्रकार कळवून घ्यावा यासाठीं ती सिद्ध झाली. इतक्यांत गणूभाऊ ह्मणाले— "मी माझ्या पहिल्या बायकोला भेटायला कां जातों व कोणत्या नात्यानें जातों हें कोणासच ठाऊक नसतां मी जातों एवढ्याच निमित्तावर माझ्या नांवानें भलताच गवगवा घरची व दारची मंडळी करीत सुटली आहेत. माझ्या आईनें बहिणीनें तुझ्या मनावर विष ओतून तुला माझ्या सुखांत व्यत्यय आणण्यास उद्युक्त केल्याचें मला आतां समजलें. आजपर्यंत आईच्या नादानें बायकांचे हाल केले. आतां कुठें मी सुखाच्या मार्गाला लागलों तों त्यांत माती कालवायला आई, बहीण व बायको या सिद्ध झाल्या आहेत. जगांत आतां सुखाचें ठिकाण असें मला कोणतेंच उरलें नाहीं. माझा एका महत्संकटांतून बचाव करून तुला जिनें चुडेदान दिलें त्या बाईला मी कृतज्ञभावानें भेटायला जातों. त्यांत माझा दुसरा कांहीं उद्देश नाहीं व नव्हता. अग, माझ्याबद्दल मनांत संशय बाळगून जर तुला खुनशीपणानें, मत्सरीपणानें वागावयाचें असेल तर तुझी इच्छा; पण मला त्रास झाल्यास मी तुह्मां सगळ्यांना सोडून एकटा राहीन. तुमच्या पोटाची व्यवस्था करणें माझें कर्तव्य असल्यामुळें मिळकतीपैकीं अन्नवस्त्राची टंचाई न पडण्याइतका भरपूर हिस्सा दरमहा देऊन टाकतों. रहा तुह्मी सुखानें. माझ्यामुळें तुमचे सर्वांचे हाल कशाला?"

लक्ष्मीचें मन आतां फार बावरलें. आपल्या हातानें आपण आपल्या

पायावर धोंडा पाडून घेतला असें वाटून ती माफी मागण्यास तयार झाली. सासूनें व नणंदेनें पुष्कळ दिवसांच्या प्रयत्नानें ठासून भरलेला बार अखेरीस वांझ ठरला व लक्ष्मीच्या मनावर संदेहवृत्तीनें चढलेलें कठोरपणाचें कवच गळून जाऊन तें विषादानें वितळलें. नवऱ्याच्या चित्ताला त्रास देऊन त्यास छळलें अशी तिची खात्री झाली. तिनें सपशेल माफी मागितली. व नवरा अमळ खुषींत पाहून त्या बाईनें आपणास चुडेदान कसें दिलें हा इतिहास विचारला. कांहीं तरी भयंकर आजारामुळें त्यास अज्ञातवास काढावा लागला होता व आपली शुश्रूषा आईप्रमाणें करून जीव वाचविणारी बाई ती ही घारूताई अशी हकीकत त्यानें तिच्या कानीं घातली, पण हें कोणाजवळ न बोलण्याविषयीं ताकीद दिली. शेवटीं ते ह्मणाले— "केवळ तिच्याच मेहरबानीनें मी जगाला मुकलों नाहीं, एवढेंच नव्हे तर माझी वागणूक देखील बदलून टाकण्यास तीच कारण झाली. बायका या एका नवऱ्यासाठीं सगळ्या दुनियेच्या वैभवावर लाथ मारण्यास सिद्ध असतां सारासार विचाराला टाळा देऊन त्यांचा छळ करणें चांगलें नाहीं; अशी तिनें माझी कानउघाडणी केल्यावरून माझा आईवरचा विश्वास उडाला व मी संसारसुख अनुभवूं लागलों. ती इथें असतांना तिचें ह्मणणें मीं कधींच ऐकलें नाहीं पण दुखण्यांत तिच्या उपकारांनीं मिंधा झाल्यानें व पूर्वींपेक्षां तिला स्वतंत्रतेनें बोलण्याचा अधिकार असल्याच्या योगानें तिनें चांगलें झणझणीत अंजन डोळ्यांत घालून माझी चूक दाखविली. सासूच्या गांजणुकीच्या सगळ्या तऱ्हा तिनें मला स्पष्ट सांगितल्या. तीच चूक मी हल्लीं दुरुस्त करीत आहें. तिची गांठ न पडती तर मागच्या दोघां बायकांसारख्याच हालअपेष्टांत तुला आपलें आयुष्य संपवावें लागलें असतें व मी प्रपंचसुखाला आंचवलों असतों. पण ईश्वराच्या दयेनें ती माउली मला भेटली व सगळें बस्तान जुळलें. मग सांग बरें आपल्यावर तिचे किती उपकार आहेत ते ?"

उलटपक्षीं घारूताईच्या तोंडून काय उद्गार निघत ते ऐका— "मी

आनंदांत रहात असतां माझी व तिकडची भेट झाली. मला फार दुःख झालें. परंतु ही गोष्ट एका दृष्टीनें माझ्या हितासच कारण झाली. माझ्या अंगांत जन्मतः मुरलेले आर्यस्त्रियांना उचित असे स्वभावविशेष पुन्हां जोरानें उसळले व अखेरीस धंद्यावरून माझें मन उडालें. मला माझ्या धंद्याचा वीट आला. मीं घोर पाप केलें असा माझ्या मनाला अनुताप होऊं लागला. पतिला वाहिलेली ही काया कुसंगानें विटाळण्यापूर्वी माझ्या सवतीप्रमाणें जर आत्महत्या करून नाहींशी केली असती तर तिला हल्लीं जडलेला हृद्रोग तरी त्रास देताना. सासरीं व माहेरीं माझा अव्हेर केल्यावर रहाण्याला थारा देणाऱ्या दुर्जनांनीं माझा देह भ्रष्ट केला. माझें मन अशुद्ध विकारांनीं जेव्हां बेफाम झालें तेव्हां माझें तारुण्य व स्वरूप याला भुलून कोणा एकानें मला जवळ ठेवलें. कुलशीलवती स्त्रियांच्या अब्रूवर पाणी सोडून मी त्या हलकटपणांत दंग झालें. माझा धनी— शिव शिव, ईश्वरानें माझ्यावर हुकमत चालावी ह्मणून कोणाला योजलें ? माझा खरा मालक कोण व मी कोणाला माझा धनी ह्मणतें— असो. माझा धनी रंगेल व गर्भश्रीमान् असल्यामुळें माझ्या विलासांत त्यानें कमतरता पडूं दिली नाहीं. मी माझें पूर्ववृत्त पूर्ण विसरून या नव्या आयुष्यक्रमांत किती तरी काळपर्यंत रमलें होतें, पण पुढें एकाएकीं माझी व तिकडची गांठ पडली. माझें मागचें आयुष्य मला स्मरूं लागलें. माझ्या सख्या, मैत्रिणी नवऱ्याच्या रोजगारावर मुलांबाळांच्या सहवासांत अब्रूनें, आनंदानें कशा दिवस काढीत असतील हा प्रश्न माझ्या डोळ्यापुढें वारंवार येऊं लागला. तिकडचें दर्शन झाल्यापासून मी माझ्या विलासी वैभवाचा तिरस्कार करूं लागलें. माझा आनंद मला दुःखासारखा भासे. माझें व माझ्या धन्याचें जुळेना तेव्हां एकदां त्यास व या ग्राम्य धंद्यास अखेरचा रामराम ठोकून तिकडच्या भेटीसाठीं तळमळत येथें आलें. मी या जगाला कंटाळलें आहें, जगण्याची माझी इच्छा नाहीं. माझी परिस्थिति पाहून लोकांनीं मला दोष देण्याचें कारण नाहीं. पतिसुखाची कल्पनाच नसलेलें हें मन दुष्टांचा कावा ओळखण्याइतकें प्रौढ झालें

नव्हतें. नवऱ्यालाच धरून काय करावयाचें आहे ? त्यापेक्षां चैनींत आयुष्य घालविण्याची जर सोय झाली तर काय वाईट ? असे कुतर्क त्यांनीं माझ्या मनांत भरवून दिले. मला ते खरेच वाटले, मी त्यांच्या भुलथापांना फसून या पापाला प्रवृत्त झालें. मी त्यांना हुरळून या पापांत रुतलें, पण माझ्या दोषाला आणखीहि खाजगी कारणें आहेत. सासूनें गांजलें व नवऱ्यानें छळलें यासाठीं या यातनांतून कधीं सुटेन असें मला झालें होतें. सासू दुष्ट असली, नणंद कजाग असली तरी चालेल, पण पतिप्रेमाच्या जिव्हाळ्यानें त्यांची आह्मां बायकांना फारशी खातरजमा वाटत नाहीं. पण माझ्या स्थितींत त्याचीहि वानवाच होती. माझ्याकडे कधींहि कृपेच्या नजरेनें पहाण्यांत आलें नाहीं. पतिप्रेमाचा झरा आटल्यावर संसाराच्या रुक्ष प्रदेशाचा मार्ग कंठणें मुष्किलीचें झाल्यास नवल नाहीं. ज्याच्या जीवासाठीं जन्मदाते आईबाप पारखे केले, ज्याच्या सुखाकरितां आपला देह वाहिला, त्यानें नांव टाकल्यावर जगांत आशा कशाची करायची ? पति हें बायकांचें सर्वस्व, तें जर रुष्ट झालें तर बायकांचा वाली कोण ? मी नादान ह्मणून सुखास्तव दुसऱ्याचा हात धरला, पण नीच हौस पुरविण्यासाठीं जुळणारें परस्परांचें जुजबी प्रेम कधीं उडल त्याचा नियम नसतो. आज नाहीं तर उद्यां तरी मला पतीवर हक्क सांगतां आला असता, त्याची एकनिष्ठ सेवा करून इहलोकीं न मिळालेल्या सुखाची जोड परलोकीं करून घेतली असती पण आतां माझ्या जीवाला किती वेदना होत आहेत पहा. नवऱ्यानें जाचलें तरी त्याच्या घराच्या सावलींत समाधानानें दिवस काढणाऱ्या स्त्रियांकडे स्वर्गांतल्या देवांगना कौतुकानें पहात असतील, दोन्ही कुळांतले पितर त्यांच्या कष्टाळू जीविताचा गौरव करून आनंदाश्रु गाळीत असतील. ज्या प्राचीन व अर्वाचीन सतींनीं आपल्या दिव्य जीवितक्रमानें आपलें नांव अजरामर करून ठेवलें आहे त्या या सुशील स्त्रीचें अभिनंदन करीत असतील, दिव्यलोकीं तिच्यासाठीं उत्तम स्थान निवडून ठेवण्यांत देव गढून गेले असतील. सारांश, इहलोकींची यातनामय पतिनिष्ठा तिला परलोकीं भोगण्यासाठीं दिव्यसुखें

जोडून ठेवीत असते; पण माझी काय स्थिति आहे! मी भ्रष्ट झालें ह्मणून माझी या लोकांत जशी विटंबना चालली आहे; लोक माझ्याकडे कुत्सित बुद्धीनें बोटें दाखवितात. मीं पतिसुखाला अंतरून जो पेशा धरला त्यामुळें माझ्या मनाला तरी शान्ति कोठें आहे? जीवनावांचून तळमळणाऱ्या माशा सारखी माझ्या मनाची दशा झाली आहे. मी या लोकीं केलेल्या पापांचें प्रायश्चित्त जनापवादाच्या रूपानें भोगीत आहेंच, पण मरणानंतर माझी अवस्था काय होणार? पतिद्रोही ह्मणून यमाच्या दरबारांत हजर करण्याकरितां मला बांधून नेतील. माझ्या उघड्या देहावर ज्या कोरड्याचे फटकारे द्यायचे त्याची तयारी यमदूत एव्हांपासून करीत असतील. राजद्रोहाचे आरोप अंगीं लागून लोकसेवेच्या पायीं शिक्षा भोगणारांचे कष्ट माझ्यापेक्षां किती तरी बरे; त्यांना त्यांच्या सत्कर्माचें कडू फळ येथें चाखावें लागलें तरी लोकांतरीं योग्य बक्षीस मिळण्याची त्यांस खात्री असते. पण माझा पतिद्रोह मला दोन्ही ठिकाणीं सारखाच तापद होणार. ज्या करवतीनें माझा देह कापला जायचा तिच्या दांतांना यमदूत आतांच धार लावण्यांत गुंतले असतील, ते आपल्या तरवारी पाजळून तयार करीत असतील, ज्या कढईतील तापलेल्या तेलांत माझें शरीर तळायचें ठरलें असेल, तिची भट्टी त्यांनीं आतांच पेटवून ठेवली असेल, या सगळ्या अपेक्षांत भर पडावी ह्मणून नरकांतले किडे माझ्या शरीराला कुरतडून कुरतडून गट्ट करण्यासाठीं एव्हांपासून उपाशीं ठेवण्यांत येत असतील. पतिद्रोहाच्या पातकांची शिक्षा भोगण्यास मी तर तयार आहेंच; पण सासूबाई, ज्या तुह्मीं दुष्टाव्यानें मला सुखांतून ढकललेंत, त्या तुमचें नांव मी यमापुढें सांगितल्याशिवाय मात्र खचित रहाणार नाहीं."

घारूताई ही जातीची कुलीन स्त्री असून परिस्थितीला कंटाळून हा रोजगार करूं लागली होती, त्यामुळें तिच्या विचारांत दिसून येणारी क्रांति अस्वाभाविक नव्हती. पतिनिष्ठा हा कुलीन स्त्रियांचा उपजत अंगस्वभाव पडला. त्याची फिरून उठावणी झाल्यास नवल नाहीं. ती प्रथम घराच्या बाहेर

पडत नसे, पण पुढें पुढें आपल्या नातलगांच्या त्यांची इच्छा असल्यास भेटी घेऊं लागली. एकदां ती उमेच्या बिऱ्हाडीं गेली. उमेला प्रथम तिची गांठ घ्यावी कीं न घ्यावी हा प्रश्न पडला. पण त्यांस सावित्रीबाईसारख्या पोक्त स्त्रियांची संमति मिळल्यानें तिनें घारूताईस घरांत येऊं दिलें. घारूताई डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाली– "बाई, माझा ज्यानें त्यानें अव्हेर करावा हें योग्यच आहे. लोकांच्या आदरास पात्र व्हावें असा कोणता गुण माझ्यांत उरला आहे? जगाचा मार्ग जग अनुसरतें, पण या पश्चात्तापानें पोळत असलेल्या आपल्या जावेची अवहेलना तुह्मी करूं नका. माझें दर्शन पुण्यनाशक आहे खरें, पण ज्या आप्तेष्टांनून मी उठून गेलें त्यांनीं तरी या गरीब पापिणीकडे मेहेरनजरेनें पहावें. त्यांनीं सदय अंतःकरणानें जर माझे अपराध पोटांत घालून कृपेचे कण मला बहाल केले तर त्यांच्या ओलाव्यानें माझ्या चित्ताचा ताप कांहींसा शमल. तुमच्या सगळ्यांच्या पुण्याईचा अंश जर माझ्याकरितां खर्ची पडला तर तुमचें थोडेंसें नुकसान होईल खरें, पण माझा हतभागिनीचा त्यामुळें उद्धार होईल. बाई, माझें अंतःकरण पापाच्या तापानें करपून जात आहे."

हृदयांत चाललेली खळबळ ती जिच्यातिच्यापाशीं ओकून टाकीत असे. तिच्या करुणोद्गारांच्या श्रवणानें तेथें हजर असलेल्या प्रत्येकीचें मन हेलावलें व तिच्या दुःस्थितीची सर्वांना कींव आली. सावित्रीबाईहि यानंतर तिच्याशीं अगदीं स्वच्छ मनानें संभाषण करूं लागल्या.

ज्या गोष्टीचें थोडेंसें रूपान्तर करून लक्ष्मीच्या सासूनें व नणंदेनें तिला अवस्तुश करून सोडलें होतें, व ज्या कामांत त्यांचा हेतु निष्फळ झाला ती गणूभाऊ व घारूताईची भेट कांहीं खोटी नव्हती. ते होऊन तिच्याकडे गेले त्या प्रसंगीं ती झोपाळ्यावर बसून मंद आंदोलनें घेत होती. पतीची मूर्ति दृष्टिगोचर होतांच तिनें त्यास उत्थापन दिलें व झोपाळ्यावर बसवून आपण भिंतीशीं टेकून नम्रतेनें उभी राहिली. आपण जेव्हां हिच्या औषधोपचारानें तिळतिळ प्रमाणांत रोगमुक्त होत होतों तेव्हांपेक्षां आतां हिच्यांत फरक

फार पडला होता. त्या वेळची तिची मुखश्री आतां कायम नव्हती, तिच्या चर्येवर म्लानि अतिशय आली असून आनंद, उत्साह, इत्यादि मनोवृत्तींचा प्रायः लोपच झाला होता. अनुतापानें मन जसें क्षीण झालें होतें तसेंच शरीरहि कृश झालें होतें. तिची अशी स्थिति पाहून गणूभाऊला फार विषाद वाटला. ती त्यांच्याकडे व ते तिच्याकडे अगदीं अचळ दृष्टीनें पहात होतें. जणूं काय नजरेचें हें मुकें संभाषण त्यांस परस्परांचें मनोगत समजावून देत असावें. परंतु असा प्रकार फार वेळ टिकला नाहीं; घारूताईच्या नेत्रांतून घळघळ आंसवें गळूं लागून तिनें डोळ्यांला पदर लावला, गणूभाऊंनीं तिच्या वदनावर खिळलेली आपली दृष्टि बाजूला काढली, व दुःखानें गळा दाटला असूनहि कष्टानें ते ह्मणाले—"मला कशाला बोलावलें?"

घारूताईनें डोळे पुसले, व ह्मणाली—"महाराज, सध्यांच्या आपल्या पत्नीला आपल्या हातून सुख लागतें ना?"

गणूभाऊंनीं होकार सुचविला.

"महाराज, या पापिणीच्या बोलावण्याला मान दिलात या उपकाराची उतराई मी कशी होऊं शकेन! केवळ आपल्या दर्शनासाठीं मी सर्वपरित्याग करून येथें आलें. आपल्या मातुःश्रीची चार दिवसांपूर्वीं भरस्त्यांत बेअदबी केल्याबद्दल प्रथम पदर पसरून माफी मागतें. आपण माझा तो अपराध पोटांत घालून दया करावी. पण असला गुन्हा करण्याला मी कां सिद्ध झालें याचें कारण विचाराल तर तें उघड आहे. माझें शरीर साफ असलें तरी मन अस्वच्छ आहे. त्या मनाला जीं पापांचीं क्षतें पडलीं आहेत त्यांपैकीं प्रत्येक क्षत "सूड सूड" ह्मणून ओरडत आहे. तुमच्या आईला पहातांच माझीहि इच्छा प्रबळ झाली व मीं त्यांना हटकलें. त्यांत माझी फजीती होऊन आपल्या आईची सरशी झालेली पाहून पुत्राला आनंद होणें रास्तच आहे. मी पाप करून त्याच्या पश्चात्तापानें आज होरपळत आहें. महाराज, आपले चरण धरावे असें कितीदां मनांत येतें पण या बाटलेल्या देहाचा स्पर्श झाल्यानें आपणास विटाळ होईल ही शंका लगेच उद्भवून मी तसें करण्यापासून

माघार घेतें. महाराज, हा देह भ्रष्ट झाल्यानें इहपरलोकाचा कठोर दंड सोसायला मी तयार आहें. पण आपल्या संनिध राहून प्राणान्त होईपर्यंत लागलेली दु:खाची आंच कमी करावी हाच येथें येण्यांत उद्देश आहे. पिंगला नांवाच्या एका वेश्येनें परपुरुष भोगण्याच्या दुष्कृत्यांत उपरति झाल्यावर परमेश्वरचिंतनाचा मार्ग धरला. तिनें ईश्वरनामाची कास धरली व त्या उपायानें तिच्या पापाचा मळ धुऊन जाऊन ती मुक्त झाली अशी कथा पुराणांत आढळते. मला आतां तेवढीच आशा आहे. राहिलेलें आयुष्य त्या करुणामय परमेश्वराच्या ध्यानांत कंठावें असा माझा हेतु आहे. श्रीहरीचें भजन, पूजन आणि हरिकथांचें वाचन अथवा श्रवण माझा परलोकींचा जाच कमी करूं शकेल; पण भक्तवत्सल श्रीकृष्णाच्या निदिध्यासांत माझ्या पापाच्या स्मरणानें खंड पडतो, व नेहमीं वाटतें कीं, स्त्रियांचें पति हें दैवत शास्त्रांनीं, आमच्या धर्मानें सांगितलें असतां, त्याचा त्याग करून दुसऱ्या देवाचे पाय धरून काय होणार ! एवढ्यासाठीं मी आपल्याजवळ आलें. महाराज, इच्छेस येईल त्याप्रमाणें या शरीराची सेवा घ्यावी.''

''शरीराची सेवा घ्यावी'' हें ती सहज ह्मणाली खरी, पण लागलीच तिच्या मनांत विचार आले—

''शरीर अपवित्र अमंगळ झालें असल्यानें तें निरुपयोगीच आहे. द्रव्याची मदत— पण द्रव्य या शरीराच्या अशुद्धीवर मिळविलेलें अर्थात् तेंहि पापार्जित ह्मणून वर्ज्य. मग कोणत्या साधनानें पतिसेवा माझ्या हातून घडेल. साधन दिसतच नाहीं. एखाद्या मोलकरणीप्रमाणें यांच्या घरीं राबण्यावांचून दुसरा उपाय नाहीं. पण पतित अशा मला हे सवलत तरी देतील का ? छे नाहींच, निराशा—निराशा—'

या विचारानें तिच्या मनावर घनदाट औदास्य पसरलें व पतीकडून काय जबाब येतो तो ऐकण्यास ती उतावीळ झाली.

गणूभाऊस बोलण्याला कांहींच नव्हतें. ती जवळ आली व त्यांच्या पायाशीं बसून ह्मणाली— ''महाराज रहावत नाहीं ह्मणून बोलतें, मला क्षमा

कराल का? आपण मला माफी देऊन निर्दोष मानलें ह्मणजे त्या आधारावर मी परलोकीं यातनांतून खास बचावेन. इकडून सदय व निर्मळ अंतःकरणानें क्षमादान झाल्यावर परलोकीं माझा छळ करण्यास यमाचे दूत धजणार नाहींत. माझें मागणें फक्त इतकेंच आहे. मला क्षमा करा. महाराज, माझ्या या विनवणीला मान देऊन माझा उद्धार करा. माझा उद्धार कराहो, या अभागिनीला हात देऊन वर काढाहो, असे कठोर होऊं नका, दया येऊं द्या,—" तिला रडूं कोसळलें व हुंदका न आवरून त्या भरांत तिनें भुईवर डोकें टेकलें.

गणूभाऊ अडचणींत सांपडले, आपण हिला माफी दिली तर परलोक कसा सुखावह होणार याचेंच त्यांना गूढ पडलें असतें. पण त्यांनाहि परमार्थाची अलीकडे मोठी तळमळ लागून ते सद्गुरूच्या शोधांत होते व अशा चेल्याला गुरुहि लवकरच लाभले. त्यांना पत्नीचें करुण वचन ऐकून क्षमा दान करावेंसें वाटलें व भाषणाच्या शेवटीं तिची हृदयस्थ तळमळीनें जी स्थिति झाली ती पाहून तर त्यांना तसें करणेंच भाग पडलें. हा प्रसंग चित्तद्रावक होता व त्याप्रमाणें त्यांचें चित्त द्रवून त्यांनीं क्षमा केली; "माझ्या मनांत यापुढें किंचित्हि किंतु उरला नाहीं. तूं सुखानें परमार्थाला सिद्ध हो." अशीं आशीर्वचनें त्यांनीं काढल्यावर घारूताइच्या डोळ्यांचें पाणी खळलें व तीस शान्ति वाटूं लागून तिच्या मुद्रेवर अंतस्थ समाधानाची झांक मारूं लागली.

गणूभाऊ हा माणूस बोजड बुद्धीचा असल्यानें दुसऱ्याच्या अंतरंगाशीं एकरूप होण्याची शक्ति त्यांत नव्हतीच; त्यामुळें त्यास घारूताइच्या करुण चित्रांत क्षणभर मौज वाटून जरी तो तिचें इष्ट पुरविण्यास सिद्ध झाला तरी त्यास तिच्या मनाशीं मिसळून जातां आलें नाहीं.

गणूभाऊच्या पहिल्या भेटीला वर घडलेला प्रकार झाला. त्यानंतरच्या प्रसंगांत ती त्याच्याशीं मोठ्या विनयानें भाषण करून स्वतःच्या सुखदुःखाच्या गोष्टी सांगे, त्याचें मन रिझवी. परंतु आपण भ्रष्ट अर्थात् पतित

आहों ही जाणीव ती केव्हांहि विसरली नाहीं.

त्यानंतर ती सासूच्या घराखेरीज अवशिष्ट व तिच्या भेटीला अशुभ न मानणाऱ्या नातेवाईकांकडे नेहमीं जात येत असे, व बायकांशीं बोलतांना तर तिचें नेहमीं सांगणें असे कीं, बायकांना नवऱ्यासारखा दाता नाहीं. त्याची सेवा त्यांनीं श्रद्धापूर्वक करावी. तो दुर्व्यसनी असला व स्वतःची त्याला किंमत वाटत नसली तरी त्यावर त्रासून त्याचें मन दुखविण्यासारखें कांहीं करूं नये. त्यानें आपल्याला संतोषपूर्वक आशीर्वाद दिला नाहीं तरी चालेल, पण त्याशीं विरोध करून त्याचें मन निदान दुखवूं तरी नये. आपल्या सेवेचें फळ ह्मणून दीनाचा कनवाळू परमेश्वर कधीं ना कधीं त्यांच्या मतांत फरक पाडील; आपल्यावर नवरा प्रेम करीत नाहीं ह्मणून त्याला दोष देण्यापेक्षां आपण आपल्या पूर्वदुष्कृताचे परिणाम सतत भोगीत आहों असें समजावें. इत्यादि, इत्यादि.

मुलगे वयांत आल्यानें ज्यांना सासूपणा लवकरच यावयाचा त्यांना सद्गदित कंठानें व मोठ्या कळकळीनें ती नेहमीं उपदेश करी– "बायांनों, तुह्मी स्वतःवरून जर पहाल तर तुह्मांस असें आढळेल कीं, आपण बायका आपले आईबाप व इतर मायेचे स्वजन लोटून एका पतीच्या जीवासाठीं दुसऱ्याचें घर आपलें मानतों, इतकेंच नव्हे तर नवऱ्यावांचून आपलें भिन्न अस्तित्व असतच नाहीं. आपल्याला सासू व्हायची वेळ आली ह्मणजे आपण ते आपल्या सूनपणाचे दिवस विसरतों व आपल्या मुलामागें येणाऱ्या लहान लहान अजाण मुलींना गांजूं लागतों. आपल्या जशा मुली तशाच त्या. आपल्या मुलींच्या हातून ज्या चुका होतात त्याच त्यांच्याहि होतात; पण सुनांच्या चुकीच्या राईचा डोंगर करून त्यांना शासन लावण्यांत सास्वा तत्पर असतात. या परक्या मुलीच्या मागें तिच्या जावांनीं, नणंदांनीं व दीरांनीं लागून तिला सळो का पळो करण्यांत त्यांना भूषण वाटतें. सर्वांचा सलोखा असला तर घरांत मूर्तिमंत आनंद नांदेल, सासूच्या अपरिमित छळामुळें कंटाळून तर मी माझ्या सासरमाहेरचें व माझें स्वतःचें नांव बदू

करण्यासारख्या कृत्यांत सांपडलें. पुष्कळ मुली जीव देतात. त्यांना सासर ह्मणजे यमपुरी असें वाटूं न देण्याचा प्रयत्न करा, माझ्या सासूसारख्याच सगळ्या सास्वा असतात असें माझें ह्मणणें नाहीं. प्रत्यक्ष पोटच्या मुलीहूनहि आपल्या मुलाच्या अर्धांगीला जपणाऱ्या धन्य माउली या जगांत पुष्कळ आहेत. माहेरीं स्वच्छदानें बाळपण घालविणाऱ्या कोंवळ्या मुलींना एकदम सासरच्या बंदींत कोंडून बसण्याचा प्रसंग येतो. सासर हा बंदिवास आहे, तो गुन्हेगारांचा तुरुंग आहे असें त्यांस वाटूं देतां कामा नये. पक्षिणी आपल्या पिल्लांना त्यांनीं आकाशांत स्वेच्छेनें भराऱ्या मारण्यापूर्वीं झाडाच्या एका फांदीवरून दुसरीवर, दुसरीवरून तिसरीवर, जसें उडायला शिकवतात तसें जगामध्यें मुलांसुनांनीं स्वसामर्थ्यानें संसार करूं लागण्याचे अगोदर ओंजारून गोंजारूनच सुनांना शिक्षण द्यायला पाहिजे. जुलमी राजा जशी मन मानेल तशी प्रजेवर सत्ता गाजवितो तसा सास्वासुनांचा संबंध नाहीं. जुलमानें सद्गुणाची वाढ होऊंच शकत नाहीं."

जेथें जेथें ह्मणून तिला कांहीं सांगण्याचा प्रसंग येई तेथें तेथें ती स्वतःचें जीवनक्रम स्मरून गहिंवरे. तिला रडें आवरतच नसे व आपण पतित आहों अशा दृढ भावनेनें ती झुरणीस लागली. पण पतीनें केलेलें क्षमादान तारक आहे, तें ईश्वराच्या घरीं रुजू असून तो मला अल्पावधींतच प्रायश्चित्त देऊन दोष मुक्त करील, असें तिला वाटे.

---

## प्रकरण एकोणिसावें.

# मधल्या कांहीं हकीकती.

"नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण" महाकवीच्या या जगद्रहस्यदर्शक श्लोकचरणास अनुसरून सुखदुःखाचें रहाटगाडगें सदैव चाललें आहे. कालाच्या फेऱ्यांत कोणाला खालीं तर कोणाला वर जाण्याचा प्रसंग येतो. हा क्रम मनुष्याच्या प्रयत्नांनीं थांबूं शकत नाहीं. या नियमाची

आठवण होण्यासारखी स्थिति प्रल्हादपंतावर याच सुमारास कोसळली. दुर्दैवाचा फटका बसल्यावर जगाच्या नश्वरतेची साक्ष पटूं लागते व मग समाधान करणारा वेदान्त आपोआप स्फुरूं लागतो. प्रल्हादपंताकडे पाहून त्यांच्या परिचितांना मनुष्यांच्या परिस्थितीचें अनित्यत्व सुचूं लागलें. महाजनसरणीस अनुसरून त्यांनींहि आपआपल्या परीनें आपल्या विपद्ग्रस्त मित्राच्या मनाला बरें वाटण्याची खटपट केली. जो तो ह्मणे "प्रल्हादपंतांचें व्याख्यान तें काय, त्याचें केवढें अवडंबर झालें अन् बिचाऱ्याच्या पोटावर कीं हो पाय आला! आंजच ह्मणजे त्याला खाण्याची ददात आहे असें नाहीं पण दरमहाची मिळकत बुडाली हें नुकसानच आहे असें आपल्याला बोवा वाटतें." दुसऱ्यांनीं अभिप्राय द्यावा—"अहो, आज दिवस कसे आले आहेत! एवढ्या थोरल्या प्रचंड राजसत्तेला आवडत नाहींत त्या भानगडींत पडावें कशाला! इंग्रजांना आज दुसऱ्याच्या देशावर राज्य करायचें आहे, अर्थात् त्यांनीं जें केलें तें योग्यच आहे. आपण किती क्षुद्र माणूस. आपणच जपून वागायला पाहिजे होतें. आपल्या स्वतंत्र विचाराकरितां मागें कृष्णशास्त्र्यांच्या मुलानें चांगली सोन्यासारखी नोकरी सोडली. त्यानें केलें ह्मणून आपणहि करायला गेला. अहो, मोराचा नाच पाहून लांडोर नाचूं लाल्यास तें कसें साधेल? ज्याचें त्याला. आह्मी ह्मणतों प्रल्हादपंतांनीं गणपत्युत्सवांत बोलायचें नव्हतें, बरें बोलला तर त्याच्या वरिष्ठांनीं त्याला माफी मागून मोकळे होण्याची सवलत दिली होती. पण हे पडले मानाचे. यांना माफी मागण्याची लाज वाटली. आतां नोकरी गेल्याबद्दल कां रडावें?" असें मत देणारे लोक कोणत्या प्रकृतीचे हात हें समजावून द्यायला नकोच.

समाजांत बभ्रा झाला ती मूळची गोष्ट अशी आहे—घरोघर पुजल्या जाणाऱ्या गणाधीशाला समाजांत आणून त्याच्या नांवाला सार्थ करण्यासाठीं ज्यांनीं गणेशोत्सवाची महाराष्ट्रांत सुरवात केली त्यांचे उद्देश कितीहि शुद्ध व धार्मिक असले तरी त्याकडे कलुषित नजरेनें पहाण्याची आमच्या कथानकाच्या

काळीं कांहीं विशिष्ट लोकांना संवय लागलेली होती. त्यामुळें खाजगी संस्था अथवा राजसंस्था यांच्या सेवकांनीं या धार्मिक देवतोत्सवांत पडूं नये असा साक्षात् नसला तरी अप्रत्यक्ष निर्बंध पडला होता. निदान लोकांची तरी अशी समजूत झालेली होती. या कल्पनेस अनुलक्षून असल्या फंदांत पडणारांना लोकांनीं दोषी ठरवावें यांत आश्चर्य तें काय ? आपल्याकडे राष्ट्रीय धार्मिक उत्सव असावेत ह्मणून गणेशोत्सव अमलांत आला आहे व त्यांत प्रल्हादपंतानें भाषण केलें एवढ्या अपराधासाठीं त्यांना नोकरीवर पाणी सोडावें लागलें. एका शाळामास्तरानें असला उपद्याप कां केला असा चोहोंकडे गवगवा होऊन त्या गुरुजीवर वरील संकट कोसळलें खरें, पण प्रल्हादपंत हा गृहस्थ आपल्या मताच्या सत्यतेला, आपल्या बाणेदारपणाला केवळ पोटासाठीं कमीपणा आणणारी माफीसारखी गोष्ट कशी अमलांत आणील ? शिवाय माफी मागणें, मी पुन्हां असें करणार नाहीं ह्मणून दीनवाणी कबूली देणें ह्मणजे आपण होऊन गुन्हेगार ठरण्यासारखें आहे हें न कळण्याइतका तो मूर्ख नव्हता. प्रल्हादपंतावर काहूर माजतांच त्यानें ताबडतोब राजीनामा देऊन ही आपल्या मागची कटकट तोडून टाकली व बेकार होऊन ते घरीं बसले. मतस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य इत्यादि अनेक स्वातंत्र्यांचा हा काळ आहे असें ह्मणण्याची एक रीतच पडून गेलेली आहे व त्या स्वातंत्र्याची सबब पुढें करून स्वेच्छेच्या आड येणारांना सुधारक उडवूनहि देत असतात. परंतु असल्या फुसक्या स्वातंत्र्याला भुलण्याइतके प्रल्हादपंत बेअक्कल ठरले नाहींत.

जेव्हां राजा आणि प्रजा याच्यांत संबंध नसेल तेव्हां प्रजेपैकीं कांहीं जणांनीं स्वतःचा नंगा नाच सुरळीत चालूं देण्यासाठीं पाहिजे तर हीं स्वातंत्र्यें अवलंबावीं. स्वैराचाराला आडकाठी न होऊं देण्याची या दिखाऊ स्वातंत्र्यांनीं एक प्रकारची सोय झाली आहे, असें दत्तोपंत या प्रकरणानंतर प्रल्हादपंतांशीं वारंवार वदे. "एखाद्याला शेंडी काढून केस राखावेसे वाटले तर त्यानें मतस्वातंत्र्य पुढें करावें. पुनर्विवाह, बालविवाहनिषेध, अभक्ष्यभक्षण, अपेय-

पान, वेश्यागमन वगैरे बाबींत मतस्वातंत्र्य जरूर असावें, रूढाचर मोडून टाकून सगळा समाज विस्कळित करण्याकरितां मतस्वातंत्र्य अवश्य पाहिजे, संध्या न करण्याचें कारण मतस्वातंत्र्य, धर्मनिंदा करण्याचें कारण मतस्वातंत्र्य, आपल्या पूर्वजांना मूर्ख ह्मणण्याला साधन मतस्वातंत्र्य, तात्पर्य दुर्व्यसनें व फाजिलपणा यांना सभ्यतेच्या सदरांत ओढण्याला मतस्वातंत्र्य नसून कसें चालेल? पण हा नियम निर्भेळ सामाजिक व धार्मिक हलकटपणापुरताच आहे हो प्रल्हादपंत."

खुद्द प्रल्हादपंतावर या अकांडतांडवाचा परिणाम कांहींच झाला नव्हता. ते तर नेहमीं ह्मणत— "शाळेंतलीं चार दोन पुस्तकें पढविण्याच्या कामाखेरीज शाळामास्तरांना स्वतंत्र अस्तित्व शाळेबाहेर नाहीं कीं काय? ईश्वरानें आह्मांस मेंढपाळाप्रमाणें पोरें हांकण्यापुरताच जन्म दिला नाहीं. आह्मी माणसें आहोंत व माणुसकीचे सगळे हक्क आह्मांला आहेत. शाळेंत येण्याबरोबर जो वरिष्ठ असेल त्यानें किल्ली भरल्यावर आह्मी गजरासारखें बोलूं लागावें व शाळा सुटल्यावर सारा वेळ गप्प बसावें अशी जर परमेश्वरानें आमच्या ह्मणजे शाळामास्तरांच्या व इतर माणसांच्या शरीररचनेंतच तफावत ठेवली असती तर गोष्ट निराळी होती. पण तसा प्रकार कांहीं नसतां आह्मी पोटामाटीं एखाद्या संस्थेची गुलामगिरी पत्करली ह्मणून घरीं दारीं आह्मी त्या संस्थेच्या तंत्रानें चालावें असा नियम नाहीं. आह्मी चालतीं बोलतीं माणसें आहों, आह्मांला ईश्वरानें विवेकशक्ति दिली आहे, आह्मांला मेंदू आहे तो कुवत असेल तितका खर्चून आह्मी सारासार विचार करावा एवढ्याकरितांच ती देणगी परमेश्वरानें इतर माणसांप्रमाणें आह्मांलाहि दिली आहे. हा गुलाम व हा सत्ताधीश असा भेद परमेश्वरानें मानलेला नाहीं. हा भेद मनुष्यनिर्मित आहे. त्याचा प्रतिकार अथवा पुरस्कार माणसेंच करितात. निसर्गांत सर्वांना सारखें वागविण्यांत येतें. माझ्यावर हा प्रसंग ओढवला तरी तो माणसांच्या आवडीनावडीनें. परमेश्वराची नाराजी जोंपर्यंत झाली नाहीं तोंपर्यंत मला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. शाळा,

विद्यालयें हे नवीन ताज्या पिढीला तयार करण्याचे कारखाने आहेत. तेथें आजचीं बाळें ह्मणजे उद्यांचें राष्ट्र असा विचार मनांत ठेवून त्यांच्या पूर्वजांच्या कर्तबगारीला, इभ्रतीला, साजेसें शिक्षण मिळावयास पाहिजे व हा थोर हेतु मनांत धरून शिक्षक या नात्यानें माझें कर्तव्य मी बजावीत होतों. शिक्षकांना समाज तुच्छ मानतो, त्यांचा तिरस्कार करतो, याचें कारण ते पोटाला महत्त्व देऊन कर्तव्यांत कुचराई करतात एवढ्यामुळेंच. मी पोट भरावें ह्मणून गुरुत्व स्वीकारलें नव्हतें. माझा उद्देश उदात्त होता, पण परिस्थितीच्या दाबाखाला दृष्टीचा संकोच झालेल्या लोकांना तें कळलें नाहीं, तर त्यांत माझा काय दोष? ईश्वराची मजवर दया असल्यानें मला पोटाकरितां दुसऱ्याच्या तोंडाकडे न पहाण्याची सोय आहे. मी स्वतंत्रपणानें कांहीं उद्योग करीन व शिक्षक, आचार्य, गुरु या शब्दांच्या खऱ्या अर्थाप्रमाणें लोकांचें चुकतें कोठें, कर्तव्य काय हें दाखवून देईन. शिवाय माझा विद्याधर शिष्य आहेच. तो माझ्या शिकवणीचें चीज करण्यास खरोखर लायक आहे.''

विद्याभ्यासंग, मनन व चर्चा यांत प्रल्हादपंताचा काळ पुढें जाऊं लागला. दत्तोपंतहि त्यांच्याच समानशीलाचा गृहस्थ, त्यानें रिकामपणीं प्रल्हादपंताशीं संवाद करीत बसावें. विद्याधर शाळेंत जात होताच. सुदैवानें तो पहिल्या परीक्षेंत पसार झाला पण पुढें काय करावें असा त्यास प्रश्न येऊन पडला. पुढें कालेजांत शिकण्यास जावें ही त्याची इच्छा खरी, पण साधनाभावीं ती सफळ व्हावी कशी? प्रल्हादपंताची पूर्वींसारखी सुस्थिति असती तर त्यानें या होतकरू तरुणाची इच्छा पुरी केली असती; पण सांप्रत तेंहि शक्य नव्हतें. प्रल्हादपंताला निर्वाहाची टंचाई न पडण्याजोगी ऐपत असली तरी एक विद्यार्थी सतत कालेजच्या शिक्षणाचा खर्च देऊन संभाळण्याचें सामर्थ्य नव्हतें ह्मणून फार वाईट वाटे. पण इलाज काय? ते त्यास वारंवार समाधान व्हाव ह्मणून सांगत कीं, तूं माझ्या जवळ रहा, मी तुला खाजगी शिक्षण देतों. परीक्षा उतरल्यानेंच मनुष्य विद्वान् ठरतो

असें नाहीं. तो एक भपका आहे. दर वर्षांत बी.ए, एम्.एच्या परीक्षांत उत्तीर्ण होणारे विद्यार्थी काय थोडे आहेत, पण त्यांना परीक्षा पास होण्यापुरतीच अक्कल असते. शेंकडा पांच देखील कर्तव्य काय हें न जाणण्याइतके नादान असतात. त्यांना रामदासांनीं वर्णिलेलीं पढतमूर्खांचीं लक्षणें चांगलीं लागू पडतील. परीक्षेसाठीं ते पुस्तकें हातीं धरतात व एकदां त्यांतून सुटले ह्मणजे पुन्हा त्यांची ओळख सुद्धां त्यांस रहात नाहीं. त्यांच्या पदव्या पोट भरणें सुलभ व्हावें एवढ्या कामीं उपयुक्त असतात. बाकी सगळे नामधारी पदवीधर. आमचा मुलगा दोन परीक्षा उतरलेला, तीन पास झालेला, ह्मणून आईबापांनीं लग्नाचे वेळीं फुकट बडेजावी सांगण्याचेंहि तें साधन आहे. द्रव्यदृष्टीनें त्या कांहीं अगदींच कुचकामाच्या नाहींत. हाडांचीं काडें करून व पाण्यासारखा पैसा नासून शिक्षणांत काय संपादिलें तर पदव्यांच्या कागदांचीं भेंडोळीं व तीं कशाला तर कलेक्टरकचेरींत वीस पंचवीस रुपयांच्या मासिक उत्पन्नाकरितां. कर्तबगारीचें प्रमाणच इतकें कनिष्ठ झालें आहे कीं, लेकाला एक पंचवीस तीस रुपयाची कायम चाकरी मिळाली ह्मणजे आईला धन्यता वाटते. बापाच्या दहावीस रुपयांत मुलाची तितक्याच रुपयांची भर पडली कीं बाप कृतार्थ बनतो. नवऱ्याच्या नोकरीनें बायकांना भूषण असतेंच. विद्याधर, साधन असतें तर तुझ्या-सारख्यास शिक्षण मिळूं नये असें माझें ह्मणणें नाहीं. पण तेवढ्याकरितां अडून पडण्याचें कारण नाहीं. मीं तुला यथाशक्ति मदत करीन.''

विद्याधराच्या हानीबद्दल उमेला जितकें वाईट वाटे तितकें कोणासच वाईट वाटत नसेल हें सहज आहे. आपल्या दारिद्र्याचा हा सारा खेळ, दुर्दैवापुढें उपाय नाहीं, अशीं सोन्यासारखीं मुलें माझ्यासारख्या हतभागि-नीच्या पोटीं जन्म न घेतीं तर किती उत्तम झालें असतें. पण माझ्या फुटक्या नशीबाशीं जर यांच्या दैवयोगाचा ऋणानुबंध होता तर भलतेंच होईल कसें?'' अशी अनंत विचारांची खळबळ तिच्या हृदयांत चाले, व तिच्या दुःखांत भर पडून तिला जीव देखील नकोसा होई. तिला आनंद,

उत्साह कधींच वाटत नसे; परंतु जें कांहीं अंतःसमाधान तिला असे तें विद्याधर नजरेस पडला कीं पार विलयाला जाई. नवऱ्याच्या जीवंतपणीं ज्यांनीं तिला पाहिलें होतें त्यांना ती हल्लींच्या स्थितींत ओळखतां आली नसती. तिचा देह अहर्निश झिजत होता. अश्रुपातावांचून एक दिवस सुना गेला नाहीं. अन्नपाण्याची रुचि तिच्या जिव्हेला सोडून कधींच गेली होती. तिचा निस्तेज चेहरा, व क्षीण शरीर पाहून सावित्रीबाईला तर ही फार दिवस जगणार नाहीं असेंहि वाटे. सर्व हितचिंतकांनीं तिचें परोपरीनें समाधान करावें पण त्याचा फारसा उपयोग होत नसे, व अलीकडे घारूताईचा परिचय झाल्यापासून तर सगळें विश्व दुःखमय असावें असें तिला भासे. मुलें नसतीं तर तिच्या जीवाचा तंतु कदाचित् अगोदरच केव्हां तरी तुटून ती पंचत्वास पावली असती. पण आपल्या पतीची "सजीव ठेव" [मुलांना ती नेहमीं हा शब्द लावी] आपण जतन करून वाढीस लावली नाहीं तर परलोकीं आपला पति आपणास दोष लावील या समजुतीनें ती आपलें आयुष्य कंठीत होती. पाळण्याची दोरी हातीं धरून ज्यांना आपण हलविलें त्यांनीं सगळा देश कर्तृत्वाच्या जोरावर हलवून सोडला नाहीं, तर माझ्या कामाला मी नालायक ठरेन, असे ती बोलण्याच्या भरांत सहज उद्गार काढी. अस्तु.

आमच्या कथानकाच्या आरंभापासून आतांपर्यंत दोन अडीच वर्षें उलटलीं आहेत. याच सुमारास कोणा एका सन्मान्य पुढारी इसमाचा अंत झाला व "सगळ्या देशाला हळहळ वाटत आहे" अशीं वचनें वर्तमानपत्रांतून फडकूं लागलीं. मयताला अनुलक्षून बोलतांना "खिस्ती लोक मृताच्या आत्म्याला शान्ति मिळो" असे उद्गार काढतात. तो शब्दप्रयोगहि या मान्य गृहस्थाला उद्देशून वर्तमानपत्रांनीं अमलांत आणला. कीर्तन अथवा पुराण या आमच्या इकडच्या जुन्या निरूपणपद्धतींऐवजीं जशी आधुनिक व्याख्यानसरणी आमच्यांत नवीन शिरली आहे तशी एखाद्या प्रसिद्ध इसमाच्या मृत्यूबद्दल शोक प्रदर्शित करण्यासाठीं सभा भरविण्याची रीतहि

आमच्या इकडे सभ्य शिष्टांच्या व्यवसायांत आवश्यक होऊन बसली आहे व त्याप्रमाणें दुःख होवो अथवा न होवो, दुखवट्याची सभा भरवून उसन्या शोकावेगांत मृताचे गुणानुवाद गाऊन त्याच्या निधनानें तत्कुटुंबीयांवर आलेल्या संकटाचे आपण शाब्दिक भागीदार आहों असें जाहीर करण्याची हल्लीं वहिवाट पडली आहे. तीस अनुसरून एक महाजनसभा आज संध्याकाळीं असल्याचें विद्याधर एके दिवशीं घरीं प्रल्हादपंतांना सांगत होता. दत्तोपंतहि गैरहजर नव्हते. ते नेहमींप्रमाणें याहि वेळीं चिडले व ह्मणाले—

"वर्तमानपत्रकारांना कोणीकडून तरी ठरलेल्या आकाराचा कागद काळा करायचा असतो. जाहिरातींवर त्यांचा निम्मा-निम्मा खर्च भागतो व रोगानें ग्रासलेल्या स्वबांधवांना त्राण यावें ह्मणून अनेक धन्वंतरी रोजच्यारोज पुढें सरसावत असल्यामुळें त्यांचा वर्तमानपत्रांना केवढा आधार झाला आहे. मंथनाचा खटाटोप करून शत्रूच्या डोळ्यांत धूळ फेंकून जो अमृताचा कलश देवांनीं पळविला त्याला भोंक पडून गळूं लागल्यामुळें अमृत मर्त्यांना सांपडलें कीं काय कोण जाणे! पण मानवांनीं आपला मेंदू खर्चून त्या अमृताचे विभाग पाडले आहेत. मोठ्या माणसाला सोसेल तें बालांना बाधेल ह्मणून त्यांसाठीं त्यांनीं वेगळें अमृत तयार केलें आहे. ईश्वरानें सृष्टीची सदोदित वाढ होत असावी, हा हेतु पुढें ठवून प्रत्येक प्राणिमात्र निर्माण केले व प्रत्येक प्राण्याची शरीररचना तदनुरूप करून ठेवली आहे; परंतु कालांतरानें हिंदुस्थानच्या माणसांत शैथिल्य उत्पन्न झालें आहे असें पाहून व हा देश वठूं नये ह्मणून हिमालयांतले सिद्ध आपल्या रामबाण औषधी योग्य चेल्यांच्या स्वाधीन करीत आहेत. हे शिष्य मिळालेला अप्रातिम गुणकारी प्रसाद लोकांत जाहीर करून वर्तमानपत्रें काढणारांचीं पाटें भरीत आहेत. सारांश वर्तमानपत्रांना जाहिराती अधिक मिळविण्याखेरीज देशहिताचें धोरण फारसें नसतेंच. कांहीं पत्रांना नवरानायकांचीं भांडणें पथ्यावर पडतात. अशा बेजबाबदार

वर्तमानपत्रांना स्वतःच्या खपासाठीं एखाद्या 'येन केन प्रकारेण' नाणावलेल्या दुढ्ढाचार्यांची कास धरावी लागतेच व त्यांतल्यात्यांत ज्याचा पक्ष घेतल्यानें सहसा चट्टा बसणार नाहीं असाच इसम त्यांना हवा असतो, व असेच जे मेले ते रावबहादुर होते. या रावबहादुरांना कांहीं प्रतिष्ठित पत्रांनीं 'नृपतिजनपदांच्या' दुर्लभ हितकर्त्यांच्या सदरांत ओढण्याला कमी केलें नाहीं. पण हे असतांना फायदा कोणता झाला व मेल्यानें नुकसान काय होत आहे याचीं उदाहरणें कोणी देईल काय? अव्वल इंग्रजींतले हे पहिले विद्वान्, यांचें डोकें मोठें, व शरीर सशक्त आणि धिप्पाड, एतद्देशीयांना ज्या जागेपर्यंत जाण्यास महत्प्रयासांची सवलत ठेवली आहे त्या जागेवर हे होते. उन्हाळ्यांत महाबळेश्वरीं अगर लोणावळ्यास जात असत, व हवा खायला निघाले तर इतर मित्रांसह आपल्या अर्धांगीस बरोबर घेत असत, प्रार्थनासमाजांत फुरसतीनें प्रवचनें काढीत अथवा पुनर्विवाहाचें समर्थन करीत असत. राजकर्त्यांना न दुखवतां लोकहितकर्ते म्हणून नांव यांनीं मिळविलें आहे. इंग्रजी लिहिण्यांत फार वाकब असतील, आणि ज्या भूमींत ते जन्मले त्या भूमीचा एखादा अपुरा इतिहासहि त्यांनीं फुरसतींत खरडला असेल. पुष्कळ बोलत असतील व पुष्कळ विषयांवर दुधखुळ्या लोकांना मतें देत असतील म्हणून यांच्या मरणानें नुकसान तें काय झालें? स्वजातीय राजा असला तरी लोकहित साधूं म्हटल्यास अनेक संकटें येतात. इंग्लंडचाच इतिहास आम्हांला असें शिकवितो. अर्थात् परक्या राज्यकारभारांत प्रजाहित म्हटल्यास अशक्यच. मग ही गोष्ट त्या इसमाला साधली कशी? आधीं यांनीं स्वार्थ, नृपतिकार्य, व प्रजाहित हीं तिन्ही कार्यें कशीं सुसंगत पार पाडलीं तें प्रल्हादपंत तुम्ही मला समजावून द्या व तसें जर त्यांनीं कांहींच केलें नाहीं असें सिद्ध झालें तर मग आज जी सभा भरणार आहे ती काय म्हणून? जसा सभा भरविण्याला सुमार नाहीं तसाच स्मारकें करण्यालाहि कांहीं ताळमेळ नाहीं. अमेरिकन लोकांनीं स्वातंत्र्ययुद्धाचें स्मारक म्हणून एक विजयदेवीचा पुतळा उभा केला आहे म्हणतात. ज्याच्या दर्श-

नानें अमेरिकन लोकांचीं अंतःकरणें मातृभूमीच्या प्रेमातिरेकानें उचंबळून जात असतील, ज्याला पहातांच त्यांच्या सद्यःकालीन सुस्थितीचा, गौरवाचा अभिमान वाटून पटापट डोळे आनंदाश्रूंनीं भरून जावेत तें स्मारक खरें, व ज्या विजयदेवतेची पार्थिव प्रतिमा अमेरिकन शिल्पकारांनीं केली ती देवता प्रसन्न करणाऱ्या पूर्वजांच्या मूर्ति जर त्यांनीं स्वाभिमानासाठीं चव्हाट्यावर उभारल्या तर तें योग्य आहे. पण आमच्या इकडे वाटेल त्याचीं स्मारकें तयार करतात. या गत रावबहादुरांचें स्मारक व्हायचें आहे ह्मणे."

दत्तापंतानें ज्या रावबहादुरांवर आपलें वाक्शास्त्र इतक्या प्रखरपणानें उपसलें त्यांच्या बाजूचें समर्थन करण्यासाठीं पुष्कळ मुद्दे प्रल्हादपंतानें आणले पण दत्तोपंतानें त्याची वासलात तेव्हांच लावून टाकली. प्रल्हादपंताचें ह्मणणें असें— "या रावबहादुरांत संघटनात्मक शक्ति होती. सरकारी नोकरी संभाळून अर्थात् परसेवेचीं अंगभूत सर्व बंधनें राखून स्वामीच्या डोळ्यांत न खुपतां त्यांनीं लोकप्रेम संपादिलें हें जास्त नव्हे का? कोणीहि गृहस्थ मग तो बाल असो वा वृद्ध असो, नोकर असो, विद्यार्थी असो अथवा इतर कांहीं धंदा करणारा असो, त्याला त्याच्या मगदुराप्रमाणें एखादें काम योजून देण्याचें कसब या रावबहादुरांनीं पुरें साधलें होतें. महाराष्ट्रांतच नव्हे सगळ्या हिंदुस्थानांत निघणाऱ्या प्रत्येक चळवळीच्या बुडाशीं यांचें अंग असायचेंच. हे कर्ते सुधारक, मुत्सद्दी, विद्वान् लेखक व वक्ते असल्याबद्दल साशंक रहाण्याचें कोणासहि कारण नाहीं. यांना महाराष्ट्राचा व महाराष्ट्र भाषेचा इतका अभिमान होता कीं, त्यांच्या पुनरुजीवनासाठीं यांनीं आपलें वर्चस्व खर्चीं घातलें होतें. प्रत्येकास यांचें ह्मणणें असें कीं, "तुह्मास उचित वाटेल त्या दिशेनें तुह्मी प्रयत्न करा पण पुढें सरका, प्रत्येक क्षणीं पाऊल पुढें असूं द्या, पडलां तरी बेहेत्तर."

दत्तोपंत ह्मणतो— "एक धड ना भाराभर त्या चिंध्या काशाला? प्रार्थनासमाज निघाला तरी त्यांत अध्यात्मचर्चा करण्यास यांची तयारी. आर्यसमाज निघाला तर त्याच्या प्रवर्तकाची पाठ थोपटून स्वतःची व

त्याची विटंबना करून घेण्यांत माघार नाहीं. ब्रह्मसमाजाचे प्रसारक आले, लाग त्यांच्या पाठीस. हें रावबहादुराचें धर्मस्थैर्य. पुनर, प्रौढ, आणि प्रीति या तिन्ही सामाजिक सुधारणेला पसंत वाटणाऱ्या विवाहांचे पुरस्कर्ते ह्मणून रावबहादुरांची प्रसिद्धि, पण त्यापैकीं एकाचेंहि उदाहरण प्रसंग अनायासें आला असून त्यांनीं घालून दिलें नाहीं. सुधारणेची ही वाट. राजकारण तर सेवाधर्माला साफ वर्ज्य. राहिली लिहिण्याची व बोलण्याची बाजू; तींत मात्र रेलचेल. हें पहा प्रल्हादपंत तुह्मी कांहीं ह्मणा; त्यांच्यांत दुटप्पी वर्तन अथवा धरसोडीपणाचे कांहीं गुण असतील; स्मारक करण्याइतकी त्यांची योग्यता माझ्या मतें खास नव्हती."

"पण स्मारकें उभारणें, शोकप्रदर्शक सभा भरविणें, त्यांत रडण्याचा नाटकी आव आणणें, या परक्या तऱ्हा आपल्यांत रूढ होण्याला असेच प्रसंग वायां न जाऊं देणें इष्ट आहे."

"हें मात्र अगदीं खरें, व्याख्याता योग्यतेनें शंख असला तरी एकदां प्लॅटफार्मवर उभा राहिला कीं, झाला तो सर्वज्ञ. लग्नांत जसें वराला बहुमानार्थ 'श्रीधररूप' मानायचें तशांतलीच ही गोष्ट. व्याख्यात्यांनीं कसेंहि भाषण केलें तरी आदिअंतीं टाळ्या वाजवावयास पाहिजेतच. हीं सगळीं सोंगें आहेत. नाटक आहे. अर्थात् या गोष्टींना लोकशिक्षण ह्मणून मानण्याचें कांहीं कारण नाहीं. ज्या विषयावर बोलावयाचें असेल त्यांत पुरे वाकब असलेलेच गृहस्थ लोकांस भाषणद्वारा ज्ञानदान करण्यास उभे राहिले पाहिजेत, आणि लोकांचे अंगीं इतकी पात्रता पाहिजे कीं, त्यांना निरूपकाचें अवसान ताबडतोब कळावें; पण आमच्याकडे सगळेंच उलट. पुढारी होऊं पहाणारे अथवा झालेले सर्व ईश्वराप्रमाणें सर्वज्ञ अशीच आमची कल्पना."

याप्रमाणें बोलणें पुष्कळ विषयांवर झालें. वस्तुतः प्रस्तुत कथानकाशीं या प्रकरणाचा कांहीं संबंध नाहीं. पण प्रल्हादपंत व त्यांचा स्नेही दत्तोपंत यांमध्यें एखाद्या महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं कसा वादविवाद चाले व त्यांचीं मतें कशीं होतीं हें थोडक्यांत दाखविण्याचा हा प्रयत्न आहे.

# प्रकरण विसावें.

## भवितव्यता.

प्रल्हादपंतांची नोकरी निघाली व ते घरीं बसले तेव्हां विद्याधराला पुढें काय करायचें हा प्रश्न उभा राहून कांहींच सुचेनासें झालें. आपल्या आश्रयदात्याविरुद्ध खळबळलेलें वातावरण शान्त पडून त्यास पुनः सुस्थिति येईपर्यंत आपण कोठें तरी चरितार्थ चालण्यापुरतें दास्य पत्करून पोटाची सोय करावी असें त्याच्या मनांत वारंवार येई व हा विचार त्यानें आपल्या मातेस कळविल्यावर प्रसंग ओळखून नाइलाजानें जेव्हां तिनें त्यास आपली संमति दिली तेव्हां त्यास आनंद झाला. परंतु हा आनंद निर्भेळ नव्हता, त्यावर दुःखाचीं अभ्रें डोकावत होतीं. विद्येची स्वाभाविक आवड दुर्दैवामुळें बाजूस ठेवून पोटाला प्राधान्य द्यावें लागणें हें कोणाहि विद्यासक्ताला आवडणारें नाहीं. पण नाइलाज तेथें मनांत तळमळत रहाणेंच शक्य. प्रल्हादपंतांपाशीं आपला उद्देश त्यानें व्यक्त केला तेव्हां त्यांसहि खेद झाला पण त्यांनीं त्यास आडकाठी करावी अशी त्यांची स्थिति नव्हती. ह्मणून त्यास एखाद्या सरकारी चाकरींत अडकवण्यापेक्षां खाजगी नोकरी मिळवून द्यावी असा बेत त्यांनीं केला व त्या प्रयत्नास ते लागले. त्यांच्या कोणा एका संपन्न स्नेह्यानें एक मोठ्या भांडवलावर व्यापारी पेढी उभारल्याचें त्यांच्या ध्यानांत होतें. दिवसानुदिवस त्या संस्थेची भरभराट असल्यानें वाढत्या व्यापाराबरोबर अधिक कामकरी माणसांची जरूरी भासणें योग्यच होतें. प्रल्हादपंतानीं तिकडे धोरण बांधलें व या आपल्या स्नेह्याकडे विद्याधराची व्यवस्था केली. शाळेंतलें शिक्षण प्राप्त झालेल्या पांढरपेशा वर्गाची खर्डेघाशीखेरीज अंगमेहनतीचें काम करण्याची योग्यता नसते हा सार्वत्रिक अनुभव प्रल्हादपंताला होताच. त्यानें विद्याधराला त्या व्यापारी संस्थेंत वीस रुपये दरमहाची हंगामी चाकरी लावून दिली, व विद्याधराला स्वतःच्या जबाबदारीवर आई अथवा इतर इष्टमित्रांसारख्या जिव्हाळ्याच्या माणसांपासून दूर स्व-

तंत्र रहाण्याचा प्रसंग आला. आजपर्यंत पोटाशीं बाळगलेला आपला पुत्र आतां आपणास पारखा होणार, जो दृष्टीआड झाल्यास आपल्या मनाला सारखी हुरहुर लागे, तो पोटासाठीं आपल्याला सोडून दूर जाणार ही कल्पना उमेला रात्रंदिवस अश्रु ढाळण्यास पुरली. विद्याधराच्या मनावर औदास्याच्या भेसुर छाया पसरल्या होत्या, व काय असेल तें असो त्या दोघां मातापुत्रांना आतां आपला होणारा वियोग कायमचाच होऊन बसणार असें भलतेंच वाटे. या जगाकडे निराशेनें पहाण्याची उमेच्या मनाला तर संवयच पडली होती. त्यामुळें जेथें प्रत्येक माणसाची परिस्थिति क्षणोक्षणीं पालटते तेथें आपला मुलगा जगून वांचून आपणास भेटेल अशाविषयीं चित्त साशंक असल्यास त्यांत नवल काय? व आपण आपल्या मुलाच्या पुन्हां खास नजरेस पडत नाहीं या विपरीत कल्पनेनें तिच्या मनाला चांगलें पछाडल्यामुळें तिला चैन कसें तें पडेना. आपल्या अंतःकरणांत वारंवार डोकावणारी ही भयाण कल्पना तिनें कोणाजवळ प्रकट केली नव्हती, व आपली आई आपणास यापुढें कायमची अंतरणार ही विद्याधराची कल्पना त्यानेंहि कोणापुढें व्यक्त केली नाहीं.

ज्या सकाळीं विद्याधर गेला त्याच्या पूर्वीं एक दोन दिवस ती विद्याधरास सारखी सदुपदेश करीत होती. "बाबारे, जगांत दिवस काढणें फार कठिण आहे. फसव्यांच्या नादानें तूं बहकशील व दुराचाराकडे तुझें मन वळेल. माणसाची पुरी पारख केल्यावांचून त्यावर विश्वास टाकण्याच्या भरीस पडूं नको. मूळचा माणूस कितीहि शुद्ध असला तरी संगतीवर त्याचें बरेंवाईट पुष्कळ अवलंबून आहे. हल्लींच्या या भपकेदार जगांत मनुष्य सहज बेभान होतो, स्वतःची ओळख विसरतो. त्याला जप." वगैरे वगैरे व्यावहारिक बोध तिनें चालविला होता. मातेचें हृदय आपलें कर्तव्य केलें असें मानून स्वस्थ कसें राहील! विद्याधर जायला निघाला तेव्हां ती पदोपदीं त्यास तोच बोध करीत होती.

विद्याधर जाण्याचा दिवस येतां येतां जेव्हां आला तेव्हां तिला सारें जग

शून्य भासूं लागलें. लेक चाकरीवर जाण्याकरितां निघाला तेव्हांचा देखावा इतका हृदयद्रावक होता कीं, तो कोमल अंतरंगाच्या माणसाला पहाणें जवळ जवळ अशक्यच झालें असतें. मुलाला पोंचविण्यासाठीं उमा दारापर्यंत आली पण रोजच्या वहिवाटलेल्या जागीं अश्रुपुरानें अंध झाल्यामुळें ती कितीदां तरी तेथें अडखळली. दारांत उभी राहून आपणास सोडून चाललेल्या पुत्राकडे तो डोळ्यांआड होईपर्यंत ती अश्रुपूर्ण नेत्रांनीं पहात होती. आंसवांचे ओघळ तिच्या फिकट कपोलांवर मलिनता आणीत होते. या वियोगाचा देखावा सावित्रीबाई आदिकरून सर्व स्त्रियांच्या डोळ्यांस पाणी येण्यास कारण झाला. एवढें बिऱ्हाडकरू कुटुंबांनीं गजबजलेलें घर पण एका विद्याधरावांचून उमेला ओसाडीसारखें भासलें, व तिच्या क्षीण चित्तावर त्याचा फार परिणाम झाला. दिवसा काम करतां करतां तिला एकदम चुकल्याप्रमाणें होऊन ती भ्रान्त नेत्रांनीं इतस्ततः बघूं लागे. विद्याधराचें स्मरण होतांच डोळ्यांतून खळकन पाणी गळावें असें एका दिवसांत कितीदां होत असे. रात्रीचे वेळीं झोंपेंतून एकाएकीं उठून "विद्याधर, अरे विद्याधर, बिचाऱ्याला गाढ झोंप लागली असेल. त्याची सख्खी आई मी जींवंत असतां त्याची खाण्यापिण्याची आबळ व्हावीना. त्याला परठिकाणीं आपलेपणानें गोंजारून क्षणभर मनाला धीर कोण देणार ? बापडा दीनासारखा दिवसाच्या कामानें थकून रात्रीं बिछान्यावर पडला कीं झोपीं जात असल. मधल्या वेळीं भूक लागली तर हक्कानें कांहीं ओली कोरडी चतकोर दशमी तरी त्याला कोण देणार ? उपाशी रहात असेल" असें ती आपल्याशींच बरळे. विद्याधराचें सुखरूप पोंचून कामकाज व्यवस्थितपणानें पाहूं लागल्याचें पत्र आल्यावर तिच्या जिवाला पुष्कळ समाधान झालें. व त्यानें कबूल केल्याप्रमाणें नेमक्या दिवशीं पत्र येण्याचें चुकलें कीं तिच्या चित्ताचें भान सुटलेंच ह्मणून समजावें. पहिली डाक गेली, दुसरी सरली, तिसरींत पत्राचा ठिकाण नाहीं, चवथी नाहींच, झालें, गेला दिवस. विद्याधराच्या जीवाला कांहीं बरें वाईट झालें असलें तर

तें कोण कळवणार, असे नाना विचार तिच्या मनांत येत व त्या दिवशीं तिला चैन ह्मणून कसें तें पडायचें नाहीं. शेजारच्या घरांत डाकवाल्यानें एखाद्याचें नांव पुकारल्याचें हिच्या कानीं अलें कीं, हातीं असलेलें कसल्याहि महत्वाचें काम जसेंच्या तसें टाकून तिनें दरवाज्याकडे यावें व आपल्या नांवचें पत्र पोष्टाच्या शिपायानें हवालीं केलें ह्मणजे समाधान वाटून पत्रांतला सारा मजकूर आपोआप, न वाचतां कळेल तर बरें झालें असतें असें वाटण्याइतकी ती उतावीळ होई. शेजारीं बसून घरीं जशी एखाद्या माणसानें स्वतःची इत्थंभूत दिनचर्या मायेच्या माणसाजवळ निवेदावी तशा धर्तीवर विद्याधर पत्रें लिहीत असे. एकदां सगळ्या आठवड्यांतली हकीकत समजली ह्मणजे उमेनें कामधंद्याला लागावें.

सुमारें दोन महिने याप्रमाणें गेले व नंतर सगळा रंग पालटला. उमेला जडलेला सगळा क्षय या संधीस बळावून त्यानें तीस अंथरुणास जखडून टाकलें. तिच्या अंगांत क्षीणता फारच आली होती व त्यांत रोगाचा जोर झाल्याबरोबर तिला बिछान्यास खिळून पडावें लागलें यांत नवल नाहीं. प्रथम तिनें जेव्हां आपल्या दुःस्थितीचीं चिन्हें पाहिलीं तेव्हांच विद्याधरास येण्यास तिनें पत्र पाठविलें. त्याला त्या पत्नावरून आईची खरी माहिती कळली नाहीं व ह्मणून त्यानें सांप्रत कामाची गर्दी असल्यामुळें आपणास रजा मिळूं शकत नाहीं असें आईस कळविलें. उमेनें फार आग्रह धरला नाहीं. उमेला घरांत काम फार नसे पण जें असे तें सुद्धां तिच्यानें अलीकडे रेटेना. आपण अगदींच अशक्त झालों हें वाड्यांतल्या कोणाहि स्त्रीस विशेषतः सावित्रीबाईस न समजूं देण्याचा तिनें प्रयत्न केला. पण असें कोठवर चालणार! एके दिवशीं सकाळीं ती प्रातर्विधि उरकून घरांत परत जात असतां तोल न राहून धाडकन शेजारच्या भिंतीवर कलंडली. सावित्रीबाई तिच्या अगोदर उठून तोंडानें गोड स्वरांत भूपाळ्या ह्मणत अंगणामध्यें सडासंमार्जन करीत होत्या. त्यांना उमा पडल्याचें दिसलें. त्या धांवत तिच्याजवळ गेल्या व सावरूं लागल्या. उमा तोंपर्यंत स्वतःचा देहभार उठ-

विण्याच्या खटपटींत होतीच. सावित्रीबाईंनीं उमेच्या अंगास स्पर्श केला मात्र तों "कोणग हा ताप, उमाबाई!" असे उद्गार त्यांच्या तोंडून निघाले. त्यांनीं तिला अतिशय जपून घरांत नेऊन अंथरुणावर निजविलें व त्या दिवशीं उमेला बिछाना सोडवला नाहीं. उमेच्या आजाराचा जिकडे तिकडे शेजाऱ्यांपाजाऱ्यांत बोभाटा होऊन तिच्या समाचारास मंडळी येऊं लागली. घारूताई तर सारखी हजर असेच. यशोदाबाई अगदीं मन:पूर्वक अत्यंत जिव्हाळ्यानें उमेची शुश्रूषा करीत होती. सावित्रीबाई औषधपाण्याची व्यवस्था करण्याचें काम पहात असे. डाक्टराकडे हेलपाटे घालण्याचा पत्कर प्रल्हादपंत व दत्तोपंत यांनीं घेतला होता. साऱ्यांना आश्चर्य वाटे दत्तोपंताच्या कळकळीचें. त्यानें उमा आजारी पडेपर्यंत एकहि दिवस तिच्या संबंधी सहानुभूति एक ।अक्षरानें कोणाला दाखविली नव्हती. पण असा परका मनुष्य जेव्हां तिच्या दुखण्यांत जिवापलीकडे परिश्रम करतांना सर्वांनीं पाहिला तेव्हां त्यांना नवल वाटलें नसतें तरच नवल. दत्तोपंतानें रात्र बेरात्र पाहिली नाहीं. ज्या वेळीं हाक येईल त्यावेळीं तो आपला तत्पर असायचा.

पार्वतीबाई, गणूभाऊ या मंडळींना उमेच्या आजाराची वार्ता कळल्यावर त्यांनीं त्याबद्दल विशेष चवकशी केली नाहीं. त्या मंडळीना उमा आपली नाहींच असें वाटे व तिऱ्हाइताप्रमाणें लांबून लांबून तीं वागत असत. सहोदर बंधूची भार्या विपन्नावस्थेंत दुखण्यानें पडली तर तिच्या औषध वगैरेची व्यवस्था काय झाली हें देखील त्यांपैकीं कोणीं विचारलें नाहीं. वस्तुत: गणूभाऊ कांहीं आतां आईच्या कह्यांत नव्हता, तिच्या तंत्रानें वागण्याचें त्यानें कधींच सोडलें होतें व स्वपत्नीबद्दल त्याला जें प्रेम अलीकडे वाटत असे त्याप्रमाणेंच स्वजनाबद्दल आदरभाव वाटूं लागणें हेंहि उचित होतें. पण त्याचें मन पत्नीखेरीज अन्यत्र कोठेंच गुंतलें नाहीं व ज्याच्या नादानपणानें पहिल्या दोन बायकांवर दुर्धर प्रसंग ओढवले तोच गणूभाऊ बायकोच्या पदीं लीन होण्याचीं लक्षणें अलीकडे दिसूं लागलीं होतीं. गणूभाऊनें उमेच्या दुखण्याकडे दुर्लक्ष केलें पण पार्वतीबाईची त्याच्याहून अघाडी होती. त्यांनीं

तिच्या आपत्तींत समाचाराला जाऊन कठोर वाक्ताडन करण्यास सोडलें नाहीं. असो, हा त्यांचा स्वभावच होता.

नातेवाईकांनीं टाकलें ह्मणून उमेच्या शुश्रूषेंत लेशमात्र अंतर पडलें नाहीं. तिच्या आरोग्याकरितां सावित्रीबाई, यशोदाबाई, दत्तोपंत व प्रल्हादपंत या चतुष्टयाची विलक्षण खटपट चालू होती. वैद्य डाक्टरांच्या तिच्या घरीं येरझारा चालू होत्या व त्यांना पाहून एकदां ती सावित्रीबाईजवळ भतिभीत ह्मणाली—"माई, इतकीं औषधं अन् उपचार कशाला करतां. डाक्टराचेंच देणें इतकें होईल कीं, यंदां कदाचित् मी यांतून बरी झालें तर त्यांचें ऋण फेडून मला चरितार्थासाठीं भिक्षाच मागण्याची पाळी येईल." सावित्रीबाईंना तें रुचलें नाहीं. "अग उमा, तूं बरी व्हावीस यासाठीं तुझे पैसे खर्ची पडणार नाहींत हो. आमच्याकडे लागलें तें सगळें, तूं त्याबद्दल मुळींच विचार करूं नको. मुकाट्यानें जें होईल तें पहा."

"होय, तें खरें, पण दुसऱ्याचें ऋण डोक्यावर घेऊन मरणें तरी बरें का ?" उमा बोलली.

प्रल्हादपंताचे डाक्टर रद्द ठरवून दत्तोपंतानें स्वमतानेंच प्रसिद्ध डाक्टर व नामांकित वैद्य आणण्यास सुरुवात केली होती व त्यांत मौज अशी कीं त्यांपैकीं एकानेंहि द्रव्याची चवकशी मुळींच केली नाहीं. दत्तोपंताच्या हाकेला जो तो अगदीं हजर. सर्वांना याबद्दल कौतुक वाटे, पण यांतलें गूढ सोडविण्यासाठीं दत्तोपंताला त्यासंबंधी प्रश्न करण्याचें धारिष्ट एकांतहि नव्हतें. प्रल्हादपंतांनीं एकदां पर्यायानें सहज विचारलें तों ते बोवाजी असे कांहीं संतापले, व त्यांनीं असें कांहीं आकाशपाताळ एक केलें, कीं प्रल्हादपंतांचा प्रश्न गेला भुसासारखा कोणीकडच्या कोणीकडे उडून; त्यांना दत्तोपंताची समजूत घालतां घालतांच पुरेवाट झाली. "तिकडे रोग्याला घोर लागलेला, अन् इकडे ह्मणे डाक्टर इतकेच कां आणतां ? काय ह्मणावें बोवा या लोकांना ? अगदीं व्यवहारशून्य. कोणत्या वेळीं कसें वागावें हें देखील समजत नाहीं." अशा अर्थाचें त्यांचें बडबडणें आपलें चालूच होतें. "उमा-

बाई बऱ्या झाल्या ह्मणजे एकदां करीन त्याचा खुलासा; पुन्हां असें विचारलेंत तर बघा आपला विचार.'' अशी त्यानें प्रल्हादपंतांस दहशतहि घातली.

''विद्याधराला हें सारें वृत्त कळवून बोलावूं का ?'' असें कोणीं उमेला विचारलें तर तिचें पित्त खवळे. ''त्याला रजा मिळत नाहीं. तो बंदींत अडकलेला. त्याला कळलें तर यायला व्हायचें नाहींच पण उलट विलक्षण चिंता मात्र त्याला लागण्याचा संभव. आतां बिचाऱ्याला आई खुशाल आहे या कल्पनेमुळें स्वस्थ झोंप लागत असेल ती जायची व विनाकारण माझ्या काळजीनें झुरून त्याच्या प्रकृतीला अपाय होईल कीं काय कोणजाणे. तसें कोणी करूं नका, सावित्रीबाई, तुह्मांला माझ्या गळ्याची शपथ आहे त्याला कळवाल तर. मला साधारण बरें वाटूं लागलें ह्मणजे मग पाहिजे असल्यास कळवा.''

सर्वांना विद्याधरानें आईला भेटण्यास यावें अशी कर्तव्यता वाटे पण उमाबाईच्या आणाशपथांच्या आग्रहाकडेहि कानाडोळा करण्याची सोय नव्हती. अखेरीस त्यांनीं तिचें सुधारण्याचें चिन्ह दिसेना तेव्हां विद्याधरास ''जसा असशील तसा ताबडतोब निघून ये'' ह्मणून निकडीचा निरोप पाठवला व त्याप्रमाणें येण्यास सवड सांपडेना यासाठीं तो तिंकडे हवालदिल होऊन बसला.

उमाबाईचा रोग दिवसानुदिवस कमजोर होण्याऐवजीं वाढत चालला. वैद्यांचे काढे, डाक्टरांचीं मिक्श्चरें, सगळीं वाया जाऊं लागलीं, व शेवटीं तर सर्वांनीं हातटेकीस येऊन दत्तोपंताजवळ रोग्याच्या बचावाची निराशा दर्शविली. उमाबाई खास जगत नाहीं हें डाक्टरांनीं जाहीर करण्यापूर्वींच सर्वांना लक्षांत येऊन चुकलें होतें व चिकित्सकांनीं सांगितल्यावर त्यास बळकटी आली. हा काळपावेतों उमा बेशुद्ध झाली नव्हती. पण आतांशा ती देहभान सुटून बरळूं लागे. व तशांतच एका प्रसंगीं दत्तोपंत शेजारीं असतांना ती बडबडली— ''मरतांना तिकडून थोरल्या भावाजवळ सगळें डबोलें— होय, माझ्या अलंकारभूषणाखेरीज— गांठीस असलेलें सगळें— अ-

गर्दी पै न पै हिशोबासुद्धां भाऊजींच्या पाशीं स्वाधीन करण्यांत आलें पण त्यांनीं मला भिकेला– एकटीलाच कां– माझ्या पोरांबाळांचें वाटोळें करून– सगळें– अगदीं सगळें– गट्ट केलें. पापाचे घडे भरतीलच, त्याचें प्रायश्चित्त– असें– पापाचा निवाडा एकाच जन्मीं होत नसतो. त्यांनीं चोरलें, त्यांनीं गिळंकृत केलें– तें पहा मेघमंडळांना बाजूला सारून तिकडे तोंड काढणें झालें आहे. होय उमे. तुझ्यासाठीं बऱ्यावाईट प्रसंगाला आधार असावा ह्मणून एका आईच्या पोटीं जन्मास आलों या भरंवशावर सगळा गड्डा गणूच्या स्वाधीन केला पण त्यानें त्याचा अपहार केला. तो आपलें कर्तव्य विसरला. असेंचना तिकडे ह्मणत आहेत.''

दत्तोपंताला इतकें पुरलें. लागलीच स्वारी तडक गणूभाऊच्या घराकडे निघाली, व गणूभाऊहि त्यास दैवयोगानें जवळच रस्त्यावर भेटले. तत्काळ त्यांच्यावर दत्तोपंताचा ताशेरा सुरू झाला.

''गणूभाऊ, तुह्मी गुरूच्या भजनीं लागलां आहां; स्नान संध्या धर्म कर्म करतां ह्मणे; तें सगळें कशाला? दुसऱ्या अनाथ दुबळ्यांच्या माना मुरगळायला? एकूण हा सगळा भस्माचा लेप, व ही गंभीर मुद्रा हें सगळें व्यर्थच ना? तुमचीं कर्म बकामारखीं व ध्यानहि त्याच मासल्याचें. अरे गृहस्था, असा भांबावलास कां? घाबरूं नको. दम धर तुझ्या धाकट्या भावानें– यशवंतरावानें– मरतांना आपल्या बायकोची सोय व्हावी ह्मणून तुझ्या स्वाधीन जें द्रव्य केलें तें कशासाठीं? तूं आपलें गपचीप गट्ट करण्याकरितां? धिक्कार असो तुमच्या धर्माला, तुमच्या वेशाला, तुमच्या ब्राह्मण्याला. तुझें मन तुला असेंच का करायला सांगतें? खास नाहीं. परद्रव्यानें तूं तळीराम गार केलास असें तुझें चित्त तुला ग्वाही देत आहे. तुझी नजर बदलली. तुझ्या मुद्रेंत पालट झाला. तुझें कृष्णकृत्य तुझ्या चेहऱ्यावर आपला रंग फासून स्वतःची साक्ष देत आहे. पण सहोदर भावाच्या रक्तानें स्वार्थ साधण्याकरितां ज्या काळांत भावांचे हात लाल भडक रंगत आहेत, त्या काळांत मुकाट्यानें बंधूचें धन पचनीं पडल्यास नवल काय? तुझी भावजय मरणाच्या

दारीं पडली आहे तर तिची तुह्मांस दाद नाहीं, ती तुमची कोणीच नव्हे जशी कांहीं. तुझ्या शरीरांतल्या रोमरोमांत जें रक्त खेळत आहे त्याच्याच अंशाची ती आहे. मूळची दुसऱ्याची असेल पण तुमच्या रक्ताचा तिच्याशीं संबंध जडलेला आहे असें असतांना तिच्याविषयीं बेपर्वा रहाण्याला तुमचें मन पाषाणाचें तर घडवलें नाहींना ? मनाची लाज नसेल पण जनासाठीं कांहीं लाज असूं द्या. गणूभाऊ, तुह्मी उमाबाईचा सर्वस्वीं घात केला आहे. या पापाचा जाब देतांना तुमचें सध्याचें गुरुभजन व धार्मिक पेशा तुमची जामीनकी ईश्वरापुढें खास घेणार नाहीं हें पक्कें लक्षांत बाळगा. तुमच्या या सगळ्या थोतांडाला जग कदाचित् फसेल पण सर्वसाक्षी व हृदयस्थ परमेश्वराच्या डोळ्यांत धूळ फेकण्याचें सामर्थ्य तुमच्यांत खचित नाहीं. तुमच्या पातकांची नोंद चित्रगुप्ताच्या रजिष्टरांत झाल्यावांचून राहिली नसेल.'' या भाषणानें गणूभाऊ तर पुरा गोंधळला. त्याला दत्तोपंतापुढें काय बोलावें व कशी वेळ मारून न्यावी हेंच सुचेना. दत्तोपंताची व त्याची साधारण ओळख पण तिचा फाजिल फायदा घेऊन त्यानें आपल्या अब्रूवर उघड उघड घाला घातला हें गणूभाऊला झोंबलें तो जरासा संतापाचा आव आणून ह्मणतो— ''दत्तोपंत, मीं भावाचे पैसे घशांत टाकले याला पुरावा काय ? अरेरावीबद्दल तुह्मांला कोर्टांत जबाब द्यावा लागेल हें विसरूं नका.''

''शाबास ! पुराव्यावांचून का मी हें सगळें बोललों, मग हें निवळ मी कुभांड रचल्यासारखें होईल. पण तुह्मी नाहीं कुठें ह्मणतां आहांत. नाहीं ह्मणण्याची तुमची छातिच नाहीं. ह्मटलेंतच तर तुह्मी दुराग्रहानें सद्बुद्धीला धाब्यावर बसवून ह्मणतां आहांत असेंच होईल. तुमच्या कानांत एक अगदीं सूक्ष्म ध्वनि उठतो आहे व तो तुह्मांस सांगतो आहे कीं, गणूभाऊ, मुद्दाम नाहीं–खोटें ह्मणूं नको. ह्मणजे एका पापावर दुसऱ्या पापाचें झांकण घातल्यासारखें होईल. उघडकीस न यावें ह्मणून तिसऱ्याची योजना करावी लागेल व अशी ही छपवाछपवीसाठीं उभारलेली पापांच्या झांकणाची रास शेवटीं कोसळून पडेल व मूळ पातक उघडकीस येईल. आणि सगळ्याचें प्रायश्चित्त

एकदम भोगावें लागेल."

"होय, मी नाहीं ह्मणतों—"

"स्पष्ट नाहीं ह्मणा पाहूं"

"नाहीं."

"भावाची ठेव मी दाबली नाहीं असें स्वच्छ सांगा"

"भावाची ठेव मी दाबली नाहीं. अगदीं लख्ख सांगतों."

"महाराज, वाक्य उच्चारतांना तुमची जीभ चांचरली. आतां आमची खात्री नुसत्या नाहीं ह्मणण्यानें पटत नाहीं. आपल्या गुरूची शपथ वहा आणि ह्मणा पहिल्यासारखें."

गुरूच्या शपथेची अट निघतांच गणूभाऊंचें धाबें दणाणलें. त्यांचा चेहरा एकदम गोरामोरा पडला व 'आपण बोललों तें खोटें' असे शब्द क्षीण स्वरांत त्यांनीं उच्चारले. झालें. दत्तोपंतांचें तात्काळ जुळलेंच. ते पुढें ह्मणतात—"गणूभाऊ, तुह्मी ताळ्यावर आलांत एवढ्यानें बरें झालें. अद्यापि तुमच्यांत माणुसकी आहे. गुरुभजनीं रत झाल्याचा एवढा तरी फायदेशीर परिणाम झाला. गुरूंचा असाच दरारा पाहिजे. चला, उमाबाई, तुमची सख्खी भावजय आसन्नमरण झाली आहे. तिच्या समाचाराला चला, तिच्याजवळ आपलें कृत्य ओका. चला."

नाहीं होय ह्मणून आढेवेढे घेण्याला गणूभाऊला अवसरच मिळाला नाहीं, व त्यास तसें ह्मणावेसेंहि वाटलें नाहीं. दत्तोपंतानें आपली छाप त्यावर छाप बसविली. तो त्याच्या मागोमाग उमेच्या बिऱ्हाडीं आला. उमा त्यांच्या आगमनाचे वेळीं सावध होती. तिनें त्याचें शब्दानें स्वागत केलें. शेजारीं सावित्रीबाई बसल्या होत्या त्यांनींहि हंसत हंसत गणूभाऊच्या बेपर्वाईबद्दल त्याची बरीच कानउघाडणी केली. भाऊजी आले ह्मणून उमेला हर्ष झाला. "कसें काय?" "बरें आहे" इत्यादि औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर दत्तोपंतानें सावित्रीबाईस तेथून कामानिमित्त उठवून लावलें व जवळपास ऐकण्यासारखें कोणी नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर

गणूभाऊला कृतकर्माचा पाढा वाचावयास लावला व "पुढें मागें तें द्रव्य तुझ्या मुलांच्या स्वाधीन करीन" अशी कबूलीहि देवविली. दत्तोपंतानें गणूभाऊंची फार वाखाणणी करून ह्मटलें, "पहा गुरुकृपेचा असा महिमा आहे. हल्लींच्या काळांत स्वार्थ सोडून द्यायला कोणी तयार होईल का? पण वाहवारे बोवा! शाबास त्याची. आश्रय करणाराला निष्कल्मिष करून त्याचा आत्मा नवनीतासारखा कोमल बनवण्याचा पराक्रम आहे गुरूंत. स्वार्थाचा मोह सुटला यापेक्षां अधिक काय पाहिजे? खरोखरीच तुमच्या गुरूचा महिमा अगाध. असल्या वंद्य विभूति जगांत अद्यापि आहेत ह्मणून तर जगाचे व्यवहार कांहींतरी सुरळीत चालले आहेत. आज, गणूभाऊ, मला वाटतें, तुमच्या जन्माचें सार्थक झालें. धन्य धन्य त्या गुरूची."

दत्तोपंताची मुद्रा इतकी गंभीर होती कीं, त्याच्या बोलण्यांत व्याजोक्ति असेल अशी शंकाहि कोणास आली नसती. मग आपल्या मतीवरचा कलंक झडून जाऊन आपल्या नवीन दीक्षेची व ती देणाराची पाखंडी दत्तोपंताच्या तोंडून तारीफ झाल्याबद्दल गणूभाऊ समाधानवृत्तीनें घरीं गेले असल्यास आश्चर्य काय? असो. दत्तोपंतानें त्या धांदलींत एवढें महत्त्वाचें काम उरकून घेतलें हेंच जास्त.

इतरांप्रमाणेंच उमेलाहि दत्तोपंताच्या लहरी प्रेमळ वृत्तीमुळें आनंद होत असे व तें गारूड उकलण्यासाठीं तिचा प्रयत्न मधून मधून चालू असे. दत्तोपंतानें गणूभाऊकरवीं घडवून आणलेल्या गोष्टीपासून तिला त्याबद्दल सकौतुक आदर वाटूं लागला होता.

आपण आतां खास जगत नाहीं व विद्याधरहि अखेरीस आपले डोळे कायमचे मिटण्यापूर्वी दिसत नाहीं अशा कल्पना एक दिवस तिच्या मनांत वावरूं लागल्या. पुत्रवियोगाच्या चिंतनानें डोकें भ्रमतां भ्रमतां ती बडबडूं लागली व विद्याधराच्या नांवाचा तिनें जप चालविला. त्या दिवशींच तिचे प्राण देहत्यागासाठीं उत्कंठ झाले व आतां एखाददुसऱ्या दि-

वसाचीच हा धनीण असें सर्वांना वाटलें. प्रल्हादपंतांनीं विद्याधरास तार ठोकली. विद्याधरहि लागलीच निघाला पण त्या मातापुत्राची गांठ पडण्याइतका जीवनतंतु उमेंत उरला नव्हता. ती रात्र तिला शेवटचीच झाली. संध्याकाळपासून तिचें अवसान सुटत चाललें. जिव्हा बंद पडली व सगळ्यांकडे टकमक पाहून क्षीण नेत्रांतून अश्रु ढाळण्यापलीकडे तिच्या हातून कांहींच होईनासें झालें. याचा परिणाम सर्वांना दिसत होताच, त्यामुळें त्या रात्रीं सर्व मंडळी डोळ्यांत तेल घालून जागत होती. क्षणोक्षणीं तिचा देह गार पडत चालला तेव्हां सावित्रीबाईनीं तिच्या तोंडांत गंगा ओतली. त्या प्रसंगीं त्यांच्या कमरेभोंवतीं महत्प्रयासानें हाताचें वेष्टण घालून उमा रडूं लागली. तिच्या शरीरांत त्राण कांहींच नव्हतें त्यामुळें तिचें रुदन फारसें दिसलें नाहीं. पण उमेची ही अखेरची मिठी पडतांच सावित्रीबाईंना मोह आवरला नाहीं. उमा त्यांच्या नात्याची नव्हती. परंतु सहवासानें जडलेलें व सद्गुणमत्तेनें दृढमूल झालेलें प्रेम अशा वेळीं आपलें कर्तव्य करण्यास माघार घेईल काय? सावित्रीबाई एखाद्या आईनें आपल्या लाडक्या मुलीसाठीं रडावें त्याप्रमाणें ओक्साबोक्शी रडूं लागल्या. यशोदाबाईचीहि उमेवर बहिणीसारखी माया होती. तिला तो दुःखद व भेसुर देखावा कसचा पहावतो? अर्थात् तीहि स्फुंदूं लागली. मृत्युपंथाला लागलेल्या उमेची मातुःश्रीच्या कमरेस मिठी पडली आहे व मातुःश्री तिला कुरवाळून तिचे गुण आठवीत ती आपल्याला टाकून लोकांतरीं चालली ह्मणून रडत आहे. या प्रत्यक्ष चित्रानें दत्तोपंतांना डोळ्यास पदर लावावयास लावलें व प्रल्हादपंतहि परमेश्वराचें नामस्मरण करीत उमेच्या खोलीच्या दारांत उंबरठ्यावर बसून अश्रुमोचन करीत बसले. आईच्या आजारीपणापासून बाळकृष्ण भारी किरकिर करीत असे, पण सुदैवानें आज तो सावित्रीबाईच्या घरांत स्वस्थ निजला होता. त्या अजाण बाळाला आपण जगांत तासा अर्ध्या तासाच्या आंत निराश्रित उघडे असे होणार याचें स्वप्न सुद्धां पडलें नव्हतें. पण सावित्रीबाईचा दीर्घ रोदनस्वर त्याला जागें कर-

ण्यास कारण झाला व तोहि रडूं लागला. त्याची समजूत घालीत सावित्री-बाईनीं त्याला जवळ घेतलें व आईच्याजवळ अर्धवट झोंपेंत असा तो पडला. मुलगा जवळ आल्याचें कळतांच उमेच्या हातचा कमरेभोवतींचा विळखा सुटून ती त्याच्या अंगावरून हात फिरवूं लागली. पण ही सुस्थता अल्पकालीन होती. अल्पावकाशांत उमा डोळे गरगर फिरवूं लागली. आतां बहुतेक आटपलेंच असें समजून तिला सावित्रीबाईनीं सावरलें. क्षणार्धांत ती चांगली सावध झाली. दिव्याची ज्योत मालवूं लागली ह्मणजे अगदीं शेवटच्या क्षणीं ती एकदम प्रकाशित होते व मग तत्काल विझते असें आपणास नेहमीं पहावयास सांपडतें त्याप्रमाणें उमेची स्थिति झाली. आतां तिला वाटणारी हुशारी साहजिकच अंतिम होती. तिला पुन्हां वाचा फुटली— "विद्याधर आला का ?" असा तिनें प्रश्न विचारला. त्यास नकार मिळतांच तिनें डोळे मिटले. फिरून नेत्र उघडले, व क्षीण शब्दांत ती दत्तोपंताला जवळ बोलावून ह्मणाली— "भाऊराया ! आतां माझ्या बाळांची सर्वस्वीं तुझ्यावर भिस्त आहे. या बाकीच्या मंडळींचा माझ्यावर लोभ होताच. माई, यशोदावहिनी, प्रल्हादपंत, आणखी भाऊराया, माझ्यावरची माया आतां मुलांवर करा. त्या दीन, अनाथ बाळांचा सांभाळ करणें, जगविणें, मारणें सर्वस्वीं तुमच्या हातांत आहे. त्यांचें कल्याण होईल व या हतभागी मातेचें स्मरण सुद्धां होणार नाहीं असा मी त्यांना आशीर्वाद देतें. सांभाळा हो त्यांना. श्रीराम— श्रीराम— श्रीराऽऽ—"

उमेचा आत्मा देहबंधांतून सुटल्यावर तिच्या जडशेष अस्तित्वाची समाप्ति मंडळींनीं यथाविधि केली. परंतु तिच्या ओवळेपणाचा प्रश्न काढून भटाभिक्षुकांनीं बखेडा माजवायचा तो माजविलाच. बिचारी उमा ! इहलोकाच्या यात्रेंत तिनें "सुख पहातां जवापाडें दुःख पर्वताएवढें" याच तत्त्वाचा अनुभव घेतला, बालपणीं लग्न होईपर्यंत व त्यानंतर भर्तृनिधन होईपावेतों काळ काय सुखाचा गेला असेल तेवढाच. बाकी, तिचें सारें आयुष्य कष्टांतच गेलें. शिक्षण संपल्यावर तिनें कर्तव्याचा विसर पडूं दिला नाहीं. हीच

तिची थोरवी. तिचीं मतें व वागणूक वाचकांना वारंवार पहावयास सांपडलीं आहेत. "शिक्षण ह्मणजे कर्तव्याची जाणीव" हें तिचें ध्येय होतें व तेंच तिनें बाणेदारपणानें सिद्धीस नेलें. शिक्षित स्त्रियांच्या गरजा अशिक्षित स्त्रियांपेक्षां अधिक असतात पण लहानपणीं श्रीमंतीच्या चोचल्यांत वाढलेल्या मुलींची दैवयोगानें दरिद्री पतीशीं गांठ पडली तर त्यांची जी दैना उडते तशी तिची कधींच उडाली नाहीं. उंची लुगडीं पाहिजेत, अंगभर दागिने पाहिजेत, असा हव्यास तिनें कधीं धरला नाहीं. उलट ती ह्मणे— "शिक्षणानें मन इतकें शुद्ध व उदार बनलें पाहिजे कीं, पतिप्रेमाच्या पवित्रपणाखेरीज अलंकारांच्या हौसेसारख्या अमंगळ विकारांचा त्यास विटाळ सुद्धां होऊं नये. पति हा केवढा दागिना आहे! त्या दागिन्याची ओज राखा. तो दागिना उज्वल दिसावा, अखंड टिकावा, ह्मणून प्रयत्न करा. जड सुवर्णाचीं भूषणें लेऊन त्यांच्या जोखमीची काळजी मागें लावून घेण्यांत काय अर्थ आहे? ईश्वराच्या दयेनें तीं मिळालीं तर आनंदच आहे पण नसल्यास त्यासाठीं खेद वाटावयास नको. पाळण्याची दोरी हातीं धरून भावी पिढीला झोके देण्याचें अत्यंत पवित्र काम ईश्वरानें बायकांवरच सोंपविलें आहे, हा पाळण्याच्या दोरीचा मान हलका नाहीं. भावी पिढीस— भविष्य काळास— खऱ्या कर्तव्याचें बाळकडू पाजून त्यास तयार करा." वगैरे वगैरे बोध नेहमीं तिच्या तोंडीं असे. तिला इंग्रजी, संस्कृत व मराठी या भाषा चांगल्या अवगत होत्या व पुढें विद्याधरानें तिचे कागदपत्र पाहिले तेव्हां त्यांत 'स्त्रियांच्या कर्तव्या'वर समाजशास्त्रदृष्ट्या विविध पुस्तकें वाचून लिहिलेला एक ग्रंथ त्यास सांपडला. तो वाचून पाहिल्यावर प्रल्हादपंत, दत्तोपंत यांसारख्या विद्वान् पुरुषांनाहि तिच्या विद्वत्तेचें कौतुक व अचंबा वाटला.

* * *

विद्याधराला एकामागून एक अशीं दोन तीन उमेच्या आजारीपणाचा वृत्तान्त निर्दिष्ट केलेलीं प्रल्हादपंताचीं पत्रें आलीं. व्यापारी संस्थेच्या व्यवस्था-

पकाला त्यानें ती नेऊन दाखविली पण तो कांहीं केल्या रजा देईना. तो ह्मणे—“अजून कामावर रुजू झाल्याला दोन महिने देखील झाले नाहींत, रजा कशी देतां येणार ?” विद्याधर नोकरी सोडण्यास तयार झाला तेव्हां “एक महिन्याची अगाऊ खबर दिल्याखेरीज एकदम नोकरी सोडण्यास मी परवानगी देत नाहीं” असें घोडें पुढें ढकलून त्यानें तिकडूनहि त्याचा कोंडमारा केला. जावें तरी पंचाईत न जावें तर तेंहि अनुचित—नव्हे शुद्ध अधमपणा, अशा दुहेरी पेंचांत तो पडला असतां अकस्मात् त्याच्या हातीं मातेच्या अत्यवस्थेची तार धडकली. त्यासरसा तो कामावरून उठला व आपल्या वरिष्ठापुढें ती तार टाकून उभा राहिला. तारेंतलें वर्तमान कोणाहि माणुसकी असलेल्या पुत्राच्या उरांत धडकी भरण्यासारखेंच होतें; पण त्या खमंग रावसाहेबांना त्यांचें कांहींच वाटलें नाहीं. कपाळाला आठ्या घालून तिरस्कारानें ते ह्मणाले— “आतां तुला जायला परवानगी देण्यांत येत नाहीं.”

विद्याधराच्या उपजत आडदांड स्वभावानें या वेळीं उसळी मारली व त्यास अतोनात संताप येऊन तो ह्मणाला— “रावसाहेब, माझ्या आईची धडगत नसतांना मी कांहीं जाणीत नाहीं. मी हा आतां चाललों. हें आपलें काम व हे आपण; घाला गोंधळ. मला तुमच्या कामाहून आईची किंमत जास्त आहे समजलांत.”

“खबरदार जास्त बोलशील तर. तूं आह्मां लोकांना पहात नाहींस आह्मी कसे कामें करतों ते. काम सोडून वाटेल तेव्हां आह्मी जात असतों तर येथवर टिकलोंच नसतों.”

“रावसाहेब, ही धाकदपटशा पुरे करा. आपल्या कामाची तऱ्हा आ-ह्मांला चांगली ठाऊक आहे. तुह्मी सांगायला नको. मी नोकरीवर आल्या-पासून गेल्या दोन महिन्यांत घरून बाईसाहेबांचा निरोप आला कीं, चालले तांतडीनें धावत, असें दोन चार वेळां पाहिलें आहे. तुह्मी कायदा कितपत पाळता तें सांगून उगीच कशाला तोंडची वाफ दवडतां. पण “बडेने किया

सो अच्छा किया, छोटेनें किया सो भंड" असा [illegible]च्या तुमच्यांत फरक आहे. मोठ्यांचें ह्मणून तें स्तुत्य अन् धाकट्यांचा तो पुंडावा. हेंच खरें."

बाईलेच्या अधीनतेच्या रावसाहेबांच्या वर्मावर विद्याधरानें घाव घालतांच ते विरमले पण भर कचेरींत हा टारगा पोर आपलें वर्म काढून निर्भर्त्सना करतो याचा त्यांना फार राग आला. "[illegible] आतांच्या आतां निघून जा. आह्मांला असला उर्मट मनुष्य नको [illegible]हेब ह्मणाले.

विद्याधरानें ताबडतोब पडत्या फळाची [illegible]. सामानसुमानाची घाईघाईनें व्यवस्था करून जी गाडी पुण[illegible]ला पहिल्या प्रथम मिळाली त्या गाडीनें तो निघाला. परंतु [illegible] वैचित्र्य पडलें कीं त्यानें त्याची व त्याच्या आईची जी एकदां ताटातूट [illegible] ती कायमचीच. तो उमा निवर्तल्यावर चार पांच तासानें पुण्यास पोंचला.

मातृवियोगाची विपत्ति कांहीं सामान्यापैकीं नाहीं; व बाळपणापासून पित्याच्या अभावीं ज्यांचें सर्वस्व आईवरच त्यांना तिची आवश्यकता अतिशयच वाटत असते. त्यांतून विद्याधराचें आपल्या आईवर अत्यंत उत्कट प्रेम होतें. तो अजून कर्ता झाला नव्हता तोंच त्याच्या डोक्यावर आकाश फाटलेलें पाहून त्यास काय वाटलें असेल! मातेचा चिरविरह त्यास दु:सह होऊन त्यानें अन्नपान वर्ज्य केलें व चार दोन दिवसांत त्याचीहि शरीरकान्ति कोमेजली. पण आजूबाजूच्यांनीं त्यास तसें फार दिवस करूं दिलें नाहीं. दत्तोपंत, प्रल्हादपंत, त्यास परोपरीनें मातेच्या विरहाची जाणीव कमी कमी पाडण्यास उद्युक्त करीत होते. या सर्वांत कालाचा प्रयोग सुफल झाला. कालामध्यें अशी शक्ति आहे कीं, तो प्रपंचांतले खांचखळगे साफ बुजवून टाकून माणसाला त्याची आठवण न होईसें करून टाकतो. त्यानेंच एक एक दिवसाच्या क्रमाबरोबर विद्याधराच्या मनाचा उद्वेग कमी पाडला. ज्या स्मशानांत उमेच्या शरीराची अखेर झाली तें विद्याधरास प्रिय होऊन तो रोज संध्याकाळीं त्या भयाण जागेंत मन रमविण्यास जाऊं लागला.

ज्या स्थळीं चितेच्या भट्टींत उमेच्या अचेतन शरीराचे पांची घटक पु-

थक् होऊन सृष्टीत वसणाऱ्या आपल्या मूळ रूपांत मिसळले तें स्थळ त्यास विहरणीय कां वाटतें याचें कारण विचारल्यावर दत्तोपंताजवळ त्यानें पुढील शब्दांनीं खुलासा केला—

"श्मशान मला शान्तिस्थान वाटतें. मी तिथें बसलों असतांना माझ्या समोरच्या वृक्षावरून गळलेलीं व पाण्याच्या ओघांत वाहून चाललेलीं पानें मला जगाच्या तरूवरून कालीं अकालीं गळलेल्या मानवी पानाफुलांची स्मृति करून देतात. श्मशान नेहमीं नदीच्या काठीं असतें व त्याचें संतत वहानें माझ्या मनाला जीविताच्या वहनाची आठवण करून देतें. तो झुळझुळ प्रवाह जसा कधीं खडकाळ जमीनींतून संकोच पावून तर कधीं सुपीक प्रदेशांतून विस्तृत होऊन अखेर महासागराशीं एकजीव होतो, त्या अफाट जलराशींत जसा त्याचा ठावठिकाण अथवा मागमूसहि उरत नाहीं तसाच सुखदुःखाच्या परिस्थितींतून विस्तार अथवा आकुंचन होत होत या मानवी जीविताचा ओहोळ त्या काळाच्या प्रचंड उदरांत लय पावला कीं, पुन्हां ह्मणून त्याचें दर्शन व्हावयाचें नाहीं. सूर्याची उष्णता रूपांतरानें जसें समुद्राचें पाणी आकाशगर्भात सांठवून त्यावर सगळ्या नदीनाल्यांचे प्रवाह जिवंत ठेवीत असते तसेंच कालाची सत्ता आमचेंहि जीवन चालवीत असते. त्या परमेश्वराच्या अचिंत्य शक्तीची जाणीव माझ्या मनाला श्मशानांत भासत असते. इहलोकींचें अस्तित्व नश्वर खरें पण त्यामध्यें खरें कर्तव्य जाणून तें साध्य करण्याचा प्रयत्न केल्यास माणूस महात्म्यांनीं ह्मटल्याप्रमाणें नारायणरूप बनेलच बनेल. ऐहिक अस्तित्वाची राख अंगाला फांसून श्मशानांत सदाशिव नांदत असतात. ही प्रेतभूमि कर्तव्यदर्शक ह्मणून मला आवडते. तेथलें वाळवंट माझ्या मनाला रुचतें."

त्यानंतर उत्तरकार्यादि विधि उरकल्यावर पुढें काय करावयाचें हा प्रश्न उद्भवला. त्याचा निकाल त्यानें तत्काळ लावला. "श्मशानभूमीमध्यें संध्यासमयीं गंभीर शांतता वसत असतां माझ्या कानीं तूं सर्वसंगपरित्याग करून लोकोद्धाराचें पवित्र काम पत्कर ह्मणून हाका ऐकूं येत असत.

संधिप्रकाशाप्रमाणें दिशाभूल करणारी संदेहस्थिति देशाला आलेली आहे तिच्याकडे कानाडोळा करणें माझ्यासारख्याला अनुचित असा साक्षात्कार मला झाला आहे. प्रत्येक रात्रीं माझी आई माझ्या स्वप्नांत येते व माझ्या अंगावर भगवें वस्त्र घालून 'कर्तव्य कर' असें बजावीत असते. जिवंत असतांना तिनें आह्मांस सन्मार्ग दाखविण्याचें काम अगदीं चोख बजावलें पण मातेचा आत्मा अद्यापि माझ्याभोंवती घिरट्या घालून तेंच पवित्र काम करीत आहे. ती मला स्पष्ट सांगते कीं, विद्याधरा तूं काशीस जा. तेथें आपल्या धर्मशास्त्राचा, वेदान्ताचा, देशाच्या प्राचीन इतिहासाचा अभ्यास कर व कर्तेपणानें जगदुद्धाराचें कार्य करण्यास पुढें हो. विश्वेश्वराच्या व गंगामाईच्या सान्निध्यानें प्रत्येक भारतीयास वंद्य झालेल्या त्या प्राचीन विद्यापीठास जाऊन मातेच्या आज्ञेप्रमाणें मी अभ्यास करण्यास जातों. विद्या व गुरुकृपा संपादून मी पुन्हां महाराष्ट्रांत परत येईन. महाराष्ट्र हें मला सगळ्या भारतवर्षांत जास्त प्रिय आहे."

स्मशानवैराग्याचे झटके माणसांना येतात पण ते टिकाऊ नसतात. विद्याधराची अगदींच निराळी स्थिति झाली होती. त्याच्या अंगीं अनुपम विरक्ति बाणली होती. त्यास जग नकोसें झालें व अखेरीस त्यानें आपला निश्चय पार पाडला. तो काशीस निघून गेल्यावर बाळकृष्णाचें संगोपन व वर्धन प्रल्हादपंतावर पडलें. प्रल्हादपंताला मूलबाळ कांहीं नव्हतेंच; तेव्हां यशोदाबाईला बाळकृष्णाला अगदीं आपल्या पोटच्या पोराप्रमाणें जिव कीं प्राण करावेंसें वाटे. सावित्रीबाईचा तो नातूच झाला व प्रल्हादपंताच्या सुशिक्षणाखालीं तो वाढूं लागला.

दत्तोपंतांना अंतकाळीं दोनदां उमेनें ज्या सलगीच्या नांवानें हाक मारली त्या 'भाऊराया'वरून सर्वांनीं हें गौडबंगाल काय आहे हें समजून घेण्यासाठीं त्याची पाठ पुरवली व त्यानेंहि त्याचें 'मी भावासारखा उमाबाईच्या दुखण्यांत खपत होतों ह्मणून त्या असें ह्मणूं लागल्या होत्या' असें समाधान केलें व त्यांत खरें खोटें कांहीं असो, त्यांना त्या वेळेपासून 'मामा'

ही संज्ञा मिळाली व ते सगळ्या वाड्याचे मामा बनले एवढें मात्र खरें.

सहा वर्षेपर्यंत विद्याधर काशीच्या धामास होता. पण तेवढ्या अवधी आपणास कर्तव्यासाठीं महाराष्ट्र आपली जन्मभूमि अंतरली ह्मणून प्र ल्हादपंतास आतुरतेचीं पत्रें येत असत. पुढें तो संन्यास घेऊन मह राष्ट्रांत परत फिरला. त्यानंतर सर्व तीर्थें क्षेत्रें त्यानें समर्थांप्रमाणें धांड ळून टाकलीं व अखेरीस महाराष्ट्राच्या पुण्यस्थानीं मठ बांधून हे बालयां स्थिर राहूं लागले. व सामाजिक मतमतांतराच्या प्रश्नांचा जगाचा इतिहा व आमचें धर्मशास्त्र यांच्या प्रमाणावर अधिकारवाणीनें निकाल दे लागले. पण विद्याधर काशीस निवास करूं लागल्यानंतर वर्षसहामाहीं त्याच्या परिचितांमध्यें काय काय चमत्कार व स्थित्यंतरें घडलीं तीं पहाण्या जोगीं आहेत.

---

## प्रकरण एकविसावें.

## गुरुमहाराज.

आल्प्स पर्वताच्या एका शिखरावर बसून सबंध युरोप खंडाचें मानसिक निरीक्षण करणाऱ्या एका मुशाफरानें गुलामगिरीमध्यें दिवस काढणाऱ्या इटली देशाची स्थिति आपल्या काव्यांत वर्णन केली आहे. जगाच्या पाठीव सुखाचा अंश किती वसतो आहे व माणसांच्या महत्वाकांक्षेचा त्यास कितपत उपयोग होतो याचा विचार करतां सुखाला निसर्गसिद्ध अवस्था जश मदत करते तशी मनुष्यनिर्मित कलांपासून होत नाहीं असा सिद्धान्त त्यानें काढला आहे. परंतु त्या युरोपियन राष्ट्रांच्या तपासणीमध्यें त्याला इटली देशाच्या हीन दशेचें आश्चर्य वाटलें. या परतंत्र देशांत त्या वेळीं काय प्रका चालू होते व तेथील परवशतेंत मुरलेल्या लोकांचीं मनें किती दुर्बळ व दोषसुलभ झालीं होतीं याचें चित्र त्यांच्याच शब्दांत दिल्यास अधिक खुलेल. निसर्गाची या देशावर अवकृपा होती असें नाहीं. सृष्टीची याव

पूर्ण मेहेरनजर होती; पण सृष्टीच्या सौंदर्याचा काय उपयोग? ईश्वरानें जगदुत्पत्ति केल्यावर आपल्या कर्तबगारीचें कौतुक करण्यासारखा एकहि प्राणी त्यास न आढळल्यामुळें मनुष्य जन्मास आणला. तो ईश्वराचें प्रतिरूप असल्याचें सांगतात व हें जर खरें असेल तर मनुष्यांच्या अवनतीच्या भेसुर-पणापुढें निसर्गाचें वैभव न शोभल्यास त्यांत आश्चर्य काय? मनुष्यांचीं चित्रें जर स्वस्थ असतील तर सृष्टीच्या देणग्यांचें कौतुक. एरवीं त्या सर्व व्यर्थ होत. गोल्डस्मिथ ह्मणतो कीं, मनुष्येतर सर्व वस्तुमात्राचे ठिकाणीं तरतरी होती, पण त्या देशांत—

Man seems the only growth that dwindles here.
Contrasted faults through all his manners reign;
Though poor luxurious; though submissive vain;
Though grave, yet trifling; zealous yet untrue;
And even in penance, planning sins anew;
All evils here contaminate the mind;
That opulence, departed leaves behind.

दत्तोपंतानें विद्याधराला लिहिलेल्या एका पत्रांत या उताऱ्याचा उल्लेख करून हें वर्णन आपल्या देशाशीं किती तंतोतंत जुळतें आहे याचा खुलासा केला होता. त्यांनीं पुढें लिहिलें होतें. "नुकत्याच हरपलेल्या ऐश्वर्याचा ठसा अद्यापि मनावरून न गेल्यामुळें लोकांत एक प्रकारचें श्रीमंती दैन्य दृष्टीस पडतें आहे. दिखाऊपणा ह्मणजे बेगडी श्रीमंती. अलीकडे लोकांत एक प्रकारची छानछुकीची हौस वाढत आहे, पण भपक्यांत राम कांहीं नसतो. रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या युवतिजनाकडे सहज नजर टाकली तर असें दिसून येईल कीं, त्यांपैकीं शेंकडा पाऊणशेंजणींच्या अंगावर दागिन्यांचा अभाव असतो. वस्त्रें पाहिलीं तर तीं तेवढीं सुंदर असतात. शिक्षणामुळें दागिन्यांची आवड कमी झाली असेल असा याचा अर्थ नाहीं. स्त्रियांच्या स्वभावांत पेशवाईपेक्षां सुधारलेल्या इंग्रजी राज्यांत लवमात्रहि फरक पड-

केला नाहीं. पण देश दिवसानुदिवस निर्धन होत चालल्याचीं हीं लक्षणें आहेत. कोट, पाटलून, बूट, पायमोचे, शर्ट, नेकटाय, कॉलर या जिन्नसांचा संच एकदां घेऊन ठेवून तो बेतानें वापरला ह्मणजे जशी पुरुषांच्या ऐश्वर्याची पुष्कळ दिवसपर्यंत भरपूर बेगमी होते तशीच एक दोन दिखाऊ लुगडीं, एक जोडा, दोन चार पोलकीं इतक्या सरंजामानें बायकांच्या श्रीमंतीचें काम भागतें. अशा जोडप्यांच्या घरांत पाहूं गेल्यास, चहादाणी, मुलाम्याच्या चार पांच लोखंडी अथवा चिनी मातीच्या कप बशा, व थोडीशीं संसाराचीं भांडीं एवढीच काय ती दौलत आढळेल. परंतु हें अल्प संतोषाचें लक्षण नव्हे. पूर्वी मुलीला दहाजणांच्या घरांत देण्याची आईबापांची खटपट असे. मुलीनें घरांतल्या मंडळींच्या चित्राहुति गोळा करून खाल्लयास पोट भरण्यास अडचण पडूं नये इतक्या मंडळीच्या गोतांत मुलगी पडावी असे जुन्या लोकांचे उद्गार असतात. मोठ्या कुटुंबांत कामाच्या धबडग्याचा सराव पडल्यानें त्या मुलींत प्रसंगोपात पडेल तें काम रेटण्याची धमक येत असे. पण विद्यावंत, सध्यांचा मनु निराळा आहे. नवरा व बायको असा दोनच माणसांचा संसार असला तरी तेवढ्याचें काम पार पाडण्याचें अलीकडील नवीन स्त्रियांना झेपत नाहीं. नवऱ्याच्या मिळकतीची त्यांस फारशी पर्वा नसते. पैशाची अडचण कशीहि असली तरी दळण कांडण करण्याला मोलकरीण पाहिजेच असा नियम ठरून गेला आहे. कलाकौशल्याची बाजू पाहूं गेल्यास यथातथाच. पत्ते खेळावे, चकाट्या पिटाव्या व अगदींच करमेनासें झालें तर संध्याकाळीं फिरायला जावें हा साऱ्या दिवसाचा धंदा! शिवणाच्या नांवानेंहि आवळ्याएवढें ह्मणण्यास हरकत नाहीं. शाळेंत काय चार दोन पुस्तकें वाचून झालीं असतील ती काय ती विद्वत्ता! शारीरिक परिश्रमाचें तर नांवच काढावयाला नको. असा सर्वत्र घोटाळा माजला आहे. पूर्वी स्त्रियांमध्यें जें समाधान वसत असे, त्याचीहि सांप्रत उणीवच आहे. प्रौढविवाह, पुनर्विवाह अथवा यांसारख्या इतर सुधारणेच्या साधनांचा देशोन्नतीशीं कांहीं संबंध नाहीं. पांढरपेशांपेक्षां सध्यां निकृष्ट मानल्या जाणाऱ्या

जाती अधिक सुखी आहेत. नोकरीच्या मागें लागणारांहून धंदेवाले जास्त सधन आहेत. हल्लींचें कालमान पाहून वागलें पाहिजे. नसत्या उठाठेवीनें आहे त्याचा नाश होऊन "तेल गेलें तूप गेलें, हातीं धुपाटणें आलें," या म्हणीचा अनुभव घेण्याची पाळी येईल."

दत्तोपंत व विद्याधर या दोघांमधला या सुमारास चालू असलेला पत्र-व्यवहार फार नमुनेदार व बोधपर आहे. तो सगळा देत बसण्याचें हें स्थळ नाहीं; पण त्यांतल्या कांहीं महत्त्वाच्या भागाचें दिग्दर्शन आम्ही करणार आहों. या पत्रांतून प्राचीन व अर्वाचीन स्थितीची तफावत दाखवून हल्लीं आमचें काय चुकतें आहे याचें विवेचन दत्तोपंत करीत असत. दत्तोपंतांनीं दुसऱ्या एका पत्रांत लिहिलें होतें—

"हल्लीं चालू असलेल्या कांहीं खाजगी शाळांच्या व कालेजांच्या तहा-हयात सेवकांनीं हा सामाजिक सुधारणेचा प्रश्न पुढें आणून त्यास पाठिंबा दिला आहे. वस्तुतः हें करणें अनिष्ट आहे. खुद्द पुरस्कर्त्यांच्या मतांमध्यें स्थिरता नसते त्यामुळें त्यांच्या धरसोडीचा वाईट परिणाम समाजावर होतो. "हीनें दाविलें चांगलें" या न्यायानें सुधारणेमध्येंहि कांहीं चांगल्या गो-ष्टींचा अंतर्भाव आहे; पण दर्यामें खसखस त्याप्रमाणें दोषांच्या राशींत एखाददुसऱ्या गुणाचा मागमूसहि लागणार नाहीं. थोडक्यांत सांगायचें म्हणजे स्वैराचरणाला बाध येऊं नये यासाठीं सुधारणेचें खूळ पुढें करून सुधारक-पक्ष आज धिंगाणा घालीत आहे. मद्यपान, व्यभिचार, मांसभक्षण हा आ-जच्या सुधारकांचा रूढ मार्ग बनलेला आहे. खरोखर त्यांत अर्थ मुळींच नाहीं. पोरें शिकवणाऱ्या प्रोफेसरांपेक्षां पुष्कळच उच्च दर्जाच्या माणसांना धर्माधर्मांचें संशोधन करण्याचा अधिकार असावयास पाहिजे. पण सध्यांच्या युगांत हजामाचें काम परटानें, व धोब्याचें काम न्हाव्यानें करण्यासारखा गोंधळ झाला आहे."

आणखी एका पत्रांत त्यांनीं असें लिहिलें होतें—

"विद्याधरपंत, सुधारणेच्या नांवाला भुलून लौकिकाच्या मागें लागलेल्या

एका प्रसिद्ध घराण्यांतल्या स्त्रीनें एका छाकट्या इसमाशीं पुनर्विवाह केल्याचें तुमच्या ध्यानांत असेलच. लग्नाचे अगोदर त्या दोघांमध्यें अगदीं आत्यन्तिक प्रेमाची भाषा वापरली जात असे; पण लग्न होतांच त्यांच्यांत बिनसतां बिनसतां आतां दोघेंहि परस्परांस काडी मोडून देण्यास सिद्ध झालीं आहेत. पुरूष हा जात्याच जास्त धीट असल्यामुळें प्रसंगीं एखाद्या पातकाचा त्याला फारसा पश्चाताप होत नाहीं, असें रा. ब. शकाराच्या उदहरणावरून वाटतें. तो बायकोच्या धुसफुशीबद्दल बराच बेफिकीर आहे. थोडेच दिवस झाले, हें जोडपें आपसांत भांडतांना माझ्या नजरेस पडलें. तेव्हां रा. ब. नीं स्त्रीपुरुषांच्या समान हक्काचें नातें विसरून जाऊन मनोरमेवर बरेंच उग्र स्वरूप धारण केलें होतें. तिनेंहि त्याच्या अरेरावीला किंमत दिली असें नाहीं. पण हा सगळा चमत्कारच नव्हे का ? पुनर्लग्नाचें हेंच का प्रेम ! मनोरमेच्या पैशावर चैन करणारा हा सावचोर तिच्या तक्रारीची पर्वा करीत नाहीं. पण असें किती दिवस चालणार ? लवकरच याचे कडु परिणाम पहावयास व ऐकावयास सांपडतील. दुसरी एक गोष्ट सांगायची राहिलीच. पश्चात्तप्त मनोरमा सध्यां कृतकर्माच्या पापक्षालनार्थ एका गुरूच्या चरणीं लीन झाली आहे. विद्याधरपंत, तुमचे काका गणूभाऊ यांचें पहिलें कुटुंब असेंच परमार्थरत झालें असल्याचें तुम्हांस माहीत आहेच. सद्बुद्धीची गांजणूक टाळण्यासाठीं गुरुचरण धरावे हें ठीकच आहे, पण मनोरमेसारख्या सुधारक स्त्रीनें एका टाळकुट्याच्या नादीं लागावें हें नवल नव्हे का ? पण सध्यांचा काळ अशाच चमत्काराचा आहे. अंधश्रद्धा, अश्रद्धा, धर्माचा अनादर, अधर्माबद्दल साशंकवृत्ति इत्यादि परस्पर विरोधाचें मिश्रण सांप्रत एकत्र पहावयास सांपडतें."

मनोरमा सुधारक स्त्री व एखाद्या संताच्या पायीं लागते हें सकृद्दर्शनीं जवळ जवळ अशक्यच. पण मनामध्यें संकल्पविकल्पाचीं स्थित्यंतरें केव्हां व कशीं होतील याचा कांहीं नियम नाहीं. तारुण्याच्या भरांत ज्या बड्या लोकांनीं आपली वाणी व लेखणी स्वधर्माची नाचक्की करण्यास वाहिली

त्यांनाच "काळ आला जवळी ग्रासावया" अशा स्थितींत पूर्वीं निंदिलेल्या धर्माची कास धरून भवसिंधूची पैलथडी गांठावीशी वाटूं लागते. भाकड-कथांचें भारूड ह्मणून एकदां उकिरड्यावर टाकण्यालायक ठरविलेल्या साधु-संतांच्या ग्रंथांचीं वार्धक्यामध्यें पारायणें करतांना पुष्कळ तारुण्यांतले जहां-बाज लोक आढळतात. "रामकृष्णहरि" हा सोपा मंत्र त्यांच्या मुखीं मग वसूं लागतो. संत पुरुषांच्या वास्तव्यानें पुण्यमय झालेलीं तीर्थें, क्षेत्रें, त्यांस मनाची तळमळ शमविण्यास योग्य स्थळें वाटूं लागतात. सारांश, हें जसें मतान्तर पुरुषांत होतें तसेंच तें परिस्थित्यनुरूप स्त्रियांतहि घडून आल्यास त्याबद्दल अचंबा वाटावयास नको. पुनः लग्न झाल्यापासून दिवसेंदिवस तिच्या मनाची मोठी विचित्र स्थिति झाली होती. रावबहा-दुराच्या सहवासाचा तिला प्रत्यहीं जास्त जास्त तिटकारा येऊं लागला. त्याच्याशीं घडलेला संबंध लोकांत थोडेसें नांव होण्यास जरी कारण झालेला असला तरी पण प्राचीन साध्वींच्या चरित्राशीं त्याची तुलना करूं गेल्यास तो अगदींच निंद्य ठरेल असें तिचें मन तिला खाऊं लागलें. लग्नापूर्वीं तिच्या मनांत अशा विचारांचें तुंबळ रण माजत असे; पण आतां आपण भ्रष्ट अशी तिच्या हृदयांत ठाम समजूत रुजल्यामुळें आपलें कृत्य अश्लाघ्य असाच तिच्या मनाचा ग्रह बनत चालला. तिच्या विचाराला दुजोरा मिळण्यास दत्तोपंताच्या भाषणाची कांहींशी मदत होत असे. तो तिच्या कृत्याचा उघड निषेध करून "तूं आपल्या पतीचा गळा कापलास" असें साफ सांगत असे. "ताईसाहेब, पतिपत्नींच्या प्रेम-संवादाची मला कल्पना नाहीं, तरी पण तो तसा होउ असेल यांत संशय नाहीं. अशा प्रसंगीं तुह्मी आपल्या वतीनें पुण्यवान् सतींचे दाखले पुढें करून करून नवऱ्याला आपल्या निष्ठेची खात्री पटावी याकरितां खट-पट केली असेल व असें करणें साहजिक आहे. तुमच्या डोळ्यांपुढें शेक्सपी-यरच्या प्रणयी दंपत्यांचीं चरित्रें उभीं राहून तुमच्या अंतःकरणांत कर्तव्य-वृत्ति उचंबळून जात असतील. केवळ पतिप्रीतीकरितां स्वजन दूर लोटून

प्राण देणाऱ्या ज्युलिएटसारखें आपण व्हावें असेंहि कदाचित् तुह्मांला वाटून तुह्मी आपल्या प्रेमांध पतीला तशीं गोड गोड आश्वासनें दिलीं असतील. पण आज त्या पत्नीनें आपले बोल खरे केले आहेत का? प्राचीन स्त्रिया मृतपतीसह आपलाहि देह चिताग्नीवर होमून टाकण्यास सिद्ध असत. आज हें साधन उपलब्ध नाहीं. तें जावो, पण कोणत्या अन्य उपायानें या पत्नीनें आपली निष्ठा जागृत ठेविली आहे? लौकिकतृष्णेच्या पायीं सगळें पातिव्रत्य विध्वंसून ती आज कुळाला काळोखी फासून बसली आहे. काय मनोरमाबाई, मी ह्मणतों तें खरें कीं नाहीं? आज जर तो मृत पति भूमीवर अवतरून पत्नीची स्थिति पाहूं लागला, तर परस्पर्शानें भ्रष्ट झालेली ही अमंगळ काया दृष्टीस पडून त्यास काय वाटेल? बाईसाहेब, एकट्या बायकांच्या पातिव्रत्यासाठीं हिंदुस्थानांत वीरपुरुषांनीं आपल्या रक्ताच्या नद्या वाहविल्याचें इतिहास सांगत आहे. पण हें पवित्रतम पातिव्रत्याचें सत्त्व आपल्या हातानें झुगारून परपुरुषाशीं सलगी करणाऱ्या तुमच्यासारख्या स्त्रियांना पाहून त्या महावीरांना आपण आपलें रक्त कारणीं लावलें असेंच वाटेल नाहीं? बायकोची छिनाली सहन करणारा खिस्ती धर्माचा दमदारपणा हिंदूंच्या रक्तांत अजून मुळींच उतरला नाहीं समजलांत. टेनिसनच्या ईनॉक आर्डेन या काव्यांत याचा मासला पहावयास सांपडेल. आपली बायको आपल्या पश्चात् प्रतिस्पर्ध्याशीं रत झालेली पाहून तिच्या पापी सुखांत आपल्या दर्शनानें व्यत्यय न यावा ह्मणून स्वतः प्राण देणारे ईनॉकसारखे बहाद्दर अद्यापि आमच्यांत निपजूं लागले नाहींत. आमच्यांत बायकांच्या शुद्धतेबद्दल फार उच्च कल्पना आहेत. तुमचाच प्रथम पति येथें आला व आपल्या मालमत्तेच्या गब्बरपणावर स्वतःच्या अभावीं रावबहादुराशीं लग्न करून पुन्हां संसार थाटल्याचें जर त्याच्या नजरेस आलें तर संतापून तो त्या मानभावी बायकोचा अस्सा—अस्सा—गळा दाबून...ठार—"

दत्तोपंताचे हात खरोखरीच समोर बसलेल्या मनोरमेच्या मानेवर सर-

सावले. ती दचकून एकदम उभी राहिली. दत्तोपंताचे ओठ रागानें थरथर कांपत होते, चेहरा अत्यंत उग्र होता व क्षणभर त्यास स्वस्थितीचें भानहि उरलें नाहीं. परंतु थोड्या वेळांत तो ताळ्यावर आला व त्यानें आपलें नेहमींचें सौम्य स्वरूप धारण करून मनोरमाबाईची झाल्याप्रकाराबद्दल क्षमा मागितली व स्वस्थ बसला.

दत्तोपंतानें मनोरमेच्या अंत:करणावर डागण्या दिल्याशिवाय एकहि प्रसंग वाया जाऊं दिला नाहीं. प्रत्येक वेळीं त्याचे वाक्प्रहार असेच कठोर असत. असो. मनोरमेचा पश्चात्ताप यामुळें दुणावत चालला व अखेरीस ती काडी मोडून देण्यास तयार झाली. प्रथम कांहीं दिवस रावबहादुर मनोरमेच्या तंट्याकडे दुर्लक्ष करीत पण अलीकडे त्यांचा नूर बदलला. त्यांच्यांत प्रेमळपणा एकाएकीं इतका आला कीं, मनोरमेच्या ह्मणण्याला स्वमताचा बाध न येऊं देण्याविषयीं ते फारच खबरदारी घेऊं लागले होते. अर्थात् मनोरमेला जरी या फरकाचा फारसा उलगडा झाला नाहीं तरी दत्तोपंताच्या मनानें अतिस्नेहाच्या बूडाशीं कांहीं तरी काळें बेरें मुरतें आहे असें पक्कें घेतलें व रावबहादुरांच्या हालचालीवर ते विशेष लक्ष ठेवूं लागले.

* * *

आपल्या पत्नीच्या ह्मणण्याला मान देऊन तीशीं आपला कारणापुरताच संबंध रावबहादुर ठेवूं लागले व मनोरमेला आपल्या विचारांचें चर्वितचर्वण करण्यास अवकाश सांपडला. रावसाहेब निवळल्यामुळें तिनेंहि त्यास सोडचिठ्ठी देऊन टाकून मोकळें होण्याचा बेत तूर्त रहित केला व स्वकर्माच्या पायीं हृदयांत बसणारी अशान्ति घालविण्याला ती उपाय शोधूं लागली. "सद्गुरूवांचोनी सांपडेना सोय धरावे ते पाय आधीं त्याचे." या वचनानुसार तिनें सद्गुरूचे पाय धरले. त्यांच्या सेवेनें अंतर्यामींची चिंता दुरावते कीं नाहीं तें ती पाहूं लागली.

या सद्गुरूचा सध्यां पुण्यास फार बोलबाला होता. संसाराच्या विवंचनेला कंटाळून वैतागल्यामुळें स्वारीनें हिमालयांत कांहीं तपें घालविल्याची गांवांत

दाट वदंता होती. महाराज रात्रीं निजत नाहींत, भोजन केल्यावांचून रहातात असें लोकांत त्यांचें कौतुक माजलें होतें. भव्य मुद्रा, पिळदार अंगलोट ही त्यांच्या योग्यतेची शिफारसच होय. अंगावर आपादमस्तक रेशमी कफनी असून वाढविलेला व मसाल्याच्या तेलांनीं कमावलेला तुळतुळीत केशकलाप त्यांच्या खांद्यावर लोळत असायचा. महाराजांच्या नजरेंतल्या चलाखीला शिष्यसमुदाय तेजस्विता ह्मणून वाखाणीत असत. प्रथमतः महाराज दक्षिणेंत प्रकट झाले तेव्हां त्यांनीं गोसाव्याची दीक्षा घेतलेली नव्हती. कथा कीर्तनें करून यांनीं नांव मिळविलें पण कीर्तनाचा नुसता हरदासी पेशा यांचा मूळचा नसून कालपरत्वें तो स्वीकारला असल्याचें जेव्हां लोकांत फुटलें तेव्हां त्यांचा खरा गुण जो योगाभ्यास तो लोकांच्या नजरेस पडला. "दुनिया झुकती है झुकानेवाला चाहिये" अशी एक हिंदी ह्मण आहे; त्याप्रमाणें हरउपायानें दुनियेला आपल्या तालावर नाचावयास लावणाराला भाळण्याची जगाची वहिवाट आहे. डोंबारी लोक रस्त्यावर कसरतीचे खेळ करून दाखवितांना पुष्कळांनीं पाहिलेलें असतें पण त्यांच्या अंगमेहनतीवर खुष होऊनहि एक पैसा त्यांच्या पोटाला द्यावासा वाटत नाहीं. तेंच एखाद्या भव्य तंबूत रात्रींच्या वेळीं, विजेच्या उजेडांत, खेळ करून दाखविले कीं, त्याला ठरलेल्या दराचे पैसे देऊन साह्य करण्यास लोक मागें पुढें पहात नाहींत. गारुडी रस्त्याच्या बाजूला हातचलाखीनें खेळ करून दाखवितात परंतु त्यांच्या याचनेला आश्रय देण्याची बुद्धि आपणास होत नाहीं. उलट एखाद्या लफंग्यानें आपल्या मागें प्रोफेसर ही पदवी घेऊन रंगभूमीवर त्याच खेळाचे प्रयोग करून दाखविले कीं, टाळ्यांचा कडकडाट करून त्याची वाहवा करावीशी आपणास वाटते. पुष्कळ भिक्षेकरी अत्यंत विकट अशीं योगासनें दारोदार करून दाखवूनहि अखेरीस जेमतेम पोट भरतात पण या गुरुमहाराजांनीं तशींच आसनें एका बड्या गावगुंडांना हातांशीं धरून देवळाच्या मंडपांत करून दाखवितांच महाराजांच्या योगासिद्धीचा सर्वांस अचंबा वाटला, व लागलीच त्यांची सर्वत्र प्रसिद्धि झाली.

आपल्या राष्ट्रीय हीनावस्थेंत योगाभ्यासावांचून सद्गति नाहीं, हा महासिद्धान्त स्वामींच्या मुखांतून अनेक वेळां श्रवण केल्यावर योगाच्या नादीं पुष्कळ जण लागले. विसरलेल्या संध्येच्या पुनरुज्जीवनासाठीं ब्रह्मकर्मांच्या पोथ्यांची चालना सुरू झाली, गायत्री मंत्राचा यथाशक्ति जप सुरू झाला व महाराजांच्या प्रसादानें लोकांस प्राणायामाची दीक्षा देण्यांत येऊन लोकांना आपणास मोक्षपंथाला लागलोंसें वाटून अंतर्यामीं समाधान उत्पन्न झालें. वर्तमानपत्रांतून सर्वरोगविध्वंसक औषधांच्या जाहीराती असतात तशींच योगाभ्यासानें निरनिराळ्या प्रकारचे असाध्य रोगी बरे झाल्याचीं पत्रें शिष्यसमुदायाच्या घरोघर कागदपत्रांच्या कोनाड्यांत अथवा कपाटांफडताळांतून जाऊन बसलीं. योगदीक्षा घेण्याकरितां महाराजांनीं सव्वा रुपया, श्रीफळ व एक महावस्त्र एवढीच फक्त फी ठेवली होती. व हिमालयांतल्या दोन अडीचहजार वर्षें जिवंत असलेल्या यांच्या गुरुवर्यांनीं "बेटा लोकोद्धार करण्यासाठीं तूं आसेतुहिमाचल सात वर्षें संचार करून परत स्वस्थानीं ये" अशी आज्ञा केली असतां त्यांना ही सक्तीच्या खुषीची दक्षिणा कशाला हवी ह्मणून कोणी लोक कुरकुर करीत, पण महाराजांवर त्यांची श्रद्धा जबर असल्यामुळें ते त्यासंबंधी उघड चर्चा करण्यास धजत नसत. ही गुरुजींची पूर्वकथा झाली.

पहिलीं कांहीं वर्षें त्यांनीं महाराष्ट्रांत संचार केला. एका स्थळीं फार दिवस हे रहात नसत, परंतु जागोजाग धर्मोज्जीवनाकरितां मठ स्थापल्यामुळें यांची केव्हांहि उतरण्याची सोय झाली होती. मठामध्यें प्रातःकाळीं वाटेल त्या ऋतूंत भिन्नभिन्न आसनें लावून प्राणायामाच्या गुरुदर्शित शास्त्राप्रमाणें श्वासोच्छ्वासाचा कमीअधिक प्रमाणांत उत्सर्ग अथवा अवरोध करण्यांत मंडळी दंग झालेली पाहून एखाद्या ऋष्याश्रमाची आठवण होऊन कदाचित् आतां आमचा धर्म खास बुडत नाहीं अशी आशा वाटण्यासारखा तो देखावा असे. जगदुद्धारक व्यक्तींची निर्भर्त्सना, विटंबना ही व्हायची असा अगदीं नियम आहे, त्याप्रमाणें दोन तीन वर्षांनंतर महाराजांसंबंधी

लोक जरा निंदेचे शब्द काढूं लागले. प्रत्येक तक्रार करणाराच्या निरानिराळ्या सबबी असत. कोणी ह्मणे– "या बोवाला आतां बायका सुद्धां शिष्यपरंपरेंत घ्याव्याशा वाटूं लागल्या हें ठीक चिन्ह नाहीं." कोणी त्यांच्या केसांना नावें ठेवीत, कोणी त्यांच्या वाढत्या थाटामाटाकडे पाहून बोटें मोडीत. कोणी तर त्यांच्या नैतिक वर्तनाबद्दल संशय दाखवूं लागले होते. हा एक पक्षाचा मासला झाला. आतां दुसऱ्या ह्मणजे त्यांच्या श्रद्धाळु शिष्यांचा नमुना पहा. एकजण महाराजांच्या ब्रह्मचर्याच्या शुद्धतेची हमी घेत. "महाराज ह्मणजे प्रति रामदास" असेहि शब्द एखाद्याच्या तोंडून निघत. समर्थांच्या वेणूबाई–अक्काबाईंचीं उदाहरणें पुढें ढकलून "बायका जवळ असल्या ह्मणून काय बिघडतें ?" असा कोणी शंकेखोर प्रतिपक्ष्याला प्रश्न विचारीत. एखादा त्यांच्या ऐकीव चमत्काराचें वर्णन करून त्यांच्या अचाट सामर्थ्याची खात्री पटवून देण्याची खटपट करी. महाराजांच्या चलतीकडे लक्ष जाऊन धर्मग्लानीच्या आणि अधर्माभ्युत्थानाच्या काळांत आपण युगायुगाचे ठायीं अवतार घेतों" या परमेश्वरी वचनाची आठवण होऊन महाराज ह्मणजे कोणी तरी ईश्वरांश विभूति आहे असें एखाद्या भोळसट भाविकास वाटे. सारांश, महाराजांच्या संबंधीं लोकांत तर्ककुतर्कांची मांदी उठली होती एवढें खरें.

महाराजांचा देशाभिमान जाज्वल्य होता. स्वधर्मनिष्ठाहि कांहीं नांवें ठेवण्याजोगी नव्हती. गुरुजींचें दशग्रंथापर्यंत वैदिक अध्ययन झाल्याचें त्यांचे शिष्य वारंवार ठांसून सांगत. महाराजांजवळ राहिल्यानें पुख्ख्याची चांगली सोय लागते ह्मणूनहि कदाचित् ते गुरुस्तुति करीत नसतील कशावरून ? बोवासंबंधी विशेष सविस्तर हकीकत विद्याधराला लिहिलेल्या दत्तोपंताच्या पत्रांत खालीलप्रमाणें होती––

"मनोरमा ज्या बोवाच्या नादीं लागून मोक्षद्वाराच्या किल्ल्यांचा जुडगा मिळवूं पहात आहे, त्याचें सध्यां बरेंच स्तोम माजलें आहे. मी डोळ्यांनीं ज्या गोष्टी पाहिल्या त्या फारच अजब असून बोवासंबंधीं मनांत अनादर

उत्पन्न करण्यासारख्या आहेत. गाईह्मशींच्या थव्यांत जसा पोळ अथवा टोणगा असावा तसा तो बायकांच्या झुंडींत अंगावर भरजरीची किनखाफी झूल घालून बसतो त्याचें मला कांहींच वाटत नाहीं ! पण मौज आहे तीं निराळीच. बोवा धर्मश्रद्धा जागृत करून राष्ट्रोद्धार करणार असल्याची वदंता आहे. त्यांच्या वर्तनावरून तो खरी असेल असें मला वाटत नाहीं. देवदेवतार्चन हें धर्माचें उपांग आहे. सध्यांच्या नास्तिक काळांत देवाचें सत्त्व भक्तांनीं कायम ठेवलें पाहिजे. दगडाच्या मूर्ति ह्मणून लोकांत अर्चनाविषयीं दिसणारी अनास्था घालविण्याचें एक संतांचें महत्कार्य आहे पण हे बोवाजी स्वतःच्या अंगठ्यांत शाळिग्राम धरून स्वतःवर पंचामृताचा अभिषेक करून घेतांना मीं व माझ्याप्रमाणें पुष्कळांनीं पाहिलें आहे. दुसऱ्या एका प्रसंगीं कोणा एका भक्तानें यांचीच सत्यनारायणाचे जागीं चौरंगावर स्थापना करून पूजा केली व यांनीं देवपदावर अधिष्ठित होऊन ती करून घेतली. माझ्या मतें या दोन्ही गोष्टी हलकटपणाच्या आहेत.

"चमत्कारांच्या दंतकथा लोकमुखांत सध्यां बऱ्याच प्रचलित झाल्या आहेत. येथल्या रामेश्वराच्या देवळाच्या आवारांत उभा राहून एक सच्छिष्य मोठा चमत्कार नुकताच वर्णन करीत होता. कोणत्याशा गांवीं एका गुरुभक्ताचें घर जळालें. घरांतल्या सगळ्या सामानाची जशी राख झाली तशीच श्रीमद्भगवद्गीतेचीहि झाली; पण त्या पोथींत खुणेसाठीं ठेवलेली महाराजांची तसबीर मात्र एवढ्या अग्निप्रलयांत जशीच्या तशी शाबूत ! नाशिक पंचवटीच्या बाजूला एकदां महाराज सर्व लोकांसमक्ष पहातां पहातां सुटलेल्या वावटळींत चोवीस तासपर्यंत नाहींसे झाले व नंतर पुन्हां अद्भुत रीतीनें प्रकट झाले. जन्हुराजानें जशी कानांतून गंगा सोडल्याची कथा पुराणांतरीं आहे तद्वत् हे महाराज काखेंतून उपास्यदेवतेच्या नामगर्जनेबरोबर गंगाजल काढतात ह्मणे. शिवाय कार्यक्षम अशा लोकधुरीणांना आपत्कालीं त्यांचें धैर्य खचल्यास हे आपल्या साक्षात्कारानें धीर देतात असेंहि ऐकिवांत आहे. बोवा आपल्या हिमालयनिवासाच्या ज्या गोष्टी सांगतात

त्या ऐकून भाविकांना त्यांच्या सामर्थ्याविषयीं आश्चर्य वाटल्यावांचून रहाणें अगदींच अशक्य ! त्यांचा हिमालयांतील निवास व प्रवास याबद्दल त्यांनीं वेळोवेळीं कथन केलेले वृत्तांत एकत्र करून त्यांच्या देखरेखीखालीं छापवून प्रसिद्ध करण्याची शिष्यांची खटपट चालू आहे. त्या पुस्तकांत पुष्कळ अद्भुत व असंभव्य हकीकती आहेत. स्वारी कैलासपर्वतावर मानस सरोवराच्या कांठीं वास्तव्य करीत असतां व्यासांनीं प्रकट होऊन यांस दर्शन दिलें व यांच्याशीं प्रेमानें कांहीं काळ ते कानगोष्टी करीत बसले. त्या प्रसंगीं हिंदुस्थानच्या भावी इतिहासांतील अनेक घटना भारतकर्त्यांनें निवेदिल्या व त्यां पैकीं कांहींचा अनुभव सध्यां येत आहे असाहि मजकूर वाचकांस पहावयास सांपडेल. मला हें पुस्तक अगोदरच वाचावयास मिळालें असल्यानें मला तुह्मांस वरील माहिती कळवितां आली. राष्ट्रकार्याचें जूं मानेवर घेतल्याचें बोवा भासवीत आहेत, पण अलीकडे एक अशी कंडी पिकली आहे कीं बोवा सरकाराच्या गुप्त हेरांच्या खात्यांत नोकर आहेत.

"बोवांच्या तोंडांत नेहमीं ग्राम्य शब्द येतात. हा कदाचित् सलगीचा प्रकार मानला जात असेल. बोवा व्याख्यान वगैरे देतांना परधर्मांची टवाळी व स्वधर्मांची स्तुति पुष्कळ करतात. पण धार्मिक आचरण पाहूं गेल्यास खुद्द बोवांतच शून्यांश आढळेल. बोवांना कोणत्याहि विषयावर बोलावयाचें असलें तरी त्यांत स्त्रीशिक्षण, सुधारणा, इत्यादि अनेक चळवळींवर पुष्कळ कोटिक्रम लढवून हंशा पिकवून दिल्याखेरीज त्यांच्यानें रहावत नाहीं. सुसंगतीनें एका सुद्धां विषयावर त्यांस निरूपण करतां येत नाहीं. बोवाचें सोंग व त्याची होत असलेली वतावणी एवढ्यावरून परीक्षा करावयाची असल्यास त्यांत तिळमात्र न्यून सांपडणार नाहीं; पण अंतरंग बहिर्वेषाहून फार निराळें आहे. याचा प्रत्यय लोकांस लवकरच येईल. पण सध्यां तें कांहींहि असो, बोवाजीची चैन चालली आहे ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे व सध्यांच्याच घटकेपुरतें बोलायचें झाल्यास खूप मौज आहे असेंच ह्मणावें लागेल.

"महाराजांच्या भजनीं तुमचे चुलते गणूभाऊ, तुमच्या आत्याबाई व गणूभाऊचे दुय्यम कारभारी बाळंभट जोशी हे सर्व लागले आहेत. आत्याबाई त्यांच्या सेवेंत अखंड निमग्न असतात. सांजसकाळ मोठा मेळा भरतो व देवाच्या ऐवजीं बोवांच्याच आरतीची जंगी ओरडाओरड चालते. गुरूकडे शास्त्राज्ञेनुसार रिक्त हस्तानें न जाणाऱ्या शिष्यांनीं अथवा इतर गृहस्थांनीं आणलेल्या मेवामिठाईचा बोवासमोर ढीग पडतो व सकाळ संध्याकाळ या प्रसाद वाटण्याच्या वेळीं फार गर्दी जमते. मनोरमाहि यथाशक्ति भजनांत सादर असते व महाराज तिच्याकडे नेहमीं कृपाकटाक्ष फेंकून पहात असल्याचें माझ्या पुष्कळदां नजरेस आलें आहे. बोवांची ही अशीच मेहेरनजर राहिल्यास मनोरमेला गुरुप्रसाद लाधून परमार्थसाधनहि लवकरच सफळ होईल असा रंग दिसतो." वगैरे, वगैरे.

बोवांविषयीं समग्र व सविस्तर हकीकत पत्रद्वारा विद्याधराकडे जात असल्यामुळें आम्हीं त्या पत्रांतील शब्दांनींच ती येथें वाचकांना सादर केली आहे. दत्तोपंताला इतकी माहिती कशी लागली हें सध्यांच कळणें जरासें कठिण आहे. परंतु सांप्रत महात्म्यांचा जो धिंगाणा महाराष्ट्रांत चालू आहे त्याचें स्पष्ट आविष्करण व्हावें एवढ्याच हेतूनें ते वरील बोवांच्या गोष्टी वारंवार कळवीत असत. त्यांच्या आणखी पत्रांत खालील मनोरंजक मजकूर होता—

"योगमार्गाचा अवलंब करीत असतां सिद्धि प्राप्त होते व कच्चा साधक त्यांच्या पाशांत सांपडतो अशी पूर्वापर समजूत आहे. त्या सिद्धि व त्यांच्यापासून प्राप्त होणाऱ्या अतर्क्य शक्ति याची मला कल्पना नाहीं, परंतु संतांचा धंदा करणारे जे लोक सध्यां जगांत नांदत आहेत त्यांच्या वेशाला व उपदेशाला भुलून भाविक नादीं लागतात व त्या छद्मी गुरुच्या पाठीस आपण होऊन सुखें लागतात इकडे लक्ष दिलें ह्मणजे सिद्धि कशा असतील यांची अंधुक ओळख होण्यास हरकत नाहीं. आपण जें करूं तें पचनीं पडतें असा एकदां समज झाला कीं, मनुष्याच्या दुर्वृत्ति कोणत्या थरावर जातील याचा मासला मला व जनतेला सदरहू बोवांच्या कृतीनें पहावयास सांपडला.

ती गोष्ट जगांतील दैनंदिन व्यापार प्रसिद्ध करणाऱ्या संदेशात्मक वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाली आहे. बोवांनीं तुमच्या आत्याबाईच्या मार्फत एका गुरुभक्ताच्या भार्येवर हात टाकण्याचा दिवसा दहा अकरा वाजतां प्रयत्न केला. बाईच्या ओरडण्यानें बोवांचा पापी हेतु फसला व लोकांनीं त्यांची भररस्त्यांत ओढून फटफजीती केली. परंतु एवढ्यानें लोकांचे डोळे उघडत नाहींत. बोवांनीं आपली फजीती लोकांच्या आठवणींतून जाण्याकरितां उपायचिंतन चालविलें आहे."

त्या चिंतनाला काय फळ आलें त्याची कथा पुढें दोनच आठवड्यानंतर लिहिलेल्या पत्रांत होती ती अशी—

"येथील वर्तमानपत्रांतून हल्लीं एका विशेष विषयावर जो पत्रव्यवहार चालू आहे तो तुमच्या पहाण्यांत आलाच असेल. या सर्वांच्या मूळाशीं मीं मागें पत्रांत उल्लेखिलेल्या व थोडीशी हकीकत दिलेल्या बोवांची जाहीर समाधि आहे हें तुमच्या ध्यानांत यायला प्रयास पडले नसतील. सदरहू बोवांनीं एका वृत्तपत्रांत जाहिरात देऊन आपण अमुक दिवशीं सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत समाधि लावणार असें लोकांना आगाऊ कळविलें. समाधीच्या ठरीव दिवसापूर्वीं मी एकदां बोवांच्या आश्रमांत गेलों असतां मला बोवांची समाधि ह्मणजे हिंदुस्थानच्या भूत, भविष्य अथवा वर्तमान काळांतील अत्यंत अद्भुत आणि अपूर्व प्रसंग असल्यामुळें त्या वेळीं दुंदुभि वाजविण्यांत येणार व महाराजांचा समाधिस्थ स्थितींत फोटो काढणार अशी माहिती गुरुशिष्यांच्या संवादांत कळली. परंतु यांपैकीं कांहींच घडलें नाहीं. महाराजांच्या समाधीनंतर लोकांत अशी वदंता आहे कीं, योगमार्गाचा विजय प्रस्थापित केल्यानें महाराजांवर आकाशांतून पुष्पवृष्टि झाली व योगसंप्रदायाच्या स्वर्गवासी उत्पादकांनीं तेथें महोत्सव केला; दुर्दैवानें या जनवार्तेला अगदीं भोळ्या शिष्यांखेरीज इतरांच्या हृदयांत विश्वासाचा थारा मिळत नाहीं ही गोष्ट निराळी. विद्याधरपंत, महाराजांच्या समाधीचें वर्णन समजून घेण्यासारखें असल्यामुळें मी तें येथें पत्राच्या मर्यादेकडे दुर्लक्ष करून देतों.

समाधीच्या दिवशीं महाराजांच्या सुदैवानें पावसाची झड लागली होती. मेघाच्छादनानें सूर्यप्रकाश अर्थातच कमी होता. शिवाय समाधीच्या जागेची निवडहि फार चतुराईनें केली होती. समाधिस्थलीं स्वच्छ दिवशीं देखील अंधार असायचा मग पावसांत अंधाराचें प्रमाण किती असेल याची कल्पना तुह्मीच करा. या दाट काळोखाला मदत करण्यासाठींच कीं काय एक मंद दिवा समाधिस्थानीं लावण्यांत आला होता. समाधि लावून महाराज जेथें बसले होते त्या दालनाच्या एका टोकाला दरवाजा होता व दुसऱ्या बाजूला महाराजांचें आसन होतें, पण दरवाज्यांतून शिरतांच दोन तीन टगे शिष्य ध्यानस्थितींत प्रेक्षकांना प्रथमदर्शनीं आढळत त्यामुळें बोवांचा पत्ता लवकर लागत नसे व मिनिट दोन मिनिटाहून कोणालाहि जास्त वेळ राहूं न देण्याची शिष्यगण काळजीनें खबरदारी घेत असल्यामुळें खऱ्या महाराजांची समाधि नीटशी पहातां येत नसे. याखेरीज आणखीहि कांहीं बंदोबस्त होता. समाधिस्थित महाराजांच्या जागेभोंवतीं चार फुटांच्या अंतरानें कळक बांधलें होतें. दरवाज्याजवळ असलेल्या दिव्याचा प्रकाश या भागांत बिलकूल नव्हता ह्मटलें तरी चालेल. समाधि लागली ह्मणजे माणसाच्या प्राणक्रिया लोपतात असें योगग्रंथांतून आढळतें व त्याचें प्रत्यंतर पहाण्यासाठीं एकजण सुप्रसिद्ध सच्छील डाक्टर गेले होते, परंतु त्यांचा अनादर करून बोवांच्या शिष्यांनीं त्यांची मात्रा चालूं दिली नाहीं. समाधीची अवस्था अत्यंत शुद्ध ठेवण्याच्या जबाबदारीची सबब पुढें करून शिष्यांनीं बोवांची अब्रू राखली कारण विशेष चौकस व तीक्ष्ण नजरेच्या प्रेक्षकांनीं मागून बोवांच्या समाधीच्या खोटेपणाबद्दल जो बोभाटा केला तो खरा ठरण्याचा फार संभव होता. समाधीचें दर्शन घेण्याकरितां शेंकडों लोक रस्त्याचा चिखल तुडवीत या स्थानाकडे आले, व बोवांच्या प्रसिद्धींत भर पडली. संध्याकाळीं बोवांची समाधि संपून ते आपल्या उपरिनिर्दिष्ट मखराबाहेर आले तेव्हां त्यांच्या भोंवतीं आंब्यांचा, नारळाचा अथवा इतर जिनसांचा फार मोठा ढीग झाला होता. समाधीनंतर बोवांना अभ्यंगस्नान अंगमर्दन करून

शिष्यिणींनीं घातलें व आंबरसाच्या भोजनानें या समारंभाची समाप्ति झाली. बोवांच्या समाधीविरुद्ध पुष्कळांना शंका आहेत व त्या अतिशयोक्तीनें बाहेर येत असल्या तरी त्यांत सत्यांश आहे याविषयीं वाद पडण्याचें कारण नाहीं. माझ्या मतें बोवांनीं जर कांहीं केलें असेल तर ते दृढ मनोनिग्रहानें बारा तास बसले एवढेंच आहे. समाधींत बोवा डोलत होते, मधून बारीक खाकरत असत, किलकिल्या डोळ्यांनीं पहात असत वगैरे जी हकीकत बोवांची 'झुलती समाधि' या लेखानें एका वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली आहे ती खरी आहे. बोवांच्या चौरंगाभोंवतीं खुंटे ठोकले होते व त्यांना कफनीच्या आंत जखडून बांधल्यामुळेंच ते दहा बारा तास बसले असा जो त्यांत मजकूर आहे तो खोटा असेल; परंतु तो सबंध लेखच असत्य अशी जी दुसऱ्या बाजूनें तरफदारी करण्यांत येत आहे ती निवळ दुराग्रहाची असल्याबद्दल माझी खात्री आहे. या समाधीमुळें सामान्य जनसमूहावर बोवांच्या दृष्टीनें चांगलाच परिणाम झाला इतकें मात्र खरें."

बोवांची त्यांच्याकडे येणारांजाणारांवर अशी विलक्षण छाप बसे कीं ते कोणत्याहि कामास सदैव तत्पर असत. गांठीच्या द्रव्याचा सद्व्यय व्हावा ह्मणून पुष्कळ धनिकांनीं बोवांची बडदास्त उत्तम प्रकारें चालविली होती. परंतु अलीकडे बोवांना कोणत्याशा एका जिल्ह्यांतून हद्दपार केल्याचा बोभाटा चोहोंकडे होऊन सरकारची नामर्जी झालेल्या या बोवास लोक भीतीनें सोडून जाऊं लागले होते. बोवांच्या तोंडून त्याबद्दल निर्धास्त उद्गार निघत असत. असे कठिण प्रसंग ह्मणजे मोठेपणाची कसोटी आहे असें ते वारंवार सांगून स्वतःचा गौरव करून घेत. प्रथम जेव्हां लोकांत उपदेशाकरितां हिंडूं लागले तेव्हां त्यांना कांचनाची मोठी चीड असे, द्रव्याचें केवळ दर्शनहि महात्म्यांना दुःसह होत असतें असा बाणा मिरवून ते स्वतःच्या द्रव्यतिरस्कारानें आपणहि महात्मा आहोंतसें भासवीत; पण आतां ते द्रव्याचा स्वीकार करूं लागले होते. दंडांत एक भलें लठ्ठ सोन्याचें वलय त्यांनीं अडकविलें होतें, व शिवाय हातांत सलकडीं होतींच. संसारांतून उठलेले

महाराज पुनः प्राकृत धर्मांचा अंगीकार कां करितात असा कोणीं प्रश्न विचारल्यास महाराजांचें माथें भडकून ते यद्वातद्वा बडबडूं लागत. महाराजांचा स्वभाव जरासा तिरसट व तापट बनला होता. असो; महाराजांची ही अलीकडची कहाणी आहे.

गुरूपदेश घेतल्यापासून गणूभाऊंच्या अर्धबोबड्या धार्मिक श्रद्धेला कसें स्वरूप आलें याचें दिग्दर्शन मागें एकदां केलेलेंच आहे. गुरूशिवाय सोय सांपडेना ह्मणून महाराजापासून मंत्रग्रहण करून मथूताईनीं तोच पंथ स्वीकारला. बाळंभटाचा बोवापाशीं असा जम बसला कीं, त्यावांचून सबंध मठांत पान हलण्याची मारामार! मनोरमेची स्थिति मात्र या सर्वांहून अगदीं निराळी होती. वरच्या मंडळींच्या हृदयांत परमार्थप्राप्तीची सद्भावना किती रुजली असेल हें सांगणें अवघड आहे, पण पातकाची जाणीव मनोरमेच्या अंतःकरणांत अहर्निश सलत असल्यामुळें तिला जीविताचा कंटाळा येत चालला होता. महाराजांनीं गाणपत्यांच्या श्रीदास अनुसरून विघ्नहर्त्या देवतेची आराधना करण्यास सांगितली होती. देवांचा अनुग्रह आपल्यावर व्हावा या उत्कट इच्छेनें तिनें मंगलमूर्तींची आपल्या वाड्यांत प्रतिष्ठापना केली व आजपर्यंत गुंडाळून ठेवून दुर्लक्ष केलेले इतर देवहि त्यांच्या शेजारीं जमले. भक्तियुक्त पूजेचा थाट मनोरमेच्या पूर्ण सुधारलेल्या घरांत सुरू झाला. तिनें गुरुमंत्र घेतला होता पण गुरुसन्निध अहोरात्र बसावें असें मात्र तिच्या मनांत कधीं आलें नाहीं. इतर पुष्कळ स्त्रिया घरचा कामधंदा टाकून गुरुमहाराजांच्या द्वारीं अनुग्रहासाठीं रात्रंदिन राबत असल्याचें तिनें पाहिलें होतें पण आपण तसें करावें असें तिला वाटेना. परंतु असा गुरुसहवासांतला चुकारपणा गुरूंच्या नजरेंतून सुटला नाहीं. त्यांनीं तिला वारंवार निमंत्रणें पाठवून आपल्याकडे बोलावून न्यावें, तिनें होईल तितकें करून टाळावें, व अखेरीस गुर्वाग्रहाला मान देऊन जावें असा प्रकार चालू होता. बोवांनींहि मनोरमेच्या घरीं चार पांच वेळ तिच्या विनंतीशिवाय पायधूळ झाडली होती.

एकंदरींत मनोरमेचें मन गुरुसान्निध्याला विन्मुख खरें. तिनें घरांत आपले नित्याचे व्यवसाय सोडून पूजा अर्चा करण्यांत घालवेल तितका काळ घालविण्याचा नियम केला होता. तिच्याकडे पूर्वीप्रमाणें प्रोफेसर घमेंडे, वगैरे मंडळी येत असत पण आतां तिला त्यांचें आपल्या घरीं येणें आवडत नसे. तिच्या स्वभावांत अलीकडे फरक पडला हें प्रोफेसरमजकुरांना न रुचून त्यांनीं त्या बोवाची पुष्कळ निंदा केली. "अशा भोंदू गुरूंच्या नादानें मोक्ष थोडाच साधणार आहे ! पोटभरू लोकांनीं सुखानें पोट भरण्याची ही एक साधुत्वाची नवी शक्कल काढली आहे. अहो, या विसाव्या शतकांत साधुपणा मिरवणें ह्मणजे निवळ ढोंग. तो भोळसटपणाचा काळ आतां नाहीं. वहिनीसाहेब, तुह्मी आतां आपला वेडा नाद द्या सोडून. समाजसुधारेणेचें ध्येय पुढें ठेवून त्यासाठीं असेल तें कर्तव्य निष्कामबुद्धीनें करावें हेंच उचित. रावसाहेब, तुह्मी तरी आपल्या पत्नीला कांहीं सांगून पहा."

रा. ब. नीं बायकोच्या उठाठेवींत न पडण्याची शपथच वाहिली होती. अर्थात् प्रोफेसरांची विनंति त्यांनीं अमान्य केल्यास तें त्यांच्या नव्या बाण्याला सोडून नव्हतें. रा. ब. नीं प्रोफेसरांची समजूत घालावी— "प्रोफेसरसाहेब, आपल्याच्यानें स्वार्थहि साधत नाहीं, मग परमार्थ कोठून साधणार ? आपला मार्ग आपण चालूं द्यावा; दुसरे कोणी कांहीं चांगलें काम करीत असतील त्यास आडकाठी तरी आपण करूं नये, असें माझें आपलें शुद्ध मत आहे."

बायकोच्या मनांतली आपल्याविषयींची तेढ असा मवाळपणा दाखवून घालवावी हाच त्यांचा त्यांत खरा हेतु असें ह्मणणें जरा धोक्याचें आहे. तें कसें हें यथावकाश वाचकांना कळेलच.

---

## प्रकरण बाविसावें.

# करीत तरी काय असत ?

शकारांनीं पुनर्विवाह करून दाखविण्यांत जें नैतिक मनोधैर्य लोकांत दाखविलें होतें त्याच्या मूळाशीं केवळ निःस्वार्थबुद्धि होती असें नाहीं. 'बडा घर आणि पोकळ वासा' याप्रमाणें रावबहादुरांचें बाहेर नांव मोठें असून द्रव्यदृष्ट्या ते फार डबघाईस आले होते. त्यांनीं सरकारांत कांहीं तरी बडी कामगिरी बजवल्याखेरीज त्यांस किताब मिळाला असेल हें संभवतच नाहीं, पण सरकारांत रुजलेल्या त्यांच्या पायांना उलथून पाडण्यासारखीं कांहीं तरी अचाट कारणें असल्याशिवाय त्यांना निघावें लागलें असेल हाहि संभव कमीच. खानदेशांत रावबहादुर प्रसिद्धीस आले व तेथेंच त्यांना उखाड मिळाला. त्याबद्दल निःपक्षपातपणानें बोलावयाचें झालें तर विष्णुपंतदादा त्यासंबंधीं जे उद्गार काढीत असत तेच खरे धरावे लागतील. "खानदेशांत यांनीं रयतेचा अनन्वित छळ केला. शिवाय यांचें वर्तन चांगलें नाहीं. पैसा तर यानें असा लाटला कीं बेसुमार. दुसऱ्याच्या तळतळाटाचें द्रव्य याच्या मूळावर उठलें व त्याचा चोहोंकडे गवगवा होऊन लांच खाण्याबद्दल याजवर खटला झाला. त्यांतून हा निर्दोष ह्मणून सुटला खरा पण नोकरी सोडणें भागच पडलें. या नामधारी रावबहादुरांना चारी दिशा मोकळ्या झाल्या व हे भिक्षा मागत फिरूं लागले. मनोरमेच्या नवऱ्याचा व याचा स्नेह एवढ्याकरितां यांनीं तिला भुलवून आतां हा घरांत शिरला आहे. हा कांहीं मूळचा जहागिरदार नव्हे, कीं गर्भश्रीमंत नव्हे; शिवाय नानातऱ्हेच्या व्यसनांत पैशाची उधळपट्टी करून कंगाल झालेला; तेव्हां सुधारकांच्या कळपांत शिरून त्यानें असा लाभ करून घेतलान्. आपमतलबासाठीं हा सगळा बडेजाव." रा. ब. चा मनोरमेशीं लग्न लावल्यापासून पुन्हां बराच जम बसला व त्यांचे धंदे पुन्हां सुरू झाले. मनोरमेला हा परपुरुष या भावनेनें जितका त्याचा राग येई त्याहून अधिक त्यानें चालविलेल्या उधळप-

ट्रीचा येत असे. लागतील तशा रकमा बिनहिशेबी उचलून त्याचा तो वाटेल तसा उपयोग करी व अशा तऱ्हेनें खर्चाचें तोंड सुटल्यास लवकरच आपल्याला उलट्या अंबारीचें धनी होऊन बसावें लागेल यासाठीं ती तळतळे. पण शकार त्याकडे लक्ष पुरवीत नसे. रा. ब. ना कसलाहि रोजगार नव्हता. परंतु हे साऱ्या दिवस घराबाहेर करतात तरी काय ? असें कोडें मनोरमेच्या मनाला पडून ती पुष्कळ विचार करी. पण तिला कांहीं कळेना. शकाराला विचारलें तर सरळ ह्मणून उत्तर कधीं त्याजकडून यायचेंच नाहीं असा त्रास तिला होऊं लागला. शकारानें लग्न झाल्यानंतर आतांपर्यंत एक दमडीहि स्वतःच्या कमाईची ह्मणून घरांत आणलेली नव्हती. त्यांची अंतःस्थिति इतकी डबघाईस आली होती पण बाहेर त्यांच्या स्नेह्यांसोबत्यांना त्याची बातमी नव्हती. व तीच स्थिति सुधारण्यासाठीं त्यांनीं मनोरमेच्या तिजोरीला मोठमोठ्या रकमा उचलून भोंक पाडून ठेवलें होतें. मनोरमेला फार राग आला ह्मणजे ती दत्तोपंताजवळ सगळी कर्मकथा सांगत बसे. दत्तोपंतहि तिला कांहीं उपाय सुचवीत नसत पण अलीकडे शकारांनीं मवाळपणा पत्करल्यापासून घरांत "जास्त सावध असत जा" असें त्यानें तिला वारंवार बजावून ठेवण्यास सुरुवात केली होती. "दत्तोपंत तुह्मांला आमच्याबद्दल कळकळ वाटते तर आमच्याच घरीं रहानात येऊन. मी कितीदां तरी तुह्मांला आग्रह केला पण तुह्मांला आमची कींव येईल तेव्हांना हें सगळें घडणार" असें ती काकुळतीनें ह्मणे. शेवटीं एकदां दत्तोपंत तिच्या ह्मणण्यास कबूल झाला. "परंतु मी घरांत रहातों एवढें रा. ब. ला न कळवाल तर रहातों" अशी अट त्यानें घालून ठेवली होती व ती पाळण्याचा रुकार घेतल्यावर त्या वाड्यांत एक खोली घेऊन तो तेथें राहूं लागला. परंतु तो सदोदित घरांत नसे. प्रल्हादपंताच्या घरचें बिऱ्हाड त्यानें हलविलें नव्हतेंच. त्यांस दत्तोपंत मनोरमेच्या घरीं कधीं कधीं रहात असतो हें किती तरी दिवसपर्यंत कळलें नाहीं.

मनोरमेच्या घरीं राहूं लागल्यापासून शकाराच्या हालचाली दत्तोपंतास

फार चांगल्या रीतीनें दिसूं लागल्या. रावबहादुरांचा व मनोरम रोजच्या रोज वाढत्या प्रमाणांत होता ही पहिली गोष्ट त्यास कळली. एकदां शकारानें मानभावीपणानें कोठें तरी प्रवासास जाण्याचें निमित्त रून दत्तोपंताचा गौरव केल्याचें त्याच्या ध्यानांतून गेलें नव्हतें. परंतु बोल-ल्यासारखी कृति मात्र अद्यापि शकाराच्या हातून झाली नाहीं. आपल्या घरांतल्या व बाहेरच्या सर्व हालचालींवर दत्तोपंताची पाळत आहे हें खुद्द शकाराला ठाऊक नव्हतें व त्यामुळें रावबहादुरांच्या स्वभावाची खरी ओ-ळख होण्यास दत्तोपंताला चांगलेंच फावलें.

रावबहादुरांना पिशाचबाधा झाली होती हें वाचकांच्या लक्षांत असे-लच. तिचा विकार आतां त्यांच्यावर मुळींच नव्हता. तथापि आपलेंच पाऊल वाजून मागें कोणी आल्याच्या भ्रमानें त्यास एकदोनदां भेवडावलें. त्यावर बरेच दिवस कांहीं घोटाळा नव्हता पण वेड्यावांकड्या अक्षरांत खर-डलेलीं दोन तीन निनांवीं पत्रें त्याकडे आलीं. त्यांत मनोरमेचा पूर्वपति रावबहादुरांनीं आपलें पद पटकावल्यामुळें मरणोत्तर पिशाचरूपानें या भूत-लावर संचरत आहे व पुढें मागें तो आपल्या सापत्न पुरुषाचा सूड उग-वल्याशिवाय रहाणार नाहीं अशा अर्थाची इशारत मिळाली होती. राव-बहादुरांना या प्रकरणाचा बराच धाक वाटे व आपलें हृद्गत उघडें केल्यास जगांत फजीती होईल या लज्जेमुळें त्यांनीं घडत असलेल्या प्रकाराचा स्वतः-च्या मनाखेरीज दुसऱ्या कोणाजवळ उच्चार केला नाहीं. रोजचे व्यवहार करीत असतांना त्यांना मधून मधून भय वाटे पण चंद्रबळावर ते सहसा कोणत्याहि कामांत माघार घेत नसत. ज्यावेळीं पिशाचाचें प्रत्यक्ष दर्शन त्यांस एक दोन वेळां झालें त्या वेळीं त्यांना कांहीं दिवस चैन पडलें नाहीं व ह्मणूनच दत्तोपंतावर संसार सोंपवून चार दिवस स्थलान्तर करण्याचा त्यांनीं निश्चय केला. तो पार पडला नाहीं हें मागच्या विवेचनावरून वाचकांना कळलेंच आहे.

पुत्रप्रेम पतिपत्नीच्या नव्या सांधलेल्या प्रेमांत व्यत्यय आणतें यासाठीं

सावत्र मुलाला दूर करण्याचा रावसाहेबाचा बेतहि सिद्धीस गेला नाहीं. दत्तोपंतानें या बाबतींत बरेंच मन घालून मुलाला परगांवीं कसल्याहि कारणावर न ठेवण्याच्या मनोरमेच्या इच्छेला भक्कम दुजोरा दिला. दत्तोपंताची ब्याद कधीं कधीं आपल्या हेतूंच्या साफल्याला नडते एवढ्यासाठीं तिचा कांटा काढून टाकण्याचा रावबहादुरांनीं इरादा केला. या खटपटींतहि त्यांना यश आलें नाहीं. तेव्हां त्यांनीं या कारणांत पुन: मन न घालण्याचा निश्चय केला. मनोरमेला बरें वाटावें याकरितां त्यांना तिच्या मुलाचा पुळका येत असे पण त्याचा विपरीत परिणाम होतोसें कळल्यावर मधुकराचें नांव त्यांनीं सोडलें. आईची व दत्तोपंतासारख्या तिऱ्हाइताची फूस मिळून पोरगा शेफारला असे उद्गार कधीं कधीं त्यांच्या जीवश्च कंठश्च स्नेह्यांपाशीं निघत. प्रोफेसरहि त्याबद्दल आपला निषेध प्रदर्शित करून मुलगा सुधारण्याचा प्रयत्न करण्याची मसलत वहिनीसाहेबांना देत असत. परंतु त्यांच्या हेतूला फळें आलीं नाहींत. दत्तोपंतासारख्या कांहीं कारणानें घरांत घुसून अरेराव बनलेल्या इसमाला अर्धचंद्र देण्याची त्यांची मनीषा रावबहादुरांप्रमाणेंच निकालांत निघाली.

मनोरमेच्या मनांत आपण पतित बनलों याची जाणीव असल्यानें रावबहादुरांशीं खाजगी संबंधांत ती रोज कुरापती काढून भांडूं लागली. सुधारलेल्या पद्धतीप्रमाणें शकारांनीं परस्परसंभाषणांत योजलेले ‘प्रिये’ वगैरे संबोधक शब्द तिला न रुचून अशी सलगीची भाषा न वापरण्याबद्दल ती आपल्या यजमानांना स्पष्ट सांगूं लागली. या गोष्टीचा चमत्कार कोणालाहि वाटेल मग पतीचा हक्क प्राप्त करून घेतलेल्या रावबहादुरांना तो अगदीं विचित्र भासावा यांत आश्चर्य काय ?

“पुनर्विवाहाला सिद्ध होऊन दाखविलेल्या अलौकिक (?) नीतिधैर्याला असला प्रेमभंग खालीं पहावयास लावील याची कांहीं तरी चाड असूं दे” असल्या रावबहादुरांच्या ह्मणण्याला मनोरमेकडून तिटकाऱ्याचें उत्तर मिळे. “पुनर्विवाहाच्या भपक्याला हुरळून मीं आपला घात करून घेतला. असला

पतिपत्नीचा व्यवहार कोणाहि आर्य स्त्रीला संमत होणार नाहीं. यांत परोपकार, पुण्य कांहीं नाहीं. यांत खरें प्रेम मिळणेंच दुर्लभ. पुनर्विवाहांत प्रेम शोधण्याची खटपट मृगजळाच्या सागरांत अवगाहन करून ताप शमन करण्याच्या प्रयत्नाइतकीच खरी आहे. त्यांत सत्यांश लेशमात्र नाहीं. पण हें प्रथम न कळून मी दुःखपंकांतून उद्धरण्याऐवजीं त्यांत आपण होऊन पडलें'' असे औदास्यमिश्रित जबाब ऐकण्याची पाळी रावबहादुरांना अलीकडे पुष्कळदां येऊं लागली. या खाजगी धुसफुशीच्या कारणानें असो अगर दुसरें कांहीं कारण असो, रावबहादुरांनींहि आतांशा घरांत उदासीनतेनें वागण्याचा क्रम धरला. ते घरांत केव्हां तरी येऊन जाऊन असत. त्यांना घरांत करमत नाहीं असें त्यांच्या कृतीबद्दल सर्वांकडून अनुमान करण्यांत येत असे; पण दत्तोपंतासमोर रावबहादुरांच्या या वागणुकीबद्दल वरीलप्रमाणें घरांतल्या करमणुकीचा अभाव हा तर्क कोणीं प्रकट केल्यास ते मात्र फार गूढार्थयुक्त भाषा बोलत असत. त्यांच्या एकंदर विचित्र वर्तणुकीसारखेंच हेंहि निरर्थक भाषण असावें असा सर्वांचा समज रावबहादुरांच्या सर्व हालचालींचा उलगडा झाल्यावर खोटा ठरला.

शकारांनीं बायकोशीं सलगीनें वागण्याचें सोडून दिल्याला बरेच दिवस लोटले. अशाच तऱ्हेनें आणखी कांहीं दिवस गेल्यावर आपण या यजमानाला सोडचिठ्ठी देऊन पापाच्या काचांतून मुक्त होऊं असे आशाजनक सानंद विचार मनोरमेच्या मनांत सारखे घोळूं लागले होते. ती त्या संधीची वाट पहात होती, नव्हे, तो प्रसंग आपोआप घडून येण्यापेक्षां घडवून आणण्याचा प्रयत्न कोणत्या तऱ्हेनें सिद्धीस जाईल असा विचार करीत होती म्हटल्यास जास्त शोभेल. अशा विवंचनेंत ती एका दुपारीं आपल्या दिवाणखान्यांत कोचावर समोरच्या नारायणरावाच्या फोटोकडे अढळ दृष्टि लावून पडली होती. स्वतःच्या पातिव्रत्याच्या चिंतेचा तिच्या मनाला घोर लागल्यापासून तर तिला स्वस्थ झोपेनें जवळ जवळ सोडल्याप्रमाणेंच होतें. सबंध रात्रभर बिछान्यावर असंबद्ध विचाराच्या भरांत तळमळत पडण्यावांचून तिला आतां

इलाजच राहिला नाहीं. हीं जागरणें तिच्या शरीरसौंदर्याचा अपहार करूं लागलीं होतीं. अंथरुणावर पडल्यावर यदाकदाचित् किंचित् डोळा लागला कीं तत्काळ भेसुर स्वप्नांचे देखावे नजरेसमोर येऊन ती दचकून जागी होई. अशाच झोंपेवांचून रात्री जाऊं लागल्यास ज्या हृद्रोगाचा हा परिणाम होता तो आपणांस लवकरच इहलोकमुक्त केल्याखेरीज खचित रहाणार नाहीं अशी प्रत्यहीं अनुभवास येणाऱ्या शरीरशक्तीच्या ऱ्हासावरून तिच्या मनाची पक्की खात्री झाली होती. निष्पाप स्थितींत मरण येतें तर त्याचें भय अथवा दुःख मानण्याचें कांहीं कारण राहिलें नसतें, पण आतां जगाच्या पसाऱ्यांतून ओढून नेणारें मरण मनोरमेच्या अंतश्चक्षूंनां भयंकर उग्र स्वरूपाचें दिसे. तथापि पातकाची जाणीव मनांत अहर्निश सलत असतां आणखी कांहीं दिवस जगण्यापेक्षां मरण आल्यास बरें अशी तिच्या मनाची भावना दिवसरात्रींच्या एक एक अधिकाधिक फेऱ्याबरोबर जास्त जास्त दृढ होत चालली होती, व या कायिक, मानसिक तापानें जर्जर झालेल्या शरीराचा आत्म्याला त्याग करावयास लावणाऱ्या अखेरच्या क्षणाकडे मन लावून व चर्मचक्षु आपल्या गतपतीच्या चित्रावर रोखून ती आस्मानी वर्णांत असलेल्या दुपारीं कोचावर पडली होती. इतक्यांत खिन्न मुद्रा झालेले तिचे यजमान हातरुमालानें डोक्याचा घाम पुशीत पुशीत तिच्यापुढें येऊन उभे राहिले. रावसाहेब येतांच तिनें त्याकडे एक कटाक्ष टाकून पुन्हां ती आपल्या पूर्ववृत्तींत रमली. दहा पंधरा मिनिटें याप्रमाणें स्तब्धतेंत गेल्यावर रावबहादुरांनीं तीस स्पर्श करून आपण आल्याची जाणीव करून दिली. आतां मात्र मनोरमा कोचावर उठून बसली. तिच्या शरीरावर आलेली अशक्ततेची कळा यावेळीं प्रथमच रावबहादुरांच्या नजरेस पडली, तेव्हां कळवळ्यानें तिचा हात आपल्या हातांत घेऊन समोरच्या खुर्चीवर बसत बसत रावबहादुर ह्मणतात— "अलीकडे प्रकृतींत कांहीं विकार झाला आहे वाटतें. होय, यांत तुझ्या उत्तरावर खरा प्रकार कळण्यासाठीं विसंबायला नकोच. प्रकृति नादुरुस्त झाल्याचीं चिन्हेंच जर सगळ्या शरीर-

भर दिसताहेत तर त्याबद्दल शंका बिलकुल बाळगायला नकोच."

रावबहादुरांच्या कळवळ्याला उत्तर मिळालें नाहीं. तेव्हां जरासें थांबून पुन्हां ते ह्मणतात—"हल्लीं मला कामामुळें तुझ्याकडे लक्ष द्यायलाच फावत नाहीं. आपल्या जिवलग पत्नीला आपल्या कामाचा मागमूसहि लागूं न देणें अगदीं गैर हें मला समजतें आहे; पण कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्या आपल्या प्राणसख्या सहचरीपासूनहि लपवून ठेवाव्या लागतात. लाडके, तुझ्यावर नाराज होऊन मी सांप्रत घरांत फारसा रहात नाहीं अशी तुझी कल्पना असेल, व आपल्या चढेलपणानें प्रियकराशीं कांहीं अनुचित वर्तन घडलें तर त्याबद्दल दिलगिरीहि दाखविण्याला मानिनी स्त्रियांचें मन धजत नाहीं, त्या आपल्याशींच गुप्तपणें कुढत असतात. माझा विरह असह्य होऊन तर तुझी अशी स्थिति झाली नाहींना? विरहानें इतकें झुरून शरीराला अपाय करून घेण्याचें कांहीं कारण नाहीं."

"विरह—आणि तो असह्य—परमेश्वरानें ज्याच्यासाठीं हा देह निर्माण केला त्याचा अंत झाल्यावर विधवा झालेली ही मनोरमा ऐहिक सुखाचा आस्वाद घेण्यांत गुंगली होती. तिकडच्या मरणानें स्त्रियांच्या इहलोकींच्या आत्यंतिक सुखांत पडलेलें खिंडार भरून काढण्याकरितां वासनेच्या पायीं ज्यां पापिणीनें केवढें अघोर कर्म केलें आहे! विरहानें झुरणीस लागण्यासारखी जर या चांडाळणीच्या हृदयाची रचना असती तर तें पुनर्विवाहाच्या पातकांत रुतायला आजपर्यंत या जगांत टिकलेंच नसतें. वैधव्याच्या आगींतून पुनर्विवाहाच्या फोफाट्यांत लोकनिंदेचे चटके आनंदानें खात बसणारें मन व शरीर आपल्याकरितां विरहतप्त होणारें खास नाहीं असें पक्कें समजा. माझें शरीर रोगग्रस्ताप्रमाणें कांतिहीन होण्यास आपल्याशीं जडलेला माझा बेकायदेशीर संबंधच जास्त कारण आहे." अशीं वाक्यें मनोरमेच्या तोंडून क्षीण स्वरांत बाहेर पडलीं.

"बेकायदेशीर—" रावसाहेबांनीं विकट हास्य केलें. "कायदा आणि बेकायदा सांगून नवऱ्यांना त्रास देणाऱ्या या आजकालच्या बायका—"

"बायकांची अकल चुलीपुरती होती तोंपर्यंत संसारांत पुष्कळ सौख्य होतें. बायकांचा उद्धार करण्याचें ब्रीद बाळगणाऱ्या आपल्यासारख्या शहाण्या-सुर्त्यांच्या बुद्धिमत्तेला बायकांच्या अकलांना चुलीपुढून काढून नसत्या उन्न-तीच्या भानगडींत सोडतांना आपल्या हातून चूक घडते आहे हें कसें कळलें नाहीं? तुमच्यासारख्या लोकांच्या पायीं सगळ्या समाजाचा नाश होणार हें तुह्मांला कसें दिसत नाहीं? पुरुषांच्या अरेरावीखालीं नांदणाऱ्या बायका आमच्यापेक्षां शतपटीनें अधिक आनंदांत आहेत."

"बरें, मनोरमे, मला येथें या विषयावर वादविवाद करीत बसण्याला वेळ नाहीं. मी कांहीं जरूरीच्या कामासाठीं आज येथें आलों आहें. मला कांहीं महत्वाच्या कामानिमित्त द्रव्यसाहाय्य पाहिजे आहे. मला आत्तांच्या आत्ता पांचशें रुपये हवेत."

"माझ्याकडून एक छदामहि मिळणार नाहीं." मनोरमा संतापानें बोलली. "आजपर्यंत आपण माझ्या नगदी जिंदगीचा फार शोष केला आहे. स्त्रीधनावर चैन करणाऱ्या पुरुषांना जगांत कोणीहि मान देत नाहीं. आ-पलीं कामें कितीहि महत्त्वाचीं असोत त्याला द्रव्याची मदत मी करणार नाहीं. माझी स्वतःची मालकी असती तरी सुद्धां मदतीला मी कचरलें असतें. परंतु जें द्रव्य मीं आजपर्यंत माझें ह्मणून आपल्या मर्जीखातर हवें तसें खर्चलें तें माझें नव्हतें असें मला अलीकडे कळून आलें आहे. त्या द्रव्यावर खरा खरा हक्क मधुकराचा आहे. ज्याच्या संसर्गानें ही त्याची आई मनोरमा पातिव्रत्यापासून भ्रष्ट झाली त्या पुरुषाचा अथवा माझा या मालमत्तेवर कांहीं हक्क नाहीं. मी माझ्या डोळ्यांदेखत यापुढें आपल्या-करितां एका सुतळीच्या तोड्यालाहि शिवणार नाहीं. ही कमाई आपली नाहीं अथवा माझी नव्हे, ही मधुकराच्या जन्मदात्याची आहे."

"मनोरमे, विचार कर, या असल्या वर्तनानें तूं माझा राग आपल्यावर ओढून घेत आहेस. मला द्रव्य दिलेंच पाहिजे. भ्रमिष्टासारखी बडबड करणें चांगलें नाहीं. मी रागावलों तर—"

"मला असल्या प्रौढीचें भय वाटणार नाहीं. पुनर्विवाहाचें पातक करतांना ज्या मनोरमेनें जगन्नियंत्या परमेश्वराच्या कोपाची पर्वा केली नाहीं ती ही मनोरमा एखाद्या मानवी प्राण्याच्या धाकाला भीक घालील ही आशा व्यर्थ आहे."

"परमेश्वर आणि त्याचा कोप ही भोळ्याभाबड्यांची कल्पना पुढें करून तूं मला चकविण्याचा कितीहि प्रयत्न केलास तरी मी फसणार नाहीं. मनोरमे, पैशाच्या अभावीं आज माझी अब्रू पेंचांत सांपडली आहे. पतीच्या मानापमानाची लाज पत्नीला पाहिजे. माझें संकट निवार. तुझ्या गळ्याशपथ, मी फारच अडचणींत आहें."

"आजपर्यंत मी आपल्या भुलथापांना फसलें; जुगार व त्यासारख्या इतर व्यसनांसाठीं आपण मजजवळून द्रव्य नेत होतां. पतीनें व्यसनासक्त व्हावें ह्मणून कोणतीहि सच्छील भार्या आपली धनदौलत खर्ची घालण्यास तयार होणार नाहीं व तशी मजविषयीं अपेक्षा आपण बाळगूं नये."

"माझ्या अब्रूची, मानाची तुला कांहींच किंमत वाटत नाहीं ?"

"वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. फजितखोरांना अब्रू नसते व मान तर नसतोच नसतो."

"एकूण मी फजितखोर! कोणाला उद्देशून हे शब्द उच्चारीत आहेस? मी तुझा कायदेशीर नवरा आहें. माझी अशी नालस्ती तुझ्या तोंडून ऐकावी लागेल असें जर मला अगोदर कळतें तर असल्या बेमुर्वत बाईशीं संबंध करून माझा सुखाचा जीव दुःखांत टाकण्यास मी तयार झालों नसतों."

"तें जरी आपण कांहीं ह्मटलें तरी मला त्याचें वाईट वाटणार नाहीं. मी एकदांच सांगतें कीं, माझ्यापाशीं द्रव्यसाह्याची गोष्ट आपण काढीत जाऊं नका."

"एकूण तूं द्रव्य देत नाहींस—"

"नाहीं." मनोरमेनें ठासून जवाब दिला.

"ठीक आहे. विचार कर."

शकाराच्या मनांत कांहीं तरी भयंकर विचार या वेळीं खेळत होते. संतापानें तो लाल झाला होता. त्याचा चेहरा तर अत्यंत उग्र झाला असून प्रसंग पडल्यास काय पाहिजे तें करण्यास मागें पुढें न पहाणाऱ्या साहसी माणसाच्या क्रूरतेची भयप्रद छाया त्याच्या डोळ्यांत मूर्तिमंत नाचत होती. रागाच्या भरांत तो ह्मणतो–

"बऱ्या बोलानें तूं मला मागितलेली रक्कम देऊन वाटेस लाव. आजपर्यंत तूं वेळोवेळीं माझा पाणउतारा सारखी करीत आली आहेस. बायकोसारख्या क्षुद्र प्राण्याकरवीं झालेली मानहानि मुकाट्यानें सहन करणारा हा शकार नाहीं. पण आमच्या सुधारणेच्या नवराबायकोच्या समान हक्काच्या तत्त्वाखातर मी मूग गिळून बसलों. मी नरम आहें असें समजून तुझी जीभ फारच लांबत चालली आहे. दुसरी एखादी व्यक्ति अशी बडबडती तर तिची मान एखाद्या कडब्याच्या ताटाप्रमाणें ताडकन मोडून मीं तिला कधींच यमसदनाला धाडलें असतें. पण लौकिकासाठीं— प्रेमासाठीं–"

"नव्हे, मतलबासाठीं– स्वार्थासाठीं आपण आजवर मीं पदोपदीं केलेली नाचक्की सहन केलीत. भुंगा मध असलेल्याच फुलावर प्रेम करतो हें समजण्याइतकी अक्कल ईश्वराच्या दयेनें मला आहे. या भुंग्याची कृति निर्हेतुक प्रेमाची का स्वार्थाची, हें सुज्ञांना वेगळें सांगायला नको."

"चूप रहा, हा चटोरपणा पुरे कर. तुझ्याशीं संबंध केल्यामुळें माझा दुर्लौकिक फार झाला. जा– पण नको– पुरे झाले समान हक्क. मी तुला मोकळीक देणार नाहीं. बायकोचा जीव घेण्याइतका पुरुषाला अधिकार पाहिजे. चल तिजोरीची किल्ली दे, किंवा मी मागतों ती रक्कम दे. ऊठ."

रावबहादुर तिचा हात धरून तिला उठवूं लागले. तिनें न उठण्यासाठीं बळ आणलें पण त्या आडदांड पुरुषापुढें ती जातीची अबला व त्यांतन निःशक्त झालेली किती वेळ टिकाव धरणार? एक जोराचा हिसका [illegible]नें तिला उभें केलें, व हाताच्या पंज्यांत तिची मान धरून तो

तोंडानें "चल, पैसे काढ" असें ह्मणत तिला पुढें ढकलीत तिजोरीच्या खोलीकडे घेऊन चालला.

"ही अगदीं दिवसाढवळ्या दरवडेखोरी आहे, हा न्याय नाहीं," असें मनोरमा मोठ्यानें ओरडूं लागली.

"घरांत कोणी नाहीं, याची खात्री मी मघाशींच करून वर तुझ्या खोलींत आलों. ओरड, खुशाल ओरड. मला पाहिजे तितकें द्रव्य टाक अगोदर आणि मग खुशाल घसा कोरडा कर." तो तिला पहिल्यापेक्षां जोरानें रेटीत चालला.

"अहो जबरदस्ती–अशी भामटेगिरी—"

खालीं तळमजल्यांत पावलें वाजलीं. रावसाहेबांनीं आपल्या रिकाम्या हातानें मनोरमेचें तोंड दावलें, व अधिक जलदीनें ते तिला द्रव्यागाराकडे घेऊन चालले. इतक्यांत मधुकर आईकडे घाबऱ्या घाबऱ्या धांवत आला. रावसाहेबांनीं तावडतोब त्या पोराच्या श्रीमुखांत इतक्या जोरानें भडकावली कीं, तो विव्हल स्वरानें ओरडत धाडकन खालीं पडला. ही चपराक जोराची होती व तिच्या आघातानें त्या कोवळ्या पोराला तिरमिरी आली. तरी त्यांतल्या त्यांत चलाखीनें तो पुन्हां उठला व रावसाहेबांच्या हाताला धरून त्यानें कडकडून चावा घेतला. रावसाहेबांना क्रोध अनावर होऊन त्यांनीं मनोरमेला जोरानें पुढें ढकलून त्या पोराकडे आपले पाय वळवले. मनोरमेला एकंदर प्रकारावरून रावबहादुरांच्या मनांतील मधुकराचा सूड घेण्याचा रोंख कळला व पुत्रवात्सल्याच्या भरांत तिनें रावसाहेबांच्या कमरेला चटकन मिठी मारून त्यांच्या गतीला रोध केला. एका हातानें मनोरमेच्या हातांचा विळखा सोडवीत असतां त्या झटापटीमुळें मधुकराला पळून जाण्यास अवसर सांपडला पण त्यानें त्या अवधीचा स्वत:च्या बचावाकडे उपयोग करून घेतला नाहीं. आईकरितां तो तेथेंच उभा राहिला. रावसाहेबांनीं मनोरमेशीं ओढाओढ करीत त्याच्यापर्यंत मजल मारली. अशक्त मनोरमेला या धडपडीचे श्रम जास्त होऊन ती अगदीं थकली. तिच्यांत रावबहादुरांच्या

कमरेभोंवतीं हाताची मिठी तशीच घट्ट ठेवण्याइतकी चिकाटी उरली नाहीं. रावबहादुरांनीं या वेळीं जोराचा हिसडा मारून स्वतःस सोडवून घेतलें. मधुकराला पुढचा परिणाम दिसत नव्हता असें नाहीं. पण सावत्र बापाचा त्याला या वेळीं इतका तीव्र संताप आला होता कीं, त्यानें पुढें मागें न पहातां जवळ आलेल्या रावबहादुरांच्या अंगावर जोराची उसळी मारून आपल्या डोक्याची त्यांच्या पोटावर धडक मारली. शकाराची अंगकाठी त्याच्या वयाच्या मानानें पुष्कळच मजबूत होती तरी त्या पोराच्या डोक्याचा तडाखा त्यास सहन झाला नाहीं. क्षणभर त्यांना घेरी आल्यासारखें झालें. एवढ्याशा पोरानें आपली रग जिरवावी या रागावर त्यांनीं वेदनातिशयानें आलेलें चक्कर जातांच पोरावर चाल केली व विलायती बूट असलेल्या आपल्या पायाची ठोकर त्या पोरास मारली. ती लाथ जिव्हाळीं बसून मधुकर निश्चेष्ट होऊन भूमीवर पडला. मनोरमा धापा टाकीत खालीं बसलीच होती. तिला मधुकर बेशुद्ध पडतांना दृष्टीस पडतांच पुन्हां जोर आला. "पोर मेलें, पोर मेलें" असें कातर स्वरांत ओरडत जाऊन तिनें मधुकराला पोटाशीं घट्ट धरून त्या बाळावर सारखें अश्रुसिंचन चालविलें. एकीकडे मर्यादेचा अतिक्रम करून ती या निर्दय यजमानास "दुष्टा, क्रूरा" इत्यादि शिव्या देतच होती. शकाराला या हृदयभेदी देखाव्यानें तिळभरहि दया आली नाहीं, "पहा माझें सामर्थ्य, भोगा प्रायश्चित्त," असें तो निष्ठुर बोललाच. त्याचें मन द्रवलें नव्हतें. "बायांबापड्यांवर बळ दाखवणारांना कोणीहि पराक्रमी ह्मणणार नाहीं" मनोरमा बोलली. "फिरून तुझी वडबड आहेच. आणखी दाखवूं का इंगा ?" रावबहादुरांचें हें वाक्य पुरें होतें न होतें तोंच एक व्यक्ति त्यांच्या पाठीशीं येऊन उभी राहिली. रावबहादुर एकदम चपापले व आतांपर्यंतच्या आपल्या बिनघोर कारभारतां हें जबरदस्त विघ्न आलेलें पाहून त्यांस किंचित् रागहि आला.

शकाराला खरोखरी जर ओळखीच्या मंडळींत कोणाचें भय वाटत असेल तर या एवढ्याच व्यक्तीचें. आपल्या दुष्ट कृत्याचा सुगावा लागून

शकारांनीं पोरावर चाल केली व विलायती बूट असलेल्या आपल्या पायाची ठोकर त्या पोरास मारली. [ पान २६०.

तर ती येथें ऐन वेळेला अचूक हजर झाली तर नसेलना, आपण एवढा वेळ काय बोललों काय दंगामस्ती केली ही अद्गून तर या गृहस्थानें पाहिली नसेलना, अशा शंका त्या व्यक्तीचें दर्शन झाल्यापासून त्याच्या मनांत क्षणोक्षणीं उद्भवूं लागल्या व तो फारच भेदरला; आपली मारामारी त्याला दिसती तर हा इतका वेळ खास दडून राहिला नसता, तेव्हां तो आतांच कांहीं तरी गडबड वर चालली आहे या अदमासानें आला असावा, त्यास सगळा प्रकार कळला नाहीं, असें समाधान शकारानें आपल्या मनांत करून घेतलें व घडलेल्या सगळ्या गोष्टींना निराळें स्वरूप देण्याच्या हेतूनें तो ह्मणाला—"पाहिलेंस ! या पोराच्या दांडगाईनें हा कधीं तरी आपला जीव संकटांत घालील असें मला नेहमीं वाटतें. खालीं कोण आहे ? या पोराची धडपड सदा चाललेली. आतां तिथें वर चढण्याचें कांहीं कारण होतें का ? पण एक क्षणभर स्वस्थ बसेल तर ना. अग, जा असें नुसतें पोटाशीं धरून काय होणार, त्याच्या डोक्यावर पाणीबिणी शिंपडशील कीं नाहीं ? जा, ऊठ, मी त्याच्याजवळ बसतों. तूं पाणी आण जा."

रावबहादुरांचें भाषण चालू असतां चष्म्याच्या मोठाल्या काळ्या भिंगांतून जवळ आलेल्या व्यक्तीचे डोळे त्याच्या चेहऱ्याकडे वेधले होते. रावबहादुरांना त्याच्या नजरेशीं नजर भिडविण्याचें धैर्य नव्हतें. त्यांना आतां त्या व्यक्तीशेजारीं उभें राहवेना. मनोरमा अद्यापि त्याच्या सांगण्याप्रमाणें पाणी आणण्याकरितां उठली नव्हती. शकाराला तेवढें निमित्त पुरलें. "त्या पोराची तुला काळजी वाटत नाहीं तर मी तरी रिकामा वेळ कां घालवूं ? मला पुष्कळ उद्योग आहेत. मी आपला जातों कसा." रावबहादुरांनीं वाट धरली पण जातां जातां त्यांनीं सहज मागें वळून पाहिलें तों त्या व्यक्तीची नजर त्यांच्यावर होतीच असें त्यांच्या निदर्शनास येऊन त्यांनीं लवकर या व्यक्तीच्या डोळ्याआड होण्यासाठीं खटपट केली व ताबडतोब ते घराबाहेर पडले.

शकार दृष्टिआड झाल्यावर ती व्यक्ति मनोरमेजवळ आली व तीस पहा-

तांच मनोरमेच्या गहिंवराला हुंदक्याचें स्वरूप आलें. तो गृहस्थ गेला व तेथून त्यानें थंड गार पाण्याची झारी आणून त्याचा मधुक मस्तकावर शिडकाव केला. इतरहि बरेच उपाय झाले तेव्हां मधुकर वर आला. हा वेळ पावेतों मनोरमेच्या जीवांत जीव नव्हता. ठार झाला'' हीच कल्पना तिच्या मनांत भ्रमत होती व मातेच्या हृदय निरतिशय वात्सल्याची ज्यांना जाणीव असेल त्यांना एकुलत्या एका त त्याच्या मरणाची कल्पना किती दुःसह होते हें समजेल. मनोरमा मु भानावर येईपर्यंत भानावर नव्हती. वेड्यासारखी ती त्याकडे टक ल या नव्या व्यक्तीच्या निरनिराळ्या इलाजांच्या परिणामावर लक्ष देत हो उपाययोजना सफल होतांच तिच्या अंतरंगांत आनंदाचा केवढा प्रचंड लोट उत्पन्न झाला व दुःखातिरेकानें गळणारे अश्रु सुखातिशयानें सेच किती काळपर्यंत तरी वहात होते.

वर वर्णिलेली हकीकत घडल्याला सुमारें दोन अडीच तास लोटल्या दत्तोपंत व मनोरमा ज्या दिवाणखान्यांत यजमानाची व तिची कला जुंपली त्याच जागेत परस्पराशीं बोलत बसलीं होतीं. मानसिक व्यथे अहोरात्र पीडल्यामुळें स्वभावतः दिवसेंदिवस थकत चाललेल्या शरीरयष्टी दुपारच्या आकस्मिक श्रमानें जास्त ग्लानि आल्यास त्यांत मनोरमेला को णीहि दोष लावणार नाहीं. दत्तोपंतानें मधुकराला सावध केल्यानंतर त्याच्या योग्य शुश्रूषेची व्यवस्था लावून ते मध्येंच कोठें बाहेर निघून गेले. दोन तासांनीं स्वारी पुन्हां परत आली व आतां मनोरमेजवळून त्यांनीं झाला प्रकार सर्व काढून घेतला. ओळख झाल्यापासून मनोरमेचा त्यांच्यावर निरपेक्ष लोभ जडला होता व त्यामुळें त्याजवळ ती आपलें सर्व बरें वाईट मनोगत ओकून टाकीत असे. दुपारीं शकाराशीं उडालेला तंटा, त्यावरून झालेली झोंबाझोंबी तिनें दत्तोपंताशीं कांहींएक चोरून न ठेवतां इत्थंभूत सांगून टाकली व ''दत्तोपंत, माझ्या देहावसानाचा काळ थोडक्यावर ठेपला असावा असा माझा समज आतां दृढ होऊं लागला आहे. या जगाच्या

अफाट रंगभूमीवर प्रत्येक प्राणी आपआपल्या मगदुराप्रमाणें योजलेली भूमिका पार पाडून विस्मृतीच्या पडद्याआड मरणाच्या द्वारानें निघून जातो. माझ्या प्रयाणाचा क्षण फार लांबणीवर नाहीं. स्त्रीजातीच्या— जगांतील यच्च यावत् स्त्रियांबद्दल मी बोलत नाहीं— आर्यस्त्रियांच्या, भारतीय स्त्रियांच्या, नव्हे महाराष्ट्रांतील ब्राह्मण स्त्रियांच्या एकनिष्ठ पातिव्रत्याच्या दुर्लभ लौकिकाला स्वतःच्या अविचारानें व दुर्वृत्त पुरुषांच्या उच्छृंखळ शिक्षणानें सरसकट काळें फासायला निघालेल्या दुष्ट स्त्रियांपैकीं मी एक आहें. महाराष्ट्रांतील ब्राह्मण स्त्रियांच्या शुद्ध, निष्कलंक, पवित्र आचरणाला मी लांछन लावलें. खऱ्या कर्तव्याला विसरून भलत्याच नादाला लागून माझी विटंबना करून घेतली. ईश्वरसेवा करून वैधव्याचें दुःख माझ्या हजारों इतर भगिनींप्रमाणें सहन करीत जगाच्या नजरेआड मी पडलें असतें तरी फार बरें झालें असतें. या पश्चाद्बुद्धीचा आतां कांहीं उपयोग नाहीं. पाण्यांत घसरून भोवऱ्यांत गरगर फिरूं लागल्यावर बुडणारानें आपण पाण्यावर आलोंच नसतों तर श्रेयस्कर झालें असतें असें ह्मणण्यासारखें मूर्खपणाचें आहे. पातकाचें विष अंगांत भिनल्यावर मला सुविचार सुचताहेत. या सगळ्या यातनांला एकच औषध आणि तें मरण होय. परमेश्वराच्या दयेनें तो उपाय लवकरच लागू पडेल. पण दत्तोपंत, तोंपर्यंत त्या धटिंगणाचा संबंध तोडायला काय इलाज करावा !'' असा तिच्या भाषणाचा उत्तरभाग होता.

तिचे करुणोद्गार दत्तोपंताच्या मनावर विफलपरिणामी झाले नाहींत. निर्वाणींच्या भरांत बाहेर पडणारें प्रत्येक वाक्य त्यांच्या मनाला झोंबत होतें. बऱ्याच वेळानें ते ह्मणाले, ''वहिनीसाहेब, समजा हा तुमचा व त्या दुष्ट माणसाचा संबंध यदृच्छेनें तुटण्याचा प्रसंग आला तर तो तुह्मांला सहन करवेल का ?''

''दत्तोपंत, याबद्दल शंका कशाला पाहिजे ? ज्या चांडाळाच्या भूलथापांना हुरळून मी पुनर्विवाहाच्या शास्त्रनिषिद्ध कर्माला प्रवृत्त झालें, त्याला इहलोकींचें अथवा परलोकींचें कोणतेंहि शासन मिळालें तरी मला त्यांत आनं-

दच वाटेल."

"परलोकींचें शासन कोणीं पाहिलें आहे ह्मणा, पण इहलोकींचा दंड भोगण्याचा त्यास लवकरच प्रसंग येणार आहे, व तो असा तसा नव्हे तर चांगला खडतर दंड भोगावा लागेल. सध्यां रावबहादुर शकार त्याच मार्गांत आहेत."

मनोरमेचे डोळे आश्चर्यानें विस्तृत झाले. तिचा भावार्थ जाणून दत्तोपंत पुढें सांगूं लागले—"या माणसाचें एक एक काय कर्म सांगूं ? मनुष्य जातींत अशा व्यक्ति निपजतात याचा अर्थ कितीहि सुधारणा झाली तरी मनुष्यस्वभाव जशाचा तसा कायम रहाणार हा होय. बाहेर बाहेर रहाण्यांत रावबहादुरांचा काय मतलब आहे ? हाच. सध्यां त्यांची चैन आहे पण तिच्या मूळाशीं आजपर्यंतच्या पातकाची कीड कोणाला नकळत— दैवाच्या प्रतिकूलतेचा वारा सुटतांच ती चैन सहज निखळून बाहेर पडेल असा— पोकळपणा तयार करून ठेवीत आहे. वेळ जवळ येत चालली आहे. लवकरच तुह्मांला रावबहादुरांच्या पूर्वोत्तर चरित्राचा खुलासा मिळेल. जरा दम धरा."

"ह्मणजे ? दत्तोपंत अजूनहि मला तुमच्या बोलण्यांतला गर्भितार्थ उकलत नाहीं. तो काय आहे?"

"दुसरा कांहीं नाहीं. रावबहादुरांनीं कांहीं घोर कृत्य केलें आहे व तें आतां लवकरच बाहेर फुटून त्यांस त्या पापानिमित्त प्रायश्चित्त भोगावें लागणार आहे. आज जी रक्कम त्यांनीं तुमच्याजवळून दंडेलीनें काढण्याचा प्रयत्न केला त्यांतलें रहस्य हेंच आहे. सरकारच्या हेरांना त्यांच्या कर्माचा सुगावा लागल्यामुळें ते सध्यां त्यांच्या हालचालीवर बारकाईनें नजर ठेवीत असतात. त्यांना कांहीं चिरीमिरी पटवून कांहीं दिवस तरी गोष्ट लांबणीवर टाकावी असा त्यांचा विचार आहे. त्यासाठींच द्रव्याची मदत सध्यां पाहिजे आहे."

"पण दत्तोपंत, असें कृत्य तरी त्यांच्या हातून काय घडलें आहे?"

"बाईसाहेब, तुह्मांस सांगितल्यास तें खरें देखील वाटणार नाहीं."

"तरी पण सांगाच."

"वहिनीबाई, आपल्या यजमानांनीं खून—"

"खून—काय ह्मणतां दत्तोपंत—"

"खून—होय खून—"

मनोरमा एखाद्या निर्जीव पुतळीप्रमाणें जागच्या जागीं खिळून गेली.

---

## प्रकरण तेविसावें.

## शोचनीय मृत्यु.

एके दिवशीं दुपारीं ३।४ वाजण्याचा सुमार असेल. दिवस ग्रीष्म-ऋतूच्या अखेरीचे होते. अर्थात् दुपारीं उष्मा अतिशय होता यांत संशय काय ? सकाळीं सृष्टीशीं कोवळ्या प्रकाशानें लडिवाळपणा करून ती आपल्यावर प्रसन्न आहेशी पहातांच हळू हळू आपल्या करांची तीव्रता वाढविणाऱ्या व जीवमात्रास तापवून सोडणाऱ्या श्रीसूर्यमहाराजांच्या स्वारीनें त्या दिवशीं तर उष्णतेची कमालच केली. उकाड्यानें लोकांचा जीव रंजीस आला. सृष्टींत क्षणोक्षणीं परिवर्तन कसें होतें याचा एक मासला त्या दिवशीं घडायचा होता. कोणाला कल्पनाहि नसतां आह्मीं वर सांगितलेल्या तासाला पूर्वेकडून आकाशांत एक बारीक काळसर भाग दिसूं लागला. त्याची वाढ सारखी चालू होती व अर्ध्या पाऊण तासाच्या आंत हें प्रकरण काय आहे हें सहज निदर्शनास आलें. वाऱ्याचा वेग मोठा होता व त्यामुळें हा वळवाच्या पावसाचा पूर्वरंग असावा हें सहज ध्यानांत येण्यासारखें होतें. सूर्य पूर्ण अस्ताला जाण्यापूर्वींच त्याच्या प्रकाशावर आवरण पडून सृष्टीवर अकालींच अंधकार पसरूं लागला. वाऱ्यानें पूर्वेकडून आपल्या पाठीवर, वर्षा ऋतूची स्वारी लवकरच प्रकट होणार ही आनंदाची सूचना देणारे, बिनीचे मेघ वाहून आणले होते. एका ऋतूचा

अधिकार जाऊन दुसऱ्याची सत्ता व्हावयाची असल्यानें या नव्या ऋतूचे दूत शान्त स्वरूपाचे नव्हते. त्यांची कठोर गर्जना सगळ्या आकाशाची पोकळी भेदून भूतलवासी प्राण्यांच्याहि मनांत भीति उत्पन्न करीत होती. यांचा ध्वनि होतांच वृक्षाश्रित पक्षी एकदम सैरावैरा उडूं लागत. झालें, बघतां बघतां या मेघांनीं चहूंकडून आरोळ्या देऊन किती तरी प्रदेश आक्रमून टाकला. त्यांच्या भूसंचारी वायुवाहनानें तर आपल्या पदक्रमानें नवे जुने असा भेदाभेद न पहातां शेंकडों वृक्ष उन्मळून टाकले. मेघांचे विद्युत्खड्ग दिसतांच मी मी ह्मणणारांची गाळण उडून जात होती. या मेघांनीं एकदम एवढा फरक करून सोडला कीं, सूर्याच्या तापाची ओळखच बुझाली.

या दिवशीं वृत्तपत्रकारांना एखादा आठवडा सहज निघून जाण्यासारखी एक गोष्ट घडली. स्थानिकवृत्तांत तर फार मोठें वादळ आलें, झाडें पडलीं, घरावरचे पत्रे उडाले, याचें रसभरित वर्णन होतें पण त्याखेरीजहि एक विशेष वर्तमान लठ्ठ काळ्या रेघांच्या चौकटींत फडकूं लागलें. हा काळ्या रेघांचा मान अर्थातच त्या बातमींतील नायकाच्याविषयीं असलेल्या अधिक आदराचा द्योतक होता. तेव्हां अशा एका आदरवान पत्रांतील कविकल्पनाप्रधान लेखांतूनच ती गोष्ट वाचकांना आह्मी कळवितों.

## शोचनीय मृत्यु.

रा० ब० शकार

यांचा फोटो.

हा हंत हंत नलिनीं गज उज्जहार।

आज आमच्यावर केवढा दुःखाचा प्रसंग ओढवला आहे ! वर आह्मीं फोटो दिला आहे त्याकडे पाहून आह्मी आज कोणत्या सन्मान्य व्यक्तीचें निधनवृत्त देत आहोंत तें वाचकांच्या सहजीं ध्यानांत येईल. थोडेच दिवसांपूर्वीं आह्मां सुधारकांना विजय वाटण्यासारखा जो लग्न-प्रसंग घडला तो आमच्या वाचकांच्या स्मरणांतून गेला नसेलच. रा. ब. शकार व श्रीमती मनोरमाबाई या विधुरविधवा व्यक्तींचा पुनः-परिणय येथील प्रार्थनासमाजाच्या मंदिरांत घडून आल्याला अद्यापि पुरें एक वर्षहि लोटलें नाहीं तोंच त्या दंपत्याची काल ताटातूट झाली. रा. ब. शकार हे कांहीं साध्या मरणानें आमच्यांतून नाहींसे झाले नाहींत. कोणत्याहि व्याधीनें यांचा ग्रास घेतला नाहीं. कालपर्यंत यांची प्रकृति अगदीं खडखडीत होती.

काल संध्याकाळचा भयंकर प्रसंग आह्मांला— समाजोद्धार करणाऱ्यांना —चिरस्मरणीयच झाला ह्मणावयाचा. एखाद्या स्वार्थी धूर्तानें चिथावून

दिलेले भाऊबंद जसे एकमेकांशीं झुंजतात त्याप्रमाणें वाऱ्यानें भडकवून दिलेल्या मेघांनीं काल येथें अंतरिक्षांत भयंकर धामधूम केली. त्याच्या विद्युद्रूपानें दिसणाऱ्या कलहाग्नीचा प्रचंड लोळ पाहून धीर पुरुषांसहि क्षणभर कांपरें भरलें असतें. या कलहाग्नीची एखादी ठिणगी भूतलावर पडून आमच्यांतील एका कर्तृत्ववान् पुरुषाचें प्राणहरण करील अशी कल्पनाहि कोणाचे मनांत आली नव्हती. संध्याकाळीं समाजोद्धारधुरीण रा. ब. शकार पर्वतीच्या बाजूस फिरावयास गेले असतां एकाएकीं या वादळाचा प्रादुर्भाव झाला. आकाशांत विजा कडकडून चमकूं लागल्या. वारें सोसाट्यानें सुटलें तेव्हां स्वारी माघारी फिरून घराकडे यावयास निघाली. कांहीं अंतरावर गेले नाहींत तोंच एकदम विजेचा कर्णभेदी प्रचंड धडाका झाला व ती खालीं उतरली; क्षणार्धांत तिनें रा. ब. शकारांच्या शरीराशीं झगडून त्यांचे प्राण आकर्षून घेतले व त्यांचें अचेतन शरीर भूमीवर पडलें. त्यांच्या मागें त्यांचा एक पुरभय्या गडी होता पण तो झाल्या प्रकारानें इतका भेदरला कीं, त्यास काय झालें हेंच पांच मिनिटें उमगेना. नंतर त्यानें वेड्यासारखा आक्रोश करण्यास सुरुवात केली. हा दुर्धर प्रसंग लांबून पुष्कळ जाणारां येणारांच्या दृष्टीस पडला होता. लोक जमल्यावर त्यांनीं शव रा. ब. शकारांच्या घरीं आणून टाकलें. रा. ब. ना असें चमत्कारिक मरण आलें. तो प्रसंग पहाणाऱ्या एखाद्या सहृदयाला तर वाल्मीकि ऋषींना जशी क्रौंच दंपत्यांपैकीं एकाला व्याधानें मारलें ह्मणून कविता स्फुरली तशी स्फुरली असती. ही बातमी तासा दोनतासांच्या आंत गांवभर होऊन सुधारकवर्गाचे लोक त्यांच्या वाड्याकडे लोटले. रा. ब. चें अंत्य दर्शन व पतिवियोगभारानें जर्जर झालेल्या श्री. मनोरमाबाईचें सांत्वन हे त्यांच्या कर्तव्याचे दोन भाग उरले होते. श्री. मनोरमाबाई स्वतः जाणत्या आहेत तेव्हां त्यांस आह्मी वेगळें तें काय समजावणार ? आमचें एवढें सांगणें

आहे कीं, वाईटांतून चांगलें निघतें या न्यायानें श्रीमती मनोरमाबाई यांनीं या प्रसंगाचा फायदा घेऊन एकदां स्वीकारलेला पुनर्विवाहाचा मार्ग पुन्हां धैर्यानें पुढें चालवून सुधारणेची प्रगति करावी.

रा. ब. इतक्यांतच मरावयास नको होते. त्यांच्या कर्तेपणाचीं परिपक्क फळें लोकांस चाखावयास सांपडण्यापूर्वींच त्यांचा अंत व्हावा हें दुर्दैव. "गेल्याचा शोक वृथा न करावा" हेंच खरें! ईशेच्छा!

× × ×

बये विद्युल्लते! तुला आघातच करावयाचा होता तर महान् पर्वतांचीं शिलामय शिखरें काय थोडीं होतीं? तुला प्राणमय बळि पाहिजे होता तर एखाद्या वृक्षावर उलथून पडायचें होतेंस. जंगम प्राणी पाहिजे होता का? निर्बल पशूंवर उपजीविका करणारीं व्याघ्रादिक हिंस्र श्वापदें चटकावून तूं आपली क्षुधा शमवायची होतीस व मनुष्यच पाहिजे होता तर 'पुनरपि जननं, पुनरपि मरणं' या चक्रांत पडलेले पशुतुल्य कर्तृत्वहीन अडाणी असे दुसरे रावबहादुर तुला भूमीच्या पाठीवर असंख्य सांपडले असते त्यांपैकीं एकास गिळायचें होतेंस. पण तूं रा. ब. शकारांना या लोकांतून नष्ट केल्यानें येथील त्यांच्या पुढारीपणाखालीं वागणाऱ्या माणसांवर केवढा अनिष्ट प्रसंग ओढवला आहे याची कल्पनाहि तुला नसेल. तुझा झाला खेळ पण आमच्या अग्रणीचा गेला प्राण याची जाणीव तुला आहे का? अथवा कशाला असेल—

× × ×

## रा. ब. च्या जीवनाचें सिंहावलोकन.

जन्म — सालीं. शिक्षण बी. ए. पर्यंत. कॉलेजांत यांची तरतरी पाहून यांवर शिक्षकवर्ग खुष होता. सरकारी नोकरींत असतां पदवी मिळून राजमान्यता झाली. पुढें कांहीं कारणानें सरकारी रोष होऊन राजीनामा द्यावा लागला. पण कर्तृत्ववान् माणूस काय स्वस्थ बसणार?

राजसेवेंतून मुक्तता होतांच आपला आवडता विषय जो समाजसुधारणा तो हातीं घेऊन, येथील सुप्रसिद्ध विदुषी ज्या श्रीमती मनोरमाबाई त्यांजबरोबर विवाह करून "बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाऊलें" या पदापर्यंत पोंचले. अशा वंदनीय विभूति क्वचितच जन्मास येतात.

यांच्या विद्वत्तेचा परिचय समाजांतील लोकांना वारंवार येत असे. उपनिषदें, वेदान्तशास्त्र यांत हे निष्णात होते. यांच्या वाणीचा व लेखणीचा (Utterances and writings) कोणी त्यांच्या भक्तानें संग्रह करून छापविल्यास पुढच्या पिढीस बोधप्रद होईल.

× × ×

परमेश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो. प्रभूची सत्ता समर्थ आहे.

* * *

रा. ब. शकार वारले निमिषार्धांत पण त्यांचें जीवनचरित्र वर्तमानपत्रकारांस बरेच दिवस वादाला पुरलें. त्यांच्या मरणानंतर दुसऱ्या एका जबाबदार वर्तमानपत्रांत खालील मजकूर प्रसिद्ध झाला—

"नुकतेच विजेच्या अपघातानें रा. ब. शकार मरण पावले. त्यांच्या चरित्राविषयीं जरी त्यांच्या पक्षीयांनीं बडेजाव माजविला आहे तरी आह्मांस त्याचें कांहींच महत्व वाटत नाहीं. त्यांच्या दुर्गुणाच्या बारीक सारीक गोष्टी लोकांत प्रसिद्धच आहेत. सरकारी नोकरींतून बडतर्फ झाल्यावर यांनीं सुधारणापंथ स्वीकारला व एका सधन व विकारवश विधवेशीं पुनर्विवाह करून लोकांत प्रसिद्धि करून घेतली. इतरांना काय दुःख झालें असेल तें त्यांनाच ठाऊक, पण त्यांच्या पुनर्विधवेला [विवाह, पुनर्विवाह तसाच विधवा, पुनर्विधवा हा शब्द आहे] मात्र कांहींसें दुःख होईल. कांहींसें ह्मणण्याचें कारण इतकेंच कीं, त्यांना कर्तव्य असल्यास तृतीय विवाहाचा मार्ग खुला असल्याचें त्यांच्या प्रमुख वर्तमानपत्रानें सुचविलें आहेच. जरठ-कुमारी विवाहाचा निषेध करणाऱ्या सुधारकांना जरठा-कुमार विवाह मान्य

असायला हरकत दिसत नाहीं. येथील कालेजच्या प्रोफेसरांच्या तालमींत तरबेज झालेला एखादा कुमार संधि दिल्यास मिळेल अशी आह्मांस आशा वाटते.'' वगैरे वगैरे.

हा व्याजोक्तिपूर्ण मजकूर प्रसिद्ध झाल्यावर राष्ट्रोन्नतिकर्त्या लोकांत जे दोन तट आहेत त्यांच्यांत अधिकच वाद माजला. रा. ब. च्या पक्षपाती लोकांनीं रा. ब. त काय दुर्गुण होते ते स्पष्ट कां प्रसिद्ध करीत नाहीं असा सवाल करतांच ''श्रीदत्त'' या सहीनें एक लांबलचक शकार-चरित्रपर लेखमाला वरच्या पत्रांत प्रसिद्ध झाली.

वर आह्मी ज्या वर्तमानपत्राचा शोचनीय मृत्युलेख दिला आहे त्यांतच दुसरीकडे स्मशानयात्रेची साद्यंत हकीकत दिली होती. तीवरून वाचकांस शकारांच्या दहनाला शेंकडों लोक हजर असल्याचें व त्यांना प्रोफेसर घमेंडे व त्यांचे परात्पर गुरु तत्त्वचिकित्सकचूडामणि या विद्वद्द्वयानें मरहूम राव-बहादुरांच्या चरित्रावर व्याख्यानें दिल्याचें कळून आलें असतें. रावबहादु-रांच्या अंत्य विधीला अनेक प्रतिष्ठित नागरिक व तेली, तांबट, माळी वगैरे मागसलेल्या जातीचे लोक हजर होते त्यांचा उल्लेख करून सदरहू वर्तमानपत्रांत रावबहादुरांच्या लोकप्रियतेवर शेरा दिला होता. प्रोफेसर घमेंड्यांना स्वतःचा कोणी आप्त मेल्याइतकें दुःख होऊन सद्गदित कंठानें ते जें बोलले त्याचा संक्षिप्त अहवाल नमूद करून पुढें त्यांच्या गुरूंच्या मुखारविंदांतून गळलेल्या उपदेशामृताचा सांठा वाचकांना बऱ्याच विस्तारानें सादर केला होता. या व्याख्यानावर श्रीदत्तानें आपल्या सलामीच्या लेखांत झोड उडवून दिल्यामुळें सुधारणेच्या पाठीराख्यांचें पित्त उसळलें व त्यांनीं श्रीदत्ताची उलट लेखांनीं हजेरी घेण्यास आरंभ केला. या सर्व लेखन-द्वंद्वाचें मूळ जें गुरुवर्य मजकुरांचें भाषण तेंच येथें मांडणें बरें. सुधारकांचे गुरुवर्य ह्मणाले—

''सुजनहो, आपल्या अतिशय गाढ स्नेह्याच्या चरित्रासंबंधीं उपदेशपर चार उद्गार काढण्याची जी आपण मजला विनंति केली तिला संमति

देतांना माझ्या अंतःकरणांत केवढी कालवाकालव चालली आहे याची आपण सर्व जण स्वतःवरून परीक्षा करण्यास समर्थ आहां. ही कामगिरी पत्करण्यास मी कधींच तयार झालों नसतों. परंतु माझ्याइतका शकारांशीं निकट परिचय कोणाचाच नसल्यामुळें आपल्या अस्सल माहितीचा फायदा इतरांस देऊन शकारांच्या स्नेहऋणांतून अंशतः तरी मुक्त व्हावें या एकाच विचारानें मी या स्थळीं बोलण्याची संधि वायां जाऊं देत नाहीं. ज्या पुरुषाच्या देहाची अखेर करायला आतां आपण एकत्र झालों आहों तो सामाजिक सुधारणेचा भक्कम खांब होता, हें आपणास माहीत आहेच. आमच्यापैकीं पुष्कळांत बोलल्याप्रमाणें वागण्याचें धैर्य नसतें तथापि शकारांची अगदीं निराळी स्थिति होती. जें मत आपण प्रतिपादन केलें तें अडथळ्याला न जुमानतां कृतींत वठवावयाचें असा त्यांचा बाणा होता. माझा व त्यांचा अगदीं बाळपणाचा परिचय. मुलांचे पाय पाळण्यांत दिसतात ह्मणतात त्याप्रमाणें यांचा करारीपणा लहानपणींच दिसूं लागला होता. मला तो प्रसंग चांगला आठवतो आहे; त्याला सुमारें पन्नास वर्षें लोटलीं. नुकताच इंग्रजी अंमल झाला होता तेव्हां कोंकणांतून मी विद्याभ्यासाठीं मुंबईस जाण्याला निघालों. माझा निश्चय पाहून शकारांनाहि मजबरोबर यावेंसें वाटूं लागलें व त्यांनीं वडील मंडळींच्या आर्जवाला, दटावणीला भीक न घालतां तो संकल्प सिद्धीस नेला. त्या दिवसांत बैलगाडीनें प्रवास करावा लागे व त्यांतहि अडचणी फार. परंतु नेटानें आह्मीं दोघांनींहि एकमेकाला साह्य करीत मुंबई गांठली. आज इंग्रजांच्या आगगाड्या, आगबोटी, तारायंत्रें वगैरे अनेक यांत्रिक साधनांमुळें सर्व जगभर सुखानें प्रवास होतो. एका पैशांत बुंदेलखंडांत सुद्धां पत्र जाऊं शकतें! अर्ध्या शतकापूर्वीं ह्मणजे आमच्या तरुणपणांत अशा सोयी नव्हत्या. आह्मी शिळ्या दशम्या चापीत मजल मारली. यंत्रशास्त्राच्या प्रगतीचे फायदे आह्मांला इंग्रजांच्या संयोगानेंच घेतां आले व शकारांसारखीं माणसेंहि त्यांच्याच शिक्षणाचा परिणाम आहे. धर्माच्या रूढीच्या गुलामगिरींतून सुटून स्वतंत्र समाजोद्धाराचे मार्ग सुच-

ण्याचें कारण इंग्रजांचें उदार विद्यादानच होय. परंतु सांप्रत कांहीं लेखकांनीं व वक्त्यांनीं उठल्या सुटल्या राजकर्त्यांवर तोंडसुख घेण्याचें आरंभलें आहे. तें असो, सगळ्यांत वाईट गोष्ट ह्मणजे त्यांनीं तरुण पिढीला वडीलांचा अनादर करायला शिकविलें. असल्या बेजबाबदार लोकांच्या वागणुकीचा कोंवळ्या बुद्धीच्या तरुणांवर अत्यंत विघातक परिणाम घडतो. आमची अधोगति होत असल्यास अथवा आमच्यासारख्या अनुभववृद्ध माणसांनीं चालविलेल्या चळवळींची गति मंद असल्यास त्या सर्वांचें खापर मी असल्या लेखकांच्या व वक्त्यांच्या डोक्यावर फोडीन. असले लोक आमचे हितशत्रु होत. थोडेंसें विषयान्तर झालें. पण मला या पढतमूर्खांचा इतका संताप येतो कीं, त्यांच्याविषयीं दुरुक्ति काढल्यावांचून माझ्यानें रहावतच नाहीं. मी तरी काय करूं? असो. आह्मी कालेजांत फार हुशार विद्यार्थ्यांत गणले जात होतों. शकारांचा व्यासंग विद्यार्थीदशा सुटल्यावर सुद्धां कायम होता. ते विद्वान् होते व सामान्यतः दोन पंडितांत नेहमीं चढाओढीची चुरस व एक प्रकारचा मत्सरप्रेरित द्वेष आढळतो तसा तो आमच्यांत नव्हता. आमच्यांतला सलोखा आजपर्यंत जसाच्या तसा कायम होता हें सांगण्यांत मला थोडासा अभिमान वाटतो आहे. शकारांचा एक मोठा गुण ह्मणजे सारासार विवेक हा होय. कोणत्याहि महत्वाच्या प्रकरणीं ते माझी सल्लामसलत घेत असत व ही एकच गोष्ट त्यांच्या सौजन्याची दर्शक आहे. त्यांच्या आयुष्यांत विविधता फार होती व तिचा दुष्ट लोक हरतऱ्हेनें फायदा घेत असत. तथापि आपण आपल्या बुद्धीला बाजारगप्पांवर विसंबून ठेवतां कामा नये. त्यांचे आणखी अनेक सद्गुण सांगतां येण्याजोगे आहेत. परंतु शोकभारानें चित्त दडपून गेल्यामुळें मी जास्त कांहींच बोलूं शकत नाहीं. आपणां सर्वांच्या इच्छेपुढें वांकणें माझें कर्तव्य होतें व त्याप्रमाणें मीं तें कसें बसें पार पाडलें आहे. शकार स्वार्थाविषयीं बेपर्वा होते. "जे का रंजले गांजले, त्यांसी ह्मणे जो आपुले। तोचि साधु ओळखावा" अशा कोटींतले शकार होते व निःस्वार्थबुद्धि हें मोठेपणाचें

मोठें चिन्ह आहे. त्यांच्या चरित्राचा किंवा गिरविण्याचा निश्चय करावा हेंच आपणांस उचित आहे असें सांगून मी माझें भाषण संपवितों."

या व्याख्यानावर श्रीदत्ताची टीका पाहिल्या लेखांत आली ती अशी—

"गेल्या पन्नास वर्षांत समाजाची पाश्चिमात्यांच्या वळणावर रचना करणाऱ्यांची जी पहिली चूक झाली ती हीच कीं, त्यांनीं शब्दाला आचरणांत बिलकुल आणलें नाहीं. पुनर्विवाह करावा असें मत व्याख्यानपीठावरून खड्या सुरांत सांगणाऱ्यांपैकीं एकानेंहि उदाहरण घालण्याचें धैर्य दाखविलें नाहीं. उलट एका शाळामास्तरावर त्याचा प्रयोग केला ही गोष्ट विश्रुत आहे. शङ्करांनीं पुनर्विवाह करण्याचें धाडस कां केलें याचीं कारणें फार निराळीं आहेत, व तीं सगळीं स्वार्थपर आहेत; असें असतां वयोवृद्ध विद्वान्मजकुरांनीं त्यांच्या निःस्वार्थतेची श्मशानांत जी तारीफ केली ती साफ खोटी आहे असें मी खात्रीनें सांगतों. विद्वन्मन्यांना स्वतःलाच निःस्वार्थतेची ओळख रतिभर देखील नसल्यानें त्यांची शिफारस व्यर्थ आहे. आपल्या मुलांना बढती मिळावी या लोभानें शाळाखात्याच्या वरिष्ठाकडे खेटे घालून त्यांनीं आपले पाय किती झिजविले हें त्यांच्या स्मरणांत असेलच. अथवा असेल अशी शंका कशाला ? ज्यांना पन्नास वर्षांच्या पूर्वींचा प्रवासाचा प्रसंग खडानूखडा आठवतो त्यांना ही दहापांच वर्षांपूर्वींची गोष्ट स्मरणांत नसेल असा संशय बाळगणेंच गैर ! बिनविर चिरंजीवांना त्या वरिष्ठाकडे रवाना केल्यावर आपण स्वतः मागून रदबदली करायला जावयाचे होते, पण पुत्राची साहेबांनीं कशी बडदास्त ठेवली ती कळविण्याजोगी आहे. आपल्याला पगारांत बढती व्हावी असा अर्ज साहेबांनीं ऐकला मात्र आणि ते एकदम चवताळून म्हणाले—"जाव, मि० ++ हा गृहस्थ थोड्या पगारावर आज इतकीं वर्षें समाधानांत रहात असतां तूंच बढतीसाठीं वारंवार माझा पिच्छा कां करावास हें मला कळत नाहीं !!" यावर आमच्या विद्वानांचे आत्मज आपल्या मागणीचा खुलासा करतात—"साहेब, माझा संसार वाढता..." वरिष्ठानें उसळून उद्गार काढले—"बस्स, तुझा संसार वाढतो

याला मी काय करूं ? सरकारानें तुमच्या कुटुंबांतल्या सर्व मंडळीला नोकऱ्या पुरविण्याचा मक्ता घेतला नाहीं." इतक्यांत बाहेर त्यांचे वडील स्वतःच येऊन उभे राहिले. त्यांना पहातांच आपल्या कामाच्या यशाविषयीं आशाळून चिरंजीव जरासे आनंदानें वरिष्ठास सांगूं लागले—"साहेब, माझे वडील आपणांस भेटण्यास आले......" "जा, आणि तुझ्या बापाला पुनः भेटीबद्दल आगाऊ ठरविल्यावांचून येत जाऊं नको ह्मणून सांग, जा." साहेबांनीं आशाबद्धाचें भाषण मध्येंच तोडून जवाब दिला व चिरंजीव आणि त्याचे वडील ह्मणजे घमेंड्यांचे परात्परगुरु यांना "चालते व्हा" असें नजरेनें सुचविलें. द्रव्याची ददात नसतां केवळ लोभानें असा पाणउतारा करून घेणारे सदरहू विद्वान् आहेत. त्यांचा आशाळभूतपणा अद्यापि सुटला नाहीं. डाक्टरसाहेबांना वेळीं अवेळीं पाश्चिमात्यांच्या यांत्रिक प्रगतीचे गोडवे गाण्याची अति दुष्ट चटक लागली आहे. मागें एकदां सार्वजनिक उत्सवप्रसंगीं यांच्या एका हुशार गोऱ्या व्यवसायबंधूनें सर्व लोकांसमोर ही घाणेरडी खोड सुटावी ह्मणून यांची फजीती केल्याचें हे विसरून गेले ! त्यानें स्पष्ट सांगितलें कीं, "अर्वाचीन यंत्रशास्त्राची हिंदुस्थानांत प्रगति होण्याला कोणतेंहि विशिष्ट राज्य कारण होऊं शकत नाहीं. चीन, जपान अथवा इतर आशियांतील स्वतंत्र देश या सर्वांनीं यंत्रशास्त्राचे फायदे उठविले आहेत. हिंदुस्थानानें देखील ते, परिस्थिति अनुकूल असती तर, स्वतंत्र रीतीनें भोगले असते. हा कालाचा परिणाम आहे. परंतु इतका विचार करण्याचें सामर्थ्य यांच्या मेंदूंत यांच्या वार्धक्यामुळें उरलें नसावें असें दिसतें. असलीं बालिश विधानें ऐकून या स्वारीचा आपल्या वयाच्या वाढीबरोबर मूर्खपणाहि वाढत आहे कीं काय असा संदेह माझ्या मनांत उत्पन्न होतो." त्या तडफदार व्यक्तीचें वरील मत भरसभेंत कानीं पडल्यावर कोणाहि सलज्ज माणसाची जीभ पुनः तींच विधानें उच्चारण्यास, शकारांच्या चरित्रविवेचनांत त्यांचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध नसतां, धजली नसती. पण वरील गृहस्थ कसले स्वमंग ? त्यांनीं आपले विचार बोलण्याला कमी केलें नाहीं. विद्वद्वर्यसाहे-

त्यांनीं विद्वज्जनांच्या आपसांतल्या असूयेचा निर्देश करून शकारांच्या व आपल्या सलोख्यानें स्वत:ला विद्वानांत गणून घेतलें आहे. मागच्या उदाहरणानें यांची द्रव्याशा सुटली नसल्याचें आह्मीं सिद्ध केलें तसेंच वरील उदाहरण त्यांच्या आत्मश्लाघा करून घेण्याच्या हौसेचें द्योतक आहे; आणखी एक खुबी त्यांच्या भाषणांत आहे. यांची सल्लामसलत शकार घेत असत एवढ्याकरितांच त्यांच्याकडे सारासार विवेकाचा गुण देण्यास ते तयार आहेत. यांची मसलत ते न घेते तर कदाचित् हे त्यांस अविचारी लोकांत मोजण्यास तयार झाले असते असा अर्थ यांच्या भाषणांतून ध्वनित होतो व तो यांच्या मनाचा हीनकसपणा दाखवितो याची वाट काय ? पूर्वीं विद्वन्महाराज, एकदां कांहीं महत्त्वाची सामाजिक घालमेल उपस्थित झाली होती तेव्हां असत्याचा अवलंब करून विद्वत्तेच्या ऐटींत लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याकरितां स्वमतसमर्थनार्थ वेदाचें नवें वचन तयार केल्याचें आपण स्मरतां का ? ही गोष्ट प्रसंगीं आपण धडधडीत खोटें बोलण्यासहि कचरणार नाहीं असा पुरावा देते. सारांश ज्यांना लोभ, आत्मश्लाघा, असत्यभाषण सुटलें नाहीं ते दुसऱ्याच्या चरित्रांतून काय बोध घ्यावयाचा असला उपदेश करण्यास अगदीं नालायक असले पाहिजेत. परंतु ज्या अर्थीं लोकच मूर्खपणानें असल्या बेवकूफांना पुढारी ह्मणून मान देतात त्या अर्थीं त्याचा फायदा त्यांनीं कां न घ्यावा ? हे विद्वान् आणखी ह्मणतात कीं, कित्येक बेजबाबदार वर्तमानपत्रकारांनीं व वक्त्यांनीं लोकांमध्यें पूर्वजांचा अनादर करण्याची घातुक प्रवृत्ति उत्पन्न केली. आपण गुरुपदारूढ असतां शंकराचार्य, विद्यारण्य, रामानुजाचार्य यांसारख्या तत्त्वज्ञ महात्म्यांना 'महामूर्खां'च्या सदरांत विद्यार्थ्यांसमोर राजरोस ढकलून देतांना वृद्धांविषयीं आदरभाव असावा या उपदिष्ट सिद्धान्ताचें भान ठेवलें होतें का ? तेच आपले चेले आतां गुरूंच्या उपदेशपाठाचे प्रयोग करूं लागले यासाठीं आतां राग कां ? ते सर्व आपल्यापेक्षां तरुण आहेत कारण आपल्याइतका वृद्ध आज आजमित्तीस कोणीच हयात नसेल. त्या चेल्यास जर आपण

पढत मूर्ख ह्मणत असाल तर आपल्याकडे पढवत्या मूर्खांचा मान आपोआपच येतो. त्या वेळीं आपण काय बकतों याची जबाबदारी संभाळलीत का? ज्यांना आपण बेजबाबदार ह्मणून ह्मणतां त्यांच्या पूर्वजस्थानीं आज आपण आहांत हें आपलें दुर्दैव! त्याला इलाज नाहीं. पंडित शकारांशीं पंडितें असलेल्या यांचा कधीं विवाद झाला नाहीं. यांचा एकमेकांचा संबंध निर्मत्सर होता. परंतु आपण संस्कृत विषयाचे परीक्षक असतांना शेवटच्या परीक्षेंत एकहि विद्यार्थी पहिल्या वर्गांत पास झाला नाहीं, व याला कारण हे स्वत: त्या परीक्षेंत पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले नाहींत असें आहे असा विद्यार्थीमंडळांत असलेला बोभाटा निर्मत्सर आहे असेंच सुचवितो काय? सारांश, माझ्या सवालावरून सामान्य बुद्धीचा माणूस सुद्धां हेंच ह्मणेल कीं, यांनीं स्मशानांतल्या संधीचा उपयोग शकारांच्या व त्याबरोबर आपल्या स्तुतीनें 'अहोरूपमहो ध्वनिः'च्या नाटकाची रंगीत तालीम उठवून देण्याकडे केला. व तें यांच्या शीलाला साजेसेंच झालें. आतां राहिला एक मुद्दा व तो शकारांच्या चरित्राविषयीं डाक्टरांस कितपत खोल ज्ञान आहे याची चांचणी पहाण्याचा. शकारांच्या अंगीं वक्तयांनीं जे गुण लादले आहेत ते खोटे आहेत असें मी पुढच्या लेखांतून सप्रमाण सिद्ध करीन."

पुढच्या लेखांचा गोषवारा आह्मी देतों.

लेखपुष्प दुसरें—आयुष्याची रूपरेषा. जन्मले, शिक्षण झालें, नोकरी धरली, मानमरातबाला चढले, फुरसतीमध्यें सामाजिक चळवळी करीत

१ सदरहू विद्वद्वर्यांनीं वर जी आपल्या पांडित्याची शेखी मिरविली आहे ती अयथार्थ असल्याचें सिद्ध करण्याकरितां लोकांत प्रसिद्ध असलेली एक आख्यायिका येथें देतों. कोल्हापूरच्या एका शास्त्र्यानें नवा संस्कृत चंपू रचून तपासून शुद्ध करण्यासाठीं त्यांच्याकडे पाठविला. त्यांत एका जागीं 'वनं गाहते' असा प्रयोग साहेबांना दिसतांच त्यांना धरणीकंपासारखा धक्का बसला व त्यावर त्यांनीं अशास्त्रीयतेचा शिक्का मारला व 'वने गाहते' अशी सुधारणा केली. तो शास्त्री संस्कृत भाषेंत पारंगत होता. त्यानें साहेबांच्या ज्ञानाविषयीं काय तें अनुमान केलें व त्यांच्या सुधारणेकडे साफ दुर्लक्ष करून आपलें पुस्तक जसेंच्या तसेंच छापलें.

असत, बायको मेली, पदवी मिळाली, नोकरी सोडावी लागली, पुनर्विवाह केला, वीज पडून देहावसान झालें.

लेखपुष्प तिसरें—मतें व कर्तृत्व. मरणाच्या पूर्वी पुनर्विवाह केला या कारणानें त्यांचा सुधारकांनीं जयजयकार केला. परंतु दयानंदस्वामीची पुण्यास जी फजीती झाली तिची तयारी करण्यांत त्या वेळीं यांनीं प्रमुख भाग घेतला होता हें लोकांस माहीत असणें जरूर आहे. एके वेळीं समाजसुधारकांची नाचक्की करण्याची यांना हौस वाटत असे. बदफैलीपणाबद्दल किती तरी इतिहास सांगतां येईल. लोकांना बोलतां बोलतां हे कसे फसवीत याचें एकच उदाहरण— यांनीं एका काळीं भटांभिक्षुकांस गोळा करून तुळशीबागेंत श्रीमद्भागवताचा अधिकमासीं सप्ताह बसविला. भिक्षुकांशीं अट ही कीं, त्यास देवळांत जें काय मिळेल तें त्यांनीं यांच्या स्वाधीन करायचें, व भटांचा रोजचा कच्चा खर्च शकारांनीं चालवायचा. बिचारे भिक्षुक रोजची मिळकत यांच्या हवालीं करून अखेरच्या बिदागीच्या आशेनें आपलें नियुक्त काम चोख करीत होते. सप्ताहाचा काळ सरला तेव्हां भटांची सर्व प्राप्ति गिळंकृत करून या स्वारीनें त्यांना कांहीं मोबदला न देतां हाकलून लावलें. १८७० सालीं स्वारीनें पुनर्विवाहपक्षाच्या बाजूनें तरफदारी चालविली होती. परंतु तो निषिद्ध ठरतांच प्रायश्चित्त घेऊन ब्राह्मणांना भोजनें देऊन यांनीं शुद्धि करून घेतली. बायकांचे सारखे हक्क हा सुधारणेचा मुद्दा खरा परंतु त्याचा अनुभव शकारांच्या वर्तनानें पहिल्या बायकोला किंवा सध्यांच्या पत्नीला बिलकुल आला नाहीं. पहिली बायको छळानें मेली असा लोकापवाद आहे, आणि मनोरमाबाईशीं द्रव्यासाठीं मारामारी केल्याचें आह्मांस माहीत आहे. बडेजाव व्हावा व आपलें कुमार्गगमन सुरळीत रहावें एवढ्याच उद्देशानें त्यांनीं मनोरमाबाईला माळ घातली असें ह्मटल्यास हरकत नाहीं.......

लेखपुष्प चवथें—उद्योग. द्रव्याची हवी तशी उधळपट्टी करून दरिद्री झाले होते. वेश्यासंग, मद्यपान, जुगार इत्यादि यांचे व्यवसाय असत. शर्यतीच्या जुगारांत यांचा पैसा अतोनात गेला. यांचा हा नाद अखेरपर्यंत

कायम होता. पुनर्विवाहापूर्वींच त्यांच्या मिळकतीला खो बसला होता, मग जवळ शिल्लक कसची रहाते ? परंतु मनोरमाबाईसारखें कुळ मिळाल्यावर यांचे व्यवसाय जोरांत आले व स्वतःच्या धनाप्रमाणें त्यांच्याहि रोकडीचा फन्ना उडविण्यास यांनीं आरंभ केला. मनोरमाबाई द्रव्य देईनाशा झाल्या तेव्हां यांनीं 'सोनेरी टोळी'सारख्या एका लुटारू टोळीशीं संधान बांधलें व तिकडून द्रव्याचा पुरवठा चालू केला. पण त्या टोळीच्या कृष्णकारस्थानांत सामील झाल्याखेरीज त्यांच्याकडचा पुरवठा चालू रहाणें अशक्य असल्यानें अनेक गुप्त कृत्यें करावीं लागलीं व तीं साथीदारांच्या कौशल्यानें छपलीं गेलीं. पुढें मागें कधीं तीं उजेडांत आलींच तर शकारांचें नांव निघाल्याशिवाय रहाणार नाहीं. बाकी काळानें यांची लाज चांगली राखली. नाहीं तर यांना आपल्या सहकारी बंधूंसह बिनभाड्याच्या खोलींत दिवस घालविण्याचा प्रसंग आला असता. कदाचित् खुनासारख्या भयंकर अपराधाची मालकी यांच्याकडे येऊन यांना काळ्या पाण्याचेंहि दर्शन घडलें असतें. कोणीं सांगावें ? यांनीं सरकारी नोकरींत असतां अनेक अनन्वित प्रकार अधिकारबळावर केले व अखेरीस त्यांना त्याच कारणाकरितां सक्तीच्या राजीनाम्यानें राजसेवेशीं घटस्फोट करावा लागला.........

वारा वाहील त्याप्रमाणें गिरकी मारणाऱ्या पुरुषांचीं व्याख्यानें व लेख गोळा करून एकत्र छापण्याविषयीं एका वृत्तपत्रांत सूचना आली आहे. आमचें यावर असें मत आहे कीं, तसें करणें शुद्ध मूर्खपणाचें होईल. मनुष्य कोणत्याहि कारणानें पुढें आलेला असो, तो पुढें आला या एकाच कारणाकरितां त्याची तोंडी बडबड व कागदी खरडाखरड पुस्तकरूपानें प्रसिद्ध करणें इष्ट होणार नाहीं. राष्ट्रांत किंवा व्यक्तींत दुसऱ्याबद्दल आदरबुद्धीचा अतिरेक होणें हा एक प्रकारचा मनाचा रोग आहे. या रोगानें माणसाला स्वकर्तृत्वाचा अविश्वास वाटूं लागतो व अशा तऱ्हेची प्रवृत्ति उत्साह, साहस, निग्रह, धमक वगैरे सगळ्या सद्गुणाची माती करून टाकते. आजवर आह्मी परक्यांच्या असल्या नसल्या गुणांचा जो उदो केला त्याचीं कडू फळें चा-

खीत असतांहि आमचे डोळे उघडूं नयेत यासारखें दुसरें आश्चर्य कोणतें ? दुसऱ्यांचे स्तुतिपाठक होण्यांत खरा गौरव नसून त्यांचे गुण स्वतःमध्यें पहाण्यांत अस्सलपणा असतो अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. आमचें तरुण पिढीस इतकेंच सांगणें आहे कीं, त्यांनीं आदरातिशयाच्या रोगानें ग्रस्त न होतां दुसऱ्याचे गुण आपल्यांत आणण्याचा प्रयत्न करावा व आपण दुसऱ्याहून तिळभरहि मागसलेले नसून कांकणभर पुढेंच असल्याचें दाखविण्यांत धन्यता मानावी. नुसतें गुणांचें कीर्तन करूं लागला तर त्याच्या स्वीकाराचें इष्ट कार्य घडत नाहींच पण दुबळेपणा मात्र पदरीं येतो. दुसऱ्याच्या गुणाचा आदर वाटण्याऐवजीं तो आपल्यांत नाहीं ह्मणून मत्सरच वाटायला पाहिजे...राष्ट्राचा उद्धार करणारे पुरुष क्षणोक्षणीं निपजत नाहींत. ते पुरुष क्वचित् लोकाभ्युदयार्थ उत्पन्न होतात व त्यांचींच वचनें नव्या प्रजेच्या मनांत बिंबून जाणें श्रेयस्कर आहे. मोठेपणा मिरवणाऱ्यांच्या उष्ट्या माष्ट्या प्रतिपादनांचा संग्रह करूं गेल्यास त्या ग्रंथांनीं सगळें जग आटेल. खरा महात्मा स्वयंतेजानें लोकांचीं चित्तें भारून टाकतो. त्याची ओळख करून द्यायला असल्या दलालांची जरूर लागत नाहीं.

याखेरीज आणखी एक दोन लेखपुष्पें होतीं व त्यांच्या शेवटीं हा शेरा होता—

"अशा व्यसनी, बेजबाबदार चोराला आपला अग्रणी ह्मणून वंदणाऱ्या पुरुषांना काय नांव द्यावें हेंच आह्मांस समजत नाहीं. मी तर द्विपाद व पुच्छविषाणहीन पशूंत घालण्यास मागें पुढें पहाणार नाहीं. पुनर्विवाह करी तोंपर्यंत ज्या माणसाची विशेष प्रसिद्धि नव्हती त्यासच एकदम धुरीण पदवीवर चढण्यास पुनर्विवाह एवढेंच कारण पुरेसें होत असेल तर समाजनायकत्व मिळणें फारच सुकर आहे ह्मणायचें. असल्या चार दोन विधवांच्या लग्नानें राष्ट्रोन्नति होणार असें ह्मणणारे खुशाल ह्मणोत, पण मी त्यास अधःपाताभिमुख असें ह्मणण्यास कमी करणार नाहीं ... ... ... ... ...

समाजोद्धारकांनो ! खुशाल विधवांशीं लग्नें लावून आनंदानें नाचा. तु-

मच्या प्रयत्नानें राष्ट्रोन्नति खास होत नाहीं. अखेरीस पश्चात्ताप होऊन अरत्रीं ना परत्रीं अशा स्थितींत त्रिशंकूप्रमाणें अंतराळांत लोंबा. जुन्या लोकांच्या मतानें तुमच्यासाठीं यमदूतांचीं हत्यारें सज्ज आहेत. नरकाचीं द्वारेंहि आ वासून तुम्हांला पोटांत घेण्यासाठीं उत्सुक होऊन बसलीं आहेत."

ही लेखमाला प्रसिद्ध झाल्यानंतर लोकांत फारच खळबळ उडाली. ज्याला त्याला हा 'श्रीदत्त' कोण याची उत्कट जिज्ञासा भासूं लागली. शाकारांचा पक्ष धरलेल्यांनीं तर ज्या पत्रांत ही माला अवतरली होती त्यावर अब्रूनुकसानीची फिर्याद ठोठावण्यासाठीं मनोरमेची मनधरणी केली. "अरे चोरा, आम्हांला गट्ट करण्याकरितां नरकाचीं द्वारें आ पसरून बसलीं आहेत, का तुला व तुझा चारगटपणा प्रसिद्ध करून सन्मान्य व्यक्तींना निष्कारण कलंक फासणाऱ्या पत्रकाराला आश्रय देण्यासाठीं कैदखान्याचे दरवाजे तयार आहेत ते पाहूं आतां ! दम धर—" पुष्कळ समाजोद्धारक मिशांवर पीळ देऊन म्हणत—"तुझी न् तुझ्या पत्रकाराची हड्डी नरम नाहीं केली तर मिशी उतरून ठेवूं. अहो घमेंडनंदन, तुमची पाठ तेल मीठ लावून तयार ठेवा. आमच्या पाठीवर यमदूताचे आसूड केव्हां बसणार असतील ते असोत, पण सध्यां इहलोकींच्या न्यायदूतांकडून तुला चांगले कोरडे बसविल्याशिवाय आमचें समाधान होणार नाहीं." एवंच मनास येईल तसें यद्वातद्वा बकण्यास सुधारणाप्रिय लोकांनीं सुरुवात केली.

जुन्या मतांच्या लोकांना हीं एका नांवाजलेल्या सुधारणाधुरीणाचीं बिंगें बाहेर आलेलीं पाहून अधिकच आनंद झाला व ते या प्रकरणाचा शेवट कसा होतो हें पहाण्यासाठीं तिकडे डोळे लावून बसले.

या श्रीदत्तावर अब्रूनुकसानीचा दावा कोर्टांत मांडावा असें सुचविणारांना मनोरमेचें ठराविक उत्तर होतें कीं, माझ्या दुष्कृत्याचें आविष्करण होऊन जर भकलेल्या लोकांच्या डोळ्यांत अंजन पडून दृष्टि साफ झाली तर माझें कुकर्महि सत्परिणामी झालें असें मला वाटतें. रा. ब. शाकारांच्या चरित्राची माहिती देतांना जरी अतिशयोक्ति झाली तरी पण ती

मूळांत सत्य आहे. तेव्हां अब्रूनुकसानीच्या दाव्यानें त्या सत्याला दडपून टाकण्यास मी तयार नाहीं. मी अगोदरच धर्मबाह्य आचरण करून धर्माचा कोप माझ्यावर ओढवून घेतला आहे. आतां सत्याचा अपराध करण्याची माझी इच्छा नाहीं. मीं सुधारणा ह्मणून जी गोष्ट केली ती करून मी फसलें असें मला आतां वाटत आहे. बाबांनो, पत्रकारावर खटला करून त्यास निष्कारण ताप देऊन आह्मी कोणता मोक्ष संपादणार आहोंत ? दुष्कर्म करण्याची ज्यास लाज वाटत नाहीं त्यास तें प्रसिद्धीस येण्याची लाज कां वाटावी ? तुह्मी अनर्थ करून तो लोकांत प्रकट करणारांना जरब देणार हें मला इष्ट वाटत नाहीं. चालला आहे तोच प्रकार इष्ट आहे. अशी फजीती झाल्यावांचून तुमचे डोळे उघडणार नाहींत. तुह्मी जुन्या मतांच्या लोकांवर भडिमार करतांना कधीं त्यांच्या अब्रूची काळजी घेतां का ? त्यांनीं तरी तुमची भीड कां बाळगावी ? जा, मी कोणत्याहि मार्गानें होत असलेल्या आमच्या उपहासांत ढवळाढवळ करून व्यत्यय आणणार नाहीं. तुह्मी जा, व खुशाल मनास येईल तें करा. व्यक्तिस्वातंत्र्याचें, मतस्वातंत्र्याचें हें युग आहे. माझी प्रकृति ठीक नाहीं.''

अब्रूनुकसानीच्या फिर्यादीबद्दल चाललेल्या वल्गना मंदावल्या व तसा खटलाहि झाला नाहीं. मनोरमेनेंच अंगाबाहेर टाकल्यानंतर विकत श्राद्ध घेऊन पितृतर्पण करतो कोण ?

चमत्कार असा कीं, थोड्याच दिवसांनीं वरील लेखमालेंत भविष्य वर्तविल्याप्रमाणें एक सोनेरी टोळी पकडली जाऊन तींतील गुन्हेगारांनीं न्यायमंदिरांत वाचलेल्या स्वतःच्या कर्तबगारीच्या पाढ्यांत रावबहादुरांच्या नांवाची नोंद होती. त्यांचें या लोकांच्या धंद्यांत कर्तेपणानें पाठबळ होतें असें कित्येकांच्या जबानींत आलें. हा प्रसंग येऊन ठेपण्यापूर्वींच परमेश्वराच्या दयेनें रावबहादुर इहलोकांतून पार झाले होते.

हा सोनेरी मंडळीचा खटला प्रसिद्ध झाल्यावर श्रीदत्ताच्या प्रतिपक्ष्यांचीं तोंडें अगदींच बंद पडलीं व इतर मंडळींना जोर चढला.

प्रल्हादपंताचे घरीं दत्तोपंत यासंबंधीं चाललेल्या संवादांत ह्मणाले—"पुढाऱ्यांचें वर्तन निष्कलंक असल्यावर लोकांना टवाळी करतांच येणार नाहीं. आपलें शील सकलंक आहे हें लोकांनीं पाहिल्यास कायद्याच्या मदतीनें त्याची दोषदृक् प्रवृत्ति बंद करणें ह्मणजे आपल्याच वर्तनानें आपला दोष उघडकीस आणण्यासारखें आहे. आपलें वर्तन शुद्ध ठेवण्याऐवजीं असलेले दोष झांकण्याकडे या समाजोद्धारकांचा कल असतो. अशा लोकांची पूर्ण फजिती कधीं तरी होऊन सत्य उजेडांत आल्याशिवाय रहात नाहीं. सत्याचा विजयच व्हायचा."

---

## प्रकरण चोविसावें.

## बिकट प्रसंग.

रावबहादुरांचा शेवट झाल्यानंतर मनोरमेच्या मनाची फारच विचित्र स्थिति झाली होती. द्वितीय शरीरसंबंधांत आपण पातकाची जोड केली अशी तिला खात्री वाटूं लागल्यापासून तिच्या आरोग्याच्या क्षयाला आरंभ झाला हें वाचकांच्या निदर्शनास आलेंच आहे. त्या व्याधींतून बरें होऊन पुनः ऐहिक पसाऱ्यांत आनंदानें वागण्याचे दिवस आपल्यास पहावयास सांपडतील याबद्दल तिचें मन निःशंक नव्हतें, इतकेंच नव्हे तर उलट आपल्या प्राणधारणेची कालमर्यादा फारच थोडी उरली आहे असेंच तिला वाटे. अंतर्विकारानें कोमेजूं लागलेलें तिचें जीवन पुन्हां प्रफुल्ल होईल अशी आशा व्यर्थ होती. परंतु दुःखोद्वेगांत तिनें आत्मघातानें जगत्संबंध एकदम तोडून टाकण्याचें साहस कधींच मनांत येऊं दिलें नाहीं. धर्माकडे तिच्या मनाचा कल झाल्यापासून त्याच्या विधिनिषेधाबरहुकूम वागण्याचा तिचा प्रयत्न असे अर्थात् स्वहत्या हें इहलोकींच्या त्रासांतून जीवाची सोडवणूक करणारें साधन असलें तरी परलोकीं त्या कृत्याची नीच कोटींतल्या पातकांत गणना होऊन आपण होऊं घातलेल्या शिक्षेच्या प्रमाणांत उग्र भर घालूं असें तिला

वाटे. पातकाच्या भयाखेरीज तिचा कंटाळा आलेल्या प्राणांचा त्याग न करण्यांत दुसरा हेतु होता, व कदाचित् तोच हेतु तिचें मन भलत्या-सलत्या साहसापासून परावृत्त करीत असेल. पुत्राचें बाळपण तिच्या डोळ्यांपुढें निरंतर असे, व अशा बालकाला अनाथ स्थितींत जगांत सोडून आपण लोकान्तरांत कृतकर्माचा झाडा देण्यासाठीं निघून जाण्याची कल्पना तिच्या हृदयाला सहन होत नसे.

पातकाची जाणीव रात्रंदिवस हृदयांत सलत असलेल्या व्यक्तीला स्वतःचा अत्यंत तिरस्कार वाटतो व त्याप्रमाणें मनोरमेलाहि वाटत होता. तिला तिचें शरीर गर्ह्य भासे, व लोकांनीं, स्वजनांनीं, स्वधर्मानें– स्वदेशांतल्या सनातन कायद्यांनीं– धिक्कारलेला हा हाडामांसाचा आकारविशिष्ट पिंड जितक्या लवकर पांचा तत्त्वांत लय पावेल तितका बरा अशीहि तिची बलवत् भावना होती. असें असलें तरी या पिंडाची समाप्ति आपल्याच हातांनीं करावी हा विचार मात्र पुत्रमोहाच्या दुर्निवार मनोवृत्तीमुळें कधींच रुचला नाहीं. कालाच्या घशांत आपल्या पायांनीं चालत जाण्यापेक्षां त्याच्या सहज ओघांत आपण सांपडेपर्यंत दम धरावा हेंच तिच्या मतें युक्त ठरलें. आपल्या व आपल्या प्रथमपतीच्या ज्या शुद्ध व सात्त्विक प्रेममय संबंधांत हें बाळ जन्मास आलें त्याचें संगोपन करण्याला आपला अधम देह अयोग्य आहे अशी कल्पना तिच्या मनांत वारंवार खेळे, व त्याबरोबरच द्वितीय पतीच्या संबंधकालीं आपलें पुत्रप्रेम गढुळ कसें झालें नाहीं याचेंहि तिला मधून मधून आश्चर्य वाटे. एकदां अशा विचारांचा चित्तांत क्षोभ झाला ह्मणजे ते कोणीकडे वहावतील याचा अगदीं नेम नसे.

आपण सुखासाठीं पुनर्विवाह केला खरा पण या भलत्याच आचाराचें– अत्याचाराचें– बीज आह्मां महाराष्ट्रीयांमध्यें पेरलें कोणीं ? ही अकल आमची खास नव्हे. या अकलेची हुंडी परक्या देशांतून इकडे प्रथमतः त्यांच्या राजसत्तेबरोबर उतरली. आमच्या हितासाठीं ह्मणून परस्थांनीं आह्मांला यांच्या धर्मांतलीं तत्त्वें शिकविण्यास सुरुवात केली. त्यांच्या उपदेशाचे प्रति-

ध्वनि आह्मी काढूं लागलों व त्याचा हा सारा परिणाम आहे. आमचीं दु:खें निवारून आमच्यांत शान्ति नांदावी, एवढ्यासाठीं आह्मी अमलांत आणलेले उपाय आमचा इष्ट हेतु पुरविण्याऐवजीं कलहाचे अथवा अशांतीचे प्रवर्तक व्हावेत याचा अर्थ काय? पश्चिमेकडच्या चालीरीति इकडे प्रचारांत येऊन चांगल्या रुजल्या ह्मणजे आह्मांसारखें सुखी कोणी नाहीं अशी भलतीच भावना करून घेऊन त्या नादीं लागण्यापूर्वी पश्चिमेकडच्या मानवी समाजांचें निरीक्षण केल्यास काय आढळतें? स्त्री-पुरुषांत प्रेम आहे का? गृहसौख्य तरी लाभतें का? प्रपंचसुखाचें कोणतेंहि अंग पाहूं गेल्यास तें कलहाच्या पुटांनीं भेसुर झालेलें दृष्टीस पडेल.

ती आपल्या कृत्याची मीमांसा अशा तऱ्हेनें नेहमींच मनांत करी असें ह्मणतां यावयाचें नाहीं. कधीं कधीं तुडुंबलेल्या जलाशयाला पाट फोडून द्याव्या लागतो त्याप्रमाणें तिलाहि स्वत:च्या अंतर्गत विचारांची खळबळ वाणीच्या द्वारानें कोणाजवळ तरी बाहेर टाकावी लागे व असें करायला तिला विश्वासूक असा माणूस फक्त दत्तोपंताखेरीज दुसरा बहुधा कोणी सांपडत नसे. मनोरमा दु:खाकुल असूनहि हे विक्षिप्त गृहस्थ तीव्र वाक्प्रहर करून तिच्या मर्मावर घाव घालण्यास कमी करीत नसत. पण चमत्कार असा कीं, या दत्तोपंताच्या कृतीनें चिडून त्याशीं बोलण्याचें तिनें कधीं सोडून दिलें नाहीं. तिचा तो क्रम चालूच असे. दत्तोपंत एखादे वेळीं दृष्टांतादाखल जीं उदाहरणें तिच्यापुढें मांडी तीं तिच्या गतकालांतील निरनिराळ्या प्रसंगांशीं इतकीं ततोतंत जुळत कीं त्याचें तिला अनेकदां आश्चर्य वाटे. ज्युलिएटच्या प्रेमाशीं तिच्या व नारायणरावाच्या प्रेमाची तुलना केलेली वाचकांस स्मरतच असेल. ती व तशाच तऱ्हेच्या इतर अनेक बाबींत तिला त्याच्या बिनचूक उदाहरणाचें कौतुक वाटे. दत्तोपंताविषयीं तिचा सादर विश्वास दिनानुदिन वाढत चालला होता व एकदोनदां तर आपल्या पश्चात् – तसा प्रसंग जर थोड्यावरच ठेपला असेल तर— मधुकराची काळजी घेण्याचें काम दत्तोपंतानें करावें अशीहि इच्छा तिनें त्याजवळ

प्रकट केली होती. दत्तोपंतांनीं रुकार अथवा नकार यांपैकीं कोणत्या मार्गाचा अवलंब न करतां मौन स्वीकारलें होतें.

दुसऱ्याचें अनुकरण करण्यांत आपण जी पातकी चूक केली ती अगः परमावधीची होती हें तिला कळून चुकलेंच होतें. स्त्रियांचें पातिव्रत्य कित्येकदां दोन राष्ट्रांत वैर माजण्याला कारण होऊन त्यांच्याकरितां त राष्ट्रांतील पठ्यांचें रक्त भूमीवर सांडण्याचे इतिहासपुराणांतले प्रसंग तिच वाचनांत पुष्कळ ठिकाणीं आले होते. यःकश्चित् स्त्रियांच्या अब्रूकरि संग्रामापर्यंत मजल यावी यांतील रहस्य तिला अलीकडे कळूं लागलें हो व तीच ह्मणूं लागली कीं, "एका राष्ट्राच्या पायीं दुसऱ्या निर्बल राष्ट्रानें आपर राज्यश्री वाहिली तरी कुटुंबश्रीचा उपमर्द झाल्यास तें राष्ट्र वाघाप्रमाणें चव ताळून उठेलच उठेल. सगळ्या पृथ्वींतील माणसांचे देह सारखे असती पण तेवढ्यानें त्यांच्यांत अगदीं निर्भेळ सादृश्य असणें शक्य नाहीं. भूतल वरील ज्या भागांत त्यांनीं हजारों वर्षें काढलीं असतील तेथील हवापाण्याच भेदाप्रमाणें त्यांची स्वभावरचना झालेली असते. ज्या भूभागांत त्यांनीं अ पल्या स्वतंत्र आपलेपणानें दिवस घालविले, त्याबद्दल त्यांस उत्कट अभिमा वाटणें अपरिहार्य आहे व त्या आपलेपणासाठींच जगांत मारामाऱ्या हो असतात. धर्म, कर्म, स्वभाव, भाषा इत्यादि सर्व गोष्टींतला आपलेपण एका पिढीतून दुसऱ्या पिढींत जशाचा तसा अथवा अधिक प्रमाणांत उत विण्याचें कार्य ईश्वरानें स्त्रियांकडे सोंपविलें आहे. स्त्रियांची अब्रू जितक चोख व सतेज असेल तितके मागच्या पिढींतले गुणदोष पुढची पिढी घे ऊन उठते. इतक्या बारकाईनें विचार केला ह्मणजे बायकांच्या निमित्ता झालेले तंटे निवळ बायकांच्या जातीकरितां झालेले नाहींत असें दिसून येईल त्या राष्ट्राची वंशशुद्धि स्त्रियांच्या हातीं असते व ती कायम रहाण्याकरि लढाया उपस्थित होतात. दुर्दैवानें बलवान् परेच्छेपुढें माना वांकवाव लागल्या, राज्यश्री हजर करावी लागली तरी स्त्रियांना अर्पण करण्यास कं णीहि तयार असणार नाहीं. पण सांप्रत गंमत अशी झाली आहे कीं, आ

महाराष्ट्रीय स्त्रिया— दोनशें वर्षांपूर्वी ज्यांच्या पराक्रमाचा मासला सगळ्या जगास पहावयास सांपडला त्या लोकांच्या वंशज कन्या— आपल्या हातानें आपलें पातिव्रत्य दुसऱ्याच्या अधीन करण्यास तयार होत आहेत. पुनर्विवाहाच्या मिषानें व्यक्तिशः भ्रष्ट होणारी पतिनिष्ठा एकूण हिशोबांत सगळ्या राष्ट्राच्या कर्तृत्वाच्या मूळावर तीव्र घाव घालीत आहे इकडे कोणाचें लक्ष कसें जात नाहीं? ही कालाची वक्रगति नाहीं असें कसें ह्मणावें!'' अशा तऱ्हेची तिच्या विचारांत क्रांति झाली होती.

एकदां ती याप्रमाणें स्वतःच्या गतकालाचा विचार करण्यांत गुंग असतां अलीकडे बरेच दिवस स्वीकारलेल्या परमार्थमार्गाची दीक्षा देणाऱ्या गुरुजीकडून कांहीं महोत्सवानिमित्त मठांत येण्याविषयीं तिला निमंत्रण आलें. परमेश्वरसेवेशिवाय आपल्या मनास किंचित् तरी समाधान मिळण्यास अन्य साधन नाहीं हा तिच्या मनाचा निर्धार झाला होता. मनुष्यनिर्मित व सामान्यतः मनुष्याकार प्रतिमांमध्यें ज्या अचिंत्य शक्तीच्या प्रभावानें या अनंत विश्वविस्ताराचें नियमन होत असतें तिचा अंतर्भाव करून पूजा अर्चा करण्यासंबधीं ती जरा विरुद्ध असे. परंतु एवढ्यावरूनच तिनें घरांतल्या देवदेवतांना जलसमाध दिली असेल असें ह्मणतां येणार नाहीं. प्रथम पति असतांना, ह्मणजे तारुण्याच्या ऐन रंगांत त्यांना ईश्वराची दाद नव्हती. स्वतः त्यांनीं मनानें अथवा शरीरानें परमेश्वरसेवेला सोडचिठ्ठी दिली होती; परंतु घरांतल्या देवांची पूजा ब्राह्मणाकरवीं यथास्थितपणें त्यांनीं चालू ठेवली होती. नारायणरावानंतर कांहीं दिवस हा प्रकार मोडला नव्हता. विष्णुमामंजीचें भय तिला तसें करूं देत नसे. जेव्हां तिनें पुनर्विवाह केला तेव्हां मात्र जातिबहिष्कृत व पतित कुटुंबाच्या घरीं जाऊन धर्मविधि करण्याला ब्राह्मण मिळेना. जनतेच्या क्षोभापुढें द्रव्यलाभाची आशा सोडून भटाभिक्षुकांना नमावें लागलें, व असें होणें स्वाभाविक होतें. या वेळेपासून पुढें कांहीं दिवसपर्यंत देवांवर धूळ सांचण्यास सुरुवात झाली; पण लवकरच मनोरमेच्या चित्तवृत्तींत एकदम फरक पडल्यामुळें पुन्हां देवांना चांगले दि-

वस लाभले. आपल्या पतितांच्या घरीं देवाची सशास्त्र दैनिक सोय लावण्यास वेदज्ञ ब्राह्मण धजत नाहींत असें पाहून तिनें तें काम स्वतःच अंगावर घेतलें. रावबहादुरांनीं तिच्या या धर्मभोळेपणांत व्यत्यय आणण्याचा प्रयत्न केला पण तो सफल न होतां अखेरीस हिची धर्मश्रद्धा उत्तरोत्तर बळावतच चालली. ती अत्यंत भाक्तिभावानें घरांतल्या ईश्वरप्रतिमांची पूजा करी, तरी पण तिचें मन तिला वारंवार खात असेच. तिला आपल्या विटाळलेल्या देहानें या पूज्य मूर्तीस स्पर्श केल्यास आपण पातकांचीच भर करणार नाहींना असें भय वाटे व एकदोनदां तिनें तो संशय दत्तोपंतापाशीं व्यक्तहि केला. त्यावर दत्तोपंतांनीं तत्काळ उत्तर दिलें—"परमेश्वर हा दीनांचा, पतितांचा वाली आहे. मनुष्यसृष्टींत जसा उच्चनीच हा भेदभाव आहे तसा त्याजवळ नाहीं. धर्माचरण करणारांना तारीन व धर्मभ्रष्टांचा अव्हेर करीन असें त्यानें कोठेंच ह्मटलेलें नाहीं. धर्माचरण करणारांना आपण परमेश्वराचे लाडके आहों, तो आपल्यावर अनुग्रह करील अशी खात्री वाटत असते खरी, पण अनुतापाच्या भट्टींत तावत असलेल्या पतिताचा करुणस्वर त्याच्या कानांत जितका लवकर व अधिक भिनतो तितका धर्मकर्मांत गढलेल्यांच्या रोजच्या प्रार्थनांचा सूर भिनत नाहीं. कधीं कधीं अनुतापदग्धांच्या हृदयांतच परमेश्वराबद्दल अत्यंत शुद्ध भक्ति विशेष विकास पावते. केवळ कर्मठपणांत खऱ्या श्रद्धेचा अभाव आढळतो. मनोरमाबाई, तुह्मी परमेश्वराचा धांवा आपण पतित आहों अशा खऱ्या जाणिवेनें करा ह्मणजे पतितांचा उद्धार करणारा तो तुमच्याकडे धांव घेतल्याशिवाय खचित रहाणार नाहीं."

मनोरमेला पुराणग्रंथांत पश्चात्तप्त पतितांवर अगदीं कळकळीनें द्रवून परमेश्वरानें अनुग्रह केल्याचीं पुष्कळ उदाहरणें वाचावयास सापडूं लागल्यापासून तिचा परमेश्वराची कास धरण्याचा निश्चय दुणावला. अनंतब्रह्मांडनायकशक्तीची तिला वारंवार आठवण होऊन तिनें आपली एक उपास्य देवता ठरवून तिच्या गुणवर्णनांत ती बहुधा तल्लीन असे. परमार्थाची तळ-

मळ लागली ह्मणजे गुरुदर्शन घडतें अशा तऱ्हेचे दाखले आपणांस परमार्थ-वाङ्मयांत अनेक आढळतात. त्याचा प्रत्यय मनोरमेस आला. ब्रह्मसुखासाठीं तळमळणाऱ्या मुमुक्षूस मोक्षाची वाट दाखविणारे आपोआप भेटतात, पण मनोरमेनें एका व्यक्तीची मार्गदर्शक ह्मणून गांठ घेतली. या वाटाड्यानें जाहिरात लावून जिज्ञासूंस मोक्षमार्ग दाखविण्याचा धंदा पत्करला होता व त्याबद्दल तो थोडीशी फी पण घेत असे. ती फी भरून इतर हजारों लोकांप्रमाणें मनोरमेनेंहि गुरुमंत्र ग्रहण केला होता. परंतु वाटाड्याच्या आचरणाबद्दल तिच्या मनांत फारसा गौरव नव्हता, व पुढें पुढें तर गुरुजींविषयीं आदरभाव सोडून ती उदासीन बनली होती. दीक्षा घेतल्यानंतर तिनें फारच थोड्या प्रसंगीं मठांत पाऊल टाकलें होतें ह्मणून तिची चवकशी गुरुमहाराज वारंवार करीत असत. एखाद्या देवतोत्सवाचे वेळीं ते तिला आग्रहाचें निमंत्रणहि पाठवीत. त्यांतलेंच आजचें एक होतें. "आपली प्रकृति नादुरुस्त असल्यामुळें गुरुजींच्या निमंत्रणाचा स्वीकार करवत नाहीं" असें तिनें विनयानें बोलावणें करण्यास आलेल्या शिष्याला सांगितलें, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. "नुसतें उभ्या उभ्या तरी आपण यावेंच" अशी गुरुजींची निग्रहाची आज्ञा असल्याचें शिष्यानें ह्मटल्यावर तिनें आपण रात्रीं नऊ साडेनऊ वाजण्याच्या सुमारास येऊं असा रुकार दिला व त्याप्रमाणें रात्रीं ती तेथें गेली. पुढें काय झालें हें वर्णन करण्यापूर्वीं गुरुमहाराजांच्या मठाची व तेथल्या परिस्थितीची थोडीशी माहिती वाचकांस देणें इष्ट आहे.

गुरूंच्या भजनीं लागलेल्या एका धनिक चेल्यानें शहराबाहेर असलेल्या स्वतःच्या मालकीच्या एका मोठ्या थोरल्या बागेंत गुरुमहाराजांना मठ बांधून दिला होता. मोक्षसाधनें अनेक आहेत व जो ज्याचें अवलंबन करतो तो वारंवार त्याचेच गोडवे गात असतो असा सा[illegible] नियम आहे. नुसतें हरिनामसंकीर्तन भक्ताला संसारसागर तारणारच असें कोणी प्रतिपादितात, तर वरील गुरुसंप्रदायी महाराज यूंन गुरूची

पुरस्कर्ते असल्यामुळें त्यांना प्राणायामप्रत्याहारादि योगांगें मान्य होतीं. "नात्युच्छ्रितं नातिनीचं" हें गीतावाक्य त्यांच्या तोंडांत नेहमीं असे. योगसाधनाला उचित असें स्थान शिष्याच्या निष्ठेमुळें त्यांस मिळालें. गांवापासून फार दूर अथवा जवळहि ह्मणतां न येण्यासारख्या वरील जागीं महाराजांनीं आपला तळ दिलेला होता. ही बाग ज्या धनिकाची होती त्याच्या उन्हाळ्यांत रहाण्यासाठीं बांधलेल्या बंगल्याला मठाचें स्वरूप मिळालें व धर्मचर्चेचें तें एक प्रमुख स्थान होऊन बसलें. या मठाभोंवतीं दाट आंबराई असून इतरहि अनेक उपयुक्त वृक्षांची गर्दी होती. स्नानसंध्येला अतिशय सोयीचा असा एक विस्तृत हौदहि मालकानें त्यास बांधून दिला होता. स्थल अगदीं निवांत अतएव योगाभ्यासास फारच उत्कृष्ट होतें. मठाला रहदारीच्या गलबल्याचा उपसर्ग मुळींच नव्हता. या जागीं स्वामींचा सध्यां मुक्काम होता. सध्यां ह्मणण्याचें कारण इतकेंच कीं, महाराजांचा कार्यव्याप फार दांडगा असल्यानें त्यांस एका ठिकाणीं चिकटून सतत रहातां येत नसे. महाराष्ट्रांत मोठमोठ्या शहरीं यांचे मठ होते व तितक्या ठिकाणीं त्यांस हिंडावें लागत असे. असो.

या मठाचें नांव स्वामींनीं 'वैकुंठधाम' असें ठेवलें होतें. या वैकुंठधामांत महाराजांचा शिष्यसमुदाय जमून त्यांच्या मुखांतून स्रवणाऱ्या उपदेशामृताचें आकंठपान कर्णपुटानें करण्याकरितां सदैव सतृष्ण असे. महाराज हे नुसत्या धर्मोन्नतीचे कैवारी नसून कोणत्याहि राष्ट्राचें आत्यन्तिक ध्येय जें स्वातंत्र्य त्याच्या साधकांपैकीं ते एक प्रमुख असल्याबद्दल त्यांच्या शिष्यांत मोठी बोलवा होती. धर्मग्लानीच्या काळांत जन्मास येणाऱ्या ईश्वराच्या विभूतींपैकीं ते एक असावेत किंबहुना सतराव्या ख्रिस्ती शतकाच्या ॰र्धांत प्रसिद्ध रामदूताच्या मानुषी अवतारानें जें राष्ट्रकार्य केलें तेंच कार्य ॰च्या बिकट परिस्थितींत पार पाडण्यासाठीं महाराजांचा अवतार आहे अ॰ बेधडक सांगत. लोकांना आपल्या शास्त्यांपासून हवे असलेले स्वातंत्र्यसु॰ हक्क कांग्रेससारख्या राष्ट्रीय सभांतून आरडाओरड करून

मिळणार नाहींत, असल्या चळवळींनीं कांहीं होणार नाहीं, असें विधान ठोकून निराश झालेल्या शिष्यांना उत्साह यावा ह्मणून ते बजावून सांगत कीं, नाक धरून प्राणायामाचे प्रयोग केल्याशिवाय राष्ट्रकार्य सिद्धीस जाणार नाहीं. आपल्या परवत्तेच्या दीनवाण्या स्थितींतून सुटण्यास व्यासरामांनीं फक्त योगाभ्यासाचाच एक बाण शिलकेंत ठेवला आहे. याला आधार साधुसंतांच्या वाणींत सांपडतो. राष्ट्रीय तापसी प्रसिद्ध रामदास चळवळीचें सामर्थ्य कबूल करतात पण तिच्या पाठीवर ईश्वर पाहिजे एवढेंच त्यांचें ह्मणणें आहे. ईश्वराचें अधिष्ठान योगाभ्यासरत झाल्यावांचून मिळणार नाहीं. स्वामींच्या वचनावर शिष्यांचा फार विश्वास असे. आपण स्वतंत्र होण्यास महाराजांनीं सांगितलेला उपाय लवकर फलप्रद व्हावा ह्मणून ते गुरूक्त विधीनें उपासनाकालीं आपला श्वासोच्छ्वास नियमित करीत असत. सकाळच्या प्रहरीं तर गायत्रीमंत्राचा जप व प्राणायामाचे सुस्कारे पाहून एखाद्याला आतां आपल्या देशावर भाग्याचा पूर लोटतो कीं काय असें भय वाटलें असतें.

मठपरिसरांत पाऊल ठेवल्यापासून मनोरमेला त्या रात्रीं मठांत न जावें-सेंच वाटूं लागलें. मठामध्यें जर उत्सव आहे असें आपणास कळविण्यांत आलें होतें तर तद्दर्शक गलबला मुळींच ऐकूं येत नाहीं हें काय गूढ आहे अशी शंका मनोरमेच्या मनाला भय दाखविण्यास लागली. कदाचित् आपणास उशीर झाला असेल असें तिनें समाधान मानलें व अगदीं संथ-पणानें ती मठाच्या बाजूस एक एक पाऊल टाकूं लागली. गुरुसहवास होणार असतां तिच्या मनांत मठाच्या हद्दींत शिरल्यापासून प्रसन्नतेऐवजीं चुटपुट मात्र लागून राहिली होती. आपल्या बरोबर आणलेल्या माणसास बागेच्या दारांत सोडून ती तडक मठाकडे निघाली पण मठ जसजसा जवळ येऊं लागला तसतसें तिचें औदास्य वाढूं लागलें. ती क्षणभर थांबली व आपण परत फिरावें असें एकवार तिला वाटलें. आपला सेवक बरोबर असावा असें वाटून ती त्याला हाक मारण्याच्या बेतांत होती तोंच ब्राह्मणे-तर—नव्हे महाराष्ट्रीयेतर—जातीच्या मनुष्यास हा आश्रम वर्ज्य आहे हें तिला

स्मरलें व आपल्या परदेशी सेवकास आंत आणून गुरुकोप प्रवृद्ध करण्याचें साहस तिनं टाळलें. ती विमनस्क स्थितींत कशीबशी मठाच्या दाराशीं आली. दार अर्धवट उघडें होतें. त्यांतून तिनें आंत डोकावून पाहिलें तों महाराज डोळे मिटून स्वस्थ बसलेले तिच्या दृष्टीस पडले. महाराज समाधिस्थ आहेत तेव्हां आपण परत जावें असा विचार ठाम ठरवून तिनें मठाकडे पाठ फिरविली तोंच "कोण आहे ?" असे गुरुशब्द तिच्या कानावर आदळले. "मी आहें मनोरमा" असा तिनें विनयाच्या स्वरांत जबाब दिला.

"परत कां चाललीस ?"

"आपण ध्यानस्थ होतां ह्मणून."

"बरें आतां आंत ये."

असे सवाल जबाब होऊन मनोरमा मठांत गेली व दूर उभी राहिली.

"अशी दूर कां, जवळ येऊन बस."

"मी येथें बरी उभी आहें." नंतर विषयान्तर करण्याच्या हेतूनें मनोरमा ह्मणते– "आज जवळ कोणी माणूस दिसत नाहीं ?"

"या जगांत कोण कोणाचा आहे ? प्रत्येक प्राणी एकटा येतो आणि एकटाच जातो. सगळा परिवार येथेंच टाकावा लागतो. मनुष्याच्या आयुष्याच्या आदिअंताची ही गोष्ट ध्यानांत वागवून तर महात्मे पुरुष निःसंग होतात. जसा आरंभ व शेवट एकटेपणांत तशीच मधली स्थितीहि एकटे राहून ते घालवितात. पण मनोरमे, या जगांत त्या एकांतांतून माणसाला ओढून घेण्याचें सामर्थ्य फक्त स्त्रियांना आहे. या स्त्रिया, मनोरमे, आह्मां संगवर्जितांना देखील आकर्षून घेण्यास सोडीत नाहींत."

"महाराज, आपणासारख्या ब्रह्मसुखाचा रस चाखणाऱ्या महापुरुषांना प्रपंचसुखाची व स्त्रियांची किंमत न वाटावी ह्मणूनच मी आपली मुकाट्यानें परत चालल्यें होतें. पण आपणच ना मला हाक मारलीत ? मी जातें; आपला एकांतभंग झाल्याबद्दल क्षमा करा."

"छे, छे, मीं तुला आज येथें बोलावलें तें कशाकरितां ? आजची रात्र

तुझ्या सहवासांत तुझी सेवा घेऊन काढावी असें मला वाटल्यावरून तर मी आज तुला बोलावणें पाठविलें.'''

मनोरमेचें अंग थरारलें व त्यावर कांटा उभा राहिला.

''महाराज, खुषीची सेवा घेणें सदैव चांगलें. सेवक सेवेला उत्सुक असावयास पाहिजे का मालकांनीं त्याला सक्तीनें चाकरी करावयाला लावावी! गुरुशिष्यांतला सेव्यसेवकभाव व्यवहारांतल्यासारखा नाहीं. देव कधींहि माझी उपासना करा ह्मणून सांगत नाहीं. उपासकच स्वेच्छेनें त्याकडे जातात.''

होय, तें खरें आहे, पण गुरूची इच्छा शिष्यांना शिरसावंद्य असली पाहिजे.''

''पाहिजे, पण ती शिष्याच्या इच्छेनें पाहिजे.''

''बरें तें असो, तूं इथें माझ्याजवळ बस'' असें ह्मणून स्वामी उठले. मनोरमेला आतां काय करावें हें सुचेना. आसपास एकहि माणूस नसून फक्त धिप्पाड शरीराचे गुरु व अत्यंत सुकुमार अशी ती याखेरीज कोणीहि नव्हतें. तिनें महाराजांना तत्काळ विनंति केली, ''महाराज, माझी तब्येत सध्यां ठीक नाहीं; मला घरीं जाऊं देण्याची कृपा करा.''

''मनोरमे, चल बाहेर चल, बाहेरची गार हवा खाल्ल्यावर तुला हुशारी वाटेल. चल.'' महाराजांनीं तत्काळ तिचा हात धरला व तिला मग बाहेर घेऊन निघाले. महाराजांच्या हाताची पक्कड सोडविण्यासाठीं मनोरमेची धडपड चालू होती. ती अखेरीस निरुपाय होऊन ह्मणाली– ''महाराज, अशा तऱ्हेनें एकट्या स्त्रीला हातीं धरून फिरतांना आपणास कोणीं पाहिलें तर लोकांत आपली छीः थुः होईल. महाराज, आपली वृत्ति आज ताळ्यावर नाहीं. माझा हात सोडा. इकडे जवळ कोणी असेल. मला घरीं जाऊं द्या.''

''मनोरमे, घाबरूं नको, आपल्या जवळ कोणी नसण्याची मीं अगोदरच व्यवस्था करून ठेवली आहे. मनोरमे, जीव लावून आणि देह लावून गुरूची

सेवा करणें प्रत्येक स्त्रीशिष्यिणीचें कर्तव्य आहे."

"महाराज, काय अभद्र बोलणें हें!"

"चल आपण या बागेंतून जरासे फिरून परत येऊं."

मनोरमेच्या अंगाला आतां दरदरून घाम सुटला. तिला आतां महाराजांचें स्वरूप कळलें, व ती एकदम मोठ्यानें ह्मणाली, "मेंढीचें कातडें पांघरलेल्या लांडग्यासारखी तुमची स्थिति आहे."

"मनोरमे, संभाळून बोल. आतां तूं सर्वस्वीं माझ्या तावडींत आहेस. आजपर्यंत तूं माझ्या कचाट्यांतून सुटली होतीस, ईश्वरानें आतां मला ती संधि आणून दिली आहे. फुलें हीं सुवास घेण्याच्या उपयोगाचीं असतात. त्यांना कीड लागून तीं नासावीं असा ईश्वराचा संकेत दिसत नाहीं. निर्जीव सृष्टींत जशीं फुलें तशाच सजीव सृष्टींत स्त्रिया होत. एवढ्यावरच काय तें समज. माझी ही भगवी छाटी व हा साधुवेषच मला आजपर्यंत बिनबोभाट सगळ्या ऐहिक सुखाचा उपभोग घेण्यास कारण झाला आहे. आपआपल्या नवऱ्यांना व पोराबाळांना टाकून माझ्या भजनीं लागणाऱ्या स्त्रियांवर मी असाच अनुग्रह करीत असतों."

मनोरमेला आतां स्वामींचें रहस्य कळलें व ती हें नवें संकट चुकवावें कसें या बुचकळ्यांत पडली. तोंच स्वामींचे कर्णकठोर शब्द पुन्हां ऐकूं आले. "मनोरमे, माझा उद्देश तुला स्पष्ट कळला आहे, चल मुकाट्यानें मठांत. या निर्मनुष्य वैकुंठधामांत तुझ्या सोडवणुकीला कोणी येईल असा भरंवसा मुळींच वाटूं देऊं नको."

"माझ्या बरोबरचा मनुष्य दाराशीं उभा आहे. त्याला हाक मारून—"

"बस बस—एक अक्षरहि ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. चल परत आश्रमांत."

"बोवांची व मनोरमेची आतां झटापट सुरू झाली. चंद्राच्या प्रकाशानें त्या झाडींत त्यांना अर्धवट एकमेक दिसत होते. मनोरमेला या वेळीं अतिशय आवेश चढला व महाराजहि कांहींसे गाफील होते यामुळें एका झट-

क्यास आपला हात सोडवून तोंडानें "धांवा धांवा हा चांडाळ— मला— बलात्" असें कांहीं तरी ओरडत तिनें होतें नव्हतें तेवढें अवसान खर्चून पळण्यास सुरवात केली. "अशीं कितीक सावजें माझ्या जाळ्यांतून सुटण्यासाठीं आजपर्यंत धडपडलीं पण त्यांत तीं सपशेल फसलीं. मनोरमे, तुझ्या सारख्या पाखरांना–"

"बोवा चपापला व पारध्यांच्या चाहुलीनें जसें सावज दचकावें त्याप्रमाणें तो बोलतां बोलतां थांबला. "अँः हा भास असेल" असें क्षणभर विचार केल्यानंतर आपल्याशीं पुटपुटून त्यानें मनोरमेचा पाठलाग आरंभला. पुन्हां त्याचे पाय कचरले. "पारधीच जाळ्यांत सांपडला" हे शब्द कोणाचे ? हा फिरून कर्णभास असेल. अथवा मनोरमेनें मुद्दाम आपल्याला भेवडावण्यासाठीं आवाज बदलून वरील वाक्य उच्चारलें असेल.

"माझ्या हातांतून निसटून जाणाऱ्या पाखरांना हा शिकारी असें आपल्या पाशांत घट्ट अडकवीत असतो. मनोरमे, सांपडलीस, जातेस कोठें ?" बोवा तिच्या मागें धांवले. मनोरमेला या वेळीं कोठलें बळ आलें होतें कोण जाणे ? ती आतांपर्यंत बोवांच्या हातांत सांपडली नव्हती.

बोवाजींच्या पाठलागांत दोनदां खंड पडल्यानें तिला त्यांच्यापासून दर पावलागणीक दूर दूर अंतर पाडण्यास चांगली संधि सांपडली आणि तिचा तिनें फायदाहि चांगलाच घेतला. बोवांना आतां फार त्वेष चढला. त्यांनीं आपल्या पायांना खूप गति दिली व क्षणोक्षणीं तिच्या त्यांच्या मधलें अंतर झपाट्यानें तोडून तिला त्यांनीं अगदीं अटोक्यांत आणलें. या वेळीं आपण आतां अगदीं तावडींत आलों असें समजून मनोरमेनें "देवा आतां या गरीब अबलेचें संरक्षण करायला धांव, आतां तूंच वाली" अशी चित्तभेदक स्वरांत निदानींची हांक देवाला मारली. देवाला तिची हांक ऐकूं गेली व तो खरोखरच तिच्या संरक्षणार्थ धांवला. मनोरमेनें आरोळी दिली तेव्हां ती ठेंचाळली व धाडकन जमीनीवर आदळल्यामुळें बेशुद्ध होऊन तिला देवानें त्या उपस्थित संकटापासून कसें वांचविलें हें तिला मुळींच कळलें नाहीं.

सावध झाली तेव्हां चांगलें उजाडलें असून तिच्या शेजारीं दत्तोपंत, मधुकर व आणखी एक दोन इसम जिव्हाळ्याच्या माणसांप्रमाणें मोठ्या औत्सुक्यानें तिच्या शरीरस्थितीकडे न्याहाळून पहात असल्याचें तिला आढळलें. ती आपल्या वाड्यांत होती. असें तिच्या लक्षांत आल्यावरून तिनें कांहीं असंबद्ध प्रश्न विचारले. त्यास त्यांनीं आजारी माणसाला समाधान वाटण्यासारखीं उत्तरें दिलीं. मधुकर आईच्या जवळ सारखा बसून होता. दत्तोपंत मधून मधून आंत बाहेर अशा येरझारा करीत होते. इतक्यांत कांहीं बिकट प्रसंग गुदरून मनोरमाबाई अत्यवस्थ झाल्याची बातमी कळल्यावरून नारायणरावाचे जुने स्नेही व मनोरमेचे खरे हितचिंतक असे एक दोन गृहस्थ आले. मनोरमाबाईवरचा प्रसंग अद्यापि कोणासच सांगण्यांत आला नव्हता तरी त्या दोघांना घरच्या नोकरांनीं रात्रीं मनोरमाताई कोठेंशा बाहेर घरचा परदेशी भय्या घेऊन गेल्या, तेथून त्यांना गाडींत घालून रात्रीचे सुमारास निचेष्ट स्थितींत घरीं आणलें, तेव्हां फक्त दत्तोपंत बरोबर होता, नंतर रात्रीं डाक्टरांना बोलावण्यांत आलें, इत्यादि हकीकत सांगितली. दत्तोपंतानें त्यास कसलाच थांग लागूं दिला नाहीं.

मनोरमाबाईचे गुडघे व हाताचीं कोपरें बरींच खरचटलीं असून डोक्याला लहानशी जखम झाल्याचें सर्वांस कळलें होतें व डाक्टरांनीं तर तापहि बराच चढला असून तो आकस्मिक श्रमातिशयाचा परिणाम असल्याचें जाहीर करून एकंदर दुखणें जरा असाध्यच असल्याचें सांगितल्या वेळेपासून घरांतली सर्व मंडळी अगदीं हवालदील झाली होती.

सुमारें नऊ वाजतां मनोरमाबाईच्या वाड्यांत दोन तीन पोलीस शिपाई शिरले. त्यांनीं "दत्तोपंत मुजुमदार आहेत का?" असा नोकरांना प्रश्न केला. पोलीसांना पाहिल्याबरोबर नोकरलोक भेदरले व प्रथमतः दत्तोपंतावर कांहीं तरी लचांड आलें असें वाटून त्यांनीं "कां? कशाला? आह्मांला ठाऊक नाहीं" अशा तऱ्हेची उडवाउडवी केली पण याला भीक न घालतां पोलीसांनीं दरडावून विचारतांच दत्तोपंत वर आहेत ही गोष्ट

पटकन सांगितली. शिपायांनीं त्याजकडे नेण्यास नोकरांपैकीं एकाला हुकूम केला त्यासरसा हातांतलें काम टाकून घाबऱ्या घाबऱ्या तो त्यांना मार्ग दाखविण्यास निघाला. पोलीस त्याच्या मागोमाग जाऊं लागले. हा काय घोटाळा आहे हें जाणण्यासाठीं इतरहि नोकर शिपायांच्या पाठोपाठ गेले. थोड्या वेळानें दत्तोपंत उभे असलेल्या खोलींत तें सगळें लटांबर पोंचलें. नोकराची समजूत अशी कीं, कांहीं तरी घोरपड दत्तोपंताच्या गळ्यांत आल्यानें त्यास पकडून नेण्याकरितां हे पोलीस आले असतील. पण त्या पोलीसांनीं दत्तोपंताला अदबीनें मुजरा केलेला पहातांच त्यांच्या आश्चर्याला सीमाच राहिली नाहीं. दत्तोपंतानें त्यांचा मुजरा स्वीकारून त्यास काय काम आहे ह्मणून विचारलें तेव्हां त्यांनीं एक मोहोरबंद लखोटा दत्तोपंताचे हातीं दिला. त्यानें तो वाचून पाहिल्यावर शिपायांना निरोप सांगितला, "ठीक आहे. पत्रांत लिहिल्याप्रमाणें अकरा वाजतां कचेरींत येतों ह्मणून साहेबाला कळवा."

शिपाई निघून गेले. नोकरांना धीर आला व त्यांना दत्तोपंताविषयीं त्या वेळेपासून फारच सभय आदर वाटूं लागला.

दत्तोपंतानें त्या दिवशीं जेवणखाण मनोरमेच्याच घरीं उरकलें. मनोरमेला सारखे बेशुद्धीचे झटके येत होते. तेव्हां कोणा तरी अत्यंत काळजीच्या माणसाला तिच्यावर देखरेख करण्यास ठेवावें असें मनांत योजून त्यांनीं दहा साडेदहाच्या सुमारास एक नर्स आणली व मनोरमेची शुश्रूषा करण्याचें तिच्यावर सोपविलें.

दत्तोपंत त्या दिवशीं आलेल्या निरोपाप्रमाणें अकरा वाजण्याचे सुमारास आजारी मनोरमेची जोखीम त्या नर्सवर सोपवून निघून गेले ते दोन तीन दिवसपर्यंत परतच आले नाहींत.

* * *

ज्या रात्रींतला गोंधळ आह्मीं मागें सांगितला त्याच्या दुसऱ्या दिवशींच वैकुंठधामाच्या मठाधीश महाराजांना पोलीसांनीं चतुर्भुज करून फरासखान्यांत नेल्याचा गवगवा झाला. या मठांत माणसांचा जमाव जमतो व अशानें

लोकांत संघशक्तीचा प्रादुर्भाव होण्याचें भय वाटल्यामुळें सरकारनें बोवास पकडून नेलें असावें, व या कृतीनें सरकारचा हात आमच्या धर्मांत शिरतो असा एकच गिल्ला त्यांच्या शिष्यांनीं केला. पण लवकरच बोवाजींचा खटला कोर्टांत निघून लोकांना त्यांचें खरें स्वरूप कळलें व आपण आजपर्यंत एका प्रच्छन्न पातक्याच्या नादानें फसलों ह्मणून जो तो आपल्याशींच लाजला. या बोवांचीं दुष्ट कारस्थानें उघडकीस आणल्यामुळें ज्या पोलीसांबद्दल थोड्याच दिवसांपूर्वी हाकाटी करण्यांत आली होती त्यांच्याच विषयीं आतां स्तुति करण्यांत येऊं लागली. सांप्रत संतांचा सुळसुळाट चोहोंकडे झाला आहे तेव्हां त्यांच्या खरेखोटेपणाची पुरी पारख केल्यावांचून त्यांच्या नादीं लागणें इष्ट नव्हे अशा इशारती वर्तमानपत्रांतून येऊं लागल्या. पण योगिराजांच्या अभिमान्यांचा तर बोवांच्या गूढ सामर्थ्यावर फाजील विश्वास असल्यामुळें आतां या खटल्यांत सरकारला व लोकांना कांहीं अद्भुत चमत्कार पहावयास सांपडणार आणि योगसामर्थ्याचा जयजयकार होणार अशा तऱ्हेच्या आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या.

---

## प्रकरण पंचविसावें.

## खटला.

बोवांना त्याच्या पदवीपासून भ्रष्ट केल्यानंतर थोड्याच अवकाशांत त्यांची चवकशी न्यायमंदिरांत यथाविधि सुरू झाली. पोलीसांनीं त्यांस न्यायासनासमोर साधारण कैद्याप्रमाणें खेचून आणलें होतें. हातापायांत शृंखला असलेल्या पाहून त्यांच्या भक्तांपैकीं पुष्कळांना खूप राग आला. पण गुरूजींना तसल्या स्थितींत डोळ्यांतून आंसवें गाळीत पहावें अथवा पहावत नसल्यास मनांतल्या मनांत जळफळत घरोघर चालतें व्हावें याहून अधिक त्यांच्या हातीं कांहीं नव्हतें. खटल्याच्या आरंभीं पुष्कळांना महाराजांच्या ऐकीव योगसामर्थ्यावरून कांहीं तरी विलक्षण घटना पहावयास सांपडेल असें वाटत

असल्याचें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. ईश्वरकृपेनें तसा प्रकार कांहीं घडला नाहीं. पोलीसांनीं बोवाविरुद्ध आणलेला पुरावा इतका भक्कम होता कीं, बोवांची त्याविरुद्ध मुळींच मात्रा चालणें शक्य नव्हतें. त्यांच्या भक्तांपैकीं वजनदार व्यक्तींनीं बोवाची सुटका व्हावी एतदर्थ तडजोड करण्याचा बराच प्रयत्न केला पण असल्या एखाद्या भोंदूचीं कृष्णकारस्थानें जगाच्या नजरेपुढें उघडकीस आणून लोकांच्या डोळ्यांत अंजन घालण्याचा पोलीसांचा कृतनिश्चय या बड्या लोकांच्या खटपटीनें तिळमात्र बदलला नाहीं. त्यांनीं अखेरीस गुरुमहाराजांना कोर्टापुढें ओढलेंच. पोलीसांच्या समाजांतल्या वागणुकीवरून त्या खात्याविषयीं प्रजेच्या मनांत एक तऱ्हेचा सभय अविश्वास वाटत असतो व तसा वाटण्याला कारणेंहि असतील. परंतु नुसत्या त्या बोवांच्या प्रकरणाचा विचार करतां या बाबींत पोलीसांनीं केलेला सकृद्दर्शनीं जुलमाचा वाटणारा उद्योग समाजाच्या हिताच्या दृष्टीनें खरोखरीच इष्ट होता असें ह्मटलें पाहिजे. बोवांबरोबर त्यांच्या शिष्यसंप्रदायांतील अनेकांना न्यायमंदिरांत आरोपी या नात्यानें जाब देण्यास उभें रहावें लागलें.

बोवांवर चोरीचा माल पचविल्याचा एक आरोप होता. साताऱ्यास रहाणाऱ्या कोणा एका धनिकाची जवळची नातलग स्त्री या बोवांच्या नादीं लागली होती. तिनें आपला सर्व पैसा गुरूजीचे पायीं वाहिला. पुढें त्या बाईकडून वारंवार मिळणाऱ्या द्रव्याची भेट बंद झाल्यामुळें महाराजांच्या चैनींत कमतरता पडली. तेव्हां उपाय ह्मणून त्या बाईपासून तिच्या धनिक नातलगाच्या द्रव्यसंचयाची सर्व माहिती काढवून घेऊन आपल्या कांहीं पट्ट शिष्यांकरवीं चोरी करविली. हा चोरीचा सर्व माल बोवाजवळ होता. या चोरीची चवकशी करीत असतां पोलीसांना बोवा त्यांत सामील असल्याचा सुगावा लागला व हळू हळू बोवांना पकडण्याबद्दल सरकारांत वाटाघाट सुरू झाली. चोरी करणारे बोवांचे शिष्य या आरोपांत महाराजांच्या विरुद्ध बाजूनें ह्मणजे पोलीसतर्फे साक्षीदार होते. ज्या बाईनें हा घरभेदेपणा केला त्यांनाहि न्यायाधिशासमोर ओढण्यास पोलीसांनीं कमी केलें नाहीं. बाई त्या धनि-

काची भावजय असून विभक्त होती, व तिनें आपलें तन, मन, धन, स्वामीस निष्ठापूर्वक अर्पिलें असल्यानें तिच्या घरीं [दीराच्या घराला लागूनच हें घर होतें] स्वामींचे शिष्य नेहमीं जात येत असत. गुरुजीकरितां बाईनीं दीराच्या घरावर धाड घालण्याचे कामीं खरी मदत करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. इत्यादि गोष्टी साक्षीपुराव्यांत बाहेर पडल्या. याखेरीज बाईचा व बोवांचा संबंध नीतिदृष्ट्या फारसा चांगला नव्हता अशी शंका निवण्यासारख्या बऱ्याच गोष्टी उघडकीस आल्या त्या वेगळ्याच. बोवा या चोरीसारख्या समाजघातकी कृत्याचे प्रवर्तक आहेत असें ठाम ठरलें.

यानंतर बऱ्याच इसमांच्या निरनिराळ्या साक्षी झाल्या. त्यांत बोवांना गेलीं आठ दहा वर्षें ओळखणाऱ्या व्यक्ति पुष्कळ होत्या. प्रथम गुन्हेगार गृहस्थ धर्मगुरु या नात्यानें जगासमोर आला तेव्हां त्याबरोबर त्याची बायको समजली जाणारी एक स्त्री होती. आपण हिमालयांत तपश्चर्या करून परत लोकोद्धारासाठीं जगांत प्रकटल्यावर या आपल्या पत्नीनें आपला आश्रय केला व हिचा आपला विवाह अग्निब्राह्मणासमोर सशास्त्र झाला असल्यामुळें तिच्या पालनपोषणाचा बोजा कायदेशीर रीतीनें आपणाकडे आहे व तो आपण सध्यां तिला जवळ बाळगून उचलीत आहों असें महाराज आपणांकडे येणाऱ्या भाविक जनांस सांगत असत. ही बोवांची कुटुंबिनी मानली जाणारी बाई पुढें कांहीं दिवसांनीं नाहींशी झाली व बोवांनां ती निवर्तल्याचें जाहीर करून संन्यासवृत्ति घेतली, अशी माहिती निघाली. बोवाच्या संन्यासवृत्तींत संगपरित्याग हें लक्षण तर नव्हतेंच, उलट भोळ्या स्त्रीपुरुषांचा मेळा आपल्या भोंवतीं असण्यांतच त्यांना आनंद होत असे. एकानें सहज बोलतां बोलतां बोवांची कृपादृष्टि पुरुषांहून स्त्रीजातीविषयीं जास्त आर्द्र असल्याचें सांगितलें. बोवासारख्या महत्वाकांक्षी माणसाला हातीं धरून त्याचा जगांत योगिराज ह्मणून बडेजाव माजविल्यानें आपल्या पोटाची सोय चांगली झाली होती व एवढ्या उदरंभरणाच्या एका कारणासाठीं आपण गुरूचे पाय धरून राहिलों असें पुष्कळ




गुरुमहाराजावरील खटला.

[ पान ३००.

जणांच्या जबानींत निष्पन्न झालें. महाराजांची योगसामर्थ्याविषयीं महती वाढविणाऱ्या त्यांच्या एका हस्तकानें आपणास बोवाजींचें सगळें सोंग माहीत असतां धर्मश्रद्धेनें वेडावलेल्या इसमांना नादीं लावण्याकरितां आपण चमत्काराच्या खोट्या गप्पा उठवीत होतों असें स्पष्ट सांगितलें. आजपर्यंत आपल्या जीवावर मौजा मारून आतां आपत्काळीं आपल्या उलट झालेल्या शिष्यगणाला बोवांनीं यथास्थित शिव्याशाप दिले. परंतु त्यांची ही वटवट ज्या बाईबद्दल आह्मीं वर उल्लेख केला आहे तीच प्रत्यक्ष न्यायाधीशासमोर येतांच एकदम बंद पडली व या खटल्याला वेगळेंच स्वरूप आलें.

जी बाई मेली ह्मणून स्वामींनीं लोकांत बातमी उठविली होती ती बाई न्यायमंदिरांत उभी राहिली तेव्हां शिष्यवृंदांत मोठा घोटाळा उडाला. जो तो अचंब्यानें तोंडांत बोट घालून या चमत्काराची स्वतःच्या मनाशीं चिकित्सा करीत राहिला. या बाईनें आपणास लोकांत धर्माचार्याचें ढोंग माजविण्याऱ्या गुन्हेगार इसमानें फसविलें असें बोलतांच आश्चर्याची परमावधि झाली. त्या बाईची जबानी झाली तेव्हां बोवा ब्राह्मण का इतरजातीय याची सर्वांस शंका वाटूं लागली. कारण ती बाई जातीची सोनारीण होती. तिचा नवरा मेल्यावर ती एका श्रीमान् गृहस्थाजवळ राहिली होती. पुढें तिची व बोवांची गांठ पडल्यावर बोवांचें लक्ष त्या रूपसंपन्न युवतीकडे वेधलें व तिच्या मनांतहि बोवाबद्दल प्रीति वाटूं लागली. ती बोवाची शिष्यीण झाली व त्या श्रीमान् गृहस्थास सोडचिठ्ठी देऊन ती बोवाबरोबर हिंडूं लागली. बोवांच्या योगसामर्थ्यावर तिचा प्रथम प्रथम विश्वास होता व त्याचा फायदा घेऊन बोवांनीं तीस ती पूर्वजन्मांत स्वतःची भार्या असल्याची खूणगांठ सांगितली. खरी सती पतीला जन्मान्तरांतहि अनुसरते असे पुराणांत जे दाखले सांपडतात, तशांपैकींच आपण एक साध्वी आहों असें वाटून तिनें बोवाजीकडे या जन्मांतहि पतित्व सोंपविलें व त्यानंतर हा पतिपत्नीचा जोडा लोकोद्धारार्थ जगांत संत ह्मणून विख्यात झाला. बाईशीं संबंध जडल्यानंतर एक दोन वर्षांनीं

यांनीं धर्मगुरूचा पेशा पत्करला. तेव्हां श्रद्धाळू जनतेला या दोघांचा अनैतिक संबंध असेल असें समजण्याला मार्गच नव्हता. शिवाय गुरुवचनावर ज्याचा त्याचा पूर्ण विश्वास. मग मुद्दाम गुरुजीच्या खाजगी संबंधांत खरेखोटेपणाची शहानिशा करून गुरुद्रोह पदरीं घ्यावयाला कोण तयार होणार? त्या बाईनें आपल्या जबानींत पुढें असें सांगितलें—"चार पांच वर्षें आह्मी एकत्र राहिल्यावर हा आरोपी माझ्याशीं नीट वागेनासा झाला. परंतु माझा व याचा संबंध मी चवाठ्यावर आणून याची फजीती करीन हें भय त्यास होतेंच. त्यामुळें उघड उघड तंटा करण्याची याची छाती नव्हती. पुढें एकाएकीं हा मला घेऊन कोकणांत एका दूर खेडेगांवीं निघून गेला, व तेथें यानें माझा छळ करण्यास सुरुवात केली. शेवटीं यानें मला टाकून इकडे पुन्हां पळ काढला. मी याचा सुगावा काढीत काढीत याला येऊन भेटलें. ही भेट फारच गुप्तपणानें झाली. त्या वेळीं यानें मला दरमहा पंधरा रुपये देण्याचें कबूल करून माझा तंटा मिटविला. एक दोन वर्षें याप्रमाणें गेल्यावर यानें पैसे पाठविण्याचें बंद केलें व मी जेव्हां त्याकडे तक्रार करण्यास आलें तेव्हां त्यानें सर्व लोकांसमक्ष निर्भर्त्सना करून हाकलून लावलें. बोवाच्या सुदैवानें त्या वेळीं मला ओळखणारी एकहि व्यक्ति बोवाजवळ नव्हती. बोवांनीं माझी नालस्ती करून मला उपदेश केला. मी यामुळें निराश होऊन पोलीसांत फिर्याद लावली व आज बोवांना गुन्हेगार ठरवून पोलीसांनीं येथें आणलें आहे." बोवांचा बाईशीं वर वर्णन केल्याप्रमाणें संबंध होता, यासाठीं पुराव्यादाखल एका शिष्याची साक्ष झाली. हा चेला बोवांचा अत्यंत एकनिष्ठ सेवेकरी होता. परंतु जगाचे पेच कळण्याइतकी अक्कल परमेश्वरानें त्यास दिलेली नव्हती. बाई कोकणांत ज्या गांवीं रहात असे त्याच गांवीं हा गुरूंच्या आज्ञेनें अनुष्ठान करण्याकरितां राहिला होता. अनुष्ठानाच्या सबबीवर बोवांचा शिष्यगण पुष्कळ गांवीं पांगलेला होता, हें येथें सांगितल्यास वावगें होणार नाहीं. वरील शिष्याच्या भोळेपणाचा फायदा घेऊन त्याच्या हस्तें बोवा त्या बा-

ईला वेतन पोंचवीत असत. या शिष्याच्या साक्षीनें बाईच्या ह्मणण्याला दुजोरा मिळाला. परंतु ही साक्ष चालू असतां साक्षीदाराच्या अर्धवटपणामुळें कोर्टांत बराच हंशा पिकला. बाईला आपल्यामार्फत बोवांकडून द्रव्य मिळतें ही गोष्ट गुप्त राखण्याबद्दल बोवांची जबर ताकीद होती. माझ्या आज्ञेचा भंग झाल्यास तूं योगभ्रष्ट होशील, असा धाक बोवांनीं त्याच्या मनावर पक्का बसविला होता. कोर्टापुढें साक्ष देतांना देखील त्याची धास्ती कायम होतीच. आरोपीच्या पिंजऱ्यांतल्या गुरूजींच्या मूर्तीला पहावें, क्षणभर विचकावें, गप्प बसावें, असा प्रकार त्यानें अनेकदां केला. अखेरीस त्याच्या तोंडून अशा तुटक रीतीनें कां होईना इत्थंभूत हकीकत बाहेर पडली, व कराराप्रमाणें बोवांकडून कांहीं रक्कम बाईला दरमहा पटविली जात असे असें सिद्ध झालें. पण बोवाचें लोकांत बस्तान चांगलें बसल्यावर या बाईची त्यास पर्वा वाटेनाशी झाली व तिची त्याची जी गांठ पडली त्या प्रसंगीं बोवांचा गृहस्थाश्रम पाहिलेली मंडळी कोणी नव्हती ही गोष्ट बोवांच्या पथ्यावर पडून त्यांनीं व जवळच्या इतर सभ्य लोकांनीं तिची फजिती केली या गोष्टी अगदीं सरळ आहेत.

इतकी हकीकत कळल्यावर बोवांची पूर्वपीठिका आमूलान्त समजावी, अशी उत्कंठा वाटणें साहजिक आहे. पोलीसांची या खटल्यांत इतकी जय्यत तयारी होती कीं, त्यांनीं जन्मापासून तों त्या खटल्याच्या दिवसा तागायत बोवासाहेबांच्या प्रत्येक बारीक सारीक कृत्याचा मागमूस काढला होता, व ओघानेंच तो त्या खटल्यांत पुढें आला. बोवांचा जम लोकांत बसण्याला कारण काय झालें? धर्माचार्य पद त्यांस मिळण्यासारखी त्यांच्या अंगीं काय करामत होती ? या व अशा इतर प्रश्नांना या खटल्यांत उत्तरें मिळालीं. त्यांचा गोषवारा असा—

महंताचा धंदा सुरू करण्यापूर्वीं कांहीं दिवस बोवा एका गांवांत जाऊन तेथें असलेल्या मंदिरांत उतरले. तेथें अगदीं मोजून पांच घरीं मधुकरी मागावी, त्या अन्नाचा दोन तृतीयांश देव आणि गाय यांस समविभाग

देऊन राहिलेल्या एक तृतीयांशाचें स्वत: ग्रहण करावें असा त्यांचा परिपाठ होता. त्या काळांत ते कोणाशीं सहसा बोलत नसत. ते पहांटेस विशिष्ट प्रकारच्या आसनें करून कमी अधिक प्रमाणांत श्वासोच्छ्वास सोडीत असल्याचें पुष्कळ लोकांच्या नजरेस पडल्यावरून हा कोणी तरी दिसतो त्यापेक्षां फार निराळा प्राणी असावा अशी शंका आली. लागलीच लोक त्याच्या भजनीं लागले. त्यांचीं भैक्षचर्य व एकभुक्तता संपलीं. लोकांनीं दिलेल्या अन्नवस्त्रादि पदार्थांचा ते पाहिल्यासारखा अनादर करिनासे झाले; व एक आश्चर्य करण्याजोगी गोष्ट त्यांच्या ठिकाणीं लोकांना जी पहावयाला सांपडली ती ही कीं, त्याच्या कंठांत शालिग्राम असे. जेवणाचे आरंभीं कांहीं विचित्र हावभाव व तोंड वेडेंवांकडें करून ते तो शालिग्रामाचा खडा बाहेर काढीत व त्यास तुळसीदल वाहून थोडीबहुत प्रार्थना केल्यावर पूर्ववत् वदनाला विचित्र आकार देऊन ते त्या देवतेस मुखांत गुप्त करीत. लोकांनीं पृच्छा केल्यास ती देवता आपण हृदयांत ठेवतों व तेथून वाटेल त्या वेळीं स्वेच्छेनें बाहेर आणूं शकतों असें उत्तर त्यांजकडून मिळे. अशा रीतीनें त्या गांवीं चार पांच महिन्यांत उत्तम बस बसल्यावर ते एकदम तेथून नाहींसे झाले. पुन्हां चार पांच महिन्यांनीं प्रकट झाले तेव्हां त्यांच्याबरोबर एक स्त्री होती. बोवांनीं ती आपली पत्नी असल्याचें सांगितलें, परंतु त्यांच्या अद्भुत सामर्थ्यानें . अंधळया झालेल्या गांवकऱ्यांनीं त्यांच्या आदरसत्कारांत कमी पडूं दिलें नाहीं. याच सुमारास एक दोन शिष्य आपणांस या महात्म्याचे चरण धरल्याशिवाय संसारतापाचें निवारण होणार नाहीं असा दृष्टान्त झाल्याचें सांगत या बोवाजवळ राहिले. आतां तर हां हां ह्मणतां बोवांची प्रसिद्धि झाली, व महाराजांचा नांवलौकिक भुवनांत गाजूं लागला. हे दोन्ही आदिशिष्य या खटल्यांत पुरावा देण्यासाठीं पोलीसांनीं हजर केले होते. त्यांच्या जबानींत पुढील हकीकत बाहेर पडली— महाराष्ट्रांतल्या एका क्षेत्रस्थानीं आपली व बोवांची प्रथम गांठ पडली त्या वेळीं ते व आह्मी समानशील होतों ह्मणजे निरुद्योगी

होतों व पोटाची सोय सुलभ होण्यास काय उपाय करावा याची विवंचना लागली होती. आह्मां तिघांत हे बोवा जरा जास्त कुशाग्र बुद्धीचे असल्यानें त्यांनीं आह्मांस पडलेल्या चिंतेवर तोड शोधून काढली. संत होऊन लोकांत मिरविण्यासारखा पोटाची चिंता घालविणारा दुसरा धंदा नाहीं. परंतु लोकांत सोंग करण्याला कांहीं तरी सामग्री पाहिजेना ? त्यावर ही आह्मांस युक्ति सुचली. या बोवांजीनीं साधुत्वाच्या कार्याला प्रत्यक्ष सुरुवात केल्याचें आह्मांला यानें सांगितलें होतें व आपल्या निःसंग वर्तनाबद्दल त्या गांव-कऱ्यांना अधिक विश्वास वाटण्यासाठीं त्यांना न कळत ही स्वारी त्या क्षेत्रीं निघून आली होती. ही गोष्ट आह्मीं आपल्या पथ्यावर पाडून घेतली. या बोवानें त्या गांवीं जावें व तेथें त्यांची वाट विचारीत दृष्टान्त झाल्याची हूल उठवून आह्मीं त्यास गांठावें असा बेत ठरला व तो सिद्धीस गेल्यावर तर आमच्या धंद्याची आमच्या अपेक्षेपेक्षां अधिक भरभराट झाली. ज्याला आह्मीं साधु ह्मणून ह्मटलें तो ह्मणजे सध्यांचा गुन्हेगार फार तैलबुद्धीचा. त्यानें आपण हल्लींच्या धर्मग्लानींत धर्माला हात देऊन अवनतीच्या डोहांतून वर काढण्यासाठीं आपले हिमालयस्थ गुरु जे नग्न रुद्रमहाराज त्यांच्या आज्ञेनें लोकांत आलों अशा बाता मारण्यास सुरुवात केली. हिमालयाच्या प्रचंड वैभवाच्या व त्या पर्वताच्या कंदरांत राहून स्वतः आचरलेल्या थोर तपश्चर्येच्या लांबरुंद गप्पा ऐकून तर लोकांत याविषयींचा आदर फार वाढला. या त्याच्या थापांना आह्मीहि आपआपल्या परी पुष्टी देत असूं. क्षेत्रांत बेत ठरवून पुढें दृष्टान्ताच्या निमित्तानें गांठ घेण्याचें ठरल्यानंतर आह्मीं परस्परांना सोडलें. त्या मध्यंतरींच्या अवकाशांत त्यांचा व त्यांच्या विरुद्ध तक्रार करणाऱ्या बाईचा संबंध झाला. आह्मी त्या बाईला ओळखतों. स्वामींच्या बडेजाव माजल्यानंतर ते आह्मांसहि नकळत एकाएकीं गुप्त झाले; व फिरून आह्मांस येऊन भेटले तेव्हां ते एकटे होते. त्यांनीं ती कुटुंबिनी मेल्याचें सांगितलें व आपणास हिमालयवासी गुरुमहाराजांनीं संन्यासदीक्षा दिली अशीहि गप्प दिली. महाराज राजयोग ह्मणजे खरोखरीच एखाद्या

राजासारखा ऐषआराम उपभोगीत होते. त्यांच्यापुढें पांची इंद्रियांचीं सुखें निरंतर हजर असत, त्यांच्या भोंवतीं चांगल्या वाईट दोन्ही तऱ्हेच्या बायका असत व त्यांमध्यें खऱ्या सच्छील बायकांपैकीं पुष्कळजणींना नवरा व मुलें यांचा अनादर व गृहकार्यांत दुर्लक्ष करून गुरुसेवा स्वीकारल्याबद्दल पश्चात्तापांत पडावें लागलें असेल. बोवांचें स्तोम माजविण्यांत आमचीहि चैन चालत होती. गुरुसेवेचे ज्यांना पातकी अनुभव आले होते ते स्वतःची फजिती होईल या भयानें गुरुजीबद्दल एक चकारहि बाहेर उच्चारीत नसत.''

बोवांची लोकांत फारच महती वाढली तेव्हां त्यांच्या वर्तणुकीकडे गुप्तहेरामार्फत साशंक नजरेनें सरकार पाहूं लागलें. बोवांच्या रोजच्या बडबडींत, प्रवचनांत, अथवा कीर्तनांत परकीय राजसत्तेचें निर्मूलन हा भयंकर धाडसाचा विषयहि कमीजास्त प्रमाणांत येत असे व त्याजवर करडी नजर ठेवण्याचें सरकारला तरी कारण एवढेंच. या सरकारच्या हेतूची इशारत मिळतांच बोवांचें रूप पालटलें. त्यांनीं सरकारी आश्रय केला आहे, त्याजकडे जमणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचे विचार कसे आहेत याची माहिती सरकारला बोवांच्या द्वारानें मिळते, व या त्यांच्या कामगिरीबद्दल बोवांना सरकारी वेतन मिळत असावें, असा बोभाटा होऊन त्यांच्या जवळचा शिष्यसमुदाय बराच झडला. परंतु लोकाश्रयावर बोवांच्या सगळ्या बडेजावची मदार असल्यानें आपल्या नांवाचा असा गवगवा झाल्याचें त्यांस न आवडून त्यांनीं मध्यंतरीं विस्कटलेली घडी पुन्हां कशीबशी जमविली. बोवांचा व सरकारचा काय संबंध होता याचा खुलासा वरील खटल्यांत झाला नाहींच पण उलट ती हाकाटी व्यर्थ असावी असें वाटण्यासारखी स्थिति होती.

बोवांना पूर्वीं सात वर्षांची सक्त मजूरीची शिक्षा भोगावी लागली होती ही गोष्ट जेव्हां पोलीसांनीं पुढें आणली तेव्हां ती ऐकणारांना जितकें आश्चर्य वाटलें तितकेंच किंबहुना त्याहून अधिक आश्चर्य हें वाचून वाचकांस वाटेल. बोवांना सात वर्षें राजदंड भोवल्याची हकीकत निवळ बनावट अ-

सावी असें सकृद्दर्शनीं भासेल पण ती अगदीं खरी होती व तें बोवांनींच आपल्या जबानींत कबूल केलें. बोवांचें वय हा प्रसंग गुदरला तेव्हां सुमारें पंचेचाळीस वर्षांचें होतें व आज जवळजवळ चवदा पंधरा वर्षें ते धर्मगुरूच्या पदवीचा उपभोग घेत होते. त्यापूर्वीं त्यांस ही शिक्षा झाली होती. त्याविषयीं प्रांजळपणानें गुन्हा कबूल करतांना ते ह्मणाले, "माझें पूर्व-वय उडाणटप्पूपणांत गेलें. त्या वेळीं एका जबरदस्त गुन्ह्यांत सांपडून सात वर्षें सरकारानें अन्नवस्त्राची व निवासस्थानाची सोय करून दिल्यामुळें बिन-पगारी खडी फोडून देण्याचें काम मीं पार पाडलें. मुदत संपून सुटल्या-वर तीन चार वर्षें मीं अज्ञातवासांत मोलमजुरी करून काढलीं. एकदां मुंबई शहरांत फिरत असतां एका विशेष रहदारी नसलेल्या रस्त्यावर एक इसम डोक्यावर फुलें असलेला असा उभा होता. त्याचे डोळे मिट-लेले असून मुद्रा मोठी गंभीर होती. माझें लक्ष सहज त्याकडे लागलें व त्याजवळ उभा राहून मी तो काय करतो तें पाहूं लागलों. त्या वेळीं चार वाजण्याचा सुमार असेल. रात्रपर्यंत त्यापाशीं होतों. तेवढ्या अवकाशांत त्यानें डोळे उघडले नाहींत. फक्त हातानें माळेचे मणि भराभरा ओढण्या-खेरीज त्याची हालचाल कांहींच नव्हती. रात्र पडल्यावर "जयशंकर जय-शंकर" असें ह्मणत त्यानें डोळे उघडल व आसपास दूरवर नजर टाकली. तेव्हां माणसांची गर्दी मुळींच नव्हती ह्मटल्यास चालेल. त्याच्या भोंवतीं नारळांचा व पैशांचा ढीग पडला होता व मी तेथें असतांना शेकडों इसमांना या साधूच्या पायावर नारळ पैसा ठेऊन नमस्कार करतांना पाहिलें होतें. डोळे उघडून ध्यान टाकल्यावर ते त्या वस्तूजवळ फेऱ्या घालीत होते. मला त्या इसमाचें कौतुक वाटून त्याच्या संतपणाबद्दल आदर उत्पन्न झाला. त्यांनीं माझ्याकडे दृष्टि टाकून "क्यौं बेटा, तुला काय पाहिजे?" असें मोठ्या गंभीर वाणींत विचारलें तेव्हां मी त्याचे पाय धरून या अनाथ पामरावर दया करा, या जडजीवाला तारा असें भावनेनें ह्मटलें. त्यांनीं यावर एक विकट हास्य केलें. एवढ्या वेळांत त्या रस्त्यानें एक इसम आला व त्यानें या साधूस

वंदन वगैरे न करतां एकदम "कां दामभट कशी गंमत आहे!" असे शब्द उच्चारले. तेव्हां मी जवळ होतों ह्मणून दामभटानें त्यास दाबलें पण त्यास कांहीं भान न राहून तो पुन्हां ह्मणाला—"दोस्त, ह्या टाळी, आज पैशाच्या राशींत दडपून गेलां असाल नाहीं!"

दामभटाचा आतां मात्र नाइलाज झाला. मला त्याचें खरें स्वरूप कळून आल्यामुळें मी एकदम त्याकडे अश्रद्धेनें पहात उभा राहिलों. माझ्या मनांत तेवढ्या वेळांत अनेक विचार आले व गेले. यानंतर माझ्या देखत त्या दोघांनीं सगळे पैसे गोळा केले व त्या पैशांची एकंदर बेरीज जवळ जवळ पंधरा रुपयांइतकी झाली. दामभटाच्या मित्रानें शेजारच्या एका घरांतून पोतीं आणून त्यांत सर्व नारळ भरले व उद्यां त्याचा वि-क्रीचा येईल तो पैसा निमेनिम वाटून घेण्याचा त्यांचा सवदा ठरून त्यांनीं एकमेकाचा निरोप घेतला. मी दामभटाच्या मागोमाग जाऊं लागलों. बरेंच अंतर चालून गेल्यावर मागें वळून दामभटानें त्याचा पिच्छा पुरवि-विण्याचें कारण विचारलें. मीं त्यास त्याच्या साधुपणाचें गूढ विचारलें. तेव्हां त्यानें मोठ्या मिनतवारीनें तें माझ्यापाशीं सांगून टाकलें. त्यानें प्रथम आपल्या डोक्यावरचें एक टेंगूळ दाखविलें व हें टेंगूळ ह्मणजे श्रीशंक-राचें आत्मलिंग अशी आपण आपल्या एक दोन मित्रांकरवीं लोकांत वदंता उठवली. श्रीकैलासनाथ प्रसन्न होऊन त्याचा प्रसाद मजवर झाला असून त्याचेंच चिन्ह हें डोक्यावरचें टेंगूळ अशी मला पाहूं येणाऱ्या इस-मांची भावना माझी मित्रमंडळी करून देत असते. या साधुपणाच्या नांवा-वर आह्मांस जी प्राप्ति होईल ती हिस्सेरशीनें आह्मी वाटून घेऊन आमचा चारितार्थ चालवितों. आज सकाळीं आमच्या डोक्यांत एक नवीन शक्कल आली व ती लढवून आज आह्मी लोकांच्या धर्मभोळेपणावर इतके नारळ व द्रव्य पैदा केलें. ती युक्ति अशी— मी माझ्या या आत्मलिंगावर गंध-पुष्पें वाहून व सर्वांग भस्मानें चर्चून या रस्त्यांत येऊन उभा राहिलों. हा-तांत जपमाळ घेतली. नंतर ठरल्याप्रमाणें माझ्या एका स्नेह्यानें येऊन

माझ्या पायावर नारळ व पैसा ठेऊन नमस्कार केला व तो चालता झाला. नंतर दुसरा एकजण आमच्यापैकीं आला त्यानेंहि तसेंच केलें. त्याची ही कृति पाहून त्यास रस्त्यावरचे इतर येणारे जाणारे लोक साहजिकच विचारीत तेव्हां मी मोठा अवलिया आहें असें ते सांगत. सगळ्या लोकांना माझ्या सिद्धपणाची ढळढळीत खूण ह्मणून माझ्या डोक्यावर सांबाची पिंडी असल्याचें ते दाखवीत. या त्यांच्या सांगण्याला भुलून लोकांनीं त्यांचें अनुकरण करण्यास सुरुवात केली व मेंढरांप्रमाणें लोकांत गतानुगतित्वाची प्रवृत्ति फार असल्यामुळें रात्रीपर्यंत नारळांचा व पैशांचा ढीग पडला. संतपणा हा एक पोटाचा धंदा आहे. त्यांत श्रम कमी व प्राप्ती फार."

ही सगळी हकीकत ऐकून माझ्या डोक्यांत प्रकाश पडला व माझ्या पोटापाण्याचा मार्ग मला स्पष्ट दिसूं लागला. रामभट मला गुरू भेटले. त्यांनीं मला सच्छिष्य ठरवून एक गुरुमंत्र दिला. तो हा कीं, "दुनिया झुकती है, झुकानेवाला चाहिये." नाचविणारा असला कीं जग वाटेल तसें नाचण्याला तत्पर असतें. दुनियेला नाचवायला संतपणाचा पेशा फार चांगला असें दामभट गुरूंनीं माझ्या निदर्शनास आणून दिल्याबरोबर मी संत बनलों. माझी माहिती लोकांना काय असणार? मी तुरुंगांतल्या कालाला हिमालयनिवासाचें स्वरूप देऊन एकदोघां चांगल्या हितचिंतकांच्या साह्यानें धंद्याला सुरुवात केली. आमच्या नशीबानें मी चांगला नांवारूपाला आलों होतों. आज चवदा पंधरा वर्षें मी अगदीं राजसुखांत लोळत होतों. माझ्या संप्रदायाची मोठी भरभराट आहे.

बोवांनीं आपल्या बंदिवासाला हिमालयवासाचा पोषाख चढवून श्रद्धेनें अंधळ्या झालेल्या लोकांच्या डोळ्यांत कशी धूळ फेकली तें आतां वाचकांपुढें आलेंच आहे. त्याप्रमाणें त्यांचे अडीच हजार वर्षें जगले असें सांगण्यांत येणारे हिमालयस्थ गुरु नग्न रुद्रमहाराज ह्मणजे मुंबईचे दामभट हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल.

बोवा दशग्रंथी ब्राह्मण असल्याची लोकांत प्रसिद्धि होती. पण त्यांना

वेद अथवा शास्त्र यांपैकीं एकाचेंहि पूर्ण तर नाहींच पण अर्धवटहि ज्ञान नव्हतें असें या खटल्यांत बाहेर आलें. त्यांच्या तोंडीं श्रुतिस्मृतींतील प्रसंगीं अचूक उपयोगीं पडण्यासारखीं सुभाषितें होतीं इतकेंच. त्यांच्या चरित्रांत किती घोटाळा व गोंधळ होता हें सर्वांना कळून चुकलेंच आहे. आतां आपण त्यांच्या जन्माकडे वळूं.

त्यांच्या पहिल्या खटल्यांत त्यांचा पालक ह्मणून एका गृहस्थाची साक्ष घेण्यांत आली होती. त्याच गृहस्थाला या प्रसंगीं विरुद्ध पक्षानें साक्षीस बोलावलें होतें. त्यानें आपण गुन्हेगाराचे पालक आहोंत असेंच फक्त सांगितलें. सदरहू आरोपी लहानपणीं ह्मणजे दुनियेंत येऊन दहा पांच दिवस झाले असतील इतक्या स्थितींत आपल्याला आपल्या घराच्या पिछाडीस पडलेला सांपडला. त्याच्या आईबापांचा पत्ता आपणास ठाऊक नाहीं. परंतु नुसत्या तर्कानें हें मूल आपल्या घरच्या मोलकरणीचें असावें असें आपण सांगूं शकूं. याला पुरावा फार दूर नाहीं. हें मूल आह्मांस सांपडल्याच्या दुसऱ्याच दिवशीं त्या मोलकरणीचें प्रेत आमच्या गांवच्या विहीरींत आढळलें. तिनें जीव देण्यापूर्वीं सुमारें वर्षभर तिनें आपल्या घरची नोकरी सोडली होती व आमच्या शेजारच्या एका ब्राह्मण गृहस्थाचे घरीं तिनें चाकरी पत्करली होती. तिचें प्रेत पंचनामा होऊन डाक्टराकडे तपासणीस गेलें तेव्हां त्यांनीं ती बाळंत झाली असावी असा शेरा दिला. जीव देण्यापूर्वीं ती बरेच दिवस कोणाच्या नजरेस पडली नव्हती. या पोराची चवकशी झाली व पुढें तें आपण संभाळलें. माझ्या मुलांप्रमाणें मीं यास वाढविलें. सोळा सतरा वर्षांचा हा मुलगा झाला. बुद्धीनें तरतरीत असे व यास तालमीचा विलक्षण नाद असे. शरीरसंपत्तीचीं निरनिराळीं अंगें यानें आपलींशीं केलीं होतीं. सोळा सतरा वर्षांनंतर हा आपले ऐकेनासा झाला ह्मणून त्यास आपण मोठ्या कष्टानें घराबाहेर घालविलें. त्यानंतर याचा आपला संबंध नव्हता. पुढें या गुन्ह्यांत सांपडून याला शिक्षा झाली. त्यानंतर याचें काय झालें हें आपणास आज-

पर्यंत ठाऊक नव्हतें. आतांचा प्रकार सर्वांच्या समोर आहेच.

त्या साक्षींत बऱ्याच गोष्टींचा उलगडा पडला. तालमीचा नाद असल्यानें त्यानें निरनिराळ्या अवघड अवघड आसनांच्या कसरतींत चांगलें प्रावीण्य संपादलें होतें, व त्याची लोकांना योगाभ्यास शिकविण्याचें ढोंग करण्याचे कामीं चांगली मदत झाली हें सहज लक्षांत येतें.

त्यानंतर मनोरमेचें प्रकरण निघालें. त्याबद्दल चार पांच पोलीस अंमलदारांच्या साक्षी झाल्या. मनोरमेला महोत्सवाचें निमित्त सांगून बोलावल्याची गुणगुण दत्तोपंतांच्या कानावर आल्यानंतर चार पांच गुप्त पोलीसकामगार बरोबर घेऊन दत्तोपंतांनीं वैकुंठधामाकडे प्रयाण केलें. जणूं काय त्यांना भावी अनर्थाचें सूचक स्वप्न अगोदर पडलेंच होतें. पुढें स्वामींनीं उन्मादाच्या भरांत मनोरमेचा पाठलाग आरंभला असतां आपण तिच्या मदतीस दत्तोपंताच्या सूचनेवरून धावून गेलों असें त्यांनीं सांगितलें, व त्याच्या पकडण्याची अगोदर सगळी तयारी झाली असल्यामुळें त्या दिवशीं रात्रींच त्यास गिरफदार करून फरासखान्यांत आणलें. वगैरे वगैरे.

या खटल्यांत दत्तोपंताविषयीं एक नवीन गोष्ट लोकांना कळली ती ही कीं, बोवांच्या पोटांत शिरून, त्यांचा पूर्ण विश्वास संपादन करून, त्यांचीं गुप्त कृत्यें बाहेर काढण्याच्या कामीं सरकारला त्यांनीं अतिशय मदत केली होती. ज्या चोरीची गोष्ट आम्हीं या प्रकरणाच्या आरंभीं दिली आहे, त्या चोरीचा मागमूसहि सरकारास लागला नसता पण दत्तोपंतानें त्याची बित्तंबातमी लावून दिली व इतर पुरावाहि गोळा करून दिला. आपला पट्ट शिष्य व अगदीं कलिजा बनलेला खंडेराव दुसरा तिसरा कोणी नसून आपल्या विरुद्ध उभा राहून आपल्यास तुरुंगांत घालण्यासाठीं सज्ज झालेला दत्तोपंत आहे हें नजरेस येतांच बोवांचे हातपाय मोडले, कंबर खचली, व त्यांस आपला निकाल दिसूं लागला.

आतांपर्यंतच्या हकीकतीवरून बोवांवर किती प्रकारचे आरोप होते हें वाचकांना स्पष्टपणें कळून चुकलेंच आहे. आतां फक्त एकाच आरोपाचें

दिग्दर्शन करावयाचें आहे. तो ह्मणजे खुनाचा. नीतिभ्रष्ट झालेला मनुष्य स्वार्थरक्षणाकरितां कोणत्या घोर अत्याचारास प्रवृत्त होऊं शकतो याचें बोवा हें एक उदाहरण आहे. बोवांच्या योगसामर्थ्याला भुलून त्यांच्या पंथांत अनेक तरुणांनीं प्रवेश केला होता. असाच एक तरुण मुलगा योगसिद्धि-संपादनार्थ त्यांच्या आश्रयास गेला. या तरुणाचीं मातापितरें बालपणींच निवर्तलीं असल्यामुळें त्याच्या पालनाचा भार मामावर पडला. परंतु मामांच्या उपकाराची जाणीव विसरून यानें बोवांच्या चरणीं जीवित अर्पण केलें. आरंभीं कोणी स्नेही बोवांविषयीं साशंक बुद्धीनें कांहीं बोलल्यास यानें न चिडतां ह्मणावें, "बोवांचें वर्तन ठीक नाहीं असें दिसतांच त्याचा बभ्रा लोकांत करून बोवांची गठडी बांधीन हें तुह्मी पक्कें लक्षांत बाळगा. मी कोंकणस्थाचा बच्चा आहें." मंडळींनीं फक्त मान डोलवून प्रत्युत्तर द्यावें कीं, बाबारे एकदां तूं वाममार्गांत फसलास ह्मणजे स्वतःच्या अब्रूकरितां तूं बोवांना संभाळून घ्यायला लागशील. हा तरुण बुद्धीनें चलाख असल्यानें तो या योगमार्गांत शिरल्याबद्दल त्याच्या मित्रांना फार वाईट वाटलें. परंतु त्यानें आपली प्रतिज्ञा कायम राखली व बऱ्याच कालानंतर तो बोवांचीं गुप्त रहस्यें बाहेर काढण्यास सज्ज झाला. या वेळीं मित्रांच्या पृच्छेस उत्तर देतांना तो हरहमेश ह्मणे—"अरे, आमच्या महाराजांनीं योगसंप्रदाय उघडला नसून भोगसंप्रदाय स्थापन केला आहे. महाराजांच्या शिष्यशाखेंत योगवृद्धि होण्याऐवजीं भोगवृद्धि मात्र सपाटून झाली आहे."

महाराजांच्या कानावर ही वार्ता जाऊं लागली तेव्हां त्यांनीं त्यास एकीकडे बोलावून दपटशा दिला, पण त्यानें त्यास भीक घातली नाहीं. महाराजांनीं त्यास योगबलानें अमानुष शिक्षा करूं अशी भीति घातली. ज्याला महाराजांच्या योगाची व सामर्थ्याची खडान्‌खडा माहिती तो असल्या दटावणीला थाऱ्यावर बसविणार हें उघडच आहे व तसाच अनुभव बोवांना आला. इतकेंच नव्हे तर उलट बोवानांच स्वतःच्या योगाची इमारत हा कोंकणस्थाचा छावा जमीनदोस्त करतो कीं काय अशी धास्ती वाटूं

लागली. मग बोवांनीं साममार्गाचा अवलंब करून त्याची स्वतः व इतर शिष्यांकरवीं आर्जवें सुरू केलीं. त्यांनाहि तो दाद देईना. अखेरीस हा कांटा उपटण्याला त्यांना एकच उपाय दिसला व त्याप्रमाणें बोवा त्याच्या प्राणावर उठले. बोवा व त्याचे धाडसी शिष्य यांनीं मिळून त्याचा खून एका काळ्या रात्रीं ठाण्यास असलेल्या वैकुंठधामाच्या शाखेंत केला, व मोठ्या शिताफीनें त्याची वासलात लावून बोवा त्या काळजींतून मुक्त झाले. जवळपासच्या लोकांचा चौकसपणा बंद पडण्यासाठीं त्यांनीं अशी अफवा उठवून दिली कीं समाधि सिद्ध करीत असतां ब्रह्मरंध्रांत एकवटलेले प्राण खालीं परत उतरवितां न आल्यानें वरील शिष्याचा अंत झाला. लोक अजागळच. त्यांचें गुरुमहाराजांच्या खुलाशानें समाधान झालें, व ते गप्प बसले. परंतु असल्या कंडीनें त्या शिष्याच्या संप्रदायबाह्य मित्रांना बरें वाटलें नाहीं. कांहींजणांनीं बोवांची गांठ घेऊन आपल्या मित्राविषयीं चवकशी केली. अशा कित्येक प्रसंगीं बोवांनीं मृतशिष्याचे गुणानुवाद अघळपघळ गाऊन ओक्साबोक्सी रडूं लागावें. बोवांच्या असल्या अकांड-तांडवाला जवळच्या मंडळींनीं आपल्या समजुतीच्या गोष्टींनीं मदत करावी. हा प्रकार पाहून ते मित्र हिंपुटी होऊन घरीं परत येत.

मामाला जेव्हां भाच्याच्या मरणाची वार्ता कळली तेव्हां त्यानें तावडतोब या प्रकरणाची शहानिशा करावयास पाहिजे होती. परंतु तो एका महाराष्ट्रीय संस्थानिकापाशीं नोकर होता व भाच्याच्या मरणाची भानगड उपस्थित झाली त्याच वेळीं त्या संस्थानिकानें त्यास एक महत्त्वाच्या कामानिमित्त परदेशीं पाठविलें. त्यामुळें नाइलाज होऊन त्याला त्या वेळीं मिटतें घ्यावें लागलें. कामावरून परत आल्यावर त्यानें पुनः ही गोष्ट मनावर घेतली व चवकशीस सुरुवात केली. बोवांच्या पापाचा हंडा कांठोकांठ भरत आला होता असें ह्मणावयास हरकत नाहीं. तो शिष्य योगधारणा करीत असतां मेला या किंवदंतीनें बोवांविषयीं साशंक झालेल्या लोकांची समजूत पडेना. गुप्त रीतीनें याचा तपास पोलीसखातेंहि काढीत होतेंच. अखेरीस त्याचा उलगडा बोवांवर

असलेल्या खुनाच्या आरोपानें झाला. तो शिष्य संप्रदायाला कायमचा राम-राम ठोकून जातो असें पहातांच बोवांनीं आपलें ह्मणजे त्याच्या हत्येचें काम फत्ते होईपर्यंत लालूच दाखवून ठेवला. आपल्या जीवावर बेतेल इतका पोंच त्याला राहिला नाहीं, व या एका कारणानें तो बोवांच्या क्रूरपणास बळी पडला असा पुरावा बाहेर आला व या गुन्ह्याचें मापहि बोवांच्या पदरांत घातलें गेलें.

याप्रमाणें सगळा खटला संपला. न्यायमूर्तींनीं या बदमाष समाजघातकी पुरुषाला यथोचित शिक्षा फर्मावल्या. दत्तोपंताच्या कामगिरीबद्दल न्यायदेवतेनें त्याची पाठ थोपटून जयजयकार केला. गुरुमहाराज निजधामाला चालते झाले व गुन्हेगार शिष्यांनाहि आपआपल्या गुरुभजनानुसार कमीअधिक प्रमाणानें फलप्राप्ति झाली.

कोळसा उगाळावा तितका काळाच, या ह्मणीची यथार्थता वाचकांना हें प्रकरण वाचीत असतां अनुभवण्यास सांपडली असेल. बोवांचा सगळा चरित्रक्रम इतका गुंतागुंतीचा व घाणेरडा आहे कीं, त्याचा किळस आल्यावांचून रहाणार नाहीं. बोवांचें खरें स्वरूप निदर्शनास आणून देणें आमचें कर्तव्य होतें व तें आह्मीं बजावलें आहे.

सामान्य जनतेमध्यें पुष्कळ बाबींत सारासारविचाराचा अभाव असतो. एखाद्या माणसाला महत्त्व आलें ह्मणजे त्याविषयीं उदासीन वृत्तीनें सत्यासत्यतेची छाननी करण्याचें सोडून अविचारी निंदा अथवा तशीच स्तुति या दोन विरोधी टोकांचा अवलंब करण्याकडे सहज प्रवृत्ति होते. वेषधारी बोवांची सध्यां जी चांदरात झडत आहे तिच्या मूळाशीं लोकांची सारासारविचारशून्य श्रद्धा ह्मणजे अंधभक्ति आहे. इतर सर्व गोष्टींप्रमाणें आमच्या धर्माची स्थिति असमाधानकारक आहे याविषयीं कोणाचाच मतभेद नाहीं, परंतु ग्लानींतून धर्माला सांवरून धरण्याचा बहाणा करणाऱ्याचा हेतु खरोखरच तसा उदात्त आहे का धर्माच्या नांवाखालीं लोकांचा भोळेपणा आपल्या हिताकडे वळवून घेणारे ते स्वार्थसाधु नीच लोक आहेत याची चां-

गली खात्री झाल्याशिवाय वेडावून जाणें कधीं तरी इष्ट होईल काय ? धर्माबद्दल लोकांना वस्तुतः कळकळ वाटते का ? असा प्रश्न केल्यास शेंकडा किती जण अंतरात्म्याशीं बेइमानी न करतां छातिठोक रुकार देण्यास धजतील ?

---

## प्रकरण सव्विसावें.

## एकान्तांतलें भाषण.

गुरुमहाराजांच्या खटल्याची बातमी सर्व वर्तमानपत्रांतून सगळ्या महाराष्ट्रात पसरली. त्या वेळीं गुरुमहाराजांचें खरें रूप कळून त्यांच्या ठिकठिकाणच्या शिष्यशाखेंत मोठी गडबड उडाली. गुरुमहाराजांच्या कासोट्याचें तीर्थ प्राशन करणारे, त्यांचें उच्छिष्ट प्रसाद ह्मणून भक्षण करणारे, त्यांचें स्नान झाल्यानंतर मोरींतलें पाणी तुंबवून त्यांत त्या पाण्याला गंगा मानून लोळणारे, आपल्या बायकामुलींना निःशंकपणें गुरुजींच्या सेवेंत रात्रची रात्र राहूं देणारे, अतएव भक्तीच्या भरांत काय वाटेल तें करून बसलेल्या लोकांना स्वतःची मोठी फजीति झाल्यासारखें वाटून खजिल होऊन बसावें लागलें, त्यांना उजळ माथ्यानें समाजांत वागण्याचीहि मोठी मुष्किल पडूं लागली, हें निराळें सांगण्यास नकोच. गुरूच्या मठांत नित्य घडणाऱ्या अनेक अश्लाघ्य गोष्टींना उजेडांत आणण्याचा सपाटा चालला होता. स्तोत्यांचीं व निंदकांचीं आतां रणें माजून समाजाला अनायासेंच गंमत पहायाला सांपडली व त्याप्रमाणें या गुरूंच्या साथीवर लिहिण्यांत येणारा सर्व तऱ्हेचा मजकूर प्रत्येक साप्ताहिकांत, मासिकांत, अथवा अन्य स्थळीं कोठेंहि छापलेला असला तरी तो मनोरमा मोठ्या हौसेनें वाचीत असे. परंतु वर सांगितलेल्या रात्रीपासून तिच्या प्रकृतींत जो विकार झाला तो कोणत्याहि उपायानें कमी पडला नाहीं. त्या विकाराचा जोर रोजच्या रोज वाढत जाऊन तिच्या आयुष्याविषयीं चिंता उत्पन्न झाली.

तिच्या शुश्रूषेमध्यें दत्तोपंताच्या ओळखीनें आलेली नर्स अविश्रांत खपत असे. एके दिवशीं दुपारच्या वेळीं दत्तोपंत एकटाच बसला होता अशा प्रसंगीं मनोरमेनें त्यापाशीं बोलणें काढलें. त्या वेळची तिची आसन्न स्थिति व त्यांत तिचें करुणामिश्रित दीन भाषण ऐकून दत्तोपंताचें मन द्रवलें व अगदीं मोकळ्या मनानें त्यांच्या संभाषणाला सुरुवात झाली.

"पंत, आज पुष्कळ दिवस तुमच्या विषयीं माझ्या मनांत एक संशय येतो. बाळ मधुकराला मास्तर या नात्यानें तुह्मी आमचे घरीं आल्यापासून तो संशय उत्पन्न झाला. मी माझ्या मनांतून काढून टाकण्यासाठीं फार श्रम केले पण मला त्यांत यश येत नाहीं. जों जों त्याच्या निर्मूलनाचा प्रयत्न करावा तों तों त्याचें शमन होण्याऐवजीं तो जास्तच बळावतो. कोणता ह्मणून विचाराल तर सांगतें."

"मनोरमाबाई, तुमच्या मनांतला संदेह माझ्यापाशीं सांगून टाका. माझ्यांत सामर्थ्य असेल तर मी त्याचें निराकरण करीन."

"तो संशय तुमच्यासंबंधीं आहे."

"मग तर मजजवळ अवश्य तो सांगाच."

"मला तसें करण्याची उत्कट इच्छा असून लाज वाटते. मी तुमच्याकडे पाहूं लागलें ह्मणजे तुमच्या चेहऱ्यांत व बाळ मधुकराच्या चेहऱ्यांत अत्यंत साम्य असावेंसें वाटतें. तुमच्याकडे न्याहाळून बारकाईनें पाहिल्यास तर त्याबद्दल शंकाच उरत नाहीं. त्याच्या व तुमच्या चेहऱ्याची ठेवण अगदीं हुबेहूब सारखी आहे. त्यांत तफावत फक्त वयोमानामुळें काय झाली असेल ती. बाकी मासला एक."

"मग तुमचें ह्मणणें काय आहे?"

"माझ्यानें तें स्पष्ट सांगवत नाहीं. परंतु या प्रसंगीं मला आज सुमारें अकराबारा वर्षांपूर्वींची आठवण होऊन हृदयांत अगदीं कालवाकालव झाली आहे. पुण्यांत प्लेगाच्या धामधुमीचा नुकता आरंभ होता. त्या वेळीं

स्थलांतर हा त्या रोगावर एकमतानें उपाय ठरल्यामुळें तिकडून माझी बाळ मधुकरासुद्धां माहेरीं रवानगी करण्यांत आली. रोगाची झडप केव्हां व कोणावर पडेल याचा कांहीं नेम नव्हता. तिकडची व माझी ताटातूट झाली त्या वेळीं मी तसें करण्यास नाखुष होतें. आपण एकत्र राहूं, मग जें होईल तें होवो असा माझा निर्धार होता. पण तिकडून कांहीं ऐकणें झालें नाहीं. मला व बाळाला त्यांनीं दूर केलेंच. तो प्रसंग माझ्या डोळ्यांपुढें जशाचा तसा ह्मणजे आतांच घडतो आहेसा उभा आहे. स्टेशनवर आह्मांला पोंचविण्याकरितां स्वारी आली होती. गाडी चालू झाली तेव्हां तिकडून माझ्याकडे ज्या नजरेनें पहाण्यांत आलें ती नजर— छे. आतां त्या नजरेची आशा हवी कशाला. वियोगाच्या त्या क्षणीं प्रीतीच्या दृष्टींतून गळणारे ते अश्रुबिंदु— आतां तिकडची स्वारी जर माझ्याकडे पाहील तर त्या दृष्टींत माझ्या कृत्यामुळें आलेल्या क्रोधाग्नीच्या ठिणग्या मला जाळून टाकण्याकरितां उडत असल्याचें दिसेल. प्रीतीच्या रसानें ओथंबलेली ती नजर आज दुर्मिळ आहे. तो दिवस तो क्षण मला आतां आठवतो आहे. या सबंध आजारीपणांत माझ्या अंतर्यामीं तो काळ घोळतो आहे. मी माहेरच्या दारांत पाऊल ठेवलें न ठेवलें तोंच तिकडे रोगाच्या तापानें आजारी पडल्याची तार धडकली. मी तिकडची भेट घेण्यासाठीं पुष्कळ तडफडलें पण त्या वेळच्या माझ्या चांडाळ नातलगांनीं माझी त्यांची भेट होऊं दिली नाहीं. स्वारीजवळ शुश्रूषेला कोण होतें देवाला ठाऊक. तार आल्याबरोबर माझा दादा तिकडच्या भेटीसाठीं निघाला पण त्याला दहा दिवस क्वारंटाईनमध्यें रहावें लागलें. त्यानंतर तो जाऊन पहातो तों काय, घर बंद असून तिकडचा पत्ता नाहीं. आजारी स्थितींत तिकडच्या स्वारीला इस्पितळामध्यें नेण्यांत आल्याचें मात्र त्यास कळलें. पण पुढें काय झालें तें आज तागाईत कोणास ठाऊक नाहीं. माझ्या मनाला सध्यां अगदीं निश्चयानें असें वाटतें कीं. त्या वेळीं तिकडचा शेवट खास झाला नाहीं. ती मूर्ति निराळ्या रूपांत आतां माझ्या शेजारीं आहे. माझ्या अंतरात्म्यांत

उठणारा हा तर्क खरा असेल. महाराज आपणच ते असूं शकाल का ?"

मनोरमेच्या शेवटचा आवाज उतावीळपणाचा होता. दत्तोपंत स्तब्ध होते. जरासा वेळ शांततेंत गेल्यावर मनोरमा पुन्हां बोलूं लागली— "पंत, तुमचा माझ्या घरीं सेवक या नात्यानें संबंध जडल्या दिवसापासून माझें मन तुमच्याबद्दल वारंवार असेंच सांगत आहे. मध्यंतरीं रावसाहेबांचा व प्रो० वमेंड्यांचा तुह्मी उपमर्द करीत असां तरी देखील मला तुमचा कधींहि राग आला नाहीं. तुमचें स्वरूप आज अगदीं पालटल्यासारखें दिसतें आहे, पण त्यांत मूळची झांक साफ नाहींशी झाली नाहीं. एखादे वेळीं विवंचनेच्या भरांत झोंप लागली तर तिकडची स्वारी तुमच्या आजच्या रूपांत माझ्याकडे येत असल्याचें मीं अनेकवार स्वप्नांत पाहिलें आहे. पंत, तुह्मी आजपर्यंत माझ्यावर व माझ्या मुलावर जें अकृत्रिम प्रेम करीत आलां तें देखील माझ्या या समजाला बळकटी आणणारें आहे. दत्तोपंत, आतां मी फार दिवस या जगांत राहीनसें मला वाटत नाहीं. तुह्मांला परमेश्वराची शपथ घालून मी विचारतें, मला खरें सांगा. माझा संशय खोटा नाहींना ? माझी व तिकडची भेट होण्याचा सुयोग या आयुष्यांत असेल का ? पण मनोरमे, [येथून पुढें ती आपल्याशींच बडबडत होती] मनोरमे, तूं आपल्या कर्तव्याला जागलीस का ? नाहीं. नाहीं. दुष्ट लोकांच्या संगतीनें हुरळून तूं आपलें सतीत्व भंगलेंस. ईश्वराच्या दरबारांत महाराष्ट्रीय सतींना मिळणाऱ्या उज्वल मानाला काळोखी फांसलीस. मनोरमे, तुझ्याजवळ असा कोणत्या जबर पुण्याचा ठेवा आहे कीं, ज्याच्या जोरावर तूं पातकी असतांहि ईश्वराजवळ आपली दाद लावून घेऊं शकशील. पण नाहीं. ईश्वर जर खरोखरच कृतकर्माच्या पश्चात्तापानें होरपळणाऱ्या पापी जीवांचा कैवारी असेल तर या मनोरमेची— कर्तव्यभ्रष्ट मनोरमेची— ही अंतकाळची पतिभेटीची लालसा तो पुरवील, खास पुरवील. का पंत— तुह्मी आपलें गूढ उकलून सांगत नाहींना नाहींना—"

दत्तोपंताकडे या वेळीं तिची दृष्टि वळली पण तिच्यांत सौम्यपणा

नव्हता. दत्तोपंताच्या हृदयांत शिरून तेथून आपणास हवें असलेलें रहस्य ती शोधूनच काढते आहे कीं काय असा विलक्षण व अमानुष तीव्रपणा त्या नजरेंत भरला होता. नंतर तिनें एकदां विकट हास्य केलें. "माझी ठेव मला सांपडली. पंत, आतां लपविण्यांत कांहीं अर्थ नाहीं, तुह्मी– पण मी वेड्यासारखी या एकेरी नांवानें काय हांका मारतें आहें! अगदीं प्रत्यक्ष समोर असतांना असला हा आचरटपणा पाहून तिकडे काय ह्मणणें होईल ? महाराज !" फिरून ती हंसली.

आतांची बडबड अर्धवट भ्रमाचें लक्षण आहे हें दत्तोपंताच्या ध्यानांत आल्याबरोबर तिला एकटीला सोडून जावें असें त्यांच्या मनांत आलें. "बरें आहे, आतां तुह्मी जरा वेळ स्वस्थ निजा. झोंप झाल्यावर मला बोलावणें पाठवा." दत्तोपंत खुर्चीवरून हलले मात्र तोंच त्यांचें मनगट निर्मांस व क्षीण हातांत पडलें. त्या क्षीण पंज्याची पकड त्यांच्यासारख्या साधारण सशक्त माणसालाहि सोडविण्यास जड गेली. या मनोरमेच्या हातांत इतकें सामर्थ्य कोठून आलें याचा विचार करण्यांत त्यांचें मन गुंततें न गुंततें तोंच पुढील शब्द कानीं आले– "महाराज, या गरीब अभागिनीचा आत्मा ओळख न देतां तळमळत ठेवण्यांत आपणास मौज वाटते नाहीं ! मी खरोखर अपराधी आहें, पण अबलांचे अपराध थोरामोठ्यांनीं पोटांत घालावयास नकोत का ? आपण ह्मणाल तुझा अपराध अक्षम्य आहे. होय अक्षम्य आहे खराच. पण पतीच्या अनुग्रहाचें कवच अंगावर असल्यावर यमाच्या राजधानींत तापलेले सांडस, करवती, खिळे हातांत घेऊन शिक्षा करण्यासाठीं वाट पहात बसलेल्या यमदूतांनीं केलेले हाल मला जाचणार नाहींत; मी सगळे दंड भोगून शुद्ध झाल्यावर आपली वाट पहात तिष्ठत बसेन व मगच –आणि तेव्हांच– इहलोकींचा पसारा टाकून येत असलेल्या आपल्या आत्म्याला घट्ट मिठी मारीन."

दत्तोपंतांना काय करावें हें सुचेना. ही स्थिति जाणून ती पुन्हां त्यांस ह्मणते– "महाराज, माझा अपराध पोटांत घालून मला क्षमा करा, क्षमा

केली असें ह्मणा व आपल्या बाहूंत या तळमळणाऱ्या देहाला आश्रय द्या.''

''मनोरमे—'' दत्तोपंतांनीं जीभ चावली व ते गप्प बसले.

''तेंच कर्णमधुर नांव, व तीच हांक, महाराज मौन नको, तीच हांक पुन्हां उच्चारा. माझा अपराध मनांत येऊन आपण रागानें माझ्याकडे दांत-ओठ खात पाहिलें तरी मला त्याबद्दल वाईट वाटणार नाहीं. मला तिकडचें स्वरूप कोणत्याहि स्थितींत—मग ते प्रेमाच्या असो वा कोपाच्या असो—नजरेस पडलें तरी तें सुखकर वाटेल. महाराज, आपण शासन करण्यासाठीं हात उचलला व त्या हातांत या देहाचा घात करणारें शस्त्र असलें तरी तें मला प्रिय आहे. परंतु माझा अपराध मानवी शासनाच्या बाहेरचा आहे. त्याचा डाग घालविण्याचें सामर्थ्य इहलोकींच्या एकाहि रसायनांत नाहीं. त्याला ईश्वरी दंड पाहिजे. ईश्वरच फक्त तो कलंक धुवून टाकण्यास समर्थ आहे. महाराज, मी आपल्या प्राप्तीसाठीं सारखी तळमळत आहें व ती होण्याकरितां ईश्वरी दंड लवकर भोगून मी नरकांतून आपल्याकडे धांवत येईन. मग या परलोकीं जाणाऱ्या आत्म्याला आशीर्वाद देण्यांत आपण कसूर करूं नका— नका— या पापिणीकडे असल्या कठोर नजरेनें पाहूं नका— पण छे— असेच्च पहात रहा— त्या नजरेंतली आग प्रत्येक क्षणीं माझ्या पातकांचे कण जाळून भस्म करीत आहे. माझे प्राण या देहाचा त्याग करीपर्यंत त्या नजरेंत लवभर सुद्धां स्नेह शिरूं दिऊं नका. शिव शिव! त्या दृष्टींतला प्रखरपणा मावळला—''

दत्तोपंत आतां बोलूं लागले—''मनोरमे, तुझ्यापासून माझें आजपर्यंतचें गोप्य आतां झांकून ठेवीत नाहीं. ज्या प्रेमाचें तुला सध्यां स्मरण होत आहे त्या सलगीनें तुझ्याशीं वागण्याला माझें मन आज तयार नाहीं. ज्या वस्तूबद्दल मला अभिमानानें माझेपणा सांगतां येणार नाहीं तिच्याबद्दल प्रेम मनांत असूंच शकणार नाहीं. जुन्या पद्धतीच्या विवाहानें, तुझ्या मनावर, देहावर, नव्हे तुझ्या ऐहिक सर्वस्वावर आलेला माझा ताबा मधल्या घोटाळ्यांत संपला. परंतु माझ्या नाशानें तुझ्या वरचा माझा अधि-

कार भारत वर्षांतल्या— महाराष्ट्रांतल्या— आर्यधर्माच्या विधानानुसार तुटत नव्हता. पुनर्विवाहानें तुझ्यावर दुसऱ्या व्यक्तीची सत्ता लागू झाली. दोन वस्तूंवर विभागलें जाणारें प्रेम कृत्रिम नाहीं असें तूं तरी ह्मणशील ? धर्मानें स्त्रियांना एकाहून अधिक विवाह करण्याचा हक्क न दिल्यामुळें धर्मकारांना एक वेळ तूं जुलमी ह्मणशील. पण तुझ्या अंतःकरणाला पुनर्विवाह करतांना कांहींच कसें वाटलें नाहीं ? पापिणी, देहाचा विक्रय करणाऱ्या धंदेवाल्या स्त्रियांना आतां नांवें ठेवण्याचें कारणच नाहीं. ईश्वराच्या दयेनें तुला पुत्र होता. त्याचें संगोपन करण्याचें सोडून तूं स्वतःच्या सुखाकरितां धडपड आरंभलीस. त्या पोराला वळण कसें लागेल याचें तुला भय वाटलें नाहीं. आतां पश्चात्ताप होऊं लागला तेव्हां माझ्याकडून आशीर्वाद मागतेस ! निर्लज्जे, पृथ्वीच्या पाठीवर स्त्रियांचा कैवार घेऊन त्यांच्या स्वैराचारांचें समर्थन करणारा धर्म सध्यां प्रचलित आहे. त्या धर्माच्या लोकांची दुनियेंत भरभराट आहे; व्यभिचारी स्त्रीनें डोळ्यांत आसवें आणलीं ह्मणजे तिचा अपराध विसरून माफी द्यावयास प्रवृत्त करणारी त्या लोकांची सहनशीलता आह्मां हिंदूंना अगम्य आहे. कोणत्याहि हिंदूला— नव्हे मराठ्याला— नव्हे महाराष्ट्रीय ब्राह्मणाला ही गोष्ट आवडणार नाहीं. आज सगळ्या हिंदुस्थानांत— मी ह्मणतों सगळ्या जगांत— अगदीं अस्सल आर्यजात जर कोठें उरली असेल ती महाराष्ट्रीय ब्राह्मण होत. केवळ महाराष्ट्रच आर्यांचें आजचें वसतिस्थान व तेथील लोक हेच खरे आर्य असें मी अभिमानानें ह्मणेन. महाराष्ट्रांत सुधारणा करावयाची ती स्वतंत्र असावी. दुसऱ्याच्या नमुन्यावर नको. महाराष्ट्रांतील लोकांनीं याचा विचार करावयास पाहिजे. महाराष्ट्रांत सगळ्या जगानें धडा घेण्यासारखीं दंपत्यें निर्माण व्हावयास पाहिजेत. पतींनीं आपल्या वर्तनानें स्त्रियांच्या मनांत स्वतःविषयीं इतकें प्रेम उत्पन्न करावयास पाहिजे कीं, त्यांपैकीं कोणाच्याहि अंताबरोबर प्रेमाचा अंत होतां कामा नये, व स्त्रियांनीं सगळ्या ऐहिक वैभवाचा त्याग करून गतपतीच्या पारलौकिक कल्याणासाठीं झटणें जरूर आहे. आमच्या

धर्मांचा हेतु असाच आहे. पण स्त्रियांना त्याची जाणीव नसल्यामुळें धर्माच्या आज्ञा जबरदस्तीच्या वाटतात व त्याला पुरुष आपल्या वर्तनानें दुजोरा आणतात. पण असल्या महत्त्वाच्या गोष्टीची वाटाघाट मी तुझ्याजवळ कशाला करीत बसूं? मनोरमे, तुझ्या मनांत माझ्याविषयीं आलेला संशय अगदीं खरा आहे. ज्याच्याबद्दल तुझा पति असतांना तूं आपल्या मनांत निष्ठा बाळगीत होतीस व त्या प्रेमाला निरनिराळ्या ग्रंथांतून उदाहरणें देऊन रंग आणीत होतीस तोच तुझा– छे, छे, तुझा– आतां तुझा असें ह्मणून धन्यता मानण्याची लायकी तुझ्यांत नाहीं. हा नारायणराव तुझा सेवक बनून तुझ्याजवळ राहिला होता. मनोरमे, आतां प्रेम कसलें घेऊन बसली आहेस? मला बायकांच्या जातीचा तिरस्कार येऊन मी त्यांच्याकडे मत्सरानें पहात असें, पण या जगांत सगळ्याच स्त्रिया तुझ्यासारख्या नाहींत. तुझी सावत्र नणंद–माझी सावत्र बहीण, उमा आज स्वर्गामध्यें पतिनिष्ठ स्त्रियांमध्यें उच्चपदाचा मान भोगीत असेल. तिनें आपलें आयुष्य किती निर्मळपणानें घालविलें! ती सासरच्या त्रासानें तुझ्या आश्रयाला आली होती ना?"

"होय" मनोरमेनें मंद स्वरांत उत्तर दिलें.

"पण तिचा तूं धि:कार करून परत सासरच्या आगींत लोटलेंसना? ती माझी भगिनी उमा मोठ्या कष्टानें आयुष्य कंठीत होती. परमेश्वरा, इहलोकीं छळ झालेल्या सज्जनांना तूं आपल्या वैकुंठांत जागा देतोस ना? अशा एकनिष्ठ जीवांचा उद्धार हा झालाच पाहिजे. पण मी असा काय चरळतों आहें. मनोरमे, हा तुझा देह या बाहूंच्या आश्रयाला अपात्र आहे. तुझा देह रावबहादुरांच्या संगतींत भ्रष्ट झाला आहे. आतां तूं माझी नव्हेस आणि मी तुझा नव्हे."

"होय. आपण ह्मणतां तें खरें आहे. पतीच्या दर्शनानें अंतकाळीं कायमचें मिटण्यापूर्वीं समाधान पावणारे हे डोळे या भ्रष्ट शरीराप्रमाणेंच भ्रष्ट असून ते आपल्या नजरेनें आपल्या पुण्यांशाचा अपहार केल्यावांचून रहाणार नाहींत. महाराज, पातक केलें ही गोष्ट विसरून जाऊन आपण मजजवळ

एका गोष्टीचा खुलासा कराल का ?

"मनोरमे, बोल काय तें ?"

"आह्मां स्त्रियांना एकनिष्ठेच्या व्रतापासून पराङ्मुख करून पातकाकडे प्रवृत्त कोण करतात ? आह्मी स्त्रिया जातीनें असें करायला उद्युक्त होतों, का असें करण्याला पुरुषच आह्मांला आग्रह करतात, या प्रश्नाचा निकाल लागला ह्मणजे हल्लीं समाजांत चाललेल्या धामधुमींत दोषी कोण हें आपोआप ठरेल."

"मनोरमे, प्रांजळपणानें कबूल करायचें ह्मणजे शेंकडा नव्याणव हिश्श्यांनीं दोष पुरुषांकडेच येईल. जें शिक्षण द्यावयास पाहिजे, जें शिक्षण खऱ्या राष्ट्रसेवेंत गणतां येईल तें टाकून भलत्याच मार्गाचें पुरुष आज अवलंबन करताहेत. विधवांच्या विलापानें खरोखरी ज्यांना वाईट वाटत असेल त्यांनीं व ज्या विधवांना आपली दैवनिर्मित दुःस्थिति नकोशी झाली असेल त्यांनीं पाहिजे तर खुशाल पुनर्विवाहाचा गोंधळ घालावा. पुनर्विवाह हा वैषयिक सुखाभिलाषाचा दर्शक असल्यानें केव्हांहि गौणच गणला जाईल. परंतु मनोरमे, निर्मल पातिव्रत्यानें रहाणाऱ्या विधवांचें पुण्यतेज महाराष्ट्राच्या गांठीस पडत गेल्यास येथील प्रजा खरोखरीच राष्ट्रकार्यक्षम निपजेल असें मला वाटतें. आतां पुनर्विवाहाचा प्रश्न उपस्थित होण्यापूर्वी बायकांना वैधव्यदशेंत रहावें लागत असून आमचें राज्य कां गेलें असा प्रश्न यावर कोणी विचारतील. तर याचें कारण कदाचित् स्त्रियांची अज्ञानदशा ह्मणतां येईल. मग हल्लीं त्यांना सज्ञान करण्याचा कित्येकांचा प्रयत्न चालू असतां त्याविरुद्ध मी मधाशीं बोलून आतां पूर्वकालीन स्त्रियांच्या अज्ञानाबद्दल बोललों ह्मणून कोणी माझ्यावर दुटप्पीपणाचा आरोप ठेवतील. पण मी हल्लीं देण्यांत येणाऱ्या शिक्षणाविरुद्ध आहें. बायकांना त्यांच्या कर्तव्यांची जाणीव ज्याच्या योगानें उत्पन्न होईल, त्यांचें मन सुसंस्कृत होण्याला ज्याचा उपयोग, तेंच खरें शिक्षण असें माझें मत झालें आहे. चार दोन पुस्तकें घडाघड वाचतां येऊं लागलीं, अथवा उत्तम वळणदार व झरझर

लिहितां येऊं लागलें म्हणजे शिक्षणाचें कार्य संपत नाहीं. शाळेंत जाण्यानें गृहकृत्याकडे दुर्लक्ष होऊन स्त्रियांना आवश्यक अशा पुष्कळ बाबींत त्या नादान ठरतात. त्यांना पुरुषांचें कार्य करतां येण्यासाठीं ईश्वरानें खास निर्माण केलेलें नाहीं. देहाच्या रचनाभेदाप्रमाणें स्त्रीपुरुषांच्या कर्तव्यांत भेद असणें स्वाभाविक दिसतें व हल्लींचा लोकांचा प्रयत्न हा नैसर्गिक कर्तव्यभेद नाहींसा करण्याकरितां चालला असून आजपर्यंत महाराष्ट्राला लाभत असलेल्या गृहसुखांत विष मात्र कालविण्याचें काम होत आहे. उच्छृंखलतेकडे माणसाची स्वाभाविक प्रवृत्ति असते, व त्याच घातकी प्रवृत्तीला आमच्या धर्माची टवाळी करून आह्मी जास्त जोर देणें कधींच इष्ट होणार नाहीं. मनोरमे, हल्लींची सामाजिक उलथापालथ केल्याबद्दल मी पुरुषांनाच दोषी ह्मणेन व खरोखरीच पुरुष दोषी आहेत.''

मनोरमेच्या चेहऱ्यावर जरासें समाधान झळकूं लागून ती ह्मणाली—''महाराज, आपण राग मानीत नसाल तर आणखी विचारतें.''

''मनोरमे खुशाल विचार.''

''आपला माझा वियोग होण्यापूर्वीं आपण सुधारक मताचे नव्हतां का ? आपण स्वतःच पुष्कळदां पुनर्विवाहाचें समर्थन करून मला आपल्या पश्चात् सुखाचा भंग न करून घेण्याचा उपदेश करीत नव्हतां का ? ''

''मनोरमे, होय, मी स्वतः सुधारक होतों, मी पुनर्विवाहाच्या बाजूचा होतों, हें मी प्रांजळपणें कबूल करतों.''

''आह्मां महाराष्ट्रीय स्त्रियांच्या रक्तांत परंपरेनें खेळत असलेल्या पतिनिष्ठेमध्यें पुनर्विवाहाच्या दुर्विचाराचें विष कालविण्याचें काम आपणच केलेंतना ?''

''होय.'' दत्तोपंताच्या मनांत फारच खळबळ चालली होती.

''मग मीं खऱ्या सतीला न शोभेसें नादान कृत्य केलें याबद्दल दोषी कोण ?''

''मीच, मनोरमे, मीच.'' दत्तोपंतानें हे शब्द उच्चारले तेव्हां त्याची

जिव्हा अगदीं जड झाली होती.

"महाराज, मीं माझें पातिव्रत्य भंगलें तें जाणून बुजून. अर्थात् त्या पातकाच्या सर्व भार माझ्या एकटीच्याच शिरावर घेण्यास मी कबूल आहें. पुनर्विवाह करावा असें सभांतून मुक्त कंठानें ठांसून प्रतिपादन करणारांना आपल्या लेकीसुनांनीं हा मार्ग स्वीकारावा असें वाटत नाहीं. या गोष्टी फक्त लोकांना उपदेश करण्यासारख्या आहेत, स्वत: आचरण्यासारख्या नाहींत असें पुष्कळ सुधारकांना वाटत असतें. पुनर्विवाह हें एक पाप आहे असें प्रत्येक कर्तव्यनिष्ठ स्त्री सांगेल व महाराष्ट्रांत अजून पुनर्विवाहाच्या उपायानें साधणाऱ्या पतिसुखाला झुगारून पातिव्रत्यानें वैधव्याचे कष्ट भोगण्यास तयार असणाऱ्या हजारों स्त्रिया सांपडतील. आमच्यासारख्या स्त्रिया बोटावर मोजण्याइतक्याच आहेत."

दत्तोपंत स्वस्थ चित्तानें मनोरमेचा प्रत्येक शब्द ऐकत होते. मनोरमेनें आपलें बोलणें संपविल्यावर तीं दोघेंहि बराच वेळ गप्प होतीं.

नंतर मनोरमेचा जीव गडबडला व ती तडफडूं लागली. परंतु दत्तोपंताच्या प्रयत्नानें ती ताळ्यावर आली.

---

## प्रकरण सत्ताविसावें.

# दोन बातम्या.

मागच्या प्रकरणांत वर्णिलेलें संभाषण झाल्याला दोन दिवस झाले. मनोरमेची प्रकृति होती तशीच होती. तींत मुळींच फरक पडला नव्हता. रावबहादुरांचें व तिचें बिनसूं लागून दत्तोपंतांचें प्राबल्य वाढूं लागल्यापासून प्रोफेसर घमेंड्यांचें येणें जाणें अगदीं बंद झालें होतें. मनोरमा आजारी पडल्यानंतर ते तिच्या घरीं आले पण मनोरमेनें आपलीभेट घेण्याची नाखुषी दर्शविल्यामुळें ते रागानें तसेच निघून गेले. मनोरमेनें आपला पुनर्विवाह करण्याचा बेत ज्या दिवशीं वनितासमाजांत जाहीर केला होता, त्या दिवशीं

रमेच्या दिवाणखान्यांत प्रोफेसरसाहेबांच्या पांडित्याला हसणारा उद्धट गृहस्थच दत्तोपंत होय हें त्यांस कळल्यापासून ज्या घरांत आपला उपमर्द होतो त्या घरांत पाऊल न ठेवण्याचा त्यांचा निश्चय झाला होता. परंतु रावबहादुरां-विषयींचें त्यांचें प्रेम त्यांस आपला निश्चय डळमळावयास लावी. त्यानंतर एकदां रावबहादुरांच्या व आपल्या गौप्याचा दत्तोपंतानें मनोरमेदेखत संदिग्ध उच्चार केल्यापासून घमेंड्यांस त्यांचें फारच भय वाटूं लागलें. दत्तोपंतांचें तुर्तुक आपणास न दिसूं देण्याची त्यांनीं कंबर बांधली व तो हेतु सिद्धीस नेला. दत्तोपंत कोण हें स्पष्टपणें कळल्यानंतर त्याजपासून गोडीगुलाबीनें घमेंड्यांच्या ज्या कृत्यांचें त्यांनीं अस्फुट स्वरूप उघड केलें होतें तें काढून घेण्याचें मनोरमेचें मनोगत होतें पण मागलें संभाषण झाल्यानंतर तिसऱ्या दिवशीं सकाळीं दत्तोपंतानें स्वतःच तें गुह्य मनोरमेजवळ ओकून टाकलें.

त्या दिवशीं सकाळीं रोजच्याप्रमाणें प्रकृति पहाण्याकरितां दत्तोपंत मनोरमेच्या खोलींत गेले. पण त्या दिवशीं त्यांना थोडा उशीर झाला होता. प्रकृतीसंबंधीं चवकशी केल्यावर त्यानीं मनोरमेपुढें एक वर्तमानपत्र टाकलें व ते म्हणाले, "मनोरमे, पहा तुमच्या प्रोफेसर घमेंड्यांचे प्रताप. आजपर्यंत जेवढे म्हणून कट्टे सुधारक झाले त्या सर्वांवर प्रोफेसरांनीं ताण केली आहे. पहा या वर्तमानपत्रांत काय लिहिलें आहे तें."

"दुसरें काय असणार? क्षयाच्या व्यथेनें त्यांची बायको मेल्याचें मीं मागें एकदां ऐकलें होतें. त्यांनीं एखाद्या अनाथ गायीला उद्धरली असेल झालें!"

"व एवढेंच असतें तर मग सांगण्यांत काय अर्थ होता? या गोष्टीला आजकाल इतकें महत्त्व नाहीं. मी जें आज मुद्दाम एवढें सांगतों आहें त्यांत कांहीं तथ्य आहे. पहा तर खरें."

"वर्तमानपत्र हातांत धरून वाचतां येण्याइतकी माझ्यांत शक्ति नाहीं."

"मी वाचून दाखवितों."

"दत्तोपंत मोठ्यानें वाचूं लागले व मनोरमा लक्षपूर्वक ऐकूं लागली.

तो मजकूर असा—"आह्मांस कळविण्यास अन्यानंद वाटतो कीं, आमच्यांत लवकरच जातिभेदाचें उन्मूलन होऊन सगळी एकीच एकी होण्याचा रंग दिसतो आहे. जातिभेदामुळें आपसांत दुही माजून सुधारणेंत फार अडचणी उपस्थित होतात. हा जातिभेद अगदीं मोडून टाकण्याला एकच उपाय व तो हाच कीं, अठरा पगड जातींत रोटी व बेटीव्यवहार सुरू झाला पाहिजे. रोटीव्यवहारापेक्षां दुसरी बाब फार विचार करण्यासारखी महत्वाची आहे. बेटीव्यवहारानें सगळ्या जातींत एकी होण्यास फार सोपें जातें. अकबरानें रजपूतांशीं बेटीव्यवहार करून कसा सलोखा घडवून आणला हें तर आह्मी काय ह्मणतों याचें इतिहासप्रसिद्ध उदाहरण आहे. ही या गोष्टीची जबाबदारी ओळखून येथील + + + कालेजचे विद्वान् प्रोफेसर घमेंडे यांनीं या बाबतींत सर्वांच्या पुढें अघाडी मारली आहे.

"आह्मी काय ह्मणतों याचा अर्थ प्रोफेसर घमेंड्यांनीं जातिभेदाची शींव ओलांडून ब्राह्मणेतर ज्ञातींतील एका विधवा स्त्रीशीं विवाह केला हें कळविलें ह्मणजे समजेल. या बाईचें वय फार नसून तिशीच्या आंत आहे. यांचें थोडेंबहुत इंग्रजी व मराठी शिक्षण झालेलें असून स्त्रीविषयक वैद्यकीचेंहि यांस थोडेंसें ज्ञान आहे. शिवाय आज कित्येक दिवस त्या प्रोफेसर घमेंड्यांच्या मृतपत्नीच्या सेवेंत असल्यामुळें या नूतन दंपत्याला एकमेकाचा स्वभाव चांगल्या परिचयाचा झाला आहे.

"अशा तऱ्हेचे मिश्रविवाह आमच्या समाजांत जितके अधिक होतील, तितका राष्ट्रोन्नतीला फायदा होणार आहे. अशा तऱ्हेचे विवाह समाजांतील सुशिक्षितांना अमान्य नाहींत हें या प्रसंगीं हजर असलेल्या सन्मान्य व्यक्तींचीं नांवें वाचल्यानें तेव्हांच ध्यानांत येणार आहे." यापुढें डाक्टर, बॅरिस्टर, प्रोफेसर, वकील, लहानमोठे सरकारी अधिकारी, व्यापारी, इत्यादि इसमांची लांबलचक यादी होती.

"का मनोरमे, प्रो. घमेंड्यांच्या मनोधैर्याची कल्पना आली का?"

"प्रो. घमेंडे एखाद्या कुणबिणीशीं लग्न लावतील अशी माझी कल्पना

नव्हती. ही त्यांची कृति अगदीं अजब आहे खरी !"

"या कृतीच्या हकीकतीवर **भारतभाग्योदय** असा ठळक मथळा असून त्याखालीं "प्रशंसनीय विवाह" असें सदर घातलें आहे. समजलें का ?"

"पण हें लग्न जुळलें तरी कसें ? याचें व तिचें प्रेम जमलें कसें ? प्रेम अगदींच हिडिस बाई हें !"

"अगे हा या दोघांचा बेत आजचा नाहीं. प्रोफेसरांची बायको आज पुष्कळ दिवस आजारी होती, तिच्या तैनातीकारितां ठेवलेली मोलकरीण तुला ठाऊक आहेच."

"ह्मणजे, या लेखांत वर्णन केलेल्या जानकीबाई घमेंडे त्या त्यांच्या घरची "ठकी" कीं काय ?"

"मग तुला काय वाटतें आहे ? ती ठकी आज प्रोफेसरांचें अर्धांग बनून तिचें नांव जानकीबाई असें ठेवण्यांत आलेलें आहे."

"काय तरी बाई चमत्कार !"

"प्रोफेसरांची बायको आज पुष्कळ दिवस आसन्नमरण स्थितींत होती. तेव्हां तिच्या जीविताची निराशा झाल्यावर प्रोफेसरांनीं या बाईकडे प्रेमाचें संधान बांधलें. पुढें अपेक्षेप्रमाणें प्रोफेसरांच्या पूर्वपत्नीनें या जगाला एकदांचा रामराम ठोकला व घमेंड्यांचा संसार उघडा पडला. कांहीं दिवसांनंतर संसार सांवरण्याकरितां आपल्या दुसऱ्या यजमानांच्या मध्यस्थीनें इच्याशीं विवाह करण्याचें घाटूं लागलें. प्रोफेसरांना प्रथमतः हें रुचेना. प्रेमानें आपला पगडा बसविलाच. त्या प्रेमाची अखेर या लग्नानें झाली आहे."

"मला तर आश्चर्यानें वेडच लागण्याची वेळ आली आहे. घमेंड्यांच्या सारख्या शहाण्यासुरत्या माणसाच्या हातून अशा चुका कां होतात कळत नाहीं."

"मी तुह्मांला काय सांगूं ?" दत्तोपंताचा चेहरा गंभीर झाला. "अजाणपणें हातून कांहीं घडलें तर त्याला चूक ह्मणतां येईल. विवाहाचा हा सार्वजनिक विधि होण्यापूर्वींच अधीर प्रेमानें त्यांचा शरीरसंबंध घडवून आण-

त्यानें नाइलाज होऊन प्रोफेसरांना ती घोरपड अंगीकारावी लागली. ज्यांना हीं इंगितें ठाऊक नाहींत त्यांनीं खुशाल या मिश्रविवाहाचा गाजावाजा करावा. सामाजिक सुधारणेची जर कशानें पीछेहाट होत असेल तर ती असल्या अनैतिक उदाहरणांनीं. बाईसाहेब, हें लग्न ह्मणजे प्रेमाची आंधळी कोशिंबीर आहे."

"दत्तोपंत, मला तुमच्या बोलण्याचा अर्थ स्पष्टसा उमगला नाहीं. हरकत नसल्यास तो ऐकण्यासाठीं माझ्या मनांत उत्कंठा उत्पन्न झाली आहे."

"केवळ मिश्रविवाहाच्या तत्त्वाकरितां हा विवाह घडून आलेला नाहीं. हें घरगुती प्रेमाचें फळ लोकांत उघडकीस येण्याचा रंग दिसूं लागतांच बाईनें प्रोफेसरापाशीं लग्न करून आपल्या प्रीतीला लग्नाचें कायदेशीर स्वरूप देण्याविषयीं आग्रह धरला. प्रोफेसरांनीं प्रथमतः ही गोष्ट नाकारली. परंतु विनंति, आर्जव असल्या सामोपचारांना प्रोफेसर दाद देत नाहींत असें दिसतांच अब्रूकरितां बाईनें एका वकीलामार्फत नोटीस दिली. हा इलाज मात्र लागू पडला व प्रोफेसरांनीं इतक्या थरावर गोष्ट आली असें पाहून लग्नाचा शिष्टसंमत मार्ग पत्करला. अशी ही अंदरकी बात आहे. ही मला आज पुष्कळ दिवस माहीत आहे. तिची मीं मागें एकदां अस्पष्ट ओळख दिल्याबरोबर प्रोफेसर विरमल्याचें तुह्मांस आठवत असेलच." "शर्थ झाली बाइ आतां. असें असतांहि लोकांत याच्या अब्रूला कांहींच बाध येणार नाहीं!" मनोरमेनें विस्मयोद्गार काढला. "हीच तर मजा. आजची दुनियाच अशी आहे. लोकांत पुढें येण्याची इच्छा करणारांना उद्देशून एक विनोदी श्लोक संस्कृत भाषेंत आहे, त्यांत गाडगीं फोडावीं, वस्त्रें फाडावीं, गाढवावर बसून हिंडावें असा प्रसिद्ध होण्याला उपाय सांगितला आहे. पण आतां लोकांचे डोळे दिपविण्याला लग्नाचें एक मजेदार साधन अस्तित्वांत आलें आहे. पुनर्विवाह आतां जुना झाला असल्यानें लोकांना पुनर्विवाह करणारांची फारशी किंमत वाटत नाहीं. प्रोफेसरांनीं लोकांच्या तोंडीं होऊन बसण्याला असा सुंदर उपाय शोधून काढला आहे. परंतु या त्यांच्या राम-

मणाचा सुधारकपक्षाच्या लोकांना फारसा हर्ष झालेला नाहीं."

"ह्मणजे आतां आपण वाचला तो उतारा सुधारकाचाच ना?"

"होय पण या इरसाल सुधारकासारखें प्रोफेसरांच्या करणीनें भारतभाग्योदय होईल असें इतरांना वाटत नाहीं."

प्रोफेसरांच्या करणीबद्दल हा संवाद जसा मनोरमेच्या घरांत चालला होता तशीच या विषयाची चर्चा घरोघर चालली होती, व त्या चर्चेत नानातऱ्हेच्या इतर गोष्टीहि बोलणारांच्या तोंडून बाहेर पडत असत. प्रोफेसरांचें व त्यांच्या नूतन विजातीय कुटुंबिनीचें परस्परावर अकृत्रिम प्रेम असून नाटकांतून अथवा कादंबऱ्यांतून आढळणाऱ्या प्रेमांतील रोमान्सचें हें एक ढळढळीत उदाहरण आहे असे उद्गार कांहींच्या तोंडांतून निघाले. कांहीं जणांचें मत वेगळे पडे. ते ह्मणत, "मराठ्यांच्या अंगांतलें क्षात्रतेज व प्रो. घमेंड्यांचें ब्रह्मतेज अशा दोन्ही तेजांचें एकीकरण मिश्र सामर्थ्याची संतति जन्मास आणील व तीं बाळें आपला पराक्रम सगळ्या जगाच्या निदर्शनास आणून मिश्र विवाहाचें महत्त्व लोकांना दाखवितील असा अंदाज करण्यास हरकत नाहीं व एवढाच हेतु प्रोफेसरांच्या करण्यांत असावा."

रोजच्या व्यवहाराहून भिन्न व अनपेक्षित असें कांहीं घडलें ह्मणजे त्यावर आपल्या बुद्धीनें कोटिक्रम लढविणें हा समाजाचा स्वभावच असतो. त्यांत ज्याचा जितका मगदूर असेल तितका तो तर्क कुतर्क काढण्यांत मजल मारील ही गोष्ट उघड आहे. प्रो. घमेंड्यांचा मिश्रविवाह जसा ज्याच्या त्याच्या नोंडीं झाला होता तितक्या प्रमाणांत नव्हे पण कांहीं थोड्याशा प्रमाणांत लोकांना करमणुकीखातर बोलायला एक दुसरा पुनर्विवाह नुकताच घडला होता. तो विवाह ब्राह्मण ज्ञातींतलाच असून वराचें प्रथम लग्न व वधूचें द्वितीय लग्न अशी त्यांत मौज होती. या लग्नाचा प्रस्तुत कथानकाशीं वस्तुतः कांहींच संबंध नाहीं पण या दोन्ही लग्नांचें पर्यवसान एकाच वेळीं मोठ्या विचित्र तऱ्हेनें लोकांसमोर आल्यामुळें तो येथें नमूद करणें इष्ट वाटलें.

"लग्नाचें पर्यवसान" हे शब्द वाचून वाचक थोडेसे घोटाळ्यांत पडतील.

लग्नाचें पर्यवसान कशांत व्हायचें ? असा प्रश्न ते आपल्या मनाशीं करीत नानातऱ्हेचीं निदानें काढण्यांत त्यांना सोडून आह्मांला दुसरी एक महत्त्वाची गोष्ट सांगणें जरूर वाटतें आहे.

हीं दोन्ही लग्नें झालीं तेव्हां त्यांची बातमी ऐकायला मनोरमा जिवंत होती पण त्यांचा शेवट पहाण्याचें तिच्या नशीबीं नव्हतें. केलेल्या कृत्याबद्दल ती आपल्या मनाशीं झुरून अखेरीस तिचें अवसान झालें. परंतु तत्पूर्वीं आपला पूर्वपति आपणास वेषांतरानें कां होईना पण भेटला ह्मणून तिला दुःखांत सुख वाटत होतें.

मरणापूर्वीं चार पांच दिवस तिनें दत्तोपंतापासून त्यांच्या सगळ्या चारित्राचा खुलासा करून घेतला होता व अंतकाळ जवळ ठेपलासें पाहून दत्तोपंतास आपल्या पुत्राचें योग्य संगोपन करण्याची शपथ घालून तसें वचनहि मिळविलें होतें.

दत्तोपंतांना आतां या जगांत जगून काय करायचें असें औदास्य वाटूं लागलें. आपणहि लवकर यमपुरी गांठावी तें बरें, असे ते कधीं कधीं उद्गार काढीत असत, पण मधुकराला योग्य शिक्षण देण्याची जबाबदारी त्यांवर पडल्यानें तो योग्य महाराष्ट्रीय कसा होईल याची चिंता त्यांच्या मागें होती. त्याच्या मनावर मध्यंतरींच्या सांसारिक गडबडीनें अनेक अनिष्ट परिणाम झाले होते व त्या सर्वांना निर्बीज करण्याचें फार अवघड काम अंगावर घेऊन तें ते बजावीत होते.

दत्तोपंतांनीं आपल्या समक्ष आपल्या पत्नीचा पुनर्विवाह कां होऊं दिला, असें गूढ पुष्कळ वाचकांना पडण्याचा संभव आहे. दत्तोपंताला इस्पितळांत जो अनुभव आला त्यामुळें त्याचें मन मनुष्यजातीविषयीं अगदीं विटलें. आजारीपणांत त्याचे त्या स्थळीं अतिशय हाल झाले परंतु केवळ दैवाच्या अनुग्रहानें त्या महत्संकटांतून तो वांचला. त्यांतून सुटका झाल्यावर त्यानें सबंध हिंदुस्थानांत प्रवास केला. निरनिराळ्या प्रांतांतील सुधारणेचें कार्य व त्याचे परिणाम पाहून त्याला या चळवळीचा विलक्षण

तिटकारा उत्पन्न झाला. परंतु आपणहि आपलें पूर्वायुष्य द्रव्याच्या बळावर असल्याच थेरांत घालविल्याचें स्मरण होऊन तो अनेकदां विषण्ण होत असे. अखेरीस आपल्या सहवासांत सुधारणाविषयक मतें तयार झालेल्या आपल्या पत्नीचा चरित्रक्रम आपल्या मागें कसा चालला आहे तो तटस्थ वृत्तीनें पहावा अशी एक आकांक्षा त्याच्या मनांत उद्भवली व तेवढ्याच एका कारणानें त्यानें चाललेला सर्व प्रकार सहन केला, व मनोरमेच्या खाजगी वागणुकीची माहिती मिळविण्याकरितां त्यास ओळखणाऱ्या एका जिवलग मित्राच्या साह्यानें त्यानें स्वत:च्या घरीं स्वत:च्या मुलाची मास्तरकी पत्करली. त्यामुळें मनोरमेच्या चरित्रावर काय परिणाम घडले तें वाचकास विदित आहेच.

समाजांत चालणाऱ्या घडामोडींनीं दत्तोपंताच्या मनाचें औदास्य बरेंच दूर होत असे व हल्लीं त्यांच्या मनाला प्रकरणाच्या आरंभीं निर्देश केलेल्या लग्नाच्या पर्यवसानाची धामधूम चांगलीच करमणूक करीत असे.

लग्नाचें पर्यवसान कशांत व्हायचें ? मुलाबाळांचा गोतावळा वाढून पतिपत्नीच्या प्रेमाची वृद्धि होण्यांत; असेंच या प्रश्नाला उत्तर मिळणार. पुनर्विवाह झाला तरी परिणाम एकच व्हावयाचा. मग आह्मी 'पर्यवसान' असें वेगळें काय सांगणार ?

प्रो. घमेंडयांचें लग्न जसें विचित्र तसाच त्याचा शेवटहि विचित्र झाला. या लग्नाची चर्चा नुकतीच कोठें थंडावत चालली होती, तों त्यांच्या विजातीय कुटुंबाच्या पहिल्या धन्यानें आपली बायको पळविल्याचा खटला कोर्टांत आणला व लोकांत नवीनच गडबड निघाली. ठकी महाडिक ऊर्फ जानकीबाई घमेंडे यांना त्यांचे बांधव प्रोफेसरांशीं होणाऱ्या लग्नाची कुणकुण कळल्यापासून तसें न करण्याबद्दल उपदेश करीत होते पण सर्वांच्या डोळ्यांत धूळ टाकून नामधारी ब्राह्मणाच्या अर्धांगाची पदवी त्यांनीं पटकावलीच. त्यांच्या या कृत्याचा चांगला सूड उगविण्यासाठीं ते सगळे भग्नप्रयत्न झालेले बांधव जळफळत होतेच. कर्मधर्मसंयोगानें तशी एक

नामी संधि आपण होऊन चालत आली. ठकीचा नवरा कांहीं कारणानें वरीच वर्षें तुरुंगांत गेला होता तो याच सुमारास सुटला. हा मराठा युनिव्हर्सिटीच्या पहिल्या परीक्षेपर्यंत शिकलेला होता. तो केवळ ब्राह्मणेतर ज्ञातीचा असल्यानें त्याला विशेष अडचण न पडतां सरकारी नोकरी मिळाली. पैसे मिळूं लागल्यावर स्वारी लग्नाचा बेत करूं लागली, परंतु जिच्याशीं लग्न करावयाचें ती मुलगी साक्षर असावी अशी याची अट होती. मराठे ज्ञातींत शिकलेले पुरुष सांपडण्याची मारामार मग मुली अथवा बायका तर कोठून मिळणार ? शेवटीं याचा निर्धार सिद्धीस गेला व बऱ्याच काळानें एक बरीच शिकलेली मुलगी यास मिळाली. पुढें या रंगेल माणसानें तिला सुइणीच्या कामाचें शिक्षण मिळण्याची खाजगी तजवीज केली व ठकूबाईला वैद्यकीची थोडी माहिती मिळाली. परंतु या दंपत्याचा संसार फार दिवस चालला नाहीं. त्या माणसाला दारूचें अनिवार व्यसन लागलें व सरकारी नोकरींतून अर्धचंद्र मिळाला. पुढें व्यसनार्थ द्रव्य मिळविण्याकरितां तो गुन्हे करूं लागला. ती प्रवृत्ति वाढून तो अखेरीस कांहीं भयंकर अपराधांत सांपडला व त्याची तुरुंगांत रवानगी झाली. तुरुंगांतून मुक्त झाल्यावर त्यास आपल्या बायकोच्या नव्या पुरुषार्थाची वार्ता कळली. तो बायको सोडविण्यासाठीं प्रोफेसराकडे गेला व प्रथमतः आपली हकीकत सांगून आपली बायको परत करण्याबद्दल विनवूं लागला त्या वेळीं ती बया आरामखुर्चीवर पडून नव्या भ्रताराशीं गप्पा मारीत होती. तिनें त्याचा नवरेपणा साफ नाकारून हा कोणी तोतया असावा असें सुचविलें. तेव्हां त्या गड्याला अतोनात संताप चढून त्यानें तिचा हात धरला व फरफर ओढण्यास सुरुवात केली. या वेळीं धक्काबुक्कीला आरंभ झाला. प्रोफेसरांना त्या आडदांड माणसाशीं मस्ती करण्याची धमक नव्हतीच. त्यांनीं ताबडतोब कालेजच्या शिपायाला हाक मारण्याकरितां पोबारा केला. शिपाई गोळा करून घरीं परत येईपर्यंत दहा पंधरा मिनिटें निघून गेलीं व तेवढ्या अवकाशांत इकडे काय झालें होतें ? शिपाई दाराशीं आले तेव्हां त्यानें ठकूताईचा अंबाडा

ओढून प्रोफेसरांची फिरावयास जातांना हातांत घेण्याची काठी तिच्या पाठीवर पिंजून टाकली होती. जानकीबाई घमेंडे तोंडानें शिमग्यांतल्या महाशब्दांची गर्जना करीत होत्या व तो तिला लाथाबुक्यांनीं तुडवीत होता. इतका वेळ त्यानें जसा आपल्या सत्तेच्या बायकोचा समाचार घेतला तसाच कालेजच्या शिपायांनींहि त्याला मुष्टिमोदकांचा यथेच्छ प्रसाद दिला. प्रोफेसरांनींहि चांगली मर्दुमकी गाजविली.

प्रोफेसरांनीं त्या रानटी माणसाला मारून घालविल्यानंतर जानकीबाईंना कोणी सशास्त्र यजमान होता कीं काय त्याबद्दल विचारलें. त्यांनीं आपला नवरा मेल्याला पुष्कळ वर्षें झालीं व हा इसम कोण आपणास ठाऊक नाहीं असा जबाब दिला. पण प्रोफेसरांच्या घरीं झालेल्या या गोंधळाची बातमी चहूंकडे होते न होते तोंच प्रोफेसरांवर त्या गृहस्थानें आपली बायको पळवून नेल्याची फौजदारी फिर्याद केल्याची वदंता चोहोंकडे पसरली.

प्रोफेसरांच्या मागें हें नवीन दुष्ट लागलें. जानकीबाईनें जरी त्या इसमास आपला नवरा नाहीं असें ठरविलें होतें तरी कोर्टांत साक्षीपुरावा झाल्यावर तो तिचा नवरा ठरला व जानकीबाईनेंहि अखेरीस तो नवरा असल्याचा कबूलीजबाब दिला. शेवटीं कोर्टानें प्रोफेसराची बायको त्या आडमुठ्या माणसाची बायको ठरविली व तो बहाद्दर गडी तिला मोठ्या दिमाखानें घेऊन प्रोफेसरांच्या डोळ्यादेखत कोर्टांतून चालता झाला.

प्रोफेसरांच्या मिसळीच्या लग्नाचें असें पर्यवसान झालें. त्यानंतर प्रोफेसरांनीं उत्तरहिंदुस्थानांतल्या एका महाराष्ट्रीय संस्थानांत नोकरी धरून सध्यां अज्ञानवासांत कालक्रमणा चालविली आहे.

आमच्या कथानकाशीं साक्षात् संबंध नसलेल्या दुसऱ्या एका साध्या पुनर्विवाहाची हकीकत मागें एकदां वाचकांच्या कानावर घालून ठेवली आहे. त्या विवाहाचा परिणाम अशाच तऱ्हेच्या फौजदारी खटल्यांत झाल्यामुळें आम्ही त्याविषयीं सांगण्यास उद्युक्त झालों. तो विवाह झाला तेव्हां वर कऱ्हाडा, व व देशस्थ अशी सामान्यतः समजूत झालेली होती. त्या

वधूवरांच्या विवाहसमयीं, मनोरमेच्या पुनरुद्वाहप्रसंगीं उल्लेखिलेले संस्कृत-भाषाभिज्ञ व प्रोफेसर घमेंड्यांचे परात्परगुरु हजर होते. त्यांनीं वधूला व वराला सुधारकी अहेर करून शुभ आशीर्वाद दिले होते. पुनर्विवाहाच्या प्रसंगीं साजरा करण्याचा मक्ता घेतलेली शाळा, वकीली, वैद्यकी, व्यापार, इत्यादि सर्व धंद्यांतली ठराविक मंडळी हजर होती व त्या सर्वांचे आशीर्वाद होते. पण ढोरें मारण्याच्या कामांत कावळ्याचे शाप जसे निष्फळ तसेच यांचे आशीर्वाद होत. त्या आशीर्वादांत मंगल घडवून आणण्याचें सामर्थ्य नव्हतें. लग्न झाल्यानंतर दोन तीन महिन्यांनीं ह्मणजे प्रोफेसर घमेंड्यांच्या लग्नाचें पर्यवसान होत असतांना या विवाहाची अखेर झाली, पण ती घरगुती स्वरूपाची नव्हती. न्यायासनाच्या चवाठ्यासमोर त्याची चवकशी चालली होती.

या विवाहांतला वर कऱ्हाडा अथवा अन्यशाखी ब्राह्मण नसून ब्राह्मणेतर होता असें निकालांत ठरलें, व त्याप्रमाणें त्यास शिक्षा झाली. त्या विधवेला एका पुनरूढ गृहस्थानें घरीं बाळगून तिचा विवाह घडवून आणला होता. परंतु या देशस्थ विधवेशीं लग्न लावणाऱ्याच्या जातिकुळीची त्याच्या भपक्यानें भुलून ह्मणा अगर इतर कांहीं कारणानें ह्मणा पुरी चवकशी न होऊन त्या विवाहातुर विधवेनें ब्राह्मण समजून भलत्याच्याच गळ्यांत माळ घातली व पुढें हें सर्व गौडबंगाल उघडकीस येऊन त्या बदमाष गृहस्थास यथोचित शिक्षा झाली. त्या विधवेनें लोकनिंदा दुःसह झाल्यामुळें विष खाऊन आत्महत्या करून घेतली.

---

# प्रकरण अखेरचें.

## हारांतलीं फुलें.

आह्मी आतांपर्यंत ज्या सामाजिक कथानकाचा हार गुंफीत आलों, त्यांतील मानवी चरित्राच्या ठळक ठळक फुलांच्या व्यवस्थेंत गुंतल्यामुळें त्या मुख्य फुलांना शोभा आणणाऱ्या इतर पुष्कळ फुलांकडे आमचा कानाडोळा झाला आहे. त्यांना या कथासूत्रांत ओवून आह्मी आपल्या लेखणीला विश्रांति देण्यास आतां सिद्ध झालों आहों.

मनोरमेचें चरित्र रेखाटीत असतां तिच्या एका वडील नातलगाला आह्मी या कथेच्या रंगभूमीवर आणून सोडलें आहे. ती व्यक्ति कोण हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल.

विष्णुपंतदादा यांनीं बालपणापासून आपलें आयुष्य कष्टांत काढलें. त्यांना आपल्या वयाच्या पंधराव्या सोळाव्या वर्षी शिक्षणाला तिलांजली देऊन पोटाचा धंदा स्वीकारावा लागला. रेलवे खात्यांत त्यांनीं तीस वर्षे नोकरी केली. नोकरीच्या वर्षांइतक्याच राणी सरकारच्या मुखवटा छापाच्या रुपेरी टिकल्यांचें दरमहा त्यांस वेतन मिळत असे. यांची कांहीं शेतीवाडी होती पण अज्ञानदशेंत बाप वारल्यामुळें त्यांच्या भाऊबंदांनीं ती दाबली व हे आपली जन्मभूमि सोडून मारवाड्यांप्रमाणें एक वस्त्र आणि एक पात्र यांनिशीं रोजगार पहाण्यासाठीं निघाले. पुण्यास आल्यावर त्यांच्या एका सुखवस्तु नातलगानें आश्रय देऊन विद्याभ्यासाची सोय लावली. पण सातव्या यत्तेच्या परीक्षेत युनिव्हर्सिटीनें त्यांस एकदोनदां खितपावयास लावल्याच्या योगानें हा आश्रय सुटला. ते पुण्यास असतांना त्यांच्याजवळ त्यांच्यासारखाच एक कफल्लक चुलतभाऊ शिकत होता. यानें युनिव्हर्सिटीच्या परीक्षांच्या भानगडींत न पडतां सरकारी छात्रवृत्तीचा अवलंब करून लष्करी खात्याच्या हॉस्पिटल असिस्टंटची जागा पटकावली. कर्मधर्मसंयोगानें याला करारा-प्रमाणें लष्करी नोकरी करावी लागली नाहीं. कोणा एका गुजराथेंतल्या

संस्थानिकाला औषध देण्याचें काम यांच्याकडे येऊन त्यांत यश मिळाल्या-मुळें त्या संस्थानिकानें यांस आपल्या कुटुंब वैद्याची जागा दिली. तेथें सदाशिवरावांना पैशाचा यथास्थित लाभ होऊन त्यांनीं पुण्यास एक जंगी घर बांधलें व कांहींशी स्थावर जिंदगीहि करून ठेवली.

पुण्यांत घर बांधण्याचें काम विष्णुपंतांच्या अंगावर पडलें व त्यांनीं आपल्या करारी बाण्यास अनुसरून तें चोख रीतीनें पार पाडलें. याच सदाशिवरावांचे चिरंजीव आरंभींच्या प्रकरणांत उल्लेखिलेले नारायणराव होत. त्यांचें पुढें काय झालें तें सर्वांना ठाऊक आहेच.

भावाच्या घरांतून निघावें लागलें तरी विष्णुपंतांना सदाशिवराव बहुमान देत असत. विष्णुपंतांचें व त्यांच्या भावजयीचें पटत नसे. सकाळपासून रात्रीपर्यंत घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीची हजेरी घेऊन विष्णुपंत ताशेरा झाडीत व हें त्यांचें करणें घरांतल्या इतर मंडळींना आवडत नसे. ती भावजय तर नेहमीं ह्मणे– "भाऊजींचें तोंड घाण हो, नाहीं तर त्यांच्यासारखा माणूस लाखांत मिळावयाचा नाहीं." पण त्यांच्या तोंडापुढें कोणाचा उपाय ?

आपण नोकरी देखील फार बाणेदारपणानें केली असें वारंवार सांगत असतात. चार चार कारकुनांचें काम ते एकटे रेटीत व तेंहि पुनः बिनबोभाट. नोकरीवर असतांना यांनीं अत्यंत काटकसरीनें ह्मणजे जवळ जवळ चिकूपणानें वागून बराच पैसा गांठीस मारला होता व त्या पैशाच्या व्याजावर ते आपल्या तिघां मुलांसह टुकीनें संसार चालवीत होते. त्यांनीं तीन लग्नें केलीं पण तिन्ही बायकांनीं अल्पवयांत स्वर्गाचा मार्ग धरल्यामुळें सध्यां ह्मातारपणीं त्यांना स्वतःचा भात शिजविल्याखेरीज घांस मिळण्याची मारामार असे. आपल्या सारखा वस्ताद काम करणारा माणूस मिळायचा नाहीं अशी त्यांना मोठी घमेंड असे. पण एकदां यांनीं एका गवळ्याबरो-बर कागदपत्रावांचून भोळेपणानें हात उसनवार सोळाशें रुपयांचा व्यापार करून त्यांत सपशेल ठोकर खाल्ली ! तें कसें झालें तें मात्र त्यांचें त्यांसच ठाऊक.

नोकरी सुटल्यानंतर आज चवदा पंधरा वर्षे ते घरींच बसून आहेत व याच काळांत त्यांनीं बरेंच महत्त्व संपादन केलें होतें. दुसऱ्याच्या उपयोगीं पडावें असा एक यांचा नियम असे व त्यामुळें आळशी लोकांना आपआपलीं कामें करुन घेण्याला विष्णुपंत हें एक मोठें साधन झालें होतें. याखेरीज विष्णुपंतांना इतर कामेंहि रगड असत. घरीं बसल्या बसल्या ते वर्षाचे कांहीं जानव्याचे शंभर सवाशें जोड करून विकीत असत. याशिवाय घरांतल्या फुटक्या कांचा जपून ठेवून त्या कुटून त्यांची वस्त्रगाळ पूड करून तिचा रांगोळीसारखा उपयोग करण्यासाठीं ते गिऱ्हाइक भेटल्यास विकीत असत. याशिवाय आणखी पुष्कळ उद्योग त्यांस असत. त्याच्या रिकामटेकड्या धंद्यांप्रमाणें त्यांचीं मतेंहि मोठीं ऐकण्यासारखीं असत.

त्यांचा धर्मग्रंथ ह्मणजे गुरुचरित्र; व त्यांत स्त्रिया व पुरुष यांच्या कर्तव्याकर्तव्यांचें विवेचन केलेले अध्याय तर त्यांस अगदीं मुखोद्गत असत. त्यांच्या आधारानें ते सामाजिक सुधारणेच्या मुद्द्यावर वाद करीत. हल्लींच्या एकंदर प्रकाराविरुद्ध त्यांचीं मतें होतीं. विधवांनीं कोणतें व्रत आचरावें अशासंबंधीं ते गुरुचरित्राचे दाखले देत. पुरुषांच्या सुधारणेची गोष्ट निघाली ह्मणजे त्यांचें मन अगदीं खवळून जाई. ते ह्मणत "गुरुचरित्रांत त्याचा कोठेंहि उल्लेख नाहीं. सकाळीं उठले न उठले तों या लोकांना चहा प्यायला पाहिजे. या चहानें तर सगळ्या लोकांच्या प्रकृतींचें मान अशक्त करून टाकलें. लोकांत ऐषआराम फार वाढला. धर्म नकोसा झाला आणि त्याला हे सुधारक उत्तेजन देत असतात. इंजनांत स्टीम भरल्यावांचून जशी त्याची गति थंड, तशीच चहावांचून माणसांची चलनवलनाची शक्ति नष्ट झाल्यासारखी आहे. या चहांत काय आहे? प्रातःस्नान नको, व्यायाम नको, आणि ह्मणे आह्मी राष्ट्राचा उद्धार करतों. माझें वय आज पांसष्ट वर्षांचें आहे पण मी दिवसांतून तीस मैल मजल मारूं शकतों. अंगमेहनतीच्या कामानें माणसांना नेहमीं तरतरी रहाते. आह्मी पांढरपेशे लोक चांगलें अन्न खातों पण अशक्त असतों, आमची प्रजा रोगी मेषपात्र असते. पण नुसती भाजी-

भाकरी खाऊन इतर लोकांची ताकद कशी असते. आह्मी सात्विक अन्न खात असतांहि ते आमच्याहून जाड्याभरड्या अन्नानें धडधाकट कां असावे? लोकांत कुवत राहिली नाहीं. बालविवाह नको असें कांहीं लोक ह्मणतात, कारण तसें केल्यानें प्रजा अशक्त होते. पण प्रौढ विवाह करणारांची संतति कुठें धट्टी कट्टी आहे? कुणब्यांत तर फारच लहानपणीं लग्नें होतात पण ते आमच्यापेक्षां किती तरी पटीनें कणखर असतात. लोकांनीं आपल्या गरजा वाढवून निष्कारण त्या भागत नाहींत ह्मणून ताप मागें लावून घेतला आहे. साधी रहाणी ठेवल्यास आह्मी कांहीं मरत नाहीं.''

साहेबाचें आह्मी अनुकरण करतों यासंबंधानें त्यांचें मत असें होतें--- साहेबांची रहाणी, त्यांचा वरवरचा भपका आह्मी घेतला तर आमचें कार्य होणार नाहीं. त्यांची कर्तबगारी पोषाखांत नाहीं. त्यांचे गुण पहाण्याऐवजीं त्यांच्या विलासांतच आह्मी गुंगून गेलों आहों. हें आमच्या विनाशाचें लक्षण आहे.''

एकदां एका जिल्ह्यांत दुष्काळ पडला होता व त्यासंबंधीं विचार करण्यासाठीं एक कमिटी नेमलेली असून खुद्द दुष्काळग्रस्त प्रांतांतून गुरें मरतात याची तक्रार करण्याकरितां पुष्कळ लोक जमा झाले होते. त्या प्रसंगीं त्या स्थळीं विष्णुपंत गेले. तेव्हां गुरांच्या मरणाची तक्रार करणाऱ्या लोकांच्या डोक्यावर जरीचे रुमाल व इतर थाटाचा पोषाख पाहून स्वारीचें पित्त भडकलें व ते ह्मणाले, ''तुमच्याकडे पाहिलें तर तुह्मी चांगले संपन्न दिसतां. तुह्मी शेतकरी लोक आहां. तुमची संपत्ति ह्मणजे तुमचीं गुरें. ती संपत्ति जतन करण्याचें सोडून तुह्मी आपलें शरीर शृंगारीत बसलां तर त्या गुरांनीं तरी जगावें कसें? आदल्या वर्षीं धान्य सांठवून या वर्षाचें पीक निघाल्यावर त्याचा उपयोग करायचा अशी तुमच्या वाडवडीलांची रीत होती. ते नुसत्या लंगोट्या लावून सुखी होते आणि तुह्मांला लेको चांगली सुस्थिति मिळाली असून तुह्मीं रडगाणीं गातां? अरे कांहीं तरी लाज बाळगा. तुमच्या जमीनींची मेहनत मशागत करण्याचे कामीं खपणाऱ्या या मुक्या जनावरांची

तरतूद करण्याकडे तुह्मी आपल्या शरीरशृंगारापेक्षां जास्त लक्ष पुरविलें असतें तर त्यांचे प्राण वांचून तुह्मांसहि लोकांपुढें तोंड वेंगाडून, दांत विचकून, आपल्या अडचणींची दाद लावून घेण्याचा प्रसंग खास आला नसता. अगदीं वेळच्या वेळीं पाऊस कधींच पडत नाहीं. मला समजूं लागल्यापासून तरी या गेल्या पन्नास वर्षांतला माझा अनुभव असाच आहे. तीन चार वर्षांनीं एकदां पाऊस चांगला पडतो."

"पूर्वीपेक्षां हल्लीं महागाई वाढली आहे व प्रजा दिवसेंदिवस कंगाल होत चालली आहे. तरी आमच्यांत ऐषआराची कमतरता नाहीं. तूप हल्लीं अतिशय महाग झालें आहे तरी लग्नाकार्यांत तुपाचा अतिशय नाश करण्यांत येतो. लग्नाकार्यांत अन्न किती वाया जातें याचा कोणीच विचार करीत नाहीं या मंगल कार्यांतल्या मिरवणुकींना ब्यांड नसला तर बायकांना आईबाप मरण्याइतकें दुःख होतें. त्यांना मिरवणुकींत एकहि पाऊल उल्हासानें टाकवत नाहीं व लग्नगर्दींत या ब्यांडवाल्यांचे दर ताशीं पन्नास रुपयांपर्यंत चढतात. आतषबाजी हा एक मंगलकार्य साजरा करण्याचा मार्ग बनला आहे. दारू उडवून आपण पैशाचा अपव्यय करतों हें कोणाच्याच ध्यानांत येत नाहीं."

"न खाल्ल्यानें माणूस मरणार नाहीं पण खाण्यानेंच वेळेस घात होण्याचा संभव आहे. पोटास लागणाऱ्या आहारापेक्षां नेहमीं दोन घांस कमी खावें. अपचन हें रोगाचें मूळ आहे. कमी खाल्ल्यानें अपचनाचें भयच उरत नाहीं."

जर्मनीतील डा. कुन्ह्यांनीं औषधावांचून रोगी बरे करण्याचा उपाय शोधून काढला आहे व तो ह्मणजे गार पाण्याचा मारा. खरूज येवो, ताप येवो, लचक भरो, जखम होवो, एकूण एक शारीरिक अपायांवर गार पाण्याचा उपाय. या उपायाचा लोकांत प्रसार व्हावा ह्मणून विष्णुपंतांना मोठी हांव. त्यामुळें ते वेळीं अवेळीं आपल्या उपायाचा निर्देश बोलतां बोलतां मध्यें घुसडीत असत. त्यांच्या या योजनेचें लोकांत नेहमीं हंसें होत असे.

तथापि त्याची पर्वा न करतां ते आपल्या औषधाच्या उपयुक्ततेचा गौरव करण्यास कधींहि चुकत नसत.

"लहान मुलांना शिक्षण देतांना लाड कामाचे नाहींत, त्यांची नेहमीं माराशींच गांठ ठेवली तर तीं तरतरीत बनतात. इंग्रजींतील Spare the rod and spoil the child" ही म्हण अगदीं सार्थ आहे. आपल्यांतहि "छडी वाजे छम् छम् विद्या येई घम् घम्" अशी म्हण आहे तीहि व्यर्थ नाहीं. हल्लीं शाळांतून दिलें जाणारें शिक्षण कुचकामाचें आहे. त्यांची पद्धति चुकीची आहे. आमच्या लहानपणीं परोचा झटल्याशिवाय एक दिवस सुना जात नसे, पण हल्लीं पोरांना उजळणी नकोशी झाली आहे. अकर्कीएकोत्रींत गणितशास्त्राचें बीज आहे. उलटी सुलटी उजळणी मुलांना यायला पाहिजे. हल्लीं पहावें तों हें सगळें सुटलें व मुलांना वस्तु दाखवून शिक्षण देण्याची सोपी युक्ति निघाली आहे. लहानपणीं मुलांची बुद्धि दाखविलेल्या वस्तूचे गुणधर्म ओळखण्याइतकी प्रगल्भ झालेली नसते. त्यांना वस्तु दाखवून काय उपयोग? त्यांच्याकडून घोकंपट्टीच करून घेतली पाहिजे. पुढें मुलें मोठीं झाल्यावर लहानपणीं घोकलेल्या गोष्टी चांगल्या कळूं लागतात. माझ्या हातांत जर एखादी शाळा दिली तर मी तेथलीं पोरें कशीं चिमखड्यासारखीं करून दाखवितों. पूर्वीं एकाच मास्तराच्या ताब्यांत एक सबंध वर्ग असे. सर्व विषय त्या एकट्यानें शिकविण्याची त्यावर जोखीम असे. आपला वर्ग इतर मास्तरांच्या वर्गापेक्षां हुशार ठरावा म्हणून मास्तरांत फार चढाओढ असे. मुलें चांगलीं तयार करण्यासाठीं ते जातीनें झटत. पण हल्लीं निरनिराळ्या विषयावर निरनिराळे मास्तर नेमण्याची चाल सुरू आहे. त्यामुळें शाळेंतल्या वर्गाचें काम बेजबाबदारपणानें चालतें" असा शिक्षणविषयावर त्यांचा अभिप्राय असे.

"ऐषआराम टाका, साधे व्हा" हा यांच्या खाजगी व्याख्यानांचा इत्यर्थ असे. यांना तीन मुलांसुद्धां स्वतःच्या पोषणाची व्यवस्था व्यांकेंत ठेवलेल्या द्रव्याच्या व्याजावर करावी लागत असे. त्यामुळें स्वयंपाक, भांडीं

घासणें, दळणकांडण हीं गृहकृत्यें स्वतःच्या श्रमावर भागवावीं लागत, नव्हे तसें करण्यावांचून त्यांना गत्यंतरच नव्हतें. पण या सर्व घरगुती कामांना त्यांनीं सद्गुणाचें स्वरूप दिलें होतें. बाजारांतून आणलेले असडी तांदुळ शिजवून ते निर्वाह करीत व हें केवळ कांडण्याचा त्रास चुकविण्यासाठीं त्यांना करावें लागे. परंतु लोकांशीं बोलतांना असडी तांदुळ सकस असतात व तसेंच खाणें आरोग्याला फारच इष्ट असा त्यांचा सिद्धान्त असे. बाहेर दळण देण्याची त्यांची ऐपत नव्हती ह्मणून ते रोज पहांटेस ज्वारी, बाजरी दळून टाकीत; ह्मणून दळण्यासारखा व्यायाम नाहीं, प्रत्येकानें दररोज दळावें असाच उपदेश ते विनदिक्कत करीत असत. सारांश या व इतर अनेक कामा-काजांना, तीं नाइलाजानें करावीं लागत ह्मणून ते उपयुक्त उद्योगांच्या सदरांत घालीत. इंग्रजींत to make virtue of necessity अशी एक ह्मण आहे, त्याची यथार्थता त्यांच्या वागणुकींत अगदीं बरोबर दृष्टीस पडे.

त्यांचें हें चरित्र अगदीं त्रोटक आहे. असो. नारायणराव ह्मणजे त्यांच्या चुलतभावाचे चिरंजीव स्वतःसिद्ध झाल्यानंतर विष्णुपंतांचा त्या घराशीं संबंध अगदीं तुटल्यासारखा झाला होता. परंतु महत्त्वाच्या प्रसंगीं त्यांनीं आपल्या मदतीची वाण नारायणरावांस कधीं पडूं दिली नाहीं. नारायण-रावांची प्लेगाच्या धामधुमींत गति लागल्यावर स्वेच्छाप्रवृत्त मनोरमेच्या वाटेस ते फारसे जात नसत व ज्या एक दोन वेळीं त्यांनीं तिच्या घरीं पाऊल ठेवलें ते प्रसंग मागेंच वर्णिले आहेत. मनोरमेच्या पुनर्विवाहित पतीची वाट लागल्यावर ती आजारी पडली तेव्हां दहा पांच वेळ ते तिच्या समाचाराला गेले पण त्यांच्या मनांत तिच्याबद्दल पूर्ण तिरस्कार वसत अस-ल्यामुळें या भेटीच्या वेळीं ते अगदीं तिऱ्हाइतासारखे वागत होते. दत्तो-पंताचें गूढ त्यांना अखेरपर्यंत कळलें नाहीं. मनोरमा आटपल्यावर ते मधु-कराविषयीं चवकशी करण्यास मधून मधून जात असत.

* * *

उमा ही आमच्या कथेंतील एक प्रमुखपैकीं पुष्प असल्यामुळें तिचा इतिहास सांगतांना तिच्या सासरची हकीकत मागें सुटली आहे. "कांहीं दिवस सासूचे व कांहीं सुनेचे" या ह्मणीप्रमाणें गणूभाऊ भाव्यांच्या घरांत स्थित्यंतर झालें होतें. सासूचा अंमल संपून गणूभाऊंच्या तृतीय पत्नीच्या अनुषंगानें घरांत कारभार चालला होता. गणूभाऊंना आपल्या आईचा व वहीणीचा तिटकारा आला असून यांचे पूर्वकाळीं कंठमणि असलेल्या भटजींविषयीं त्यांचें मन साफ नव्हतें. आईचे व त्याचे अलीकडे उघड उघड तंटे चालत व त्या तापट ह्मातारीला एका अकल्पित प्रसंगामुळें वेड न लागतें तर घरांत मोठाच घोटाळा माजला असता. एके दिवशीं सकाळचे प्रहरीं गणूभाऊ कोठून बाहेरून आपल्या खोलीच्या दारांत आले तों आपल्या पत्नीच्या ट्रंकेचें कुलूप फोडण्याच्या घाईत असलेली त्यांची मातुःश्री त्यांस दिसली. त्यांना अतोनात संताप आला. आईचें त्यांच्याकडे लक्ष नव्हतेंच. ते एकदम ओरडले, "आई, हा काय कारभार चालविला आहेस !" पार्वतीबाईंना एकदम धडकी भरली व त्या सपाट्यांत चळ भरला. त्यांची सारासार विचारशक्ति नष्ट झाली त्या दिवसापासून त्या वेड्या झाल्या व साऱ्या दिवस "लक्ष्मी काया ते" याखेरीज अन्य शब्द त्यांच्या वाणीला पारखे झाले. आईची अशी दशा झाली तरी गणूभाऊंनीं तिचा संभाळ केला. परंतु वेडेपणांत त्यांनीं पुष्कळ हाल भोगले व त्या कष्टांतच कांहीं वर्षांनीं या जहांबाज बाईची इतिश्री झाली.

दुसऱ्याची वस्तु लांबविण्याच्या कामांत पार्वतीबाई पुऱ्या वाकबगार होत्या. त्यांच्या चरित्राची रजा घेण्यापूर्वीं एक सहज आठवलेली गोष्ट येथें नमूद करणें इष्ट वाटतें. एकदां कोणा एका भाऊबंदाच्या लग्नासाठीं या व यांची इतर नातलग मंडळी लग्न असलेल्या खेडेगांवीं जाण्यास निघाली. बैलगाड्यांशिवाय त्या गांवीं जाण्याला दुसरें कांहीं साधन नव्हतें. मार्गांत एके ठिकाणीं गाड्यांचा मुक्काम पडला. शहरच्या मंडळींना सभोंवतालच्या

घासणें, दळणकांडण हीं गृहकृत्यें स्वतःच्या श्रमावर भागवावीं लागत, नव्हे तसें करण्यावांचून त्यांना गत्यंतरच नव्हतें. पण या सर्व बरगुती कामांना त्यांनीं सद्गुणाचें स्वरूप दिलें होतें. बाजारांतून आणलेले असडी तांदुळ शिजवून ते निर्वाह करीत व हें केवळ कांडण्याचा त्रास चुकविण्यासाठीं त्यांना करावें लागे. परंतु लोकांशीं बोलतांना असडी तांदुळ सकस असतात व तसेंच खाणें आरोग्याला फारच इष्ट असा त्यांचा सिद्धान्त असे. बाहेर दळण देण्याची त्यांची ऐपत नव्हती ह्मणून ते रोज पहांटेस ज्वारी, बाजरी दळून टाकीत; ह्मणून दळण्यासारखा व्यायाम नाहीं, प्रत्येकानें दररोज दळावें असाच उपदेश ते विनदिक्कत करीत असत. सारांश या व इतर अनेक कामा-काजांना, तीं नाइलाजानें करावीं लागत ह्मणून ते उपयुक्त उद्योगांच्या सदरांत घालीत. इंग्रजींत to make virtue of necessity अशी एक ह्मण आहे, त्याची यथार्थता त्यांच्या वागणुकींत अगदीं बरोबर दृष्टीस पडे.

त्यांचें हें चरित्र अगदीं त्रोटक आहे. असो. नारायणराव ह्मणजे त्यांच्या चुलतभावाचे चिरंजीव स्वतःसिद्ध झाल्यानंतर विष्णुपंतांचा त्या घराशीं संबंध अगदीं तुटल्यासारखा झाला होता. परंतु महत्त्वाच्या प्रसंगीं त्यांनीं आपल्या मदतीची वाण नारायणरावांस कधीं पडूं दिली नाहीं. नारायण-रावांची प्लेगाच्या धामधुमींत गति लागल्यावर स्वेच्छाप्रवृत्त मनोरमेच्या वाटेस ते फारसे जात नसत व ज्या एक दोन वेळीं त्यांनीं तिच्या घरीं पाऊल ठेवलें ते प्रसंग मागेंच वर्णिले आहेत. मनोरमेच्या पुनर्विवाहित पतीची वाट लागल्यावर ती आजारी पडली तेव्हां दहा पांच वेळ ते तिच्या समाचाराला गेले पण त्यांच्या मनांत तिच्याबद्दल पूर्ण तिरस्कार वसत असे-त्यामुळें या भेटीच्या वेळीं ते अगदीं तिऱ्हाइतासारखे वागत होते. दत्तो-पंताचें गूढ त्यांना अखेरपर्यंत कळलें नाहीं. मनोरमा आटपल्यावर ते मधु-कराविषयीं चवकशी करण्यास मधून मधून जात असत.

* * *

परिस्थितीची मोठी मौज वाटून बहुतेक सगळी मंडळी इकडे तिकडे हिंड-ण्यांत रमली. पार्वतीबाई या वेळीं दुसरेंच एक काम साधीत होत्या. त्यांच्या एका नातलगाच्या सामानांत कांहीं उंची किंमती पदार्थ होता. त्यावर डल्ला मारण्याच्या संधीची गांवाहून निघाल्यापासून त्या सारखी वाट पहात होत्या व तशी वेळ त्यांना आतां सांपडली. त्यांनीं तिचा फायदा घेऊन हातचलाखीनें ती वस्तु त्या मालकाच्या सामानांतून नाहींशी केली. दुर्दैवानें ती वस्तु गेल्याचा बोभाटा झाला. पार्वतीबाईसारख्या पोक्त वयाच्या स्त्रीवर नांव घेण्याचें धाडस कोणांतहि नव्हतें. पार्वतीबाईखेरीज असलें काम कोणी करणार नाहीं असें प्रत्येकाला वाटे, पण चोर म्हणून पार्वतीबाई-वर आरोप घालण्याला कोणी धजेना. अखेरीस एकानें हिय्या करून या बाईखेरीज ती वस्तु गेलीच नाहीं असे उद्गार काढले. पार्वतीबाईच्या तों-डाचा सपाटा सुरू झाला, तो कोणासहि ऐकवेना. जो तो हिला पिसाळून सोडणाऱ्या व्यक्तीवर उलटून सावरासावर करूं लागला. पण तो गृहस्थ पडला खमंग, त्यानें पार्वतीबाईस "बाई तुह्मी जर साव आहांत तर तु[मचें] सामान तपासूं द्याल का ?" असा प्रश्न केला. पार्वतीबाईंनीं त्यास एकद[म] रुकार दिला. त्यांना वाटलें होतें कीं, असें केल्यानें सगळी मंडळी विरम[तील] व आपल्या सामानाला प्रत्यक्ष हात कोणीच घालणार नाहीं. कल्पन[ा] अगदीं साधी होती, पण तिचा प्रयोग लागू झाला नाहीं. पार्वतीबाईचें सर्व सामान त्या गृहस्थानें झाडून पाहिलें तों खरोखरीच त्यामध्यें सदर जिन्नस बिनचूक सांपडला.

* * *

आईला वेड लागल्यावर मथुराताईचें व त्यांच्या भावजयीचें पटे[ना]. त्यांनीं भटजीबरोबर काशीयात्रेला जाण्याची परवानगी भावाजवळ मा[गि]तली व भावानें ती त्यांस दिली. मथुराताई व भटजी काशीयात्रेला नि[घून] गेलीं पण पुढें त्यांचा पत्ता नाहीं.

* * *